३०

ॐ

रावसाहेब मल्लप्पा वसप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैव-लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ २५ वा.

श्रीमन्नीलकंठ नागनाथाचार्य कृत

# वीरमाहेश्वराचारसंग्रह

## भाग ३ रा.

हा

वे. शा. सं. रंगाचार्यशास्त्री कृत महाराष्ट्र भाषांतरासह

वेदमूर्ति, मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं सोलापूर येथें

'श्रीदत्तप्रसाद' स्टीमप्रेसमध्यें छापवून प्रसिद्ध केला.

---

आवृत्ति १ली प्रती १०००.

---

शके १८२९, सन १९०७.

---



---

किंमत १॥ रुपये.

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

## वीरशैवलिंगिब्राह्मण धर्मग्रंथांविषयीं महामहोपाध्याय शिवकुमार पंडित यांचा अभिप्राय.

स्वस्ति श्रीमत्सु पारमेश्वरमाहात्म्यप्रख्यापकग्रंथ रत्नप्रख्यापन व्यापारानुमित लोकोत्तरोमासहायपरमेश्वरविभुचरणारविंदभक्तिभाजनेषु मल्लप्पाराव महोदयेषु ॥

परश्शतधन्यवाददानपुरःसरम् द्वाविंशतिसंख्याकानां शैवग्रंथानां मूर्तिमद्भगवत्प्रसादरूपाणां महतान्वेषणेनापि दुर्लभानां अनायासप्राप्त्या नितांतं हृदयसंतोषं आवेदयते ॥

वाराणसी क्षेत्रवास्तव्यः
पंडित शिवकुमारशर्ममिश्रः
महामहोपाध्यायः

विक्रमार्क संवत् १९६४ वैशाखकृष्ण तृतीयायां इयं लिपिः

### वरच्या संस्कृताचें मराठी भाषांतर :—

कल्याण असो. श्रीशिवपरवस्तूचें माहात्म्यप्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांची प्रसिद्धि करीत असल्यामुळें सर्वोत्कृष्ट पार्वतीपरमेश्वरांच्या चरणारविंदी असलेल्या सद्भक्तीची कल्पना अनुमानानें सहज येते. अशा सद्भक्तीला पात्र झालेल्या मल्लप्पाराव महोदय यांच्या विषयीं अनंतवेळां धन्यवाद करतों. आणि बावीस शैवग्रंथ आपण पाठिविले ते मूर्तिमान परशिवाचा प्रसादच मिळाला असें समजतों. व पुष्कळ प्रयत्न केले तरी ग्रंथ मिळणें फार मुष्किलीचें असून मोठ्या प्रयासानें असले ग्रंथ मिळवून आपण प्रसिद्ध करून निरायासानें त्या ग्रंथांचा लाभ मला करून दिला यामुळें माझ्या मनाला अत्यंत संतोष वाटतो.

वाराणसीक्षेत्रवासी.
पंडित शिवकुमारशर्ममिश्र.
महामहोपाध्याय.

विक्रमार्क संवत १९६४ वैशाखकृष्ण तृतीयेच्या दिवशीं ही लिपि लिहिली.

# प्रस्तावना.

ऐतिहासिकदृष्टीनें पाहिलें असतां सदाचाराच्या योगानें मनुष्य परमोच्च-पदवीला पोंचतो असें निर्विवादपणें आढळून येतें. मानवांमध्यें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असे चार वर्ग पूर्वीं झाले आहेत धर्माला आचारच मुख्य कारण आहे. या ब्राह्मणांचे आचार वेदांत, स्मृतींत, आगमांत ठिकठिकाणीं वर्णिलेले आहेत. सारांश असा कीं उत्तम पद मिळवावयास सदाचारच अवश्यक आहे. कलीस अनुसरून कोणत्याही मतांतील (द्वैताद्वैतविशिष्टाद्वैतमतांतील) ब्राह्मणांच्या आचारांची फारच शोचनीय स्थिति दिसून येत आहे. याप्रमाणेंच दिवसानुदिवस आचाराचा लोप झाला असतां जगांतील ब्राह्मणवर्ग निःसंशय नामशेषच होईल. याकरितां प्रत्येक मतांतील ब्राह्मणांनीं सदाचारानें वागून आपलें ब्राह्मण्य ढळूं न देणें हें त्यांचें आद्य कर्तव्य होय. त्याचप्रमाणें स्वमत-ग्रंथांचें अध्ययन व अध्यापन केल्यानें आचारामध्यें सुधारणा होईल अशी आमची समजूत आहे. याकरितां आमच्या वीरशैवलिंगिब्राह्मणांकरितां "वीर-माहेश्वराचारसंग्रह" नांवाचा ग्रंथ छापून प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथांत वीर-माहेश्वरांचे आचार, विचार उत्तम रीतीनें सांगितलेले आहेत. त्यांचें येथें थोडें दिग्दर्शन करतों, षट्स्थलकथन, षट्स्थलज्ञानाचें महत्त्व, भस्मोत्पत्ति कथन, रुद्राक्षधारणमहिमा, शिवपूजेचें महत्व, शिवपूजा करण्याच्या स्थानाचें महत्व, शिवाभिषेकमहत्व, पूजासामुग्रीमाहात्म्य, करपीठाचें वर्णन, वगैरे महत्वाचे विषय यांत आलेले आहेत. या विषयांची आमचे ब्राह्मणाला अवश्यकता किती आहे हें सहज कळून येईल. वाचकांनीं असा महत्वाचा ग्रंथ अवश्य वाचून त्याचा उपयोग करावा अशी सूचना नम्रपणें करून प्रस्तावना पुरी करतों.

या ग्रंथाचें मराठी भाषांतर वे० शा० सं० रंगाचार्यशास्त्री मुधोळकर यांनीं केलें आहे. प्रूफतपास ग्रंथ शुद्ध करणें वगैरे कामें वे० मू० जगदीशशास्त्री नालवार व वे० मू० मल्लिकार्जुनशास्त्री जैनापूर हिरेमठ व वे० शा० सं० रंगाचार्यशास्त्री मुधोळकर यांनीं केलीं आहेत.

या ग्रंथाची मूळप्रत वे० मू० मल्लिकार्जुनशास्त्री जैनापूरकर यांनीं दिली या बद्दल यांसर्वांचे आह्मी आभारी आहों.

प्रसिद्धिकर्ता.

# वीरमाहेश्वराचारसंग्रह भाग ३ रा.

## विषयानुक्रमणिका.

अध्याय ५० वा.



अध्याय ५१ वा.



अध्याय ५२ वा.



अध्याय ५३ वा.



अध्याय ५४ वा.



अध्याय ५५ वा.

अध्याय ५६ वा.



अध्याय ५७ वा.



अध्याय ५८ वा.



अध्याय ५९ वा.



अध्याय ६० वा.



अध्याय ६१ वा.



अध्याय ६२ वा.

### अध्याय ७४ वा.



### अध्याय ७५ वा.



### अध्याय ७६ वा.



### अध्याय ७७ वा.



### अध्याय ७८ वा.

# संस्कृत शुद्धिपत्रक.

| पान. | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | ४ | नेक्षते | नेक्षेत |
| १३ | ५ | सा | स |
| १५ | ४ | तत्व | तत्त्व |
| १५ | १५ | चौरो | चोरो |
| १७ | २ | न्नृणाम् | न्नृणाम् |
| २३ | २ | तत्व | तत्त्व |
| २६ | ११ | सन्यासिनो | संन्यासिनो |
| ३३ | १२ | चेलास्थि | चैलास्थि |
| ३९ | ६ | रद्रध्यायी | रुद्राध्यायी |
| ४० | १५ | सद्य | सद्यः |
| ४७ | ३ | तत्वैकरसा | तत्त्वैकरसा |
| ४७ | ७ | लैंगे | लैंग्ये |
| ४८ | ५ | वशक्तितः | वशीकृतः |
| ४८ | ७ | परीक्ष्येत | परीक्षेत |
| ५५ | ९ | मेकाश्यं | मेकास्यं |
| ५८ | ४ | तत्वेन | तत्त्वेन |
| ७० | ५ | विधेयताम् | विधीयताम् |
| ७६ | ८ | पतिमेव | पीतमेव |
| ९० | ९ | विस्तराद्वक्तुं | विस्तराद्वक्तुं |
| ९६ | २ | सहस्रांश | सहस्रांशं |
| ९७ | २ | धत्तर | धत्तूर |
| १०८ | ९ | मवाष्यैव | मवाप्यैव |
| १४८ | १५ | कुर्यान्द्रेय | कुर्याद्रेय |
| १६१ | ५ | मंत्रैस्त्रिशूलिने | मंत्रैस्तुशूलिने |
| १६२ | ५ | सचेलं | सचैलं |

| | | | |
|---|---|---|---|
| १६३ | १० | वृत्यर्थं | वृत्त्यर्थं |
| १६४ | ३ | तत्व | तत्त्व |
| १७८ | १४ | गतोपिऽवा | गतोऽपिवा |
| १८७ | ३ | कारितोसकृत् | कारितोऽसकृत् |
| १९४ | २ | सुश्रूषा | शुश्रूषा |
| १९५ | १२ | म्रीयंते | म्रियंते |

## मराठी शुद्धाशुद्धपत्रक.

| पान | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३ | १५ | तत्वं | तत्त्वं |
| १४ | १५ | तत्वमसि | तत्त्वमसि |
| १३६ | २३ | मुद्रान्न | मुद्रान्न |
| १७८ | २२ | व्रत | व्रत |
| २६६ | ३० | स्त्रविध | स्त्रीवध |

## विनंति.

उपयुक्त अशा वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखितप्रती कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद सोलापूर यांचेकडे पाठवून देण्याची मेहरबानी करावी; ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व पाठविणारांस धर्मोन्नतीच्या कामीं यथाशक्ति हातभार लावल्याचें श्रेयही मिळेल. त्या ग्रंथाचें काम संपतांच त्याची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं आपली मूळ प्रत परत मिळेल किंवा नाहीं याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळप्रत परत मिळण्याविषयीं इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचेकडे ग्रंथ पाठविण्याचें करावें.

मणूरमठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# ॥ अथ श्रीवीरमाहेश्वराचारसंग्रहे ॥

## ॥ तृतीयभागप्रारम्भः ॥

## ॥ अथ षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कांदे शंकरसंहितायां ऋषय ऊचुः ॥ भगवन् श्रोतुमिच्छामो वीरमाहेश्वरक्रमम् ॥ त्वमस्माकं महाभाग वक्तुमर्हसि सत्तम ॥१॥

सूत उवाच ॥ वक्ष्ये युष्माकमद्याहं श्रुणुत श्रद्धयान्विताः ॥ महेश्वर मुखोद्गीतं वीरमाहेश्वरक्रमम् ॥२॥ पुरा कैलासशिखरे नानामुनिगणावृते ॥ विद्याधरगणाकीर्णे देवगंधर्वसेविते ॥३॥ शकुंतसंघसंघृष्टे प्रमथव्रजसेविते ॥ अप्सरोगणसंवाधे सर्वाश्चर्यमनोहरे ॥४॥ हेमप्राकारसंयुक्तं रत्नवप्रविराजितम् ॥ पीयूषपरिखाक्रान्तं नवद्वारविभूषितम् ॥५॥ पुरमस्ति महारम्यं रत्नतोरणमंडितम् ॥ उपकंठसनाथोपवनमालाविभूषितम् ॥६॥ वापीतटाकसंबाधपर्यन्तं गोपुरान्वितम् ॥ प्रासा

---

श्रीशिवास नमस्कार असो. स्कांदपुराणांतील शंकरसंहितेंत सांगितलें आहे. ऋषि ह्मणाले–(१) भगवन् मुने. वीरमाहेश्वरांचा क्रम ऐकावयाचा आहे, तर आह्मांस तुह्मी सांगा.

(२) सूत ह्मणाले—श्रद्धा ठेवून ऐका, तुह्मांला आज वीरमाहेश्वरांचा क्रम शिवानें जसा सांगितला आहे, तसाच मी सांगतों. (३) पूर्वी ज्या कैलासपर्वतावर अनेक मुनि राहत होते, तेथें अनेक विद्याधर राहत होते, देव गंधर्व विहारासाठीं नेहमीं तेथें येत होते, (४) हजारो पक्षी वास करीत होते, प्रमथगण राहत होते, अप्सरास्त्रिया तेथें राहत होत्या, यामुळें सर्वांना आश्चर्य वाटत असून तो पर्वत फार सुंदर दिसत होता. (५) त्या पर्वतावर सभोंवती सोन्याचा कोट असलेली, रत्नाचे बुरूज असलेली, सभोंवती अमृताचा खंदक असलेली, चोहोंकडे नऊ दारें असलेली (६) एक सुंदर राजधानी होती. त्यापुरींत रत्नांचीं तोरणें होतीं, व तिच्या जवळच अनेक लोकांचे बागबागीचे होते. (७) तेथें आड, तळीं अनेक असून

दमालासंलीढव्योममंडलमुत्तमम् ॥७॥ नानारत्नौघखचितं कर्णपत्रमिवावनेः ॥ पुण्यकृद्भिरवाप्यं तदप्राप्यं पापकर्मभिः ॥८॥ तत्रास्ति मंदिरं रम्यं चित्रभित्तिसमन्वितम् ॥ नानारत्नौघखचितं सहस्रस्थूणसंमितम् ॥९॥ तत्र सिंहासने शुद्धे सहस्रारविराजिते ॥ मृदुतूलाभिरचिततल्पास्तरणशोभिते ॥१०॥ शातकुंभमये दिव्ये सूक्ष्मवस्त्रोत्तरच्छदे ॥ परितः कीर्णमंदारपुष्पमालाविभूषिते ॥११॥ समासीनं महादेवं योगिध्यानैकगोचरम् ॥ गिरिजाश्रितवामांकं स्वात्मानंदांबुधिस्थितम् ॥१२॥ सुरसीमंतिनीहस्तपर्यस्तशतचामरम् ॥ वामभागस्थविष्ण्वंसविन्यस्तकरपल्लवम् ॥१३॥ कृतांजलिपुटेनाब्जजनुषा श्रुतिगोचरैः ॥ स्तूयमानगुणव्रातं स्तवैः सर्वेश्वरेश्वरम् ॥१४॥ नंदिना वेत्रहस्तेन शंकराहितदृष्टिना ॥ शिक्षितानेकचपलगणदर्शनलालसम् ॥१५॥ स्वमेव च स्वं

---

गोपुरें होतीं, व दुमजली तिमजली माडीचीं सुंदर घरें आकाशमंडलापर्यंत पोंचलेलीं अनेक होतीं. (८) असें तें शहर अनेक रत्नांनीं मंडित असून पृथ्वीला कर्णपत्रा प्रमाणें भासत होतें. मोठ मोठ्या पुण्यवान लोकांनाच तें सुखसाध्य असून पापी लोकांना अप्राप्य (न मिळणारें) होतें. (९) अशा त्या पुरींत चित्रविचित्र भिंतींनीं युक्त असें एक दिव्य मंदिर होतें. तें मंदिर अनेक रत्नांनीं खचित असून त्या मंदिरांत हजारो खांब होते. (१०) अशा मंदिराच्या मध्यभागीं सहस्र दळांनीं शोभित असें शुद्ध सिंहासन होतें. त्यावर मऊ मऊ अंथरुणें अंथरलेलीं होतीं. (११) तें आसन सोन्याचें असून त्याला सूक्ष्म रेशमी वस्त्रांची गवसणी केली होती त्याच्या भोंवतीं मंदारपुष्पाच्या माळा लोंबत ठेवल्या होत्या. (१२)अशा आसनावर श्रीशिव बसले होते. तें शिवतत्व योग्यांच्या ध्यानालाच दिसणारें असून त्याच्या वामभागीं पार्वती नांवाची शक्ति बसली होती, असें तें शिवतत्व निजानंद समुद्रांत डुलत होतें. (१३) अशा त्या शिवावर शेंकडों देवांगना चवऱ्या वारीत होत्या. ते शिव डाव्या बाजूला असलेल्या विष्णूच्या खांद्यावर हात टाकून बसले होते. (१४) त्या शिवापुढें हात जोडून वेदांत सांगितल्याप्रमाणें गुणपूर्ण सर्वेश्वर शिवाचें स्तोत्र करीत ब्रह्मदेव बसला होता. (१५) श्रीशिवावर दृष्टि ठेवून हातांत वेताची काठी घेऊन नंदिकेश्वर पुढें उभा होता. सुशिक्षित प्रमथगणांकडे पाहणारा, (१६) स्वताचें ध्यान स्वतः करणारा,

ध्यायन्तं शिवभक्तहिते रतम् ॥ ज्ञानशास्त्रं मुनींद्राणां व्याकुर्वन्तं वि-
मुक्तिदम् ॥१६॥ भक्त्या प्रणम्य देवेशं पप्रच्छ शिखिवाहनः ॥ सर्वलो-
कोपकारार्थं भगवन्तं त्रिलोचनम् ॥१७॥

स्कंद उवाच ॥ भगवंच्छ्रोतुमिच्छामि सर्वप्राणिहितं परम् ॥ के
चिल्लिंगार्चनं पीठे प्रशस्तं तु प्रचक्षते ॥१८॥ केचिच्छिवागमाभिज्ञाः
प्राणलिंगार्चनापराः ॥ लिंगे प्राणं समाधाय करपीठे शिवार्चनम्॥१९॥
प्रशंसंत्युत्तमं देव ब्रूहि किं नित्यमेतयोः ॥ संशयं मे महान्तं त्वं छेत्तु-
मर्हसि सांप्रतम् ॥२०॥

श्रीशंकर उवाच ॥ साधुपृष्टं त्वया वत्स वक्ष्याम्येतदशेषतः ॥ वे-
दागमपुराणेषु सारं गोप्यं मनोहरम् ॥२१॥ भक्तिः स्थिरीकृता यस्मि-
न् म्लेंच्छेऽपि द्विजसत्तमे ॥ स मे प्रियश्चतुर्वेदी न प्रियो भक्तिवर्जितः
॥२२॥ सा भक्तिर्द्विविधा ज्ञेया बाह्याभ्यन्तरभेदतः ॥ बाह्या स्थूलान्तरा
सूक्ष्मा वीरमाहेश्वरादृता ॥२३॥ सिंहासने शुद्धदेशे सुरम्ये रत्नचि-

---

शिवभक्तांच्या कल्याणाविषयीं झटणारा, मुनिश्रेष्ठांना ज्ञानशास्त्राचा बोध करणारा, मुक्ति देणारा. (१७) अशा देवाला भक्तीनें नमस्कार करून षण्मुखानें भगवान त्रिलोचन देवाला प्रश्न केला. कारण त्या षण्मुखाला सर्व लोकांवर उपकार करावयाचे होते.

(१८) षण्मुख ह्मणाला—भगवन, सर्व प्राण्यांचें कल्याण ज्यांत आहे, तें मला ऐकावयाचें आहे ; तुह्मीं सांगा. कांहीं लोक पीठावर लिंगपूजा प्रशस्त आहे असें ह्मणतात. (१९) प्राणलिंगपूजेंत रत असलेले, शिवागम जाणणारे लोक इष्टलिंगाच्या ठिकाणीं प्राण ठेवून (प्राणप्रतिष्ठा करून) करपीठावर शिवपूजा करावी, असें सांगतात. (२०) हे देवा, या दोहोंमध्यें कोणतें उत्तम आहे, तें सांगा सांप्रत याविषयीं माझ्या मनांत मोठा संशय आला आहे.

(२१) श्रीशंकर ह्मणाले—हे वत्सा, चांगला प्रश्न केलास, सर्व कांहीं सांगतों, ऐक. तें वेद, आगम, पुराणें यांतलें सार असून मनोहर आहे, व गोप्य आहे. (२२) हे द्विजश्रेष्ठा, जातीचा म्लेंच्छ दृढभक्ति करीत असला तर तो मला प्रिय असून तो चतुर्वेदी आहे, असें मी समजतों. भक्तीनें जो हीन आहे तो मला प्रिय नाहीं. (२३) ती भक्ति बाह्य आणि आभ्यंतर अशी दोन प्रकारची आहे. स्थूलभक्तीला बाह्य असें ह्मणतात, सूक्ष्मभक्तीला आंतर असें ह्मणतात. ही सूक्ष्मभक्तिच वीरमाहेश्वरांनीं आदरपूर्वक स्वीकारिली आहे. (२४) शुद्ध जागेंत रत्नविचित्रित सुंदर सिंहासन घालून त्यावर

त्रिते ॥ शिवलिंगस्य पूजा या सा वाह्या भक्तिरुच्यते ॥२४॥ लिंगे प्राणं समाधाय प्राणे लिंगं तु शांभवम् ॥ सशरीरं मनः कृत्वा न किंचिच्चिन्तयेद्यदि ॥२५॥ साभ्यन्तरा भक्तिरिति प्रोच्यते शिवयोगिभिः॥ सा यस्मिन्वर्तते तस्य जीवनं भ्रष्टबीजवत् ॥२६॥ जीवन्मुक्तः स विज्ञेयो वीरमाहेश्वरः पुमान् ॥ तस्य वक्ष्यामि हे वत्स शिवलिंगार्चनक्रमम् ॥२७॥ वृत्तम् ॥ नित्यानित्यविचारवानिह परत्रापेक्षितार्थो रतिः शान्त्याद्यंगसमन्वितः सुचरितो मोक्षार्थितौत्सुक्यवान् ॥ सत्यानंदपरप्रकाशपरिपूर्णात्मावबोधान्वितम् कृत्याकृत्यविवेकिनं गुरुवरं प्रेयान्नरो भक्तिमान् ॥२८॥ नत्वा भक्तिपुरःसरं गुरुवरं विज्ञापयेत्पार्श्वतः स्थित्वा जन्मशतागताद्भवभयाद्भीतोऽस्मि मां शाधि भो ॥ येनायं भवपादपो सुखफलः शोषं समूलं प्रयात्याशात्कर्मबलेन तत्कथय मे मोहप्रदः सद्गुरो ॥२९॥ इत्युक्तो गुरुरादरेण कृपया शिष्यं समीपस्थितं

---

शिवलिंगाची स्थापना करून पूजा केली तर तिला बाह्यभक्ति असें ह्मणतात.(२५) लिंगाच्या ठिकाणीं प्राण ठेवून प्राणाच्या ठिकाणीं लिंगप्रतिष्ठा करून शरीरसहित मन तल्लीन करून मनांत दुसरा कोणता विचार न आणिला तर (२६) त्या भक्तीला शिवयोगी लोक आंतरभक्ति असें ह्मणतात. तशी आंतरभक्ति शिवलिंगावर जो करतो, त्याचें जीवन भाजलेल्या बियाप्रमाणें आहे. (२७) तो वीरमाहेश्वर पुरुष जीवन्मुक्त आहे, असें समजावें; हे वत्सा, त्याच्या शिवलिंगपूजेचा क्रम सांगतों. (२८) नित्य कोण, अनित्य कोण, हें समजून घेण्यासाठीं जो विचारांत गढून गेला आहे, या लोकांत व परलोकांत सुखाची इच्छा जो करीत नाहीं, शांति वगैरे अवयवांनीं जो युक्त आहे, ज्याचें उत्तम चरित आहे, मोक्ष मिळविण्याची ज्याला उमेद आहे, सत्य, आनंद, श्रेष्ठ प्रकाश यांनीं परिपूर्ण असलेल्या शिवतत्वाच्या ज्ञानानें जो युक्त आहे, कार्याकार्य जो जाणतो, अशा गुरुश्रेष्ठाला भक्तिशाली लोकप्रिय मानव (२९) भक्तिपूर्वक नमस्कार करून विज्ञापना करतो कीं, हे शेंकडो जन्मांत संसारदुःख भोगून अतिशय भ्यालों आहे, तर आपण यांतून उद्धार करा. अशी विनंति करून तो बाजूला उभा राहतो, मग पुनः विनंति करतो कीं, हे गुरो, काय कर्म केलें असतां भववृक्ष ( संसारवृक्ष ) सुखरूपी फल देणारा होऊन लौकरच मुळांसह वाळून जाईल, तें सांगा. (३०) अशी आदरपूर्वक विनंति केल्यावरोवर जवळ असलेल्या शिष्याच्या अंगावर कृपेनें हात

स्पृष्ट्वा पाणितलेन साधु गदितं प्रीतोऽस्मि वत्स त्वया॥ संसारार्णवतारके परशिवे लिंगस्वरूपेऽमले प्राणं जीवकलाधरं तव निधास्ये त्वं तथा स्याः परम् ॥३०॥ इत्युक्त्वा पूर्णकलशं तण्डुलस्योपरि स्थितम्॥ अभिमंत्र्य सतारेण श्रीमत्पंचाक्षरेण च ॥३१॥ स्वयं च प्राङ्मुखो भूत्वा गोमयेनोपलेपिते ॥ मंडले स्थापितं शिष्यमुत्तराभिमुखो गुरुः ॥३२॥ अभिषेकं पुनः कुर्यात्कलशस्थोदकेन सः ॥ पीठस्थे शिवलिंगे तु शिष्यप्राणं निधाय च ॥३३॥ तल्लिंगं स्थाप्य तत्प्राणे प्राणलिंगं भवेत्ततः ॥ दत्वा शिष्याय तल्लिंगं श्रद्धाभक्तियुताय सः ॥३४॥ पूजय प्राणलिंगं त्वं यावज्जीवं प्रतिज्ञया ॥ पुनर्भवो न ते वत्स विद्यते मा त्यजानिशम् ॥३५॥ इत्युक्त्वाभिमुखं शिष्यमानीय कृपया पुनः ॥ वीरमाहेश्वरं धर्मं क्रमादुपदिशेद्गुरुः ॥३६॥ हस्तसिंहासने लिंगमप्रमादेन धारय ॥ प्रमादात्पतिते लिंगे सह प्राणान्परित्यज ॥३७॥ वत्स लिंगा-

---

फिरवून गुरु ह्मणतो कीं, हे वत्सा, चांगला प्रश्न केलास, मी संतुष्ट झालों. आतां संसारसमुद्रांतून पार करणाऱ्या लिंगरूपी निर्मल परशिवाच्या ठिकाणीं जीवकलेला धारण करणाऱ्या तुझ्या प्राणाची स्थापना करतो. तूंही त्या लिंगाप्रमाणें श्रेष्ठ हो. (३१) याप्रमाणें बोलून तांदुळाच्या राशीवर असलेल्या पूर्ण कलशाला सतार पंचाक्षरमंत्रानें अभिमंत्रण करून (३२) स्वतः पूर्वाभिमुख होऊन गोमयानें ( शेणानें ) सारविलेल्या मंडलावर उत्तरेकडे तोंड करून गुरु शिष्यास बसवितो.(३३) नंतर गुरु कलशांतल्या पाण्यानें शिष्याला अभिषेक घालतो. ( गुरूनें शिष्याला मंडलावर बसवून अभिषेक घालावा. असें विधिवाक्य आहे असें समजावें ). पीठस्थ शिवलिंगाच्या ठिकाणीं शिष्याच्या प्राणाची प्रतिष्ठा करून (३४) त्या लिंगाची प्रतिष्ठा प्राणाच्या ठिकाणीं करतो ; याला प्राणलिंग असें ह्मणावें. असें तें प्राणलिंग श्रद्धा भक्ति यानें युक्त असलेल्या शिष्याला देऊन गुरु सांगतों कीं, (३५) शिष्या, प्रतिज्ञापूर्वक या प्राणलिंगाची पूजा प्राण असेपर्यंत कर, ह्मणजे हे वत्सा, तुला पुनर्जन्म होणार नाहीं, अहोरात्र याचा त्याग करूं नको. (३६) असें बोलून दयेनें शिष्याला आपले कडे सन्मुख बसवून घेऊन त्याला क्रमानें वीरमाहेश्वरधर्मांचा बोध करतो. ( गुरूनें शिष्याला धर्मांचा बोध क्रमानें करावा.) (३७) मग त्याला सांगतों कीं, हे वत्सा, हस्तसिंहासनावर प्रमाद न करतां लिंगधारण कर. कदाचित प्रमादानें जमिनीवर पडलें तर तात्काळ प्राण सोड. (३८) हे

र्चनं नित्यं त्रिकालं कुरु भक्तितः ॥ पूजाद्रव्याणि संशोध्य शुचिस्तद्ग-
तमानसः ॥३८॥ वृत्तम् ॥ स्नानं समत्वसलिलेन हि पूर्णभाववस्त्रं त्रि-
शक्तिगुणसंयुतयज्ञसूत्रम् ॥ विद्यासुगंधमिह भूतदयाक्षतांश्च शब्दादि-
पुष्पचयमर्पय नित्यमंग ॥३९॥ प्रज्ञामनोहंकृतिचित्तधूपं श्रोत्रादिपंचें-
द्रियदीपमंग ॥ तद्वासनातैलयुतं च देहि जीवोपहारं सुखदुःखवाह्यम्
॥४०॥ गुणत्रयाख्यतांबूलं प्राणार्पणनमस्कृतिम् ॥ शांतिपुष्पांजलिं देहि
चैकभावविसर्जनम् ॥४१॥ एवमाभ्यन्तरद्रव्यसंभूतं शिवपूजनम् ॥ कृ-
त्वा निधेहि सततं लिंगं वस्त्रेण वेष्टितम् ॥४२॥ मस्तके कंधरे कक्षे व-
क्षस्यथ करस्थले ॥ नाभेरधस्तात्सततं प्रमादान्नैव धारय ॥४३॥ इ-
त्यादिष्टोऽथ गुरुणा शिष्यः श्रद्धासमन्वितः॥ देहं दारान्धनं प्राणान्सर्वं
तस्मै निवेदयेत् ॥४४॥ यस्य देवे यथा भक्तिः शिवभक्ते तथा गुरौ॥
तस्य पाणितले मुक्तिः स्थिता हस्तस्थबिल्ववत् ॥४५॥ वृत्तम् ॥ तदेव

---

वत्सा, निरंतर भक्तिपूर्वक त्रिकाल लिंगार्चना कर. पूजाद्रव्याचा शोध करून स्वतः शुद्ध होऊन त्यावर नेहमीं मन ठेव. (३९) हे शिष्या, समत्वरूप पाण्यानें लिंगास स्नान घालून पूर्णभावरूपी वस्त्र अर्पण करून तीन शक्तिच तीन तंतु आहेत, असें समजून त्यांचें यज्ञोपवीत समर्पण करून विद्यारूपी उत्तम गंध लावून भूतदयारूपी अक्षता लावून शब्द वगैरे हेंच पुष्प निरंतर वाहा. (४०) प्रज्ञा, मन, अहंकार, यांनीं युक्त असलेल्या चित्ताचा धूप दाखवून श्रोत्रादि पांच इंद्रियांचा दीप त्यालिंगापुढें लावून त्यां दिव्याला त्या त्या इंद्रियांत असणारें वासनारूप तेल घालून सुख दुःखाचें ओझें वाहणाऱ्या जीवाचा नैवेद्य दाखीव. (४१) गुणत्रयरूपी (सत्व, रज, तम) तांबूल समर्पण करून प्राणार्पणरूपी नमस्कार कर. शांतिरूपी पुष्पांजलि दे. आणि एकोभावरूपी विसर्जन कर (भावना एक ठेव असें तात्पर्य आहे). (४२) याप्रमाणें आभ्यंतर द्रव्याचा संग्रह करून शिवपूजा करून नेहमीं प्राणलिंगाला वस्त्र गुंडाळून जवळ ठेव. (४३) मस्तक, गळा, कक्ष, वक्षस्थल, हात या ठिकाणीं प्राणलिंग धारण कर. चुकून बेंबीच्या खालीं धारण करूं नको. (४४) अशी गुरूची आज्ञा ऐकून शिष्यानें श्रद्धा ठेवून देह, बायको, धन, प्राण हे सर्व गुरूला समर्पण करावे. (४५) देवावर भक्ति जशी ठेवतो, तशीच भक्ति जो शिवभक्त गुरूवर ठेवतो, त्याला मुक्ति ही हातांतल्या बेलफळाप्रमाणें सुलभ होते. (४६) परमात्म्याचें चिन्ह असें लिंग शिवभक्तानें हस्तकमल-

हस्तांबुजपीठमध्ये निधाय लिंगं परमात्मचिन्हम् ॥ समर्चयेदेकधियोपचारैर्नरः स बाह्यान्तरभेदभिन्नैः ॥४६॥ गुरुप्रसादाधिगतेष्टलिंगं संपूजयन्तं स्वकराब्जपीठे ॥ षडास्य भक्त्या विविधोपचारैर्नरस्तमालोक्य विमुक्तिमेति ॥४७॥ तस्माल्लिंगांगसंबंधी नित्यनैमित्तिकाश्रयम् ॥ संस्कृतं गुरुणा दत्तमिष्टलिंगमतंद्रितः ॥४८॥ नित्यं स्ववामहस्ताब्जे सावधानेन पूजयेत् ॥४९॥ वृत्तम् ॥ इति परमरहस्यं वत्स वेदान्तसारं सकलसुरमुनीन्द्रैरादृतं भक्तिमद्भिः ॥ कथितमखिलदुःखध्वंसकं तुभ्यमेतत्त्वमपि कथय धर्मं प्राणलिंगैक्यभाजे ॥५०॥

सूत उवाच ॥ इतीरितं शंभुमुखारविंदादाकर्ण्य तं प्राणशिवैक्यधर्मम् ॥ स्कंदोऽभवद्भक्तिसुधांबुराशौ मग्नो मुदा बाष्पपरीतनेत्रः ॥५१॥ लब्ध्वा संज्ञां महायोगी भक्त्या परवशो गुहः॥कृतार्थोऽस्मि कृतार्थोऽस्मीत्युक्त्वा शंभुं ननाम सः ॥५२॥ यूयं भाग्यवतां श्रेष्ठाः सर्वधर्मोत्तमोत्तमम् ॥ स्थापयध्वमिमं धर्मं वीरशैवं मुनीश्वराः ॥५३॥

---

रूपी पिठावर ठेवून एकबुद्धीनें बाह्यांतर सर्व उपचारांनीं त्या शिवलिंगाची पूजा करावी. (४७) गुरूच्या प्रसादानें मिळालेल्या इष्टलिंगाची पूजा अनेक उपचारांनीं करपीठावर करीत असतां हे षण्मुखा, जो प्राणी त्याचें दर्शन घेतो, तो प्राणी मुक्तीला जातो. (४८) याकरितां लिंगांगीनें (वीरमाहेश्वरानें) नित्यनैमित्तिककार्याला आश्रयभूत, व गुरूनें संस्कृत केलेलें इष्टलिंग विनआळसानें (४९) आपल्या डाव्या हातांत निरंतर ठेवून सावधानपणें त्याची पूजा करावी. (५०) हे वत्सा, परमरहस्य, वेदांतांतलें सार, सर्व देव व ऋषि यांनीं आदर केलेलें, भक्तिमान लोकांनीं सांगितलेलें, सर्व दुःखांचा ध्वंस करणारें असें हें धर्माचें तत्व प्राणलिंगाची सेवा करणाऱ्या तुला सांगितलें आणि तूं देखील लिंगांग सामरस्य करणाऱ्यालाच सांग.

(५१) सूत ह्मणाले— याप्रमाणें श्रीशिवानें सांगितलेला प्राणलिंगैक्य धर्म श्रवण करून स्कंद हा आनंदाश्रूनें व्याप्त होऊन भक्तिरूपी अमृतसमुद्रांत पोहूं लागला. (५२) नंतर शुद्धीवर येऊन महायोगी गुह (स्कंद) हा भक्तिपरवश होऊन शंभूला ह्मणाला कीं, हे शंभो, आज मी कृतार्थ झालें, असें बोलून शिवाला त्यानें नमस्कार केला. (५३) सूत ह्मणतात कीं, मुनीश्वरहो, तुह्मी भाग्यवान अहांत सर्व धर्मांत श्रेष्ठ अशा या वीरशैव धर्माची स्थापना करा.

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे वीरमाहेश्वराचारधर्मनिर्णये कराब्जपीठकथनं नाम षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥

---

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील वीरमाहेश्वराचारधर्मनिर्णयांतील करपीठकथन नांवाचा सेचाळिसावा अध्याय संपला.



## ॥ अथ सप्तचत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कांदे ॥ शंकरसंहितायाम् ॥ ऋषय ऊचुः ॥ भगवन् सर्वधर्मज्ञ वीरमाहेश्वरो जनः ॥ ब्रूहि कां वृत्तिमाश्रित्य विचरेत्पृथिवीमिमाम् ॥१॥

सूत उवाच ॥ वक्ष्यामि संग्रहेणाहं युष्माकं मुनिसत्तमाः ॥ यत्क्रौंचदारणायाह नीलकण्ठोंऽविकापतिः ॥२॥ कैलासशिखरे रम्ये समासीनं महेश्वरम् ॥ पप्रच्छ प्रणतो भूत्वा कृतांजलिपुटः पुरा ॥३॥

स्कंद उवाच ॥नीलकण्ठ विरूपाक्ष वीरमाहेश्वराश्रयाम् ॥ वृत्तिं कथय देवेश मोक्षमार्गैकसाधिकाम् ॥४॥

ईश्वर उवाच ॥ वक्ष्ये भाग्यवतां श्रेष्ठ संग्रहेण षडानन ॥ वीरमाहेश्वरस्यैतां वृत्तिं वेदागमोदिताम् ॥५॥ यदा लिंगांगसंबंधी नरः स्याद्देशिकाज्ञया ॥ त्रिपुंड्रधारणं कुर्याद्भस्मना सजलेन च ॥६॥ अग्निहोत्रसमुत्थेन विरजानलजेन वा॥सर्वांगोद्धूलनं कुर्यात्सद्योजातादिमंत्रतः॥७॥ अग्निरित्यादिभिर्वापि षड्भिराथर्वणोदितैः ॥ विचारयेत्सदा ज्ञानसाधनान्यखिलानि च ॥८॥ पुराणागमवेदेषु प्राणलिंगसमन्वितः ॥ भक्ति-

---

श्री शिवास नमस्कार असो ॥ स्कांदपुराणांत शंकर संहितेंत ह्मटलें आहे कीं, ऋषी म्हणाले–( १ ) सर्व धर्म जाणणाऱ्या हे भगवन् सूता, वीरमाहेश्वरानें कोणत्या वृत्तीचा आश्रय करून पृथ्वीवर संचार करावा.

(२) सूत ह्मणाले—मुनिश्रेष्ठहो, तुह्मांला संक्षेपानें सांगतों ऐका. अंबिकापति श्रीशिवानें षण्मुखास जें सांगितलें, तेंच सांगतों. ( ३ ) सुंदर कैलासावर श्रीशंकर बसल्या वेळेस त्यांना नमस्कार करून नम्रपणें स्कंदानें विचारिलें.

( ४ ) स्कंद ह्मणाला—विरूपाक्षा, नीलकंठा, देवाधिदेवा, मोक्षमार्ग साधणाऱ्या अशा कोणत्या वृत्तीचा आश्रय वीरमाहेश्वरांनीं करावा, हें सांगा.

( ५ ) शिव बोलले—भाग्यवानांमध्यें श्रेष्ठ अशा हे स्कंदा, वेदोक्त व आगमोक्त अशा वीरमाहेश्वरांच्या वृत्तीचें वर्णन करतों, ऐक. ( ६ ) देशिकाच्या आज्ञेनें प्राणी जेव्हां लिंगांगी ( वीरमाहेश्वर ) होईल, तेव्हां त्यानें जलसहित भस्माचें त्रिपुंड्र धारण करावें. (७) अग्निहोत्रापासून उत्पन्न झालेलें किंवा विरजाग्नीनें उत्पन्न झालेलें भस्म घेऊन सद्योजात वगैरे मंत्रांनीं सर्वांगावर उधळून घ्यावें. (८) किंवा " अग्निरिति भस्म " वगैरे अथर्वण मंत्रांनीं भस्म लावावें. नेहमीं जीं कांहीं ज्ञानाचीं सर्व साधनें असतील, त्यांचा विचार करावा. (९) तीं साधनें पु-

श्रद्धातितिक्षार्भी रतिर्दान्तिः शमो दया ॥९॥ रुद्राक्षधारणं भस्म ज्ञानांगानि प्रचक्षते ॥ तेषां मुख्यतमं भस्मरुद्राक्षाणां च धारणम् ॥१०॥ यो धत्ते भस्मरुद्राक्षधारणं स भवेच्छिवः ॥ विशेषतः प्राणलिंगसंबंधी भस्म धारयेत् ॥११॥ रुद्राक्षमालामनिशं श्रद्धाभक्तिसमन्वितः ॥ मस्तके कर्णयोः कण्ठे वाव्होर्मध्ये प्रकोष्ठके ॥१२॥ रुद्राक्षाणि यथाशक्ति धारयेदुपवीतवत् ॥ जपेत्पंचाक्षरं मंत्रं श्रीरुद्राध्यायमुत्तमम्॥१३॥ शिवसंकल्पमखिलं पंचब्रह्माणि भक्तिमान् ॥ पूजयेद्गुरुणा दत्तमिष्टलिंगमतंद्रितः ॥१४॥ पाणिपद्मासने नित्यं त्रिकालं शुद्धमानसः ॥ धारयेदवधानेन लिंगं तद्गुरुणार्पितम् ॥१५॥प्रमादात्पतिते लिंगे प्राणानपि परित्यजेत् ॥ पतिते प्राणलिंगे यः प्राणान्धत्ते नराधमः ॥१६॥ स चंडाल इति ज्ञेयः शिवद्रोही न तं स्पृशेत् ॥ गुरुपादोदकं नित्यं सेवेत गुरुपूजकः ॥१७॥ गुरूच्छिष्टपुरोडाशं भुंजीयाद्भक्तिनम्रधीः ॥ लिंगार्पितानि द्रव्याणि भुंजीयादप्रमादतः ॥१८॥ अनर्पितानि द्रव्याणि वर्ज-

---

राण, आगम, वेद यांमध्यें सांगितलीं आहेत. त्यांचा विचार प्राणलिंगीनें ( वीरमाहेश्वरानें ) करावा. भक्ति, श्रध्दा, तितिक्षा, रति, दांति, शम, दया, (१०) रुद्राक्ष धारण, भस्म धारण हींच ज्ञानाचीं अंगें होत. यांमध्यें भस्म धारण व रुद्राक्ष धारण हीं दोन साधनें मुख्य आहेत. (११) जो प्राणी भस्मरुद्राक्ष धारण करितो, तो साक्षात शिवच होईल; प्राणलिंगीनें विशेषेंकरून धारण करावें. (१२) श्रद्धाभक्तीनें युक्त होऊन रुद्राक्षांची माळ अहोरात्र मस्तक, कर्ण, कंठ, बाहु, कोपरे यां अवयवांच्या ठिकाणीं धारण करावी. (१३) शक्त्यनुसार उपवीताच्या आकारानें रुद्राक्ष धारण करावें. नंतर पंचाक्षरमंत्राचा व श्रीरुद्राध्यायाचा जप करावा. (१४) सर्व शिवसंकल्पमंत्राचा व पंचब्रह्ममंत्राचा जप करावा. नंतर गुरूनें दिलेल्या इष्टलिंगाची पूजा बिन आळसानें करावी. (१५) शुद्धमनाचा होऊन त्रिकाल हस्तरूपी पद्मासनावर गुरूनें दिलेल्या लिंगाची पूजा निरंतर करावी. व सावधानपूर्वक त्या लिंगाचें धारण करावें. (१६) प्रमादामुळें लिंग पतन पावेल तर तात्काळं त्यानें प्राण सोडावेत. प्राणलिंग पतन होऊनही जो नीच मनुष्य शरीर तसेंच जीवंत ठेवतो, (१७) तो जातीनें चंडाल आहे, असें समजून त्या शिवद्रोह्याला शिवूं नये. गुरुपूजक शिष्यानें गुरुपादोदकाचें सेवन करावें. (१८) भक्तीनें नम्र बुंद्धीचा होऊन हविष्याप्रमाणें पवित्र मानून गुरूच्या उच्छिष्टाचें भोजन करावें. लिंगार्पित द्रव्याचें भोजन न चुकतां करावें. (१९) भक्तिमान प्राण्यानें

येद्भक्तिमान्नरः ॥ अप्यापदि दुरंतायामन्यदेवार्पितं सुधीः ॥१९॥ न भुंजीयात्प्रमादेन भुंक्ते स पतितो भवेत् ॥ स्वयं लिंगांगसंबंधी शिव एव न चापरः ॥२०॥ तस्मादन्योपभुक्तान्नमन्यपादोदकं त्यजेत् ॥ नेक्षेत सर्वदा मर्त्यः शिवादन्यत्तु दैवतं ॥२१॥ नान्यदेवार्चकान्मर्त्यान्सदाशिवबहिष्कृतान् ॥ लिंगांगसंगिनः शुद्धान्सदाशिवपतिव्रतान् ॥२२॥ पूजयेदादरेणैव श्रद्धाभक्तिसमन्वितः ॥ वंचनं शिवभक्तेषु न कुर्वीत कदाचन ॥२३॥ यस्य देवे यथा भक्तिः शिवभक्ते गुरौ तथा ॥ तस्य पाणितले मुक्तिः स्थिता हस्तस्थबिल्ववत् ॥२४॥ यदुक्तं गुरुणा प्रीत्या न च तद्विस्मरेद्बुधः ॥ न तस्य सूतकं वत्स प्राणलिंगांगसंगिनः ॥२५॥ जननोत्थं मृतोत्थं च विद्यते परमार्थतः॥ शिवस्थानानि तीर्थाणि विशिष्टानि शिवार्चकः ॥२६॥ शिवयात्रोत्सवं नित्यं सेवेत परया मुदा॥ शिवक्षेत्रोत्सवमहायात्रादर्शनकांक्षिणां॥२७॥मार्गेऽन्नपानदानं च कुर्यान्मा-

---

अनर्पित द्रव्याचा त्याग करावा. कसलेंही संकट आलें तरी अन्य देवाला अर्पण केलेले पदार्थ बुद्धिमानानें घेऊं नयेत. (२०) प्रमादानें देखील भोजन करूं नये. जर भोजन करील तर तो पतित होईल. लिंगागी हा स्वतः शिवच आहे, दुसरा नाहीं. (२१) याकरितां दुसऱ्यानें उपभोग घेतलेल्या अन्नाचा व दुसऱ्याच्या पादोदकाचा स्वीकार कधींही करूं नये. शिवाशिवाय दुसरें दैवत पाहूं नये. (२२) शिवापासून बहिष्कृत झालेले ( शिवपूजा न करणारे ) अन्य देवाची पूजा करणारे जे लोक असतील, त्यांचा आदरसत्कार करूं नये. केवळ सदाशिवाची पूजा करणारे, लिंगांगसंबंध करणारे ( वीरमाहेश्वर ), शुद्ध आचरण करणारे अशा लोकांचा (२३) आदरसत्कार श्रद्धेनें, भक्तीनें युक्त होऊन करावा. शिवभक्तांची कधींही वंचना करूं नये. (२४) शिवावर जशी भक्ति असेल तशीच भक्ति शिवभक्तगुरूवरही असावी. ह्मणजे त्याला मुक्ति ही हातांत असलेल्या बेलफळाप्रमाणें आहे. (२५) गुरूनें जें कांहीं सांगितलें असेल, तें अगदीं आठवणीनें करावें. विसरूं नये. हे वत्सा, त्या प्राणलिंगीला कोणत्याही तऱ्हेचें सूतक नाहीं. (२६) वास्तविक विचार केला असतां वीरमाहेश्वराला ( प्राणलिंगीला ) जाताशौच व मृताशौच मुळींच नाहीं. शिवपूजा करणाऱ्यानें मुख्य मुख्य शिवस्थान, तीर्थें, (२७) शिवयात्रा, शिवोत्सव यांचें सेवन नेहमीं अत्यंत आनंदानें करीत रहावें. शिवक्षेत्र, शिवमहोत्सव, महायात्रा, शिवदर्शन यांची इच्छा करणाऱ्या लोकांसाठीं (२८) वीरमाहेश्वरांनीं जागोजाग त्या त्या रस्त्यांत अन्नछत्र

हेश्वरो जनः ॥ नान्नतोयसमं दानं न चाहिंसापरं तपः ॥२८॥ तस्मान्माहेश्वरो नित्यमन्नतोयप्रदो भवेत्॥ न हिंस्यात्सर्वभूतानि शिवभक्तिपरायणः ॥२९॥ परसंतापकारित्वं न कुर्वीत कदाचन ॥ निस्पृहो निरहंकारः कामक्रोधविवर्जितः ॥३०॥ सत्यं हितं प्रियं वाक्यमिहामुत्र सुखं च यत् ॥ तद्वदेच्छिवलिंगैक्यो नाप्रियं कस्यचिद्वदेत् ॥३१॥ नानृतं कस्यचिद्ब्रूयान्नास्त्यसत्यादघं परं ॥एकतः सर्वपापानि तुलायामेकतोऽनृतं॥३२॥ऋषयस्तोलयामासुरनृतं चातिरिच्यते॥तस्माच्छिवार्चको नित्यं न ब्रूयाद्धर्मनाशकं ॥३३॥ सुखोचितेषु मैत्रीं च कृपां कुर्यात्सुदुःखिषु॥ पुण्यक्रियेषु मुदितामुपेक्षां पापकारिषु॥३४॥शिवोदितानि लिंगांगसंबंधार्थकृतानि च॥यतः कुतश्चिदानीय शास्त्राण्येवं विचारयेत् ॥३५॥ लिंगं किमंगमिति किं संबंधः कोऽयमेतयोः॥लिंगरूपो महादेवः सच्चिदानंदलक्षणः ॥३६॥ अंगरूपो हि जीवात्मा भवभावनियंत्रितः ॥

---

पाणपोई, धर्मशाळा यांची व्यवस्था केलेली असावी. अन्नोदकदानासमान दुसरें दान नाहीं. अहिंसेसारखें दुसरें तप नाहीं. (२९) या करितां माहेश्वरांनीं अन्नोदकदान करीत असावें. शिवभक्तींत रत असलेल्या शिवभक्तानें कधींही हिंसाकर्म करूं नये. (३०) दुसऱ्याला संताप येईल असें कर्म कधींही करूं नये. निःस्पृह ( इच्छारहित ), अहंकार रहित, कामक्रोधरहित असून (३१) सत्य, हितकर, गोड असें बोलावें; ह्मणजे या लोकीं व परलोकीं सुख मिळतें. जसें आपल्यास या तऱ्हेचें सुख मिळेल, तसें बोलावें. अप्रिय ( कडू ) असें कोणाला कधींहि बोलूं नये. (३२) खोटें कधीं बोलूं नये, कारण खोट्यासारखें दुसरें पातक नाहीं. एका तराजूंत सर्व पातकें घालून दुसऱ्या तराजूंत खोटें घालून (३३) ऋषींनीं पूर्वी तोलून पाहिलें होतें, तेव्हां खोट्याची बाजू खालीं राहिली. अर्थात खोटें वजनानें जास्त झालें याकरितां शिवपूजकानें कधींही धर्मनाशक असें खोटें बोलूं नये. (३४) जे शिवभक्त सुखाला योग्य असून दुःख भोगीत असतलि, त्यांच्या बरोबर मैत्री करून त्यांवर कृपा करावी. पुण्यकर्म करणाऱ्या शिवभक्तांवर दया करावी, व पापकर्म करणाऱ्यांची उपेक्षा करावी. (३५) शिवाच्या मुखांतून निघालेली व लिंगांगसंबंधरूप अर्थाला प्रतिपादणारीं शास्त्रें कोठून तरी आणून त्या शास्त्राचा विचार याप्रमाणें करावा कीं, (३६) लिंग ह्मणजे काय ? व अंग ह्मणजे काय ? यादोहोंचा संबंध ह्मणजे काय ? सत्, चित्, आनंद या लक्षणांनीं युक्त महादेवच लिंग होय. (३७) भवभावानें (संसारत्वानें) बांधला गेलेला जीवच अंग

तत्पदेनोच्यते सद्भिर्लिंगरूपः सदाशिवः ॥३७॥ त्वं पदेनांगरूपो हि जीवः संसारलक्षणः॥ तत्त्वंपदार्थे लिंगांगरूपेऽन्योन्यविरुद्धकम्॥३८॥ उपाधिकृतवाच्यार्थं त्यक्त्वा सच्चित्सुखात्मकम् ॥ लक्ष्यार्थमविरुद्धं यच्छिवस्तदिति या मतिः ॥३९॥ सा संबंध इति प्रोक्तो वेदान्तागमवेदिभिः ॥ यो मायोपाधिको देवो लिंगरूपी सदाशिवः॥४०॥ सोऽविद्योपाधिको भूत्वा भवत्यंगस्वरूपवान् ॥ लीनं गच्छति यस्मिन्सा माया दुर्घटकारिणी ॥४१॥ तल्लिंगमिति सन्मात्रं रूप्यते पारमार्थिकैः ॥ एतस्मात्कारणादेव लिंगरूपत्वमीशितुः ॥४२॥ अमिति ब्रह्मसन्मात्रं गच्छतीति गमुच्यते ॥ रूप्यतेऽगमिति प्राज्ञैरंगतत्त्वविचिंतकैः ॥४३॥ तस्मादंगस्वरूपोऽसौ जीवः संसारवृत्तिभाक् ॥संसारवृत्तिरहितो लिंगरूपोऽविकापतिः॥४४॥ लिंगांगरूपयोर्योसौ संयोगः शिवजीवयोः ॥ ए-

---

होय. "तत्वमसि" या श्रुतींतल्या "तत्" या शब्दाचा अर्थ लिंगरूपी सदाशिव आहे, असें सज्जन सांगतात. (३८) "त्वं" या पदाचा अर्थ संसारांत असलेला अंगरूपी जीव आहे, असें सांगतात. "तत्वं" या दोन पदांचा अर्थ असा आहे. अशा लिंगांगरूपी ईशजीवामध्यें असलेल्या परस्पर विरुद्ध (३९) उपाधिरूप अर्थांचा तेवढा त्याग केला तर विरोधरहित लक्ष्यार्थ असें शिवतत्वच जीवात्मा आहे, (उपाधि निघून गेली ह्मणजे जीवच शिव आहे) अशी जी बुद्धि होते, (४०) तिलाच संबंध असें वेदांत व आगम जाणणारे ह्मणतात. मायारूप उपाधीनें युक्त लिंगरूपी जो सदाशिव आहे. (४१) तोच अविद्यारूप उपाधीनें युक्त झाला ह्मणजे त्यालाच अंगस्वरूपी जीव ह्मणतात. ज्याच्या ठिकाणीं दुर्घट कृत्य करणारी माया लीन होते. (४२) तेंच सत् रूपी लिंग आहे, असें पारमार्थिक लोक ह्मणतात. ह्मणूनच शिवालाच लिंगरूपत्व मिळालें आहे. (४३) "अंग" या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, "अं" या अक्षराचा अर्थ सद्रूपी परमेश्वर असा आहे, आणि 'ग' याचा अर्थ जाणें असा होतो. अर्थात् परमेश्वराजवळ जीव जातो, असा अंग शब्दाचा अर्थ झाला. ह्मणून जीवाला अंग अशी संज्ञा आली आहे. असें अंगतत्व जाणणारे ह्मणतात. (४४) ह्मणूनच जीव हा अंगस्वरूप असून नेहमीं संसार भोगतो आहे. अर्थात संसाररहित शिव हा लिंगस्वरूप आहे, असें सिद्ध झालें. (४५) लिंगांगस्वरूपी शिवजीवांचा जो संयोग ह्मणजे दोघांचें एकरूप होणें याला दृढ असा "संबंध" अशी संज्ञा

कः स्वरूपः सुदृढः स संबंध इति स्मृतः॥४५॥ तत्पदेनोच्यते लिंगं त्वं-पदेनांगमीरितम् ॥ अनयोरैक्यभावोऽयं संबंधोऽसिपदेन च ॥४६॥ लिंगं शिवो नियंतांगं प्रपंचः ससुरासुरः ॥ तस्मिंस्तस्य लयस्थानं संबंध इ-ति गीयते ॥४७॥ अंगं शक्तिरिति प्रोक्ता शक्तिमल्लिंगमुच्यते ॥ अन-योरैक्यविज्ञानं संबंध इति कथ्यते ॥४८॥ अंगं भक्तिः शिवो लिंगं य-या भक्त्या च गम्यते ॥ इति विज्ञाननिष्पत्तिर्यासौ संबंध उच्यते ॥४९॥ वृत्तम् ॥ प्राणरूपमिति जीव उच्यते लिंगरूपमिति शंकरः स्मृतः ॥ यस्तदैक्यमिति वेदितानयोः प्राणलिंगविदसौ शिवयोगी ॥५०॥ हे व-त्स लिंगांगपदं विशोध्य तस्मिन्नथान्योन्यविरुद्धभावम् ॥ हित्वा वि-रुद्धप्रतिपत्स्वरूपमात्मेति संबंधपदार्थ एषः॥५१॥एवं लिंगांगसंबंधप-दानामर्थमुत्तमम् ॥ लभेद्गुरूपदेशाद्यः सोयं लिंगांगसंगवान् ॥५२॥ एवं हि लिंगांगपदार्थसंविद्येषां दृढाभ्यासवशादिहास्ति ॥ ते मामुपेष्यंति विशुद्धभावा नावर्तयंतिस्म पुनर्भवाय॥५३॥यस्यैतत्परमात्मवेदनमिदं

---

आली आहे. (४६) "तत्वमसि" या वाक्यांतल्या "तत्" या पदाचा अर्थ लिंग असा होतो, "त्वं" या पदाचा अर्थ अंग असा होतो, "असि" या क्रियापदाचा अर्थ संबंध असा होतो. (४७) जगाचें नियमन करणाऱ्या शिवाला लिंग असें ह्मणत असून सुरासुरसहित प्रपंचाला अंग असें ह्मणतात. शिवाच्या ठि-काणीं अखेरीस जग जें लीन होतें, त्याला संबंध असें ह्मणतात. (४८) शक्तीला अंग ह्मणत असून शक्तिमान शिवाला लिंग असें ह्मणतात. या दोहोंच्या ऐक्य-ज्ञानाला संबंध असें ह्मणतात. (४९) भक्ति अंग असून शिव लिंग आहे, त्या भक्तीनें पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्या दोहोंचें ज्ञान करून घेणें याला संबंध असें ह्मणतात. (५०) जीवाला प्राणस्वरूप ह्मणत असून शिवाला लिंगरूप ह्मणतात. या दोहोंचा संबंध जो चांगल्या तऱ्हेनें जाणतो, त्याला प्राणलिंगवेत्ता शिवयोगी असें ह्मणतात. (५१) हे वत्सा, लिंगांगपदाचा शोध करून त्या ठिकाणीं परस्पर विरुद्ध भाव सोडावा, विरुद्धज्ञानाला सोडल्यानंतर संबंधपदाचा अर्थभूत तेवढा आत्मा हा राहतो. (५२) याप्रमाणें लिंगांगसंबंधपदांचा अर्थ जो गुरूपासून सम-जून घेतो, तो लिंगांगसंगी होय. (५३) दृढ अभ्यासाच्या योगानें याप्रमाणें लिं-गांगसंबंधपदांचें ज्ञान ज्यांना होतें, ते लोक, शुद्धभावाचे होऊन माझ्याजवळ येतात, ते पुनः जन्माला जात नाहींत. (५४) या तीन पदांचा अर्थ चांगला समजून घेऊन जो लिंगांगी सच्चिदानंदस्वरूप परमात्म्याचें ज्ञान संपादन करितो,

लिंगांगसंबंधिनः प्रत्यग्भाति पदत्रयार्थकलितं शुद्धं सदानंदकम् ॥ स श्रीकंठपदाब्जभक्तिभरितस्वान्तः पुमानुर्वरां त्यक्त्वा कर्मकलापमन्यविषयं शैवं विशुद्धं चरेत् ॥५४॥ इति वेदांततंत्रेषु गीयते तत्ववित्तमैः ॥ लिंगांगसंबंधपदानेवमेव विचारयेत् ॥५५॥ वृत्तम् ॥ लिंगं शिवः प्राणसमाख्यमंगं तस्मिल्लयस्तस्य कृतः पुरा यत् ॥ स्वदेशिकेंद्रेण शिवैक्यभाजा तदर्चयेल्लिंगमनन्यचेताः॥एवं विचरतस्तस्य भवंत्येते परिग्रहाः॥५६॥ विद्या भार्या सुतस्तोषः क्षमा हि परिचारिका ॥ माता भक्तिः पिताऽऽचारः सत्यं नप्ता शमः सखा॥५७॥ वैराग्यं सुहृदाचार्यो धर्मः श्रद्धा स्वसा मता ॥ दासी त्वहिंसा दासः स्यादस्तेयः परिकीर्तितः ॥५८॥ मैत्र्याद्यास्तनयाः प्रोक्ता धर्मोसौ वाहनं मतम्॥ ज्ञानं देहस्तथा क्षेत्रं विचारः सर्वगोचरः ॥५९॥ देशो मोक्षः सुगम्योयं प्राणलिंगांगसंगिनः ॥ एतान्परिग्रहान्वत्स गृहीत्वा शुद्धमानसः ॥६०॥ परिपूर्णचिदानंदश्चरेदुर्वीमिमां नरः ॥६१॥ वृत्तम् ॥ लोभो महाकर्दम इंद्रियाणि दुष्टारयो मोहमहापिशाचः ॥ क्रोधस्तरक्षुर्ममता हि कन्या मारस्तु चौरो मद

---

व परमेश्वराला आपले समोर पाहतो तो प्राणी साक्षात् श्रीकंठाच्या चरणावर दृढ भक्ति ठेवून या कर्मकपालाचा त्याग करून पृथ्वीवर आनंदानें फिरतो व शेवटीं शिवपदाला जाऊन तेथें स्वैर विहार करतो. (५५) याचप्रमाणें वेदांत शास्त्रामध्यें सांगितलें आहे, असें वेदवेत्ते सांगतात. ह्मणूनच बुद्धिमानानें लिंगांगसंबंधपदांचा विचार असाच करावा. (५६) लिंग शिव असून प्राण अंग आहे. त्या दोहोंच्याठिकाणीं पूर्वी शिवैक्य सेवन करणाऱ्या देशिकेंद्रानें जो संबंध करून दाखविला, त्याच लिंगाची पूजा अनन्य भावानें शिष्यानें करावी. (५७) विद्या ही बायको असून संतोष हा मुलगा आहे. आणि क्षमा दासी असून भक्ति ही आई आहे. आचार बाप असून सत्य नातू आहे, व शम हा मित्र आहे. (५८) वैराग्य सुहृद असून धर्म हा गुरु आहे. श्रद्धा ही बहीण असून अहिंसा दासी आहे. व अस्तेय ( न चोरणें ) दास आहे. (५९) मैत्री वगैरे आपलीं मुलें असून धर्म वाहन आहे. ज्ञान हें देह असून सर्व गोचरविचार क्षेत्र आहे. (६०) लिंगांगसंगीला मोक्ष हा फार सुलभ आहे. हे वत्सा, जंगमानें आपलें मन शुद्ध करून हे परिग्रह (साहित्य) घेऊन (६१) मोठ्या संतोषानें पृथ्वीवर संचार करावा. (६२) लोभ हा मोठा चिखलाचा गोळा असून इंद्रियें हे दुष्ट शत्रु आहेत. आणि मोह हा मोठा पिशाच असून क्रोध हा दुष्ट चित्ता आहे. ममता ही वाईट मुलगी असून मार

अंधकारः ॥६२॥ तापत्रयो महागर्तो विषयाः कंटकांकुराः ॥ असूया विषवल्ली स्यादहंकारो विषऱ्हदः ॥६३॥ एतानुपद्रवान्सर्वान्विचार्य सुधिया नरः ॥ संसारकानने भक्तो विचरन्सुखमश्नुते ॥६४॥ लिंगांगसंगी सततमेवमाचारवांच्छिवम्॥ योर्चयेद्यावदायुष्यं तस्य जन्म न विद्यते ॥६५॥ यावद्धनसमृद्धिः स्याद्यावदिंद्रियपाटवम् ॥ तावन्माहेश्वरं धर्ममाश्रयेद्वेदचोदितम् ॥६६॥ यावन्न हरति प्राणान्मृत्युर्गंधमिवानिलः ॥ तावदेवाश्रितं धर्मं कुर्यात्प्राज्ञः समाहितः ॥६७॥ न पुत्रा बांधवा दारास्सह गच्छन्ति गच्छता ॥ पुंसा लोकान्तरं यातो धर्माधर्मावुभौ ध्रुवम् ॥६८॥ आयुः कालक्रमाद्याति शरीरान्तरसंस्थितम्॥ भिन्नकुंभादिव जलं तस्माद्धर्मं समाश्रयेत् ॥६९॥ आपद्यपि दुरन्तायां गृही माहेश्वरो जनः ॥ न स्वधर्मं त्यजेत्प्राज्ञः कायेन मनसा गिरा ॥७०॥ एतानुल्लंघ्य वर्तन्ते ते शिवाज्ञापलापिनः ॥ राजाज्ञाभंगकर्तॄणां यथा दण्डो

---

(काम) हीं मोठा चोर आहे. आणि मद हा मोठा अंधार आहे. (६३) तापत्रय हे मोठे खड्डे असून विषय हे कांट्याचे अंकुर आहेत. असूया ही विषाची वेल असून अहंकार हा विषाचा डोह आहे. (६४) अशा भयंकर संसारारण्यांत बुद्धिमानानें चांगला विचार करून आपली वागणूक ठेविली तर तो चांगलें सुख भोगतो. (६५) लिंगांगीनें वीरमाहेश्वरानें नेहमीं चांगला आचार ठेवून आपलें आयुष्य असेपर्यंत शिवाची पूजा केली तर तो पुनः जन्माला येत नाहीं. (६६) जोंपर्यंत आपल्या जवळ द्रव्य आहे, जोंपर्यंत इंद्रियें शाबूद आहेत, तोंपर्यंत वेदोक्त माहेश्वरधर्मांचा संग्रह करून घ्यावा. (६७) गंध नेणाऱ्या वायूप्रमाणें मृत्यु जोंपर्यंत आपले प्राण नेत नाहीं, तोंपर्यंत बुद्धिज्ञानानें मन शांत ठेवून माहेश्वरधर्मांचा संग्रह करावा. (६८) जाणाऱ्या प्राण्यांबरोबर पुत्र कलत्र (बायको) वगैरे जात नाहींत, परंतु तो परलोकाला जातानां त्याच्या बरोबर धर्म अधर्म हे मात्र तेथपर्यंत जातात. (६९) आपल्या शरीराचें आयुष्य कालाच्या अनुक्रमानें फुटलेल्या घागरींतल्या पाण्याप्रमाणें हळु हळु क्षीण होतें. याकरितां मनुष्यानें आपल्या हयातींत धर्मसंग्रह करावा. (७०) भयंकर संकटांमध्यें देखील गृहस्थ माहेश्वरांनीं शरीरानें, मनानें, वाणीनें देखील आपला धर्म सोडूं नये. (७१) या धर्मांची मर्यादा जे पाळीत नाहींत, ते लोक शिवाज्ञा भंग करणारे आहेत, असें समजावें. राजाचा हुकूम तोडला असतां राजा लोकांना जसा दंड (शासन) करतो

भवेन्नृणाम् ॥७१॥ शिवाज्ञाभंगकर्तृणां दण्डो हि नरकस्तथा ॥ सांबेन शंभुनाज्ञप्तान्धर्मांस्त्यक्त्वार्चयेच्छिवम् ॥७२॥ यस्तस्मै कुप्यति शिवः स्वाज्ञाभंगनिमित्ततः ॥ चोदनालक्षणं धर्मं शिवेनाज्ञप्तमत्यजन् ॥७३॥ शंकरं पूजयेद्यस्तु तस्मै शंभुः प्रसीदति ॥ प्रसन्ने सति देवेशे महानंदे सदाशिवे ॥७४॥ दुष्करं किमु मर्त्यस्य त्रिषु लोकेषु विद्यते ॥ महादेवे महानंदे महाकारुणिकोत्तमे ॥७५॥ प्रसन्ने सति कीटो वा पतंगो वापि मुच्यते ॥ कर्मणा मनसा वाचा यदिहामुत्र सौख्यदम् ॥७६॥ तत्कुर्वन्नुभयत्रापि न हीयेत शिवार्चकः ॥ मुहूर्तमपि जीवेत नरः शुक्लेन कर्मणा ॥७७॥ न च वर्षशतेनापि नरः कृष्णेन कर्मणा ॥ धर्मं यो बाधते धर्मो न स धर्मः परंतपः ॥७८॥ अविरोधी तु यो धर्मः स धर्मः सद्भिरुच्यते ॥ एतस्माद्परो धर्मस्सोऽधर्म इति मे मतिः ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन धर्ममाश्रय सर्वदा ॥७९॥ वृत्तम् ॥ इदमतिपरमानंदात्मबोधानुषंगं परममतिरहस्यं वेदतंत्रप्रसिद्धम् ॥ भुवनजनहितार्थं प्राणलिंगै-

---

(७२) तसा शिवाज्ञा मोडणाऱ्या प्राण्यांना नरकवास होणें हाच दंड होय. श्रीसांबसदाशिवाच्या आज्ञेनें इतर धर्मांचा त्याग करून मनुष्यानें शिवपूजा करावी. (७३)आपली आज्ञा मोडली ह्मणून ज्या अर्थी शिव आपल्यावर रागावतो, त्या अर्थी शिवानें सांगितलेला चोदनालक्षण (प्रेरणारूप) धर्म न सोडतां (७४) शंकराची पूजा करावी. ह्मणजे त्याच्यावर शंभु प्रसन्न होतो. आनंदस्वरूपी शिव नेहमीं प्रसन्न झाला असतां (७५) त्या मनुष्याला त्रैलोक्यांत कोणतें दुष्कर (करावयास अशक्य) आहे बरें ? मोठा करुणाशील महादेव प्रसन्न झाल्यानंतर (७६) किडा असो, काजवा असो तो देखील मुक्त होतो. इहपरलोकीं सुख देणारें कर्म मनानें, शरीरानें, वाणीनें जो करतो, (७७) तो शिवपूजक दोन्ही लोकांत पराभव पावत नाहीं. शुद्ध कर्म करणारा प्राणी क्षणमात्र जीवंत राहिला तरी त्याचें आयुष्य सफल जाणावें. (७८) काळें कर्म (वाईट कृति) करून शंभर वर्षे जरी जगला तरी त्याचें आयुष्य व्यर्थ आहे. धर्माला ज्या धर्मानें बाध येतो, तो धर्म नसून अधर्म आहे, असें जाणावें. (७९) विरोधरहित जो धर्म असेल तो धर्म चांगला असें सज्जन सांगतात. याकरितां याविरुद्ध दुसरा धर्म अधर्म आहे, अशी माझी समजूत आहे. याकरितां सर्व प्रयत्नांनीं धर्माचा आश्रय कर. (८०) हें परम आनंददायक ज्ञान देणारें असून अतिशय रहस्यांतलें आहे. हें वेदांत व तंत्रांत प्रसिद्ध आहे. व हें सर्व सज्जनांत करावयास योग्य असून मुक्ति देणारें आहे. असें

क्यधर्मं सकलसुजनसेव्यं भाषितं मुक्तिदं ते ॥८०॥

सूत उवाच ॥श्रुत्वा धर्ममिमं परात्परतरं संसारसंशोषणं लिंगांगोत्तमसंगमर्थललितं निर्वाणसौख्यप्रदम् ॥ स्कंदो भक्तिसुधाभिलाषणरतः स्वान्तर्भवानीधवं ब्रह्मेंद्राच्युतपूजितांघ्रिकमलं नत्वाऽभवध्यानवान् ॥८१॥ भक्त्या परवशो भूत्वा स्कंदस्तुष्टाव शंकरम्॥ गंगाधरं विरूपाक्षं गिरींद्रतनुजाधवम् ॥८२॥

स्कंद उवाच॥नमः शिवाय सोमाय भक्तापदपहारिणे॥ विद्यारूपाय देवाय नीलकण्ठाय शूलिने॥८३॥ नित्यानन्दं निराधारं निर्विकल्पं निरंजनम् ॥ निग्रहानुग्रहकरं जगतां नौमि शंकरम् ॥८४॥ सृष्टिस्थितिविनाशानां हेतुभूतमहेतुकम् ॥ वन्दे सच्चित्सुखात्मानं कलाधरकलाधरम् ॥८५॥ नागालंकृतसर्वांगं जटामुकुटमंडितम् ॥ गिरिजारमणं देवं गिरिशं गीतवत्सलम् ॥८६॥ दक्षाध्वरध्वंसकरं महातांडवमण्डितम् ॥ महामहेश्वरं वन्दे तापत्रयविवर्जितम् ॥८७॥ विश्वेश्वरं विरूपाक्षं वि-

---

हें प्राणलिंगैक्य धर्माचें माहात्म्य लोकांच्या कल्याणाकरितां तुला सांगितलें.

(८१) सूत ह्मणाले—श्रेष्ठांत श्रेष्ठ, संसार शोषण करणारा, लिंगांग संबंधरूप सुंदर अर्थ प्रतिपादणारा, निर्वाणसौख्य ( मोक्षसुख ) देणारा असा धर्म ऐकून भक्तिरूपी अमृत पिण्याच्या लालसेनें आपल्या हृदयांत ब्रह्मेंद्रादिदेवांनीं वंदित अशा शिवाच्या चरणाचें ध्यान षण्मुखानें केलें. (८२) भक्तीनें परवश होऊन स्कंदानें शंकराची स्तुति केली. त्यानें गंगाधर विरूपाक्ष पार्वतीपति या नांवाच्या शिवाची स्तुति केली.

(८३) स्कंद ह्मणाला—शिवा, सोमा, भक्तांचें संकट परिहार करणाऱ्या देवा विद्यारूपा, देवा, नीलकंठा, शूलायुधधारिन्, तुला नमन असो. (८४) नित्यानंदा, निराधारा, निर्विकल्पा, निरंजना, जगाचें शासन पालन करणाऱ्या देवा, शंकरा तुला मी नमन करतों. (८५) सृष्टि, स्थिति, लय यांना कारण असून अहेतुक ह्मणवून घेणाऱ्या देवा, सच्चिदानंदसुखस्वरूपा, चंद्रकलाधरा, तुला नमन असो. (८६) सर्पभूषणा, जटामुकुटधारिन् गिरिजारमणा, देवा, गीतवत्सला, गिरिशा, तुला नमन असो. (८७) दक्षयज्ञध्वंसका, महातांडव ( नर्तन ) करणाऱ्या देवा, तापत्रयरहिता, महेश्वरा, तुला नमन असो. (८८) विश्वेश्वरा, विरूपाक्षा, विश्वरूपधरा, हरा, भूतयोने, महेशा, त्र्यंबका, अव्यया, तुला नमन असो.

श्वरूपधरं हरम् ॥ भूतयोनिं महेशानं वन्दे त्र्यम्बकमव्ययम् ॥८८॥ कलातीतं कलाधारं कोटिसूर्यसमप्रभम् ॥ कामावलेपविध्वंसं वरदं वासवार्चितम् ॥ ॥८९॥ सर्वाधारं सदानन्दं सर्वज्ञं सर्वनायकम् ॥ सर्वोपद्रवनिर्मुक्तं वन्दे शंभुं जगत्पतिम् ॥९०॥

सूत उवाच ॥ इति स्तुत्वा महादेवं भक्तिनम्रेण चेतसा ॥ स्कन्दो लिंगांगसंबन्धपदाभिज्ञो बभूव सः ॥९१॥भवन्तोऽपि महाप्राज्ञाः सदाशिवपतिव्रताः ॥ भवत प्राणलिंगांगसंबन्धपदवेदिनः ॥९२॥ यूयं श्रध्दान्विताः पुत्रैः शिष्यैः परिवृता द्विजाः ॥ स्थापयध्वमिमं धर्मं मोक्षसोपानपध्दतिम् ॥९३॥ यः स्थापयतुमुद्युक्तः श्रध्दयैव क्षमोऽपि सन् ॥ इमं शैवमहाधर्मं सोऽपि मुक्तिमवाप्नुयात्॥९४॥शक्तो यः स्थापितुं धर्ममुपेक्षां कुरुते नरः ॥ सोऽसिपत्रवनं नाम नरकं प्रतिपद्यते॥९५॥धर्मं स्थापयितुं पुंसो यतमानस्य हे द्विजाः ॥रक्षणं कुरुते यस्तु सोऽपि शार्वपदं व्रजेत् ॥९६॥ यः शांभवमहाधर्मस्थापनार्थं त्यजेदसून् ॥ स गणेशत्वमाप्नोति शंकरस्य प्रसादतः ॥९७॥ यदा यदा हि धर्मस्य हानिः

---

(८९) कलातीता, कलाधारा, कोटिसूर्यप्रकाशा, कामगर्वपरिहारका, वरदा, इंद्रपूजिता, (९०) सर्वाधारा, सदानंदा, सर्वज्ञा, सर्वनायका, सर्वोपद्रवरहिता, शंभो, जगत्प्रभो, तुला नमन असो.

(९१) सूत ह्मणाले–याप्रमाणें भक्ति पूर्वक नम्रमनानें महादेवाची स्तुति करून लिंगांगसंबंध पदाच्या ज्ञानांत स्कंद मोठा प्रवीण झाला. (९२) सदाशिवव्रत करणारे महाप्राज्ञ ब्राह्मणहो, तुह्मी देखील प्राणलिंगांगसंबंधपदवेत्ते व्हा. (९३) तुह्मी श्रद्धा ठेवून पुत्रांनीं शिष्यांनीं युक्त होऊन मोक्षाच्या पायऱ्या असा हा धर्म जगांत प्रसिद्धीस आणा. (९४) या शैव महाधर्माची स्थापना श्रद्धेनें करण्याचे प्रयत्न जो करतो, तो देखील मुक्त होतो. (९५) धर्मस्थापना करावयास समर्थ असून जो उपेक्षा करतो, तो प्राणी भयंकर असिपत्रवन नांवाच्या नरकाला जातो. (९६) हे ब्राह्मणहो, धर्मस्थापना करण्याकरितां प्रयत्न करणाऱ्या प्राण्याचें रक्षण जो करतो, तोही शिवपदाला जातो. (९७) जो प्राणी शैवमहाधर्मस्थापना करण्याकरितां प्राण त्याग करतो, तो प्राणी शंकराच्या प्रसादानें गणाधीश होतो. (९८) जेव्हां जेव्हां शैवधर्माची ग्लानि होते, तेव्हां तेव्हां गणाधीशाचा अवतार

शैवस्य जायते ॥ तदा तदावतारोऽयं गणेशस्य महीतले ॥९८॥ वृत्तम् ॥ यदा यदा प्राणशिवैक्यभाजां हानिर्भवेद्भूमितलेऽवतीर्य ॥ तदा तदा मर्त्यकुले गणेशाः संभूय कुर्वन्ति हि धर्मसंस्थाम् ॥९९॥ धर्मग्लानिरभूद्यदा शिवगणा नानाकुलेषूत्थिता भूमौ शंकरनिंदकानघवतस्तद्धर्मविध्वंसकान् ॥ शिक्षन्तः शिवधर्ममार्गमखिलं संस्थाप्य लिंगार्चकान् सत्कृत्वा सकलान्जनानिह पुनः शंभुं समेष्यंति ते ॥१००॥ यस्यैव शास्त्रकथनं प्रकटीकरोति लिंगांगसंगविषयं परमार्थभूतम् ॥ लोकेऽतिदुर्जनघने स हि लिंगधारी माहेश्वरः श्रुतिपुराणविदागमज्ञः ॥१०१॥ तस्माच्छिवकथावक्तॄन्रक्षेत्सर्वप्रयत्नतः ॥ तद्रक्षणाद्भविष्यन्ति मर्त्या धर्मपरायणाः ॥१०२॥ यूयं श्रद्धान्विता विप्रा रक्षध्वं सर्वभावतः ॥ शिवागमरहस्यज्ञांच्छिवलिंगार्चनापरान् ॥१०३॥ य इमं पठतेऽध्यायं नरो भक्तिसमन्वितः ॥ स सम्यग्ज्ञानवान्भूत्वा शिवसायुज्यमाप्नुयात् ॥१०४॥ श्रुणोति पूजावेलायां श्रावयेद्वा समाहितः ॥ प्रसीदति शिवस्तस्य नीलकण्ठोऽविकापतिः॥१०५॥न वक्तव्यमिदं शास्त्रं

---

पृथ्वीतलावर होत असतो. (९९) जेव्हां जेव्हां भूतलावर प्राणलिंगैक्य करणाऱ्या प्राण्यांची हानि होते, तेव्हां तेव्हां मानवकुलांत गणाधीश अवतार घेऊन पुनः धर्मस्थापना करतात. (१००) जेव्हां धर्माची ग्लानि होईल तेव्हां शिवगण नानाकुलांत जन्म घेऊन भूतलावर शिवनिंदक व शिवधर्मध्वंसक यांना शासन करीत शिवधर्माची स्थापना करून लिंगपूजक शिवभक्तांचा सन्मान करून पुनः ते शिवसान्निधीस जातात. (१०१) लिंगांगसंबंधरूप अर्थ ज्यामध्यें आहे, अशा परमार्थ शास्त्राचें अध्ययन करवून दुर्जनांनीं भरलेल्या जगांत जो प्राणी धर्म प्रसिद्धीस आणतो, तोच लिंगधारी असून श्रुतिपुराण जाणणारा माहेश्वर होय. (१०२) याकरितां शिवधर्म प्रवक्त्याचें रक्षण अवश्य केलें पाहिजे. त्यांच्या रक्षणानें लोक धर्मानें वागत असतात. (१०३) ब्राह्मणहो तुह्मी श्रद्धा ठेवून सर्व भावांनीं शिवधर्माचें रक्षण करा. शिवागमांतलें रहस्य जाणून शिवलिंगपूजेंत रत जे आहेत त्या सज्जनांचें रक्षण करा. (१०४) जो प्राणी भक्तियुक्त होऊन याचें पठन ध्यान करतो, तो चांगला ज्ञानी होऊन शिवसायुज्याला जातो. (१०५) जो प्राणी शिवपूजेच्या वेळेस शांतमनानें दुसऱ्याला हें ऐकवितो, त्याला अंबिकापति नीलकंठ प्रसन्न होतो.(१०६) हें शास्त्र भक्तिहीन पापी मानवाला सांगूं नये नास्तिक श्रद्धाहीन

भक्तिहीनाय पापिने॥नास्तिकाय मनुष्याय श्रद्धाहीनाय सर्वदा ॥१०६॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे वीरमाहेश्वरधर्मनिर्णये शिवषण्मुखसंवादो नाम सप्तचत्वारिंशोऽध्यायः ॥

---

मनुष्याला सांगूं नये.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचार निरूपणांतील वीरमाहेश्वरधर्मनिर्णयांतील शिवषण्मुखसंवाद नांवाचा सत्तेचाळिसावा अध्याय संपला.



# अथ अष्टचत्वारिंशोऽध्यायः

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे शंकरसंहितायाम् ॥ ऋषय ऊचुः ॥ भगवता कथिता वृत्तिर्वीरमाहेश्वरार्चिता ॥ अस्माकं सांप्रतं विद्वन् वद षट्स्थलनिर्णयम् ॥१॥

सूत उवाच ॥ वक्ष्ये भाग्यवतां श्रेष्ठाः षट्स्थलानि समासतः ॥ यानि शक्तिधरायाह श्रीकण्ठः पार्वतीपतिः ॥२॥ पुरा कैलासशिखरे नानारत्नविभूषिते ॥ समासीनं महादेवं पार्वत्या सहितं शिवम् ॥३॥ गंगाधरं विरूपाक्षं श्रीकंठममितौजसम् ॥ पप्रच्छ प्रणतो भूत्वा स्कन्दः षट्स्थलनिर्णयम् ॥४॥

स्कंद उवाच ॥ त्वत्प्रसादाच्छ्रुतस्तात वीरशैवक्रियाक्रमः ॥ इदानीं देवदेवेश वद षट्स्थलनिर्णयम् ॥५॥

श्रीशंकर उवाच ॥ वक्ष्यामि संग्रहेणाहं तव षट्स्थलनिर्णयम्॥सारं समस्तशास्त्रेषु रहस्यं च षडानन ॥६॥ सर्वेषां स्थानभूतत्वाल्लयभूतत्वतस्सदा ॥ तत्वानां महदादीनां स्थलमित्यभिधीयते ॥७॥ स्थीयते

---

श्रीशिवास नमस्कार असो. स्कांदपुराणांतील शंकरसंहितेंत ह्मटलेंकीं, ऋषि- बोलले (१) हे भगवन्, वीरमाहेश्वरांना मान्य झालेली वृत्ति सांगितली, आतां षट्स्थल निर्णय सांगा.

(२) सूत बोलले—भाग्यवान ब्राह्मणहो, षट्स्थलांचा निर्णय संक्षेपानें सांगतों, ऐका. हा निर्णय पार्वतीपति श्रीकंठानें स्कंदाला सांगितला आहे, तोच तुह्मी ऐका. (३) पूर्वी अनेक रत्नांनीं सुशोभित अशा कैलास पर्वतावर पार्वतीसह शिव बसले होते, त्याशिवाचें रूप, नाम पुढें दिल्याप्रमाणें पाहून स्कंदानें प्रश्न केला. (४) विरूपाक्ष, गंगाधर, अमिततेजस्वी शंकराला नमन करून षण्मुखानें षट्स्थल निर्णयाचा प्रश्न केला.

(५) षण्मुख बोलला—हे तात, वीरशैवाचाराचा क्रम ऐकिला, देवाधिदेवा, आतां षट्स्थल निर्णय सांगा.

(६) श्रीशंकर बोलले—हे षण्मुखा, षट्स्थलांचा निर्णय संक्षेपानें सांगतों ऐक. हे स्कंदा, हा निर्णय सर्वशास्त्रांतला सार असून परमरहस्य आहे. (७) हें षट्स्थल महदादितत्वांचें आश्रयस्थान असून लयस्थानही आहे. (याठिकाणींच सर्वांचा लय होतो.) ह्मणूनच याला स्थान असें सांगतात. (८) या स्थलांमध्यें मुक्ति राहते

लीयते यस्मिन्मुक्तिः संसारपद्धतिः ॥ तदेतत्स्थलमित्युक्तं स्थलतत्व-विशारदैः ॥८॥ स्थाणौ सर्वाश्रयेऽनन्ते सच्चिदानंदरूपिणि ॥ यस्मिन्ब्रह्मणि लीयेत प्रपंचस्तत्स्थलं स्मृतम् ॥९॥ तद्ब्रह्म स्थलशब्देन स्वशक्त्या षड्विधं भवेत् ॥ मोक्षमार्गैकसोपानं वीरमाहेश्वरादृतम् ॥१०॥ तस्य नामानि वक्ष्यामि स्वरूपं ते समासतः ॥ यद्ज्ञानेन नरो मुक्तिमनायासेन गच्छति ॥११॥ भक्तो माहेश्वरश्चैव प्रसादी प्राणलिंगकः ॥ शरणः शिवलिंगैक्यः षट्स्थलं च मम प्रियम् ॥१२॥ सदाचारः शिवे भक्तिर्लिंगे जंगम एकधीः ॥ लांछने शरणे भक्तिर्भक्तस्थलमनुत्तमम् ॥१३॥ परस्त्रियं परार्थं च वर्जितो भावशुद्धिमान् ॥ लिंगनिष्ठानियुक्तात्मा माहेश्वरमहास्थलम् ॥१४॥ लिंगार्पितपदार्थं च सुभोगी लिंगआहितः ॥ अनर्पितविसर्जी च प्रसादस्थलमुत्तमम् ॥१५॥ वायुप्राणगुणे लिंगे लिंगप्राणे समाहितः ॥ सुखदुःखोभयं नास्ति प्राणलिंगस्थलं भवेत् ॥१६॥ पतिर्लिंगं सती चाहं हृदि युक्तः स्वयं प्रभुः ॥ प्रापं-

---

असून संसाराचा लय याठिकाणीं होतो. ह्मणूनच स्थलतत्ववेत्ते लोक याला स्थल असें ह्मणतात. (९) सर्वाश्रय, सच्चिदानंदस्वरूपी, स्थाणु नांवाच्या परब्रह्मवस्तूमध्यें सर्व जगाचा लय होतो, ह्मणून त्याला स्थल असें ह्मणतात. (१०) त्या ब्रह्मस्थल शब्दांत निजशक्तीच्या अनुरोधानें सहा प्रकार झाले आहेत. मोक्षमार्गाच्या पायऱ्या ज्यांना ह्मणतात, यांचा (या षट्स्थलांचा) आदर त्या वीरमाहेश्वरांनीं केला आहे. (११) आतां तुला संक्षेपानें त्यांचीं नांवें, व त्यांचें स्वरूप सांगतों. कारण ज्यांचें ज्ञान झालें असतां मनुष्य विन आयासानें मोक्षाला जातो. (१२) भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण, शिवलिंगैक्य अशीं हीं माझीं आवडतीं स्थलें होत. (१३) सदाचार ठेवून शिवाची उत्तम भक्ति करून लिंगजंगमांमध्यें ऐक्यबुद्धि ठेवणें आणि शिवलांछनावर व शरणावर भक्ति ठेवणें, याला श्रेष्ठ भक्तस्थल ह्मणतात. (१४) परस्त्री परद्रव्य वर्ज्य करून शुद्ध भाव ठेवून लिंगावर चांगली निष्ठा ठेवणें, याला माहेश्वरस्थल ह्मणतात. (१५) सर्व पदार्थ लिंगाला अर्पण करून उत्तम भोग घेत लिंगावर मन ठेवून शिवलिंगाला अनर्पित झालेले पदार्थ सोडणें, याला प्रसादस्थल ह्मणतात. (१६) वायुप्राणरूपी गुण ज्यामध्यें आहे अशा लिंगावर व लिंगप्राणावर समाधान मन ठेवून सुख दुःख समान मानणें याला प्राणलिंगस्थल ह्मणतात. (१७) लिंग पति असून सती मी आहें, असा भाव हृदयांत ठेवून प्रभु शिव मीच आहें. असें मानणें व

चिकसुखं नास्ति शरणस्थलमुत्तमम् ॥१७॥ षड्र्मयश्च षड्वर्गो नास्ति चाष्टविधार्चनम् ॥ निर्भावो निजलिंगैक्यः शिखिकर्पूरयोगवत् ॥१८॥ वृत्तम् ॥ तवाथ वा षट्स्थलमन्यदस्ति शिवांगभूतं श्रुतिमंत्रसिद्धम् ॥ परं पदं शुद्धमनंतरूपं वदाम्यहं गुह्यतमं स्ववेद्यम् ॥१९॥ सर्वज्ञतादीनि निसर्गभूतान्यंगानि षट् च स्थलमाहुरार्याः ॥ अंगीकृतत्वाद्गिरिशेन नित्यं वक्ष्यामि ते तानि मम प्रियाणि ॥२०॥ सर्वज्ञता तृप्तिरनादिबोधः स्वतंत्रता नित्यमलुप्तशक्तिः ॥ अनन्तशक्तिश्च विभोर्विधिज्ञाः षडाहुरंगानि च षट्स्थलानि ॥२१॥ एतदप्यपरे प्राहुः षट्स्थलं स्थलवित्तमाः ॥ भक्त्या विज्ञानपर्यन्तं साध्यसाधनभावतः॥२२॥ भक्तिः कर्मक्षयो बुद्धिर्विचारो दर्पसंक्षयः ॥ सम्यग्ज्ञानमिति प्राज्ञैः स्थलषट्कमुदाहृतम् ॥२३॥ क्रिययोत्तमया भक्तिः प्राप्यते शिवचिंतकैः ॥ भक्त्या कर्मक्षयस्तस्मादमला धिषणा भवेत् ॥२४॥ धिया वस्तुविचारः स्या-

---

प्रापंचिक सुखाचा त्याग करणें याला शरणस्थल ह्मणतात. (१८) सहा ऊर्मि (अस्ति, परणमति वगैरे ह्या सहाऊर्मि होत.) षड्वर्ग (काम, क्रोध, वगैरे सहा वर्ग होंत.)यांचा त्याग करून अष्टविध अर्चन करणें. (आठ प्रकारांनीं पूजा करणें). व भावरहित होऊन शिखिकर्पूराप्रमाणें (विस्तवांत कापूर घातल्या प्रमाणें) निजलिंगांत ऐक्य पावणें, याला शिवलिंगैक्यस्थल ह्मणतात. (१९) हे वत्सा, श्रुतिमंत्रांनीं सिद्ध झालेलें शिवाचें अंगभूत, श्रेष्ठपद, शुद्ध, अनंतरूपाचें, अतिगुह्य, स्ववेद्य (आपणच समजून घ्यावयास योग्य) असें दुसरें षट्स्थल तुला सांगतों ऐक. (२०) सर्वज्ञता वगैरे सहा नैसर्गिक अंगें हीं सहा स्थलें आहेत, असें मोठे लोक सांगतात. तीं स्थलें शिवानें स्वीकारल्यामुळें अर्थात तीं माझीं आवडतीं झालीं आहेत. (२१) सर्वज्ञता, तृप्ति, अनादिबोध, स्वतंत्रता, निरंतर अलुप्तशक्ति, अनंतशक्ति अशीं शिवाचें अंगभूत सहा स्थलें आहेत, असें विधि जाणणारे पंडित ह्मणतात. (२२) स्थलवेत्ते लोक यांहून निराळें षट्स्थल सांगतात. भक्तीपासून विज्ञानापर्यंत साध्य साधन भावानें सहा स्थलें आहेत, असें सांगतात. (२३) भक्ति, कर्मक्षय, बुद्धि, विचार दर्पसंक्षय, सम्यग्ज्ञान अशीं सहास्थलें आहेत, असें सांगतात. (२४) शिवाचें चिंतन करणाऱ्या प्राण्यांनीं चांगली क्रिया केली तर त्यांना भक्ति साध्य होते, त्या भक्तीच्या योगानें कर्माचा क्षय होऊन निर्मल बुद्धि उत्पन्न होते. (२५) तशा बुद्धीच्या योगानें वस्तूचा विचार करावा,

द्विचाराद्दर्पसंक्षयः ॥ तस्माज्ज्ञानं ततो मोक्षो न मोक्षाद्विद्यते परं ॥२५॥ पूर्वं पूर्वं साधनं स्यात्साध्यं स्यादुत्तरोत्तरम् ॥ उत्तरोत्तरवैशिष्ट्यमे- तेषां परिकीर्तितं ॥२६॥ यस्यैवं क्रमविज्ञानं देशिकस्य प्रसादतः ॥ जन्मान्तरकृतात्पुण्याज्जायतेऽसौ सदाशिवः ॥२७॥ एतान्यभ्यसतः पुंसो मुक्तिः पाणितले स्थिता ॥ न तस्य दुर्लभं किंचित्त्रिषु लोकेषु विद्यते ॥२८॥ षट्स्थलाभ्यासयोगेन मुक्तिः सायुज्यलक्षणा ॥ प्राप्यते शिवभक्तैश्च नान्यैः कर्मरतैर्जनैः ॥२९॥ वृत्तम् ॥ अतः समस्तं परिव- र्जयित्वा सुखाभिलाषी परिपूर्णचेताः ॥ स्थलोक्तसम्यक्चितिचित्तवृ- त्तिं निवेश्य तद्भावविचारवान् स्यात् ॥३०॥ सम्यग्ज्ञानस्य मूलं हि भक्तिरव्यभिचारिणी ॥ सच्चिदानंदसंपूर्णे शिवलिंगस्वरूपिणि ॥३१॥ शिवस्य भक्तेर्मूलं हि वीरमाहेश्वरैर्जनैः ॥ संगमः सर्वदा पुंसां स तु लोकेषु दुर्लभः ॥३२॥ पुराकृतमहापुण्यपरिपाकविशेषतः॥वीरमाहेश्व- रासंगः सुलभः कस्य चिद्भवेत्॥३३॥नरो माहेश्वरासंगपरो भवति व-

---

त्या विचारानें गर्वाचा परिहार होतो, नंतर त्यापासून उत्तम ज्ञान होऊन ज्ञाना- पासून मोक्ष मिळतो. मोक्षापलीकडे दुसरें कांहीं नाहीं. (२६) प्रथम प्रथम जस- जशीं साधनें करावीं तसतशीं पुढें पुढें साध्यता मिळत असते यांच्यामध्यें उत्तरोत्तर श्रेष्ठपणा आहे. (२७) देशिकाच्या प्रसादानें ज्याला या क्रमाचें ज्ञान झालें आहे, त्याच्या जन्मांतर पुण्यसंग्रहानें तो प्राणी शेवटीं शिवच होतो. (२८) याचा अभ्यास जो प्राणी करतो, त्याच्या तळहातांत मुक्ति आहे, असें जाणावें. त्रैलोक्यांत त्याला असाध्य असें कोणतेंही नाहीं. (२९) षट्स्थलाच्या अभ्यासानें सायुज्य नांवाची मुक्ति मिळते. ते मात्र शिवभक्तच असले पाहिजेत. अन्य कर्म करणाऱ्यांना मुक्ति मिळत नाहीं. (३०) याकरितां सर्व सोडून सुखाभिलाष करणाऱ्यानें मन पूर्णपणें ताब्यांत ठेवून षट्स्थलांत सांगितल्याप्रमाणें ज्ञानमार्गांत चित्तवृत्ति ठेवून षट्स्थल तत्वांच्या विचारांत मनुष्यानें मग्न व्हावें. (३१) चांगल्या ज्ञानाचें मूळ अव्यभि- चारिणी (दुसरी कडे न जाणारी) भक्ति होय. ह्मणूनच शिवलिंगस्वरूपी सच्चिदानं- दस्वरूप शिवावर तशी भक्ति करावी. (३२) शिवावर भक्ति उत्पन्न व्हावयास मूळ कारण माहेश्वर लोकांचा सहवास आहे. तो सहवास सर्वदां मानवांना मिळत नसतो. (३३) पूर्वजन्मीं केलेल्या पुण्यसंग्रहानें वीरमाहेश्वरांचा सहवास कदाचित कोणा- ला तरी मिळण्याचा संभव असतो. (३४) हे वत्सा, वीरमाहेश्वरांचा सहवास कर- ण्यांत मनुष्य तत्पर होईल तर कांहीं महिन्यांचा अवकाश देखील न लागतां

त्स चेत्॥तद्दिनैरेव नो मासैः प्राप्यते शिववेदनम्॥३४॥वृत्तम्॥भवार्णवं तर्तुमिहेच्छतां नृणामुपाय एषस्सुलभः सुखप्रदः॥न वीरमाहेश्वरसंगमाहते जगत्त्रयेऽन्योऽस्ति विचारिते सति ॥३५॥ तस्मादिह प्राणशिवैक्यभाजं संपूजयेद्यो भुवनैकवंद्यम्॥संसारसंबंधविहीनभावः स ज्ञानमेति स्थलषट्ककजं तत् ॥३६॥ तस्मात्परब्रह्मसुखस्वरूपं स्वमायया षट्स्थलभेदभिन्नम्॥सच्चिन्मयं शंकरमक्षरं तद्यो वेद नायाति पुनर्भवं सः ॥३७॥एवं षट्स्थलविज्ञानं प्रत्यग्रूपं प्रमाणतः॥गुरूक्त्या स्वानुभूत्या च यस्य भाति स सर्ववित् ॥३८॥ क्रिमिकीटपतंगेभ्यः पशवः प्रज्ञयाधिकाः ॥ पशुभ्योऽपि नराः श्रेष्ठास्तेषु श्रेष्ठा द्विजातयः ॥३९॥ द्विजातिष्वधिका विप्रा विप्रेषु क्रतुबुद्धयः ॥ क्रतुबुद्धिषु कर्तारस्तेभ्यः सन्यासिनोऽधिकाः ॥४०॥ तेभ्यो विज्ञानिनः श्रेष्ठास्तेषु शंकरपूजकाः ॥ तेषु श्रेष्ठा महाभाग मम लिंगांगसंगिनः ॥४१॥ लिंगांगसंगिष्वधिकः षट्स्थलज्ञानवान्भवेत् ॥ तस्मादप्याधिको नास्ति त्रिषु लोकेषु सर्वदा ॥४२॥

---

त्याच दिवशीं त्याला शिवतत्वज्ञान होतें. (३५) संसारसमुद्र तरणाऱ्या प्राण्याला सुखाचा सुलभ उपाय हाच आहे. विचार केला असतां वीरमाहेश्वरांच्या सहवासावांचून दुसरा उपाय नाहीं, असेंच ठरेल. (३६) त्रैलोक्यांत वंद्य झालेल्या प्राणशिवैक्यसेवन करणाऱ्या वीरमाहेश्वराची पूजा जो करतो, तो प्राणी संसाराचीं सर्व बंधनें तोडून षट्स्थलाचें ज्ञान चांगल्या प्रकारें मिळवितो. (३७) त्या षट्स्थल ज्ञानापासून सुखस्वरूप, निजमायेनें षट्स्थल भेदांनीं भिन्न असलेला (षट्स्थलस्वरूप असलेला), सच्चिन्मयरूप असलेला, परब्रह्मस्वरूप अशा शिवतत्वाचें ज्ञान जो करून घेतो तो मानव शिवज्ञान झाल्यानंतर पुनः संसारांत जन्माला येत नाहीं. (३८) षट्स्थलज्ञान गुरूक्तीनें व स्वानुभवानें करून घेतल्यानंतर कोणत्या प्राण्याला प्रमाणपूर्वक शिवतत्व सन्मुख होतें, त्यालाच जगामध्यें सर्वज्ञ ह्मणतात. (३९) किडे, आळ्या, काजवे यांपेक्षां पशु बुद्धीनें अधिक आहेत. पशूंपेक्षां मानव श्रेष्ठ होत, साधारण मानवांपेक्षां ब्राह्मण श्रेष्ठ होत. (४०) ब्राह्मणांपेक्षां विप्र (वेदज्ञानी ब्राह्मण) श्रेष्ठ होत, विप्रांपेक्षां यज्ञ करविणारे ब्राह्मण श्रेष्ठ होत, त्यांपेक्षां यज्ञकर्ते श्रेष्ठ होत, त्यांपेक्षां संन्यासी श्रेष्ठ होत, (४१)त्यांपेक्षां विज्ञानी श्रेष्ठ होत; त्यांपेक्षां शिवपूजक श्रेष्ठ होत, त्यांपेक्षां माझे लिंगांगसंगी श्रेष्ठ होत, (४२) त्यांपेक्षां षट्स्थलज्ञानी श्रेष्ठ होत, यापेक्षां श्रेष्ठ त्रिजगतांत कोणीही नाहीं.

वृत्तम् ॥ षट्सु स्थलेषु विजयन्ति हि ये महान्तो वंद्यास्त एव विजि-तेन्द्रियशत्रवस्ते॥सम्राट् स्वराडपि च यत्र तृणायते तच्छैवं पदं जग-ति ते समवाप्नुवन्ति ॥४३॥ एवं षट्स्थलनिर्णयं शिवपदप्राप्त्यैकहेतुं सदा यस्सेवेत कराब्जपीठनिहितः श्रीकण्ठलिंगार्चकः ॥ स ज्ञानी स पुरातनः स हि महामाहेश्वरेषूत्तमो मर्त्यस्तेन जगत्त्रये न सदृशो वि-द्येत देवोऽपि वा ॥४४॥ यस्यैवं षट्स्थलज्ञानसामग्रीकलना दृढा॥ भा-ति धीदर्पणे स्वच्छे स वै माहेश्वरो जनः॥ स वंद्यः सर्वदा पूज्यः सं-सारविजिगीषुभिः ॥४५॥ स भवार्णवमत्युग्रं दुष्पारं दुस्तरंगकम् ॥ नीत्वा मां परमात्मानमेति नावर्तते पुनः ॥४६॥ तस्मान्माहेश्वरस्यैषा-निष्ठा वक्तुं न शक्यते॥मया सर्वविदा वत्स किमुतान्यैरजादिभिः॥४७॥ बहुनोक्तेन किं वत्स स एवाहं न संशयः ॥ सुदुर्लभमिदं ज्ञानं नराणा-मुत्तमोत्तमम् ॥४८॥ मद्भक्तिरहितानां च दुर्वृत्तानां षडानन ॥ मद्भा-वामृततृप्तानां सदाचारानुवर्तिनाम् ॥४९॥ जायते तत्परं ज्ञानं स्थल-

---

(४३) षट्स्थलांत ज्यांनीं जय मिळविला आहे, तेच वंद्य असून तेच खरे इंद्रिय-निग्रह करणारे होत. साम्राज्य (सार्वभौमपद) स्वराज्य (स्वर्गपद) ज्यापुढें तुच्छ आहे, असें शैवपद त्यांना मिळतें. (४४) शिवपद मिळवावयास उत्तम साधन असें षट्स्थलज्ञान संपादन करून करकमलपीठावर इष्टलिंगाची पूजा जो प्राणी करतो, तो प्राणी ज्ञानी असून पुरातन आहे, तोच प्राणी माहेश्वरामध्यें उत्तम असून त्याच्या तोडीचा प्राणी त्रिजगतांत कोणी देव देखील नाहीं. (४५) ज्याच्या बुद्धिरूपी स्वच्छ आरशांत षट्स्थलज्ञानसामुग्रीनें दृढ प्रतिमा दिसते, तोच खरा माहेश्वर होय. संसारांतून तरून जाणाऱ्या प्राण्यांनीं त्याला नेहमीं नमस्कार करा-वेत व त्याची पूजा करावी. (४६) संसारसमुद्र फार भयंकर असून तरण्यास अशक्य आहे; व यांत मोठ मोठाल्या दुष्ट लाटा फार आहेत, अशा समुद्रांतून तो माहेश्वर पार होऊन, नंतर प्राणी पुनः जन्मास येत नाहीं, आणि तो माझ्या-जवळ येतो. (४७) याकरितां माहेश्वराची निष्ठा सांगावयास फार अशक्य आहे. हे वत्सा, मला जर सांगावयास जड वाटतें, तर इतर साधारण ब्रह्मादिदेव यांत काय करूं शकतील बरें? (४८) हे वत्सा, फार सांगण्यांत काय मतलब आहे. तो माहेश्वर मीच आहें, यांत संशय नाहीं. हें उत्तमोत्तम ज्ञान मानवांना फारच दुर्लभ आहे. (४९) हे षडानना, दुर्व्यापार करणाऱ्यांना व माझी भक्ति न कर-णाऱ्यांना हें ज्ञान होत नाहीं. सदाचारानें वागणाऱ्यांना व माझ्या ठिकाणीं भाव

षट्कोद्भवं नृणां ॥५०॥ वृत्तं ॥ अतः सदाचाररतः समाधिमांच्छिवस्य लिंगार्चनतत्परो जनः ॥ शिवस्वरूपं परमार्थमादरात्सदाभ्यसेत्षट्स्थलमेकभावतः ॥५१॥ सर्वमुक्तं समासेन स्थलनिर्णयवेदनम् ॥ गोप्यं समस्तशास्त्रेषु तव स्नेहान्मयोदितम् ॥५२॥ तस्मादेवं विदित्वा त्वं षट्स्थलज्ञानवान्भव ॥५३॥ वृत्तम् ॥ सकलनिगमसारं षट्स्थलज्ञानमेतद्भवविपिनकुठारं सर्वतंत्रप्रसिद्धम् ॥ परमसुखसमाप्त्यैकहेतूत्तमाख्यं तव कथितमशेषं त्वं सदा प्रेमभूमा॥५४॥ त्वमपि कथय शैवाचारयुक्ताय सर्वं विजितमदनरागद्वेषलोभेंद्रियाय ॥ गुणगणनिलयाय प्राणलिंगैकभाजे गुरुचरणसरोजज्ञानयुक्ताय वत्स ॥५५॥ अशिष्टायाविरक्ताय देवतादूषणाय च ॥ लिंगधारणदूराय मावादीस्त्वं कदाचन ॥५६॥

सूत उवाच ॥ इत्युक्त्वा शंकरः क्रौंचदारणायामितौजसे ॥ गौरीमुखाब्जविन्यस्तदृष्टिस्तूष्णीं बभूव सः ॥५७॥ श्रुत्वा शिवमुखोद्गीतं स्कन्दः षट्स्थलनिर्णयम् ॥ प्रणम्य दण्डवद्भूमौ भक्त्या परवशोऽभवत् ॥५८॥भक्त्या परवशो भूत्वा कंचित्कालं महेश्वरे ॥ लब्धसंज्ञो महादेवं स्कंदस्तुष्टाव शंकरम् ॥५९॥

---

ठेवणाऱ्यांना (५०) या षट्स्थलाचें ज्ञान चांगल्या प्रकारें होतें. (५१) अशा करितां मनुष्यानें नेहमीं सदाचारांत रत व्हावें, एकाग्र मन करावें, शिवाची पूजा करावी, इष्टलिंगपूजेंत रत व्हावें, षट्स्थलज्ञान मिळवून परमार्थभूत शिवतत्वाचा अभ्यास नेहमीं करावा. (५२) स्थलनिर्णयज्ञान संक्षेपानें तुला सांगितलें, (५३) हें सर्व शास्त्रांतलें रहस्य आहे, तुझ्यावरच्या प्रेमामुळें मीं तुला सांगितलें. याकरितां हें चांगलें जाणून तूं षट्स्थलज्ञानी हो. (५४) हें सर्व वेदांतलें सार असून संसारअरण्याला कुऱ्हाडीप्रमाणें आहे, याची ख्याति सर्व तंत्रांत असून व याच्यापासून सर्व सुखें मिळतात. असें षट्स्थलज्ञान तुला प्रेमामुळें सांगितलें. (५५) तूं देखील शैवाचार करणाऱ्याला, व षड्रिपु जिंकलेल्या प्राण्याला, गुणगणांच्या स्थानांला, प्राणलिंगैक्य सेवन करणाऱ्यांला, गुरुचरणज्ञानयुक्तांला, सांग. (५६) अशिष्ट वैराग्यरहित, देवतानिंदा करणारा, लिंगधारण न करणारा, अशाना सांगूं नको.

(५७) सूत बोलले— याप्रमाणें अमिततेजस्वी स्कंदाला श्रीशिव सांगून गौरीच्या मुखाकडे पाहत स्वस्थ बसले. (५८) श्रीशिवाच्या मुखांतून निघालेलें तें षट्स्थलज्ञान ऐकून दंडाकार नमस्कार घालून षण्मुख भक्तिपर वश झाला. (५९) कांहीं कालपर्यंत शिवाच्या ठिकाणीं भक्तिपर वश होऊन शुद्धीवर येऊन श्रीशि-

स्कंद उवाच ॥ नमः शिवाय सोमाय षट्स्थलब्रह्मरूपिणे ॥ सदानंदस्वरूपाय सम्यग्ज्ञानप्रदायिने ॥६०॥ नीलकण्ठाय नित्याय निर्विकाराय शंभवे ॥ निरंजनाय शर्वाय त्र्यंबकाय नमो नमः ॥६१॥ गंगाधरं विरूपाक्षं चंद्रलेखावतंसकम् ॥ सर्वज्ञं सर्वगं सर्वं वंदे सर्वाश्रयं शिवम् ॥६२॥ आधारं सर्वलोकानामनाधारमविक्रियम् ॥ निस्तरंगसुखांभोधिं नमामीशानमव्ययम् ॥६३॥ कलाधारं कलातीतं कालकालं कपर्दिनम् ॥ कर्मादिरहितं शुद्धं वंदे भूतेशमक्षरम् ॥६४॥ ब्रह्मविष्णुसुरेशानां कारणं कारणातिगम् ॥ नागालंकृतसर्वांगं नमामि सकलेश्वरम् ॥६५॥ निष्कलं निर्मलं सच्चिन्मयं संसारमोचकम् ॥ सांबं सर्वात्मकं वंदे सदाशिवमनीश्वरम् ॥६६॥ अव्यक्ताव्यक्तसद्भावकारणं कृत्तिवाससम् ॥ कल्याणमादिपुरुषं नमामि गिरिजाधवम् ॥६७॥ गीर्वाणार्चितपादाब्जं गीतताण्डववत्सलम् ॥ गिरिशं गीष्पतिस्तुत्यं वंदेऽहं सर्वसाक्षिणम् ॥६८॥ उमाकुचाब्जलावण्यमधुमत्तेक्षणालये ॥ नमो विश्वा-

---

वाची स्तुति स्कंदानें केली.

(६०) स्कंद बोलला-शिवा, सोमा, षट्स्थल ब्रह्मरूपा, सदानंदस्वरूपा सम्यग्ज्ञानप्रदात्या (चांगलें ज्ञान देणाऱ्या देवा), तुला नमस्कार असो. (६१) नीलकंठा, नित्या, निर्विकारा, शंभो, निरंजना, शर्वा, त्र्यंबका, तुला नमन असो. (६२) गंगाधरा, विरूपाक्षा, चंद्रकलाभूषणा, सर्वज्ञा, सर्वगा (सर्व व्यापका), सर्वा, सर्वाश्रया, शिवा, तुला नमन असो. (६३) सर्व लोकांच्या आधारा, स्वतः आधाररहिता, विकाररहिता, तरंगरहित सुखसमुद्रा, ईशाना, अव्यया तुला नमस्कार करितों. (६४) कलाधारा, कलातीता, कालकाला, कपर्दिन्, कर्मरहिता, शुद्धा, भूतेशा, अक्षरा, तुला नमस्कार करतों. (५६) ब्रह्म, विष्णु सुरेश यांच्या उत्पत्तीला कारणभूता, कारणातिगा (कारणरहिता), नागभूषणा, सकलेश्वरा, तुला नमन असो. (६६) निष्कला, निर्मला, सच्चिन्मया, संसारमोचका, सांबा, सर्वात्मका (सर्वव्यापका), सदाशिवा, अनीश्वरा (ज्याला स्वामी नाहीं तो) तुला, नमन असो. (६७) अव्यक्ता, व्यक्तसद्भावकारणा (प्रपंचकारणा), कृत्तिवासा, कल्याणा, आदिपुरुषा, गिरिजाधवा, तुला नमस्कार करतों. (६८) देववंदिता, गाननर्तनप्रिया, गिरीशा, बृहस्पतिस्तुता, सर्वसाक्षिन् तुला नमन करितों. (६९) उमास्तनावलोकनप्रिया, विश्वात्मन्, स्वभावतः निर्मल तेजा, तुला नमन

त्मने तुभ्यं स्वभावामलतेजसे ॥६९॥ यस्य प्रसादाद्योगीन्द्रा ज्ञानवंतः परं ययुः ॥ तं त्वां प्रपद्ये देवेश सर्वमंगलकारणम् ॥७०॥ यस्माच्चराचरं विश्वं जायते यत्र तिष्ठति ॥ लीयते यत्र सततं तं प्रपद्ये महेश्वरम् ॥७१॥ त्वत्प्रसादाज्जगन्नाथ ज्ञातं सर्वं मयाऽधुना ॥ शिवसिद्धान्तसर्वस्वं षट्स्थलब्रह्मवेदनम् ॥७२॥तस्मात्सर्वं परित्यज्य त्वामहं शरणं गतः ॥७३॥

सूत उवाच ॥ वृत्तम्॥स्तुत्वेति शंकरमजं करुणालयं तं संसारमोचकमखण्डसुखस्वरूपं॥स्कन्दोऽम्बिकाधवपदांबुजभक्तिभावादानंदनिर्भरमना स न वेदबाह्यं ॥७४॥ युष्माकमद्य कथितः श्रुतितंत्रगोप्यो मुक्त्यंगनोद्वहनसंघटनापटीयान्॥सारस्तु षट्स्थलविनिर्णय एष लोके नान्योऽस्त्यतः परतरो भवबंधशान्त्यै॥७५॥यूयं श्रध्दान्विता विप्राः स्थलषट्कविनिर्णयम्॥व्याकुरुध्वं प्रशान्तेभ्यो भक्तिमभ्योऽतिमुक्तिदं॥७६॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे वीरमाहेश्वरधर्मनिर्णये षट्स्थलक्रमो नामाष्टचत्वारिंशोऽध्यायः॥

---

असो. (७०) ज्याच्या प्रसादानें ज्ञानी होऊन महायोगी परपदाला गेले, त्या परममंगलकारक देवेशाला शरण जातों. (७१) ज्याच्या पासून चराचर जग उत्पन्न होतें, ज्याच्या ठिकाणीं जग राहतें, ज्याच्या ठिकाणीं लीन होतें, त्या महेश्वराला शरण जातों (७२) हे जगन्नायका, तुझ्या प्रसादानें हें सर्व मला समजलें व जें शिवसिद्धांतांतलें सर्वस्व असून ज्याला षट्स्थल ब्रह्मज्ञान ह्मणतात, तें ज्ञान मला झालें. (७३) याकरितां सर्व सोडून तुलाच मी शरण आलों.

(७४) सूत बोलले—करुणेचें घर, संसार सोडविणारा, अखंड आनंदरूप, जन्मरहित अशा शंकराची स्तुति करून पार्वतीपतीच्या चरणकमलावर दृढ भक्ति ठेवून त्या आनंदामध्यें स्कंद हा बाह्यज्ञान विसरला. (७५) श्रुतींत तंत्रांत परमगोप्य असलेलें, मुक्तिरूप स्त्रियेला मिळवून देण्यांत चतुर असलेलें, सर्वांतील सार असें षट्स्थलज्ञान तुह्मांला सांगितलें. तर यापरता संसारशांतीला दुसरा कोणता मार्ग नाहीं.(७६)ब्राह्मणहो, तुह्मी शांत होऊन भक्ति ठेवून मुक्तिप्रद षट्स्थलाचा निर्णय परम श्रद्धापूर्वक करा.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील वीरमाहेश्वरधर्मनिरूपणांतील षट्स्थलक्रम नांवाचा अठ्ठेचाळिसावा अध्याय संपला.

## ॥ अथैकोनपंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ ग्रन्थान्तरे ॥ देव्युवाच ॥ भगवन्सर्वलोकेश स-र्वज्ञ शशिभूषण ॥ दर्शनात्स्पर्शनाध्यानाद्धारणाच्छ्रवणादपि ॥ शुद्धिं ददाति सततं कः पदार्थो महेश्वर ॥१॥

ईश्वर उवाच ॥ रक्षार्थं मंगलार्थं च पवित्रार्थं च भामिनि ॥ भूषार्थं सर्वलोकानां भस्म दत्तं मया पुरा॥२॥श्रीकरं च पवित्रं च हाराद्याभ-रणं तथा ॥ लोकवश्यकरं पुण्यं पापनाशं दिने दिने ॥३॥ विभूतिर्भ-सितं भस्म क्षारं रक्षेति भस्मनः ॥ भवंति पंच नामानि हेतुभिः पंच-भिर्भृशम् ॥४॥ ऐश्वर्यकारणाद्भूतिर्भस्म सर्वाघभक्षणात् ॥ भासना-द्भसितं प्रोक्तं क्षरणात्क्षारमापदाम् ॥५॥ भूतप्रेतपिशाचेभ्यः सग्रहेभ्यो-भिरक्षणात् ॥ रक्षा स्याच्चोरसर्पेभ्यो व्याघ्रादिभ्यश्च सर्वदा ॥६॥ नंदा भद्रा च सुरभिः सुशीला सुमनास्तथा ॥ तासां गर्भेषु संजाता विभू-त्याद्या भवंति हि ॥७॥ कपिला कृष्णधवला धूम्रा रक्ता तथैव च ॥

---

श्रीशिवास नमस्कार असो. ग्रंथांतरांत ह्मटलें की,—देवी बोलली–(१) भग-वन्, सर्वलोकेश, सर्वज्ञा, शशिभूषणा, दर्शनानें, स्पर्शानें, ध्यानानें, धारणेनें, श्रव-णानें हे महेश्वरा, कोणता पदार्थ शुद्धि देतो ? हें सांगा.

(२) श्रीशिव बोलले–हे भामिनि, सर्व लोकांच्या रक्षणाकरितां, कल्याणाकरि-तां, शुद्धीकरितां, भूषणाकरितां, पूर्वी मीं भस्म दिलें आहे. (३) तें भस्म लक्ष्मी-दायक असून पवित्र आहे व तें हारादि आभरणांच्या जागीं असून लोकांला वश करणारें आहे. व पुण्यकर असून प्रतिदिवशीं पापनाश करणारें आहे. (४) वि-भूति, भसित, भस्म, क्षार, रक्षा अशीं पांच नांवें पांच कारणांनीं आलीं आहेत. (५) त्यापासून ऐश्वर्य मिळतें, ह्मणून भूति असें नांव मिळालें आहे, व सर्व पा-पांचें भक्षण करीत असल्यामुळें भस्म असें नांव मिळालें आहे. प्रकाश त्यापासून मिळतो, ह्मणून त्याला भसित असें नांव मिळालें आहे, संकट नाश करण्याची शक्ति त्याच्यांत असल्यामुळें त्याला क्षार असें नांव मिळालें आहे. (६) भूत, प्रेत, पिशाच, ग्रह यांपासून रक्षण करीत असल्यामुळें रक्षा असें नांव मिळालें आहे, व चोर सर्प, वाघ वगैरे हिंस्रांपासून रक्षण करीत असल्यामुळें रक्षा असें नांव मिळालें आहे. (७) नंदा, भद्रा, सुरभि, सुशीला, सुमना यांच्यापासून वि-भूति वगैरेंची उत्पत्ति आहे. (८) कपिल (पिंगट), काळा, पांढरा, धुरकट,

नंदादीनां गवां वर्णाः क्रमेण परिकीर्तिताः ॥८॥ सद्योजाताद्विभूतिश्च वामाद्भसितमेव च ॥ हृदयाद्भस्म संजातं पुरुषात्क्षारमेव च ॥९॥ रक्षा चेशानवक्त्राच्च सर्वलोकहिताय वै ॥ पंचवक्त्रमिति ज्ञात्वा महेशस्याखिलात्मनः ॥१०॥ तत्तद्वक्त्रेण संयुज्यात्स रुद्रो नात्र संशयः ॥ धारयन्नित्यकार्येषु विभूतिं च प्रयत्नतः ॥११॥ नैमित्तिकेषु भसितं रक्षा कार्येषु सर्वदा ॥ प्रायश्चित्तेषु सर्वेषु भस्म नाम यथाविधि ॥१२॥ क्षारं च मोक्षकार्येषु प्रयोक्तव्यं सदा बुधैः ॥१३॥ मानवीयसंहितायाम् ॥ भस्मज्योतिर्भवत्येव शिवाख्यं न हि संशयः ॥ जाबालोपनिषत्सर्वं प्राहेदं परया मुदा ॥१४॥ जाबालोपनिषदि वाक्यम् ॥ सद्योजातात्पृथिवी तस्या निवृत्तिः तस्याः कपिलवर्णा नंदा तस्या गोमयेन विभूतिर्जाता ॥१५॥ वामदेवादुदकं तस्मात्प्रतिष्ठा तस्याः कृष्णवर्णा भद्रा तस्या गोमयेन भसितं जातम् ॥१६॥ अघोराद्वन्हिः तस्माद्विद्या तस्या रक्तव-

---

तांबडा असा रंग अनुक्रमानें नंदादिगायींचा आहे, असें जाणावें. (९) सद्योजातापासून विभूति उत्पन्न झाली, व वामापासून भसित झालें, हृदयापासून भस्म झालें, तत्पुरुषापासून क्षार उत्पन्न झालें. (१०) ईशानमुखापासून सर्व लोकांच्या हितासाठीं रक्षा उत्पन्न झाली. याप्रमाणें सर्वव्यापी महेशाचीं पांच मुखें जाणून (११) त्या त्या मुखानें त्या त्या भस्माची योजना जो करतो, तो रुद्रच आहे, यांत संशय नाहीं. नित्यकर्म करीत असतां प्रयत्नपूर्वक विभूति लावावी. (१२) सर्वदा नैमित्तिककर्म करीत असतां भसित किंवा रक्षा लावावी. सर्वप्रायश्चित्त घेतानां विधिपूर्वक भस्म लावावें. (१३) ज्ञात्यांनीं मोक्षानिमित्त कर्म करीत असतां क्षारनांवाचें भस्म लावावें. (१४) मानवीयसंहितेंत ह्मटलें कीं,— भस्म हें शिवाची ज्योति आहे, यांत संशय नाहीं. याप्रमाणें मोठ्या आनंदानें जाबलोपनिषदांत सांगितलें आहे. (१५) जाबालोपनिषदांतलें वाक्य तें असें— सद्योजातापासून पृथ्वी उत्पन्न झाली, तिच्या पासून निवृत्ति कला उत्पन्न झाली, निवृत्तिपासून नंदा नांवाची गाय उत्पन्न झाली, त्या गायीच्या शेणापासून विभूति उत्पन्न झाली. (१६) वामदेवमुखा पासून उदक झालें, त्या उदका पासून प्रतिष्ठा नांवाची कला झाली, प्रतिष्ठे पासून काळ्यारंगाची भद्रा नांवाची गाय उत्पन्न झाली, त्या गायीच्या शेणापासून भसित झालें. (१७) अघोरमुखापासून अग्नि उत्पन्न झाला, अग्नि पासून विद्या कला झाली, विद्येपासून तांबड्या रंगाची सुरभि नांवाची गाय

र्णा सुरभिः तस्या गोमयेन भस्म जातम् ॥१७॥ तत्पुरुषाद्वायुस्तस्मा-
च्छान्तिस्तस्याः श्वेतवर्णा सुशीला तस्या गोमयेन क्षारं जातम्॥१८॥
ईशानादाकाशस्तस्माच्छान्त्यतीता तस्याश्चित्रवर्णा सुमनास्तस्या गो-
मयेन रक्षा जाता ॥१९॥ ऐश्वर्यकारणाद्भूतिः भासनाद्भसितं सर्वाघ-
भक्षणाद्भस्म आपदां क्षारणात्क्षारं भूतप्रेतपिशाचब्रह्मराक्षसापस्मार-
भवभीतेभ्योऽभिरक्षणाद्रक्षेति ॥२०॥ तेषां रुद्रानलजत्वं वक्ष्ये ॥ अग्नौ-
ज्वालावृतं रुद्रं वन्हिमण्डलमध्यगम् ॥ ध्यायेत्कलादशयुतं शक्तिस्व-
स्तिकधारिणम् ॥२१॥ इति रुद्राग्निं संचिंत्य रुद्राग्नौ विभूत्यादीन् सं-
पादयामीति संकल्प्य विकटांगामुन्मत्तां महाशनां खलामलसामशिव-
चिन्हांकितां पुनर्धेनुं कृशांगां वत्सहीनां वंध्यामंगहीनां श्रान्तामदुग्ध-
दोहिनीं निरिंद्रियामजग्धतृणां केशचेलास्थिभक्षिणीं सन्निधिनीं नव-

---

उत्पन्न झाली, तिच्या शेणापासून भस्म झालें. (१८) तत्पुरुषापासून वायु
उत्पन्न झाला, वायू पासून शांति नांवाची कला उत्पन्न झाली, तिच्यापासून
पांढऱ्यारंगाची सुशीला नांवाची गाय उत्पन्न झाली तिच्या शेणापासून क्षार नांवा-
चें भस्म झालें. (१९) ईशानमुखापासून आकाश उत्पन्न झालें, त्याच्या पासून
शांत्यतीता नांवाची कला उत्पन्न झाली त्या कलेपासून चित्रविचित्ररंगाची
सुमना नांवाची गाय उत्पन्न झाली, तिच्याशेणापासून रक्षा नांवाचें भस्म झालें.
(२०) ऐश्वर्याला कारण असल्यामुळें भस्माला भूति असें ह्मणतात. तेजस्वी अस-
ल्यामुळें भसित असें ह्मणतात. सर्व पापें जाळून टाकितें ह्मणून भस्म असें ह्मण-
तात. संकटें दूर करितें ह्मणून क्षार असें ह्मणतात. आणि भूत, प्रेत, पिशाच,
ब्रह्मराक्षस, अपस्मार, यांच्या पासून उत्पन्न झालेल्या भीतीपासून रक्षण करितें
ह्मणून रक्षा असें ह्मणतात. (२१) आतां हें सर्व भस्म रुद्राग्नीपासून कसें उत्पन्न
झालें, तें सांगतों.—अग्नीच्या मंडलाच्या मध्यभागीं ज्वालेनें युक्त रुद्राचें ध्यान क-
रावें. परंतु तो रुद्र दहा कलांनीं युक्त असून शक्ति आणि स्वस्तिक धारण केलेला
असला पाहिजे. (२२) याप्रमाणें रुद्राग्नीचें चिंतन करून "रुद्राग्नींत विभूति
वगैरे भस्माचें संपादन करितों" असा संकल्प करावा. भीतिप्रद अवयवांची,
उन्मत्त, फार खाणारी, नीच, आळसी, शिवचिन्ह नसलेली, रोडलेली, वांसरूं
नसलेली, वांझ, अवयवहीन, दमलेली, दूध न देणारी, इंद्रिय नसलेली, रंवथ न
करणारी, केस, वस्त्र, हाडें खाणारी, फळावयास आलेली, नवीन फळलेली, रोगी,

सूतां रोगान्वितां विहायाप्रशस्तभूम्यादिपतितक्लिन्नदुर्गन्धिपर्युषितेत्यादि गोमयं विहाय प्रशस्तगोमयमादायेशतत्पुरुषसद्योजाताद्यैरुत्पत्तिस्थितिसंहारभेदैर्ग्रहणकवलनशोषणदहनप्लावनशोधनाभिमंत्रेणानुक्रमेण पंचप्रणवपंचबीजैः सह पंचब्रह्ममंत्रैः विभूत्यादीन् संपाद्य सुदृढरम्यक्षालितप्रोक्षितचूतबिल्वाशोकदारुमयपात्रे शैलमयपात्रे वा धनवत्संग्रहेदिति ॥२२॥ शैवे ॥ वायवीयसंहितायाम् ॥ कपिलायाः शकृत्खस्थं गृहीत्वा गगने पतत् ॥ न क्लिन्नं नातिकठिनं न दुर्गन्धं न चोषितम् ॥२३॥ उपर्यधः परित्यज्य गृण्हीयात्पतितं यदि॥ पिंडीकृत्य शिवाग्न्यादौ तत्क्षिपेन्मूलमंत्रतः ॥२४॥ अपक्कमतिपक्कं च संत्यज्य भसितं सितम् ॥ आदाय वाससालोड्य भस्माधारे विनिक्षिपेत् ॥२५॥ सुकृते सुदृढे शुद्धे क्षालिते प्रोक्षिते शुभे ॥ विन्यस्य मंत्री मंत्रेण पात्रे भस्म विनिक्षिपेत् ॥२६॥ तैजसं दारवं वापि मृण्मयं शैलमेव वा ॥ अन्यद्वा शोभनं शुद्धं भस्माधारं प्रकल्पयेत् ॥२७॥ क्षेमदेशे शुभे शुद्धे

---

अशी गाय वर्ज्य करून चांगल्या गायीचें शेण घ्यावें तें शेण प्रशस्त स्थलावर न पडलेलें, पातळ असलेलें, दुर्गंध असलेलें, शिळें झालेलें वगैरे असें वर्ज्य करून प्रशस्त गोमय घेऊन ईश, तत्पुरुष, सद्योजात, वगैरे उत्पत्ति, स्थिति, संहार या प्रकारांनीं व ग्रहण, कवलन, शोषण, दहन, प्लावन, शोधन वगैरे मंत्रांच्या अनुक्रमांनीं पंचप्रणव पंचबीजांसह पंचब्रह्ममंत्रांसह विभूति वगैरे भस्मांचा संग्रह करून मजबूत, धुतलेलें, सुंदर प्रोक्षण केलेलें असें आंबा, बिल्व, अशोक वगैरे लांकडांचें पात्र घेऊन किंवा दगडी पात्र घेऊन त्यांत द्रव्याप्रमाणें काळजीपूर्वक भस्म ठेवावें. (२३) शैवपुराणांत वायवीयसंहितेंत ह्मटलें आहे कीं,—अधांतरीं पडत असलेलें कपिला गायीचें शेण घ्यावें तें पातळ, अतिघट्ट, दुर्गंध, शिळें असें असूं नये. (२४) खालीं पडलेलें घ्यावयाचें असेल तर वरचें खालचें सोडून घ्यावें। त्याचा गोळा करून मूलमंत्रानें शिवाग्नींत तो गोळा टाकावा. (२५) अपक्क, अति करपलेलें, असें भस्म सोडून पांढरें शुभ्र भस्म घेऊन वस्त्रांत शोधून घेऊन भस्मपात्रांत भस्म ठेवावें. (२६) चांगलें केलेलें, मजबूत, शुद्ध, धुतलेलें, प्रोक्षण केलेलें, शुभ अशा पात्रांत मंत्रवेत्त्यानें तोंडानें मंत्र ह्मणत भस्म ठेवावें. (२७) पाऱ्याचें, लांकडाचें, मातीचें, दगडाचें, दुसऱ्या कशाचें तरी सुंदर, शुद्ध असें भस्मपात्र करावें. (२८) चांगली, शुभ, शुद्ध, अशी जागा पाहून धनाप्रमाणें त्य

धनवद्भस्म निक्षिपेत्॥ प्रस्थितो भस्म गृण्हीयात्स्वयं वाऽनुचरोपि वा ॥२८॥ न चायुक्तकरे दद्यान्न चाशुचिस्थले क्षिपेत्॥ न संस्पृशेच्च नीचांगैर्नोपेक्षेत न लंघयेत् ॥२९॥ कामिकागमे ॥

ईश्वर उवाच ॥ भुक्तिमुक्तिदमाग्नेयं विशुद्धेनैव भस्मना ॥ स्नानं चतुर्विधं भस्म भवेत्कल्पादिभेदतः ॥३०॥ कल्पं चैवानुकल्पं च ह्युपकल्पमकल्पकम् ॥ तेष्वाद्यतममुत्कृष्टतममन्यदभावतः ॥३१॥ रोगादिरहिता या गौः कृष्णा वा कपिलाऽथ वा ॥ तस्या गोमयमादाय खस्थं पद्मदलेऽपि वा ॥३२॥ सद्येन गोमयं ग्राह्यं पिण्डं वामेन कारयेत् ॥ विमले शुष्कयित्वा तु दहेद्घोराच्छिवाग्निना ॥३३॥ कल्पं तद्भस्म विज्ञेयमनुकल्पमथोच्यते ॥ शुष्कं वनगतं यत्तद्गोमयं चूर्णितं तथा ॥३४॥ निर्दग्धमनुकल्पाख्यमापाकादिगतं तु यत् ॥ वस्त्रेणोत्तारितं भस्म गोमूत्राद्यर्द्धपिंडितम् ॥३५॥ दग्धं प्रागुक्तविधिना भवेद्भस्मोपकल्पकम् ॥ अन्यैरापादितं भस्माप्यकल्पमिति कल्पितम् ॥३६॥ तेष्वेकतममादाय

---

जागेंत भस्म जपून ठेवावें. गांवाला जातांना तें भस्म स्वतः किंवा नोकराच्या स्वाधीन करावें. (२९) अयोग्याच्या हातांत देऊं नये. अशुद्ध जागेंत ठेवूं नये वाईट अवयवांनीं स्पर्श करूं नये. उपेक्षा करूं नये, ओलांडूं नये.

(३०) कामिकागमांत ह्मटलें आहे कीं,–ईश्वर बोलले—रुद्राग्नीच्या शुद्ध भस्माचें स्नान भोग मोक्ष देणारें असून कल्पादि भेदानें त्या भस्मांत चार प्रकार आहेत. (३१) कल्प, अनुकल्प, उपकल्प, अकल्प असे चार भेद होत. त्यांमध्यें पहिलें भस्म अत्युत्कृष्ट आहे. दुसरें, तिसरें, चौथें भस्म पहिलें नसेल त्यावेळीं लावावें. (३२) रोग वगैरे नसलेली गाय काळी असो, कपिला असो, तिचें शेण अधांतरीं पडत असतां पद्मपात्रांत घ्यावें. (३३) सद्यमंत्रानें घेऊन वाममंत्रानें गोळा करावा. निर्मलपात्रांत वाळवून अघोरमंत्रानें शिवाग्नींत तें घालून जाळावें. (३४) भस्माला "कल्प" अशी संज्ञा आहे. आतां अनुकल्प सांगतों. गायीच्या वाळलेल्या शेणाच्या रानशेणी सबंध किंवा अर्धामुर्ध्या झालेल्या आणून, (३५) रुद्राग्नींत जाळून केलेल्या भस्माला "अनुकल्प" असें ह्मणतात. किंवा शेण गोमूत्रांत कालवून पिळून काढून ते गोळे जाळून तें वस्त्रगाळ करावें. (३६) पूर्वोक्त विधीनें रुद्राग्नीनें जाळून काढलेल्या भस्माला " अनुकल्प" असें ह्मणतात. दुसऱ्यांनीं तयार केलेल्या भस्माला "अकल्प" असें ह्मणतात. (३७) यापैकीं कोणतें तरी एक भस्म सुरक्षित पात्रांत ठेवलेलें घेऊन जसें संभवेल त्याप्रमाणें

पात्रेषु कलशादिषु ॥ त्रिसंध्यमाचरेत्स्नानं यथासंभवतोऽथ वा॥३७॥ क्रियासारे ॥ एवं विधिकृतेनैव भस्मना स्नानमाचरेत् ॥ स्नपनोपक्रमे पादौ करौ प्रक्षाल्य वाग्यतः ॥३८॥ ततो मूलेन भसितमष्टकृत्वाभिमंत्र्य च ॥ ईशानेन शिरोदेशं मुखं तत्पुरुषेण तु ॥३९॥ उरोदेशमघोरेण गुह्यं वामेन गोपते ॥ सद्येन पादौ सर्वांगं प्रणवेनैव सेचयेत् ॥४०॥ वासिष्ठलैंग्ये ॥ आग्नेयं भस्मना स्नानं यतिभिस्तु विधीयते ॥ आर्द्रस्नानात्परं भस्म त्वार्द्रे जंतुवधो ध्रुवम् ॥४१॥ आर्द्रं तु प्रकृतिं विद्यात्प्रकृतिं बंधनं विदुः॥ प्रकृतेस्तु प्रहाणार्थं भस्मना स्नानमिष्यते ॥४२॥ शिवधर्मे ॥ भस्मस्नानं जलस्नानादसंख्येयगुणाधिकम् ॥ तस्माद्वारुणमुत्सृज्य स्नानमाग्नेयमाचरेत् ॥४३॥ कालोत्तरे ॥ वारुणं वारिणा स्नानमाग्नेयं भस्मना भवेत् ॥ वृष्ट्या सातपया दिव्यं वायव्यं रजसा गवाम् ॥४४॥ मानसं ब्रह्मतादात्म्यं स्नानान्येतानि वै विदुः ॥ दिव्यवारुणवायव्यब्रह्माग्नेयेष्वनुत्तमम् ॥४५॥ इति मत्वा शिवो भस्म स्नानमादौ

---

त्रिकाल भस्मस्नान करावें. (३८) क्रियासारांत ह्मटलें कीं,—या विधीनें केलेलें भस्म घेऊन त्या भस्मानें स्नान करावें स्नानाच्या आरंभीं मौनव्रत धरून हस्तपाद प्रक्षालन करावें. (३९) नंतर मूलमंत्रानें भस्मांत आठ भाग करून अभिमंत्रण करून नंतर ईशानानें डोक्याला, तत्पुरुषमंत्रानें मुखाला, (४०) अघोरमंत्रानें वक्षस्थलाला, वाममंत्रानें गुह्याला, सद्यमंत्रानें पादाला, प्रणवानें सर्वांगाला भस्म लावावें. (४१) वासिष्ठलिंगपुराणांत ह्मटलें कीं,—भस्मस्नानाला आग्नेयस्नान असें ह्मणतात. हें स्नान यतीला योग्य आहे, असें सांगतात. आर्द्रस्नानापेक्षां (पाण्यानें आंघोळ करण्यापेक्षां) भस्मस्नान श्रेष्ठ, असें मानिलें आहे. कारण आर्द्रस्नानांत निश्चयानें प्राण्यांचा वध होतो. (४२) आर्द्रस्नानाला प्रकृति असें ह्मणतात प्रकृति ही संसारबंधनाला कारण आहे, असें सांगतात. प्रकृतीच्या निवारणाकरितां भस्मस्नान करावें असें सांगतात. (४३) शिवधर्मांत सांगितलें कीं, जलस्नानापेक्षां भस्मस्नानांत अगणित गुण आहेत. याकरितां वारुणस्नान सोडून भस्मस्नान करावें.(४४) कालोत्तरांत ह्मटलें कीं, उदकाच्या स्नानाला वारुणस्नान ह्मणत असून भस्मस्नानाल आग्नेयस्नान ह्मणतात. उन्हानें शरीर तापवून पावसाळ्यांत पावसाच्या पाण्यानें स्नान केलें असतां दिव्यस्नान ह्मणतात. गायीच्या धुळीनें स्नान केलें असतां त्याला वायव्यस्नान असें ह्मणतात. (४५) ब्रह्मतादात्म्याला मानसस्नान ह्मणतात. दिव्य, वारुण, वायव्य, ब्राह्म, आग्नेय यांमध्यें श्रेष्ठ भस्मस्नानच आहे, (४६) असें सम-

च पूरयेत् ॥ ब्रह्मा देवाश्च ऋषयो गंधर्वा यक्षकिन्नराः ॥४६॥ मरुद्गणाः पितृगणाः सर्वे भूतगणा अपि ॥ नित्यं च सर्वयत्नेन भस्मस्नानं प्रकुर्वते ॥४७॥ तस्मादेतच्छिवस्नानमाग्नेयं यः समाचरेत् ॥ भवपाशैश्च निर्मुक्तः शिवलोके महीयते ॥४८॥ ज्वररक्षःपिशाचाश्च असुरा यातुधानकाः ॥ कुमारग्रहभूताश्च कूष्माण्डा डाकिनीगणाः ॥४९॥ ब्रह्मराक्षसमुख्याश्च पूतनाः कुष्ठगुल्मकाः ॥ भगंदराणि सर्वाणि ह्यशीतिर्वातरोगकाः ॥५०॥ चतुःषष्टिः पित्तरोगाः श्लेष्माः सप्तत्रिपंचकाः ॥ व्याघ्रसर्पभयं चैव ह्यन्ये दुष्टमृगा अपि ॥५१॥ भस्मनानेन नश्यंति सिंहेनैव गजा यथा ॥५२॥ लैंग्ये ॥ यद्यकार्यसहस्राणि कृत्वा यः स्नाति भस्मना ॥ तत्सर्वं दहते भस्म यथाग्निस्तेजसा वनम् ॥५३॥ स्कान्दे ॥ कृत्वा तु वाऽतुलं पापं मृत्युकाले तु यो द्विजः॥ भस्मस्नायी भवेत्किंचित्क्षिप्रं पापैः प्रमुच्यते ॥५४॥ शिवधर्मे ॥ महापातकसंयुक्तो युक्तो वा सर्वपातकैः॥ भस्मस्नानात्तु सर्वस्मान्मुच्यते स तु पातकात्॥५५॥ यः स्नानमाचरेन्नित्यमाग्नेयं संयतेंद्रियः ॥ कुलैकविंशमुत्तार्य स गच्छे-

---

जून प्रथम भस्मस्नान करावें. ब्रह्मदेव, देव, ऋषि, गंधर्व, यक्ष, किंनर, (४७) मरुद्गण, पितृगण, सर्व भूतगण निरंतर प्रयत्नपूर्वक भस्मस्नान करतात. (४८) या करतां हें आग्नेय शिवस्नान जो करतो, तो भवपाशांतून सुटून शिवलोकांत पूज्य होतो. (४९) ज्वर, राक्षस, पिशाच, असुर, यातुधान, बालग्रह, भूत, कूष्मांड, डाकिनी, (५०) मुख्य मुख्य ब्रह्मराक्षस, पूतना, कुष्ठ, गुल्म, भगंदर, ऐंशी प्रकारचे सर्व वातरोग, (५१) चौसष्ट प्रकारचे सर्व पित्तरोग, सत्तावन्न प्रकारचे श्लेष्मरोग, व्याघ्रसर्पांची भीति, अन्य दुष्ट मृग वगैरे (५२) सिंहाच्या भीतीनें हत्ती जसे पळून जातात त्याप्रमाणें हे सर्व भस्मस्नानानें नष्ट होतात. (५३) लिंगपुराणांत ह्मटलें आहे, कीं,—हजारों पापकृत्यें करणारा एखादा प्राणी असला, तरी त्यानें भस्मस्नान केलें तर वणव्यानें रान जसें जळावें, तद्वत त्याचीं सर्व पापें जळून जातात. (५४) स्कांदपुराणांत ह्मटलें कीं,—पुष्कळ पापकर्म करून मरणाच्या वेळेस जो ब्राह्मण भस्मस्नान करतो, तो लवकर पापापासून मुक्त होतो. (५५) शिवधर्मांत ह्मटलें कीं, महापातकी असो, सर्वपातकी असो, त्यानें भस्मस्नान केलें असतां सर्व पातकांपासून तो मुक्त होतो. (५६) इंद्रियनिग्रह करून नियमानें जो आग्नेयस्नान करतो, तो आपल्या एकवीस कुळांचा उद्धार करून

त्परमं पदम् ॥५६॥ योगी सर्वांगिकः स्नानमापादतलमस्तकम् ॥ त्रिसंध्यमाचरेन्नित्यमाशु योगमवाप्नुयात् ॥५७॥ सर्वतीर्थेषु यत्पुण्यं सर्वयज्ञेषु यत्फलम् ॥ तत्फलं कोटिगुणितं भस्मस्नानाल्लभेन्नरः ॥५८॥ लैंग्ये ॥ भस्मस्नानाद्विशुद्धात्मा जितक्रोधो जितेंद्रियः ॥ मत्समीपमुपागम्य न भूयो विनिवर्तते ॥५९॥ स्कान्दे ॥ भस्मस्नानात्परं स्नानं पवित्रं नैव विद्यते ॥ इत्युक्त्वा मुनिदेवेभ्यः स्नातो देवः शिवः स्वयम् ॥६०॥ गारुडपुराणे ॥ पंचाक्षरजपं भस्मस्नानं लिंगार्चना त्रयम् ॥ कदाचिदपि न त्याज्यं यथाशक्ति समाचरेत् ॥६१॥ क्रियासारे ॥ चंदनं कुंकुमं चैव मृगनाभिमुखान्परान् ॥ गंधान्स्वल्पफलान् हित्वा भस्मस्नानपरो भवेत् ॥६२॥ एवं स्नानक्रमः प्रोक्तः स्नानमेवं समाचरेत् ॥६३॥ वासिष्ठलैंग्ये ॥ पंचाक्षरेण मंत्रेण प्रणवेनैव तेन च ॥ उध्दूलनं त्रिपुंड्रं च नित्यं भक्त्या समाचरेत् ॥६४॥ एकपादपुराणे ॥ नमः शिवायेति भस्म कृत्वा सप्ताभिमंत्रितम् ॥ उध्दूलयेच्छरीरं तु त्रिपुंड्रं चा-

---

स्वतः तोही श्रेष्ठपदाला जातो. (५७) योग्यानें पायापासून मस्तकापर्यंत त्रिकाल सर्वांगाला भस्म लाविलें असतां त्या योग्याला योगसिद्धि मिळते. (५८) सर्व तीर्थांच्या स्नानानें जें पुण्य मिळेल, सर्व यज्ञांनीं जें फल मिळेल, त्यांच्या कोटपटीनें भस्मस्नानानें पुण्य मिळतें. (५९) लिंगपुराणांत ह्मटलें कीं—भस्मस्नानानें आत्मा शुद्ध करून क्रोध जिंकून व इंद्रियें जिंकून एकदां माझ्याजवळ आला ह्मणजे पुनः तो संसारांत जात नाहीं. (६०) स्कांदपुराणांत ह्मटलें कीं, भस्मस्नानापेक्षां पवित्रस्नान दुसरें कोणतेंही श्रेष्ठ स्नान नाहीं, असें शिवानें मुनींला व देवांला सांगून स्वतः स्नान केलें. (६१) गारुडपुराणांत ह्मटलें कीं,—पंचाक्षराचा जप, भस्मस्नान, व त्रिकाल इष्टलिंगपूजा इतकें कधींही सोडूं नये यथाशक्ति करीत असावें. (६२) क्रियासारांत ह्मटलें कीं, चंदन, कुंकुम, कस्तूरी, इतर सुगंधी पदार्थ हे अल्प फल देणारे आहेत, याकरितां मनुष्यानें भस्मस्नानांत रत व्हावें. (६३) त्याप्रमाणें स्नानाचा हा क्रम सांगितला, याप्रमाणें स्नान करावें. (६४) वासिष्ठलैंग्यांत सांगिलें कीं,— पंचाक्षरमंत्रानें किंवा प्रणवमंत्रानें भस्माचें उद्धूलन व त्रिपुंड्र निरंतर भक्तीनें करावें. (६५) एकपादपुराणांत ह्मटलें कीं,—" नमः शिवाय " या मंत्रानें सात वेळ भस्म अभिमंत्रण करावें, नंतर शरीरावर उध्दूलन

पि धारयेत् ॥६५॥ सुप्रभेदागमे ॥ स्थानभेदं प्रवक्ष्यामि मूर्धा ललाट-मेव च ॥ कर्णौ च चक्षुषी चैव नासिका चास्यमेव च ॥६६॥ ग्रीवा स्कन्धौ च बाहू च कूर्परे च तथा मणी ॥ हृन्नाभिमेढ्पायू च ऊरू जानू च जंघके ॥६७॥ गुल्फपादद्वयं चैव पृष्ठभागद्वयं तथा ॥ द्वात्रिंशत्स्थान-मित्युक्तं भस्मनालेपयेत्ततः ॥६८॥ ग्रंथांतरे ॥ रुद्रध्यायी सदा भस्मलिप्तांगो मुच्यते सदा ॥ कुष्ठक्षयादिनष्टांगस्तेजोराशिर्भवेत्पुनः ॥६९॥ स्कान्दे ॥ शिवेन विष्णुना चैव ब्रह्मणा वज्रिणा तथा ॥ देवताभिर्धृतं भस्म त्रिपुण्ड्रोध्दूलनात्मना ॥७०॥ उमादेव्या च लक्ष्म्या च वाग्देव्या मातृकादिभिः ॥ सर्वस्त्रीभिर्धृतं भस्म त्रिपुंड्रोध्दूलनात्मना ॥७१॥ यक्षराक्षसगंधर्वसिद्धविद्याधरादिभिः ॥ मुनिभिश्च धृतं भस्म त्रिपुण्ड्रोध्दूलनात्मना ॥७२॥ मानवपुराणे ॥ उध्दूलनं त्रिपुंड्रं च यैः समाचरितं मुदा ॥ त एव शिष्टा विद्वांसो नेतरे मुनिपुंगवाः ॥७३॥ नैव प्रमदितव्यं वै भ्रमादपि कदाचन ॥ भूतेरुध्दूलनं तिर्यक्त्रिपुंड्रस्य च धारणम् ॥७४॥ त्रिपुंड्धारणं भूत्या तथा देहावगुंठनम् ॥ यो न कुर्याच्च मंत्रेण

---

व त्रिपुंड्र करावें. (६६) सुप्रभेदागमांत ह्मटलें कीं,– आतां निरनिराळीं स्थानें सांगतों. मस्तक, कपाळ, कान, डोळे, नाक, मुख, (६७) गळा, स्कंध, बाहु-कूर्पर ( कोपरा ), मनगट, हृदय, नाभि, मेंदू, पायु, मांडी, गुडघे, (६८) पायांच्या टांचा, पाय, दोन्ही पृष्ठभाग याप्रमाणें बत्तीस स्थानें आहेत, या सर्व स्थानांला भस्म लेपन करावें. (६९) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,– रुद्राध्ययन करणारा सर्वदां भस्मलेपन करील तर मुक्त होतो, व कुष्ठ, क्षय अशा प्रकारचे रोग असतील तर त्यापासून मुक्त होऊन परम तेजस्वी होतो. (७०) स्कांदपुराणांत ह्मटलें कीं—शिव, विष्णु, ब्रह्मदेव, इंद्र, इतर देव यांनीं आपल्या आंगावर भस्माचें उध्दूलन करून व भस्म लावून श्रेष्ठ श्रेष्ठ पद मिळविलें आहे. (७१) उमादेवी, सरस्वती, मातृका इत्यादि स्त्रियांनीं उध्दूलनपूर्वक भस्म धारण केलें आहे. (७२) यक्ष, राक्षस, गंधर्व, सिद्ध, विद्याधर, मुनि यांनीं उध्दूलनपूर्वक भस्म धारण केलें आहे. (७३) मानवपुराणांत ह्मटलें कीं,—जे भस्मोध्दूलन भस्मलेपन करतात, तेच शिष्ट होत, व विद्वान होत. हे मुनिश्रेष्ठहो, इतर लोक शिष्ट नव्हेत. (७४) प्रमाद कधींही करूं नये, व भ्रमानें भस्मलेपन सोडूं नये. भस्माचें उध्दूलन व भस्माचे आडवे त्रिपुड्र नेहमीं करावें. (७५) भस्माचे त्रिपुंड्र धारण तसेंच देहावर उध्दूलन जो प्राणी मंत्रपूर्वक करीत नाहीं तो प्राणी पतित सम-

तत्त्यागी पतितो भवेत् ॥७५॥ महापातकयुक्तानां पूर्वजन्मसु सुव्रताः ॥ त्रिपुंड्रोध्दूलनद्वेषो जायते सुदृढं बुधाः ॥७६॥ उध्दूलनं त्रिपुंड्रं च श्रद्धया नाचरंति ये ॥ तेषां नास्ति समाचारो वर्णाश्रमसमन्वितः ॥७७॥ उध्दूलनं त्रिपुंड्रं च श्रद्धया नाचरंति ये ॥ तेषां नास्ति शिवज्ञानं कल्पकोटिशतैरपि ॥७८॥ उध्धूलनं त्रिपुंड्रं च श्रद्धया नाचरंति ये ॥ तेषां नास्ति विनिर्मोक्षः संसाराज्जन्मकोटिभिः ॥७९॥ त्रिपुंड्रोध्दूलने श्रद्धा येषां नैवोपजायते ॥ महापातकदोषेण दुष्टास्ते नात्र संशयः ॥८०॥ भूत्यैवोध्दूलनं तिर्यक्त्रिपुंड्रस्य च धारणम् ॥ वरिष्ठं सर्वधर्मेभ्यस्ततःस्तं नित्यमाचरेत् ॥८१॥ स्कांदे ॥ भस्मनोध्दूलनं यच्च तथा तिर्यक्त्रिपुंड्रकम् ॥ प्रमादादपि मोक्षार्थी न त्यजेदिति हि श्रुतिः ॥८२॥ स्कांदे ॥ सौरसंहितायाम् ॥ भस्मसंच्छन्नसर्वांगमनुगच्छति यः पुमान् ॥ सर्वपातकयुक्तोऽपि स सद्यः पूज्यते नरः ॥८३॥ भस्मसंच्छन्नसर्वांगं यः स्तौति श्रद्धया सह ॥ सर्वपातकयुक्तोऽपि पूयते मानवोऽचिरात् ॥८४॥ भस्मसंच्छन्नदेहाय प्रणामं कुरुते तु यः ॥ सर्वपातकयुक्तोऽपि स सद्य

---

जावा. (७६) व्रतस्थ ब्राह्मणहो, पूर्व जन्मामध्यें महापातक केलें असेल ह्मणून त्या संस्कारानें या जन्मांत भस्मलेपनाचा द्वेष करतात. त्या पातकांमुळेंच भस्मोध्दूलनावर दृढ द्वेष ते करतात.(७७) भस्मोध्दूलन त्रिपुंड्रधारण जे श्रद्धेनें करीत नाहींत, त्यांना वर्णाश्रमाचा आचार कळत नाहीं. अर्थात त्यांना आचार नाहीं. (७८) उध्दूलन, त्रिपुंड्र श्रद्धापूर्वक जे धारण करीत नाहींत, त्यांना कोट्यावधि कल्प गेले तरी शिवज्ञान होत नाहीं. (७९) भस्मोध्दूलन व भस्मलेपन जे श्रद्धेनें करीत नाहींत, त्यांना कोट्यावधि जन्मांतही संसारांतून सुटका होत नाहीं. (८०) त्रिपुंड्रावर व उध्दूलनावर ज्यांची श्रद्धा नाहीं, ते लोक महापातक दोषांनीं युक्त आहेत, असें समजावें. यांत संशय नाहीं. (८१) विभूतीचें उध्दूलन व आडवे त्रिपुंड्र धारण सर्व धर्मांपेक्षां श्रेष्ठ आहेत, अर्थात नित्य त्रिपुंड्र धारण करावें(८२) स्कांदपुराणांत ह्मटलें कीं,—भस्मोध्दूलन तिर्यक्त्रिपुंड्र ( आडवे तीन नाम ) मोक्षार्थी प्राण्यांनीं प्रमादानें देखील सोडूं नये, असें श्रुति सांगते. (८३) स्कांदपुराणांतील सौरसंहितेंत ह्मटलें कीं,—भस्मलेपन केलेल्या प्राण्याबरोबर जो जातो, तो प्राणी सर्व पातकी असला तरी मुक्त होतो व पूज्य होतो. (८४) भस्मलेपन केलेल्या मानवाची स्तुति श्रद्धेनें जो करतो, तो सर्व पातकी असला तरी लौकर पुनीत होऊन लोकांत पूज्य होतो. (८५) भस्मलेपन केलेल्या प्राण्याला जो

पूयते नरः ॥८५॥ शिवधर्मे ॥ भस्मनिष्ठं प्रतिष्ठाप्य दिवसेनापि यत्फलम् ॥ न तच्छक्यं गृहस्थेन प्राप्तुं क्रतुशतैरपि ॥८६॥ गारुडपुराणे ॥ भूतप्रेतपिशाचाद्या रोगाश्चातीवदुःसहाः ॥ भस्मनिष्ठस्य सान्निध्याद्विद्रवन्ति न संशयः ॥८७॥ वासिष्ठलैंग्ये ॥ भस्मसंच्छन्नसर्वांगं दृष्ट्वोत्तिष्ठति यः पुमान् ॥ तं दृष्ट्वा देवराजोऽपि दण्डनर्तं करिष्यति ॥८८॥ भस्मदिग्धशरीराय यो ददाति धनं मुदा ॥ तस्य सर्वाणि पापानि विनश्यन्ति न संशयः ॥८९॥ शैवसंहितायाम् ॥ यत्र भुंजीत भस्मांगी मूर्खो वा पण्डितोऽपि वा ॥ तत्र भुंक्ते महादेवः सपत्नीको वृषध्वजः ॥९०॥ स्कांदे ॥ आसीत्पुरा कृतयुगे वर्मादतनयो द्विजः ॥पंचाक्षो नाम सर्वज्ञो भक्त्या नन्दिसमः शिवे॥ ९१॥ शोभना तस्य भार्याऽभूदनसूयेव विश्रुता ॥ वसिष्ठारुंधतीवैवमभूतां शिवपूजकौ ॥९२॥ स्थावरे जंगमे लिंगद्वये पूजापरौ त्रिधा ॥ कदाचिदेवं वसतः पंचाक्षः शोभना-

---

प्रणाम करतो, तो सर्व पातकी असला तरी लौकर पुनीत होतो. (८६) शिवधर्मांत सांगितलें कीं—भस्मनिष्ठ प्राण्याची प्रतिष्ठा ( सत्कार ) केलेल्या एका दिवसाचें जें फळ आहे, तें फळ शेंकडो यज्ञ केले तरी मिळत नाहीं. (८७) गारुडपुराणांत ह्मटलें कीं –भूत, प्रेत, पिशाच, दुःसह रोग हीं भस्मनिष्ठ प्राण्याजवळ राहत नसून उलट त्याला पाहून पळून जातात यांत संशय नाहीं (८८) वासिष्ठलैंग्यांत सांगितलें कीं, भस्मनिष्ठ प्राण्याला पाहून जो उत्थापन देतो, त्या प्राण्याला पाहून इंद्र देखील दंडाकार नाचतो. (८९) भस्मलेपन केलेल्या प्राण्याला द्रव्यदान जो संतोषानें करतो, त्याचें सर्व पाप जळून जातें, यांत संशय नाहीं. (९०) शैवसंहितेंत ह्मटलें कीं,—भस्मलेपन केलेला प्राणी मूर्ख असो, पंडित असो, पण तो जेथें जेवतो, त्याठिकाणीं प्रत्यक्ष वृषध्वज शिव सपत्नीक जेवतो असें समजावें. (९१) स्कांदपुराणांत ह्मटलें कीं—पूर्वी कृतयुगामध्यें वर्माद नांवाच्या एका ब्राह्मणाला पंचाक्ष नांवाचा मुलगा झाला त्यानें शिवभक्तीमध्यें नंदीला मागें सारिलें. (९२) त्या पंचाक्षाला शोभना नांवाची सुंदर बायको होती. अनुसूयेप्रमाणें तिची ख्याति असे. ते दोघेही वसिष्ठ अरुंधतीप्रमाणें शिवपूजेमध्यें प्रसिद्ध झाले होते. (९३) स्थावर (प्रतिष्ठितलिंग) जंगम ( माहेश्वर) या दोन्ही लिंगांवर निष्ठा ठेवून त्रिकाल पूजा करीत होते. त्या शोभनेचा नवरा ( पंचाक्ष )

पतिः ॥९३॥ बाह्यांतःपूजनाशीलः शिवध्यानरतः सदा ॥९४॥ वृत्तम् ॥ दिने दिने सर्वगतं महात्मा ध्यायन्महात्मानमनन्यचेताः ॥ पुष्पार्थमीशार्चनतत्परोऽसौ वनं मृगव्यालसमाकुलं तु॥जगाम शिष्यैः सहितो महात्मा॥९५॥ काले तु तस्मिन्नपि विप्रसूनौ गते तु तस्मिन्गृहमस्य विप्राः ॥ जगाम चांडालशरीरधारी गणाग्रणीर्भूतिविभूषितश्च॥९६॥ भोक्तुं स नाम्ना शिखरालयश्च गृहे समायांतमदीनसत्वा॥ भस्मप्रदिग्धांगमनन्यभावा ननाम साध्वी द्विजवर्यपत्नी ॥९७॥ पाद्यादिकं हस्ततले गृहीत्वा चोवाच वाक्यं गणराट्ट तदानीम्॥ विभ्रत्स चण्डालवपुर्महात्मा जिज्ञासुरेनां भवशासनाच्च ॥९८॥ पंचाक्षभार्यो परमेशभक्तस्त्वया न कार्यं मम वंदनं वै॥जानीहि मामन्त्यजयोनिजातं त्वं देहि मे भोजनमद्य शीघ्रम्॥९९॥पद्माभनेत्रा द्विजवर्यपत्नी जगाद वाक्यं पुनरेव साध्वी॥गणाधिपं वारिजपत्रनेत्र ॥त्वया न वाच्यं परमेशभक्त्या गण्योऽसि त्वं भस्मविभूषितांगः ॥१००॥ द्विजोत्तमो वाप्यथ लोलुपो वा नार्योपि वा पुल्कसजोऽन्त्यजोपि वा॥वन्द्यः सदा सर्वजनैर्महात्मा शिवस्य पा-

---

याप्रमाणें काळ घालवीत असतां (९४) त्याची निष्ठा बाह्यपूजेंत व आंतरपूजेंत फारच वाढून तो पंचाक्ष शिवध्यानांत रत झाला. (९५) प्रतिदिवशीं सर्वव्यापी महात्म्या शिवाचें ध्यान अनन्यभावानें करीत असतां एकदां तो पंचाक्ष ईशपूजेकरितां फुलें आणावयास मृगव्यालांनीं युक्त वनामध्यें शिष्यांसह गेला. (९६) तो ब्राह्मणाचा मुलगा रानांत गेल्यानंतर त्याच्या घरीं चांडालाचा वेष घेतलेला एक गणश्रेष्ठ येऊन सर्वांगाला भस्म चर्चन करून बसला (९७) त्याच्या मनांत त्या ब्राह्मणाच्यां घरीं जेवावयाचें होतें; त्यांचें नांव शिखरालय असें होतें. तेव्हां त्याला पाहून सत्वशील द्विजपत्नीनें अनन्य भावानें नमस्कार केला. कारण त्या चांडाळानें सर्वांगाला भस्मलेपन केलें होतें.(९८)नंतर ती हातांत अर्घ्यपात्र पूजासाहित्य घेऊन आली तिला चांडालवेषधारी गणाधीश्वरानें पाहून शिवशासनामुळें परीक्षा करण्याकरितां ह्मटलें कीं, (९९) पंचाक्षभार्ये, मला तूं नमन करूं नको. कारण मीं चांडाळाच्या वंशांत जन्म घेतला आहे. असो. आधीं मला जेवावयास वाढ. (१००) ती सुशील व कमलनयना ब्राह्मणपत्नी पुनः असें ह्मणाली कीं, हे कमलनेत्रा भस्मधारण करणाऱ्या गणाधिपा त्वां असें न बोलावें. कारण तूं शंकरभक्तीमुळें भक्तांत गणला जाण्यास योग्य आहेस. (१०१) जो प्राणी शिवपूजेंत मन आसक्त करितो, तो प्राणी ब्राह्मण असो, लोभी असो, दुष्ट

दाब्जनिविष्टचित्तः ॥१०१॥ एतत्पुरा पर्वतशृंगमध्ये गिरींद्रपुत्र्याः पर-मेण चोक्तम् ॥इति प्रसन्नो भगवान् ममाह भर्ता पुरा शिष्यसमूहमध्ये ॥१०२॥ इति ब्रुवाणा गणनायकं तं पाद्यार्घ्यपुष्पादिभिरोदनैश्च ॥ संपू-जयामास विशुद्धसत्वा विशालनेत्रा परमेशभक्ता ॥१०३॥ प्रगृह्य पुं-ष्पाणि फलानि भक्त्या गत्वा सशिष्यो गणनायकं तं॥ स पूजयामास तदा महात्मा तया सहायो मदनांतकस्य ॥१०४॥ द्विजेन्द्रमत्युग्रतया बभाषे गणाधिपो हर्षगिरेशविप्रः ॥ इति प्रहस्याह मुनींद्रवर्यः सा-चापि भार्या च तथा सगोत्रा ॥१०५॥ ततः सहर्षो द्विजयोर्महेशो गणे-श्वरो मुक्तिपदं तयोर्दधौ॥१०६॥ मानवपुराणे॥ एवमुध्दूल्य मेधावी पु-नस्तिर्यक्त्रिपुण्ड्रकम् ॥ नित्यं प्रयत्नतः कुर्यान्मुमुक्षुर्मुच्यतेऽचिरात् ॥१०७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचा-रसंग्रहे सदाचारनिरूपणे श्रीमद्विभूतिकल्पतत्स्नानोध्दूलनतन्माहा-त्म्यं नामैकोनपंचाशोऽध्यायः

---

असो, पुल्कस (मांग) असो, अंत्यज असो, तो सर्वांना वंद्य आहे. (१०२) याप्रमाणें पूर्वी पर्वताच्या सुळ्यावर बसून साक्षात गिरिजेनें सांगितलें आहे, शिवाय शि-ष्यसमूहामध्यें बसून माझ्या भर्त्यानें एकदां असेंच सांगितलें होतें. (१०३) असें बोलून गणनायकाला अर्घ्य पाद्य वगैरे देऊन सत्वशील शिवभक्त शोभनेनें त्याची पूजा केली व त्याला भोजन दिलें. (१०४) इतक्यांत फलपुष्प घेऊन तो ब्राह्मण आला नंतर त्याला ( चांडाळाला ) पाहून भक्तिपूर्वक शिष्य-सहित वसून त्या ब्राह्मणानें गणाधीशाची पूजा केली व तिच्यासह ( वायकोसह ) पुनः पूजा केली. (१०५) तो गणाधिप अस्खलित हर्षयुक्त वाणीनें त्या ब्राह्मण-वर्याला ह्मणाला व तो मुनिवर्य पंचाक्षशैवही त्या गणाधिपाला हंसून ह्मणाला. त्याचप्रमाणें त्या पंचाक्षाची बायको आह्मांसह ह्मणाली. (१०६) नंतर महेशानें मोठ्या आनंदानें त्या दोघांना गणाधीशत्व देऊन मुक्तस्थानही दिलें (१०७) मानवपुराणांत ह्मटलें कीं, याप्रमाणें बुद्धिमानानें प्रयत्नपूर्वक तिर्यक्त्रिपुंड्र धारण करावे व भस्मोध्दूलन करावें या योगानें मुमुक्षु लौकर मुक्त होतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील श्रीमद्विभूतिकल्पतत्स्नानोध्दूलनतन्माहात्म्य नांवाचा एकोणपन्नासावा अध्याय संपला.

## ॥ अथ पंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ कालाग्निरुद्रोपनिषदि ॥ अथ कालाग्निरुद्रं भगवन्तं सनत्कुमारः पप्रच्छ ॥ अभिधेहि भगवन् त्रिपुंड्रविधिं सतत्त्वं किं द्रव्यं किं प्रमाणं कति रेखाः किं दैवतं का शक्तिः किं फलमिति च॥१॥ तं होवाच भगवान्यद्द्रव्यं तदाग्नेयं भस्म सद्यादिपंचब्रह्ममंत्रैः परिगृह्य मानस्तोकेति समुध्दृत्य त्रियायुषं जमदग्नेरिति शिरोललाटवक्षःस्कंधेषु त्रियायुषैस्त्र्यंबकैस्तिस्रो रेखाः कुर्वीत व्रतमेतच्छांभवं सर्ववेदेषु वेदवादिभिरुक्तं तत्समाचरेन्मुमुक्षुरपुनर्भवाय आललाटादाचक्षुषोर्भ्रूमध्यतो या चास्य प्रथमा रेखा साऽऽहवनीया अकारो रजो भूर्लोकश्चात्मा क्रियाशक्तिः ऋग्वेदः प्रातःसवनं रुद्रो देवता या च द्वितीया रेखा सा गार्हपत्या उकारः सत्वमंतरिक्षमंतरात्मेच्छाशक्तिर्यजुर्वेदो मध्यंदिनं सवनं महेश्वरो देवता या चास्य तृतीया रेखा सा दक्षिणाग्निर्मकारस्त-

---

श्रीशिवास नमस्कार असो. कालाग्निरुद्रोपनिषदांत ह्मटलें कीं,–(वाक्य) (१) नंतर भगवान कालाग्निरुद्राला श्रीकुमारानें प्रश्न केला कीं, हे भगवन्, तत्वसहित त्रिपुंड्रविधि सांगा. यांत द्रव्य काय पाहिजे ? प्रमाण काय ? रेखा किती कराव्या ? देवता कोणती ? शक्ति कोणती ? याचें फल काय ? हें सर्व सांगा. (२) (वाक्य) तेव्हां श्रीशिवानें ह्मटलें कीं,–आग्नेय भस्मच द्रव्य असून तें हातांत सद्यादिपंचब्रह्ममंत्रांनीं स्वीकार करून "मानस्तोके" या मंत्रानें उचलून "त्रियायुषं जमदग्नेः" या मंत्रानें शिरावर, कपाळावर, वक्षस्थलावर, बाहूला भस्म लावावें. "त्रियायुषं" "त्र्यंबके" या मंत्रांनीं भस्माच्या तीन तीन रेखा (त्रिपुंड्रधारण) कराव्या. हें शांभवव्रत सर्व वेदांमध्यें वेदवादी लोकांनीं सांगितलें आहे. त्याप्रमाणें मोक्ष मिळविण्याकरितां मानवानें आचरण करावें. कपाळापासून डोळ्यापर्यंत भ्रूमध्यभागीं जी पहिली रेखा कोरली असेल तिला "आहवनीय" अशी संज्ञा आहे. हिचा बीजमंत्र अकार असून रजोगुणात्मक ही रेखा आहे. भूर्लोक रेखेचा आत्मा असून क्रिया नांवाची शक्ति या रेखेंत आहे. या रेखेचा वेद ऋग्वेद असून प्रातःसवन आहे. रेखेची देवता रुद्र हा आहे. आतां दुसरी जी मध्यरेखा असेल तिला "गार्हपत्य" अशी संज्ञा असून बीजाक्षर उकार आहे. सत्वगुण इचा असून अंतरिक्ष अंतरात्मा आहे. इच्छाशक्ति इची असून यजुर्वेद आहे. मध्यंदिन सवन असून देवता महेश्वर आहे. आतां जी तिसरी रेखा आहे

मो द्यौः परमात्मा ज्ञानशक्तिः सामवेदः सायंसवनं सदाशिवो देवतेति त्रिपुंड्रं भस्मना करोति यो विद्वान् ब्रह्मचारी गृहस्थो वानप्रस्थो यतिर्वा स समस्तपातकोपपातकेभ्यः पूतो भवति तेनेतिहासागमपुराणानां रुद्राणां शतसहस्राणि जप्तानि भवंति प्राणायामानामयुतं जप्तं भवति रूपे रूपे दशपूर्वान् पुनाति दशोत्तराणां च पंक्तिं पुनाति सर्वकर्मसु सर्वदा योग्यो भवति देहं त्यक्त्वा शिवसायुज्यमेति न च पुनरावर्तत इत्याह भगवान् कालाग्निरुद्रः ॥२॥ क्रियासारे ॥ मंत्रसंस्कारसंयुक्तं पवित्रमतिपांडुरं ॥ सुस्निग्धं भसितं भक्तैर्भक्त्या धार्यमनारतं ॥३॥ वामहस्ततले भस्म क्षिप्त्वाऽऽच्छाद्यान्यपाणिना॥ अग्निरित्यादिमंत्रेण स्पृशन्वाराभिमंत्र्यच ॥४॥ ततोऽष्टकृत्वो मूलेन चाभिमंत्र्यावकुंठ्य च ॥ त्रिपुण्ड्रं धारयेद्धीमान् मूर्धादिककुदन्तकं ॥५॥ एकादशे त्रिपुंड्रस्य स्थानान्याह शरीरके ॥ शिरोललाटश्रवणद्वयं ग्रीवाभुजद्वयं॥६॥ वक्षो नाभिः पृष्ठभागः ककुदेकादशानि तु ॥ स्थानानि च त्रिपुंड्रस्य

---

तिला "दक्षिणाग्नि" असें ह्मणत असून मकार बीजाक्षर आहे. तमोगुण इच्छा असून द्युलोक आहे. परमात्मा ज्ञानशक्ति असून सामवेद आहे. सायं सवन असून सदाशिव देवता आहे. अशा अर्थाचे तीन नाम आडवे जो लावतो, तो प्राणी विद्वान आहे. तो ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, यति कोणी असो, परंतु तो सर्व पातकांपासून मुक्त होतो, व उपपातकांपासून मुक्त होतो, व पुनीत होतो. त्याला इतिहास, पुराण, आगम, रुद्र वगैरेंचा लक्ष जप केल्याचें फल मिळतें. हजारो प्रणवजपाचें पुण्य मिळतें. व तो आपल्या मागच्या दहा पिढींला पुढच्या दहा पिढींला मुक्त करितो. तो प्राणी सर्व कर्मांला सर्वदां योग्य होतो. देहत्याग करून शिवसायुज्याला जातो व पुनः जन्मास येत नाहीं, असें भगवान कालाग्निरुद्रानें सांगितलें. (३) क्रियासारांत ह्मटलें कीं—मंत्र संस्कारानें तयार केलेलें, पवित्र, अतिशय शुभ्र, अतिस्निग्ध भस्म भक्तीनें भक्तांनीं निरंतर धारण करावें. (४) डाव्या तळहातावर भस्म घेऊन उजव्या हातानें वर झांकून "अग्नि" वगैरे मंत्रांनीं स्पर्श करून पाणी शिंपडून अभिमंत्रण करावें. (५) नंतर आठवेळ मूलमंत्रानें अभिमंत्रण अवकुंठन (उद्धूलन) करून मस्तकापासून खांद्यापर्यंत भस्मधारण करावें (६) त्रिपुंड्र धारणाचीं शरीरावर स्थानें अकरा आहेत, तीं अशीं कीं, डोकें, कपाळ, दोन कान, गळा, दोन बाहु, (७) वक्षस्थल, नाभि (बेंबी),

विज्ञेयानि मनीषिभिः ॥७॥ शिवो महेश्वरो रुद्रः श्रीकण्ठः शंभुरी-श्वरः ॥ महादेवः पशुपतिः शंकरो वृषभध्वजः ॥८॥ परमात्मेत्यमी रुद्राः स्थानादिषु यथाक्रमम् ॥ त्रिपुण्ड्रमुक्तस्थानेषु दद्यात्सजलभ-स्मना ॥९॥ शुद्धशीतजलेनैव भस्मना च त्रिपुंड्रकं॥ यो धारयेत्परं ब्रह्म तत्प्राप्नोति न संशयः ॥१०॥ अकारोऽनामिका प्रोक्त उकारो मध्यमांगु-लिः ॥ मकारस्तर्जनीस्थाने त्रिभिः कुर्यात्रिपुंड्रकं ॥११॥ मध्यांगुलित्र-येणैव स्वदक्षिणकरस्य तु ॥ षडंगुलायतं मानमपि वाऽधिकमानकं ॥१२॥ नेत्रयुग्मप्रमाणेन भाले दद्यात्रिपुंड्रकं ॥ मध्यमानामिकांगुष्ठैरनु-लोमविलोमतः ॥१३॥ धारयेद्यस्त्रिपुंड्राकं स रुद्रो नात्र संशयः ॥ ऋजु श्वेतमनुव्याप्तं स्निग्धं श्रोत्रप्रमाणकं ॥१४ एवं सल्लक्षणोपेतं त्रिपुण्ड्रं सर्वसिद्धिदम् ॥१५॥ मानवीयसंहितायां॥प्रातःकाले च मध्यान्हे साया-न्हे च त्रिपुण्ड्रकं ॥ कदाचिद्भस्मना कुर्यात्स रुद्रो नात्र संशयः ॥१६॥ लिंगपुराणे ॥ एवंविधविभूत्या च कुरुते यस्त्रिपुण्ड्रकं ॥ स रौद्रधर्मे

---

पृष्ठभाग (पाठ), ककुद (खांदा) अशीं अकरा स्थानें विद्वानांनीं जाणावींत. (८) शिव, महेश्वर, रुद्र, श्रीकंठ, शंभु, ईश्वर, महादेव, पशुपति, शंकर, वृष-ध्वज, (९) परमात्मा अशीं अकरा स्थानें अकरा देवाचीं अनुक्रमानें जाणावींत. या सांगितलेल्या स्थानावर जलसहित भस्माचे त्रिपुंड्र करावेत. (१०) शुद्ध थंड-पाणी घालून त्रिपुंड्र धारण जो करतो, त्याला परब्रह्मप्राप्ति होते, यांत संशय नाहीं. (११) अकार अनामिका अंगुलि (बोट) असून उकार मध्यमांगुलि (मधलें बोट) आहे. मकार तर्जनी असून या तीन बोटांनीं भस्माचें त्रिपुंड्र धारण करावें. (१२) आपल्या उजव्या हाताच्या तीन बोटांनीं सहा बोटें प्रमाण किंवा त्याहून जास्त प्रमाणानें भस्म लाविलें तरी हरकत नाहीं. (१३) दोनी डोळ्यांच्या बरो-बर प्रमाणानें त्रिपुंड्र धारण करावें. मध्यमा, अनामिका, अंगुष्ठ यां बोटांनीं अनु-लोम विलोमानें ( उलट सुलट ) क्रमानें (१४) जो त्रिपुंड्र धारण करितो, तो रुद्रच आहे, यांत संशय नाहीं. ते त्रिपुंड्र सरळ असून पांढरे दिसावेत, व दाट असून कानाच्या शेवटापर्यंत व्याप्त झालेले असावेत. (१५) याप्रमाणें चांगल्या लक्षणांनीं त्रिपुंड्र धारण केलें तर सर्वसिद्धि मिळतात. (१६) मानवीय संहितेंत ह्मटलें कीं,—सकाळीं, दुपारीं, संध्याकाळीं केव्हांतरी भस्माचे त्रिपुंड्र धारण जो करितो, तो रुद्रच आहे, यांत संशय नाहीं. (१७) लिंगपुराणांत ह्मटलें कीं, या तऱ्हेचा विभूतीनें जो त्रिपुंड्र धारण करितो, तो प्राणी रुद्रधर्मांत निपुण

संयुक्तस्त्रयीमय इति श्रुतिः ॥१७॥ शिवरहस्ये ॥ वृत्तम् ॥ समस्ततीर्थौघमया च काशी विश्वेश्वरः सर्वसुरात्मको यः ॥ समस्ततत्वैकरसा विभूतिस्तथैव पुण्यौघमयं त्रिपुण्ड्रं ॥१८॥ ॥ स्कान्दे ॥ यथा सर्वपुराणेषु पुरी वाराणसी शुभा ॥ तथा शुभ्रत्रिपुण्ड्रं च सर्वचिन्हेषु कथ्यते ॥१९॥ यथा विश्वाधिको रुद्रस्सर्ववेदेषु गीयते ॥ तथा सर्वपुराणेषु त्रिपुण्ड्रमपि गीयते ॥२०॥ वासिष्ठलैंगे ॥ स्मरणादेव रुद्रस्य यथा पापं प्रणश्यति ॥ तथास्य धारणादेव सर्वपापं प्रणश्यति ॥२१॥ भस्मना वेदमंत्रेण त्रिपुंड्रस्य च धारणं ॥ महापातकसंघाख्यतमसश्चण्डभास्करः ॥२२॥ कूर्मपुराणे॥ वृत्तम् ॥ एतानि तानि शिवमंत्रपवित्रितानि भस्मानि कामदहनांगविभूषितानि ॥ त्रैपुण्ड्रकानि रचितानि ललाटपट्टे लुंपंति दैवलिखितानि दुरक्षराणि ॥२३॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ न दानेन न यज्ञेन न तपोभिः सुदुष्करैः ॥ न तीर्थयात्रया पुण्यं यत्त्रिपुण्ड्रेण लभ्यते ॥२४॥ दानयज्ञाश्च धर्माश्च तीर्थयात्राश्च नारद ॥ ज्ञानं तप-

---

असून तीन वेदांत निपुण आहे, किंवा वेदमय आहे, असें श्रुति सांगते. (१८) शिवरहस्यांत सांगितलें कीं,—सर्वतीर्थमय काशी आहे, सर्व देवमय काशीविश्वेश्वर आहे, सर्व तत्वांतलें मुख्य सार विभूति आहे, त्याप्रमाणें सर्व पुण्यमय त्रिपुंड्र आहे. (१९) स्कांदपुराणांत सांगितलें कीं —सर्व पुराणांमध्में वाराणसी क्षेत्राची प्रसिद्धि जशी आहे, त्याप्रमाणें सर्व चिन्हांमध्यें श्रेष्ठ चिन्ह शुभ्रत्रिपुंड्र आहे, असें सांगितलें आहे. (२०) सर्वांपेक्षां रुद्रच श्रेष्ठ आहे असें वेदांत जसें वर्णिलें आहे, तद्वत सर्व पुराणांत त्रिपुंड्राचें माहात्म्य फार सांगितलें आहे. (२१) वासिष्ठलैंग्यांत सांगितलें कीं —रुद्राच्या स्मरणानें सर्व पाप जळून जातें, त्याप्रमाणें भस्मधारणानें पाप नाहींसें होतें. (२२) वेदमंत्र ह्मणत भस्माचे त्रिपुंड्र धारण केले तर ते त्रिपुंड्र महापातकरूपी गाढांधकाराला प्रचंड सूर्याप्रमाणें नाश करून टाकितात. (२३) कूर्मपुराणांत सांगितलें कीं—शिवमंत्रांनीं पुनीत झालेले, श्रीशिवानें आपल्या आंगावर धारण केलेले, असे त्रिपुंड्र कपाळावर रेखिले असतां ब्रह्मदेवानें कपाळावर लिहलेलीं दुष्ट अक्षरें पुसून जातात. (२४) ब्रह्मांडपुराणांत सांगितलें कीं –दान, यज्ञ, दुष्कर तप, तीर्थयात्रा यांनीं जें पुण्य मिळूं नये, तें पुण्य कपाळावर त्रिपुंड्र धारण केले असतां मिळतें. (२५) हे नारदा, दान, यज्ञ, धर्म, तीर्थयात्रा, ज्ञान, तप ही त्रिपुंड्राच्या सोळा-

त्रिपुण्ड्रस्य कलां नार्हंति षोडशीं ॥२५॥ स्कान्दे ॥ यथा राजा स्वचिन्हांकं स्वजनं मन्यते सदा ॥ तथा शिवस्त्रिपुण्ड्रांकधरं स्वमिव मन्यते ॥२६॥ द्विजातिर्वाऽन्त्यजातिर्वा सितशुद्धेन भस्मना ॥ धारयेद्यस्त्रिपुण्ड्रांकं रुद्रस्तेन वशीकृतः ॥२७॥ त्यक्तवर्णाश्रमाचारो लुप्तसर्वक्रियोऽपि वा ॥ सकृत्तिर्यक्त्रिपुंड्रांकधारणात्सोऽपि पूयते ॥२८॥ शैवसंहितायां ॥तस्मिन्ज्ञानं परीक्ष्येत न कुलं न व्रतं तथा॥त्रिपुण्ड्रांकितभालेन पूज्य एव हि नारद ॥२९॥ मानवपुराणे ॥ त्रिपुण्ड्रधारिणं दृष्ट्वा भूतप्रेतपुरःसराः॥ भीताः प्रकंपिताः शीघ्रं गच्छन्त्येव न संशयः ॥३०॥ स्कान्दे सौरसंहितायां ॥ त्रिपुण्ड्रधारिणः पादं प्रक्षालयति यः पुमान् ॥ सर्वपातकयुक्तोऽपि स सद्यः पूयते नरः ॥३१॥ त्रिपुण्ड्रधारिणे भिक्षाप्रदानेन हि केवलं ॥ सर्वपातकयुक्तोऽपि पूयते मानवोऽचिरात् ॥३२॥ भीमागमे॥तेनाधीतं श्रुतं तेन तेन सर्वमनुष्ठितं॥ येन विप्रेण शिरसि त्रिपुण्ड्रं भस्मना धृतं ॥३३॥ कृतं स्यादकृतं तेन श्रुतमप्यश्रुतं भ-

---

व्या अंशाच्या योग्यतेला येऊं शकत नाहींत. (२६) स्कांदपुराणांत सांगितलें कीं, आपलें चिन्ह धारण केलेल्या प्राण्याला आपला मनुष्य ह्मणून राजा जसा ओळखतो, त्या प्रमाणें त्रिपुंड्र धारण केलेल्या प्राण्याला आपला ह्मणून शिव ओळखतो. (२७) ब्राह्मण असो, अंत्यज असो, त्यानें शुभ्र भस्माचे त्रिपुंड्र लाविले तर त्याला श्रीरुद्र तात्काळ वश होतो, (२८) वर्णाश्रमाचा आचार सोडलेला असो, सर्व क्रियेचा लोप केलेला असो, त्यानें एकवार तिर्यक्त्रिपुंड्र धारण केले असतां तो शुद्ध होतो. (२९) शैवसंहितेंत ह्मटलें कीं —हे नारदा, त्याचें ज्ञान, कुल, व्रत वगैरे कांहीं पाहूं नये. कारण त्रिपुंड्र धारणानें सगळ्या जगांत तो पूज्य होतो. (३०) मानवपुराणांत ह्मटलें कीं —त्रिपुंड्रधारी प्राण्याला पाहून भूत, प्रेत, पिशाच वगैरे भिऊन कांपत कांपत लौकरच तेथून पळून जातात, यांत संशय नाहीं. (३१) स्कांदपुराणांतील सौरसंहितेंत सांगितलें कीं —त्रिपुंड्रधारी प्राण्याचे पाय जो धुतो, तो प्राणी सर्वपातकी असला तरी तात्काळ मुक्त होतो, व पुनीत होतो. (३२) त्रिपुंड्रधारी प्राण्याला नुसती भिक्षा वाढिली तर तो प्राणी सर्वपातकी असला तरी तात्काळ पुनीत होतो. (३३) भीमागमांत सांगितलें कीं — जो प्राणी शिरावर त्रिपुंड्र धारण करतो, त्याचें सर्व अध्ययन झालें आहे, व त्यानें सर्व कांहीं केलें आहे, असें समजावें. (३४) त्रिपुंड्र धारण जो करीत नाहीं, त्यानें

वेत् ॥अधीतमनधीतं च त्रिपुण्ड्रं यो न धारयेत्॥३४॥बोधायनस्मृतौ ॥ वृथा वेदा वृथा यज्ञा वृथा दानं वृथा तपः ॥ वृथा व्रतोपवासौ तु त्रिपुण्ड्रं यो न धारयेत् ॥३५॥ ग्रंथान्तरे ॥ सत्यं शौचं तपो यज्ञस्तीर्थं देवाग्निपूजनम् ॥ अश्वमेधमिदं व्यर्थं यस्त्रिपुंड्रं न धारयेत् ॥३६॥ कौर्मे॥ न तध्द्यानं न तद्दानं न तज्ज्ञानं न तत्तपः ॥विना तिर्यक्त्रिपुण्डांकं विप्रेण यदनुष्ठितम् ॥३७॥ त्रिपुण्ड्रधारणं मुक्त्वा मुक्तिमिच्छति यः पुमान् ॥ विषपानेन नित्यत्वं कुरुते ह्यात्मनो हि सः॥३८॥ वेदस्याध्ययने शूद्रो नाधिकारी यथा भवेत् ॥ त्रिपुण्ड्रेण विना विप्रो नाधिकारी शिवार्चने ॥३९॥ गारुडपुराणे ॥ गोपीमलिनधारी तु शिवं स्पृशति यो द्विजः ॥ सस्वैकविंशतिकुलः सोऽक्षयं नरकं व्रजेत् ॥४०॥ अभावे वा तथा विप्रो लौकिकाग्नेरथाहरेत् ॥ भस्मनैव प्रकुर्वीत न कुर्यान्मृत्तिकादिभिः ॥४१॥ स्रष्टा सृष्टिछलेनाह त्रिपुण्ड्रस्य प्रशस्तताम् ॥ ससर्ज स

---

कांहीं कर्म केलें तरी न केल्यासारिखें आहे, श्रवण केलें तरी न केल्यासारिखें आहे, अध्ययन केलें असलें तरी न केल्यासारखें आहे. (३५) बोधायनस्मृतींत ह्मटलें कीं –त्रिपुंड्र धारण जो करीत नाहीं, त्याचे वेद व्यर्थ, त्यानें केलेलें दान व्यर्थ, त्यानें केलेले यज्ञ व्यर्थ, त्याचें तप व्यर्थ, त्याचें उपवासव्रत वगैरे सर्व व्यर्थ होत. (३६) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,–त्रिपुंड्र धारण केलें नाहीं तर सत्य, शौच (शुद्धता), तप, यज्ञ, तीर्थ, देवपूजा, अग्निकार्य, अश्वमेध वगैरे सर्व व्यर्थ होत. (३७) कूर्मपुराणांत सांगितलें कीं,—ज्या ब्राह्मणानें तिर्यक् त्रिपुंड्र लाविले नाहींत, त्याचें ध्यान, दान, ज्ञान, तप हीं सर्व करून न केल्यासारखीं आहेत. (३८) त्रिपुंड्र लाविल्यावांचून मुक्तीची इच्छा जो करतो, विषपान करून प्राण राहूं दे, असें ह्मटल्याप्रमाणें त्याचें कर्म जाणावें. (३९) वेदाध्ययनाला शूद्र जसा अधिकारी होत नाहीं, तसा त्रिपुंड्र धारण केल्यावांचून ब्राह्मण शिवपूजेला अधिकारी होत नाहीं. (४०) गरुडपुराणांत ह्मटलें कीं —गोपीमलिन (गोपीचंदन) धारण करून शिवाला जो शिवतो, तो प्राणी आपल्या एकवीस कुळांसह अक्षय नरकाला जातो. (४१) शिवाग्नीचें भस्म मिळालें नाहीं तर लौकिकाग्नीचें भस्म आणून त्रिपुंड्र लावावे, परंतु मातीचे नाम लावूं नयेत. (४२)सृष्टिकर्त्यानें सृष्टि करीत असतां सांगितलें कीं –भस्मधारणासारखा दुसरा उपाय नसल्यामुळें त्याकरितांच आडवें, उंच असें कपाळ सर्वांचें मीं केलें आहे, परंतु वर्तुलाकृतीचें (वाटोळें) केलें

ललाटं हि तिर्यगूर्ध्वं न वर्तुलम् ॥४२॥ स्कान्दे ॥ तिर्यग्रेखाः प्रदृश्यन्ते ललाटे सर्वदेहिनाम्॥तथापि मानवा मूर्खा न कुर्वन्ति त्रिपुण्ड्रकम्॥४३॥ अहो मोहस्य माहात्म्यं मुनींद्रा ब्रह्मवादिनः ॥ ये नरा भस्म संत्यज्य कुर्वन्त्यन्यत्समाहिताः ॥४४॥ तिर्यक्त्रिपुंड्रं संत्यज्य श्रौतं पुंड्रान्तरं सदा ॥ धारयेद्यदि वा मोहात्पतत्येव न संशयः ॥४५॥ कौर्मे ॥ त्रिपुंड्रं ब्राह्मणो विद्वान्मनसाऽपि न लंघयेत् ॥ श्रुत्या विधीयते यस्मात्तत्यागी पतितो भवेत् ॥४६॥ क्रियासारे ॥ येषां वपुर्मनुष्याणां त्रिपुण्ड्रेण विना स्थितम् ॥ श्मशानसदृशं तस्मान्न प्रेक्ष्यं पुण्यकृज्जनैः ॥४७॥ गारुडपुराणे ॥ धिक् भस्मरहितं भालं धिग्ग्राममशिवालयम् ॥ धिगनीशार्चनं जन्म धिग्विद्यामशिवाश्रयाम् ॥४८॥ वासिष्ठलैंग्ये ॥ येषां क्रोधो भवेद्ब्रह्मन् ललाटे भस्मदर्शनात् ॥ तेषामुत्पत्तिसांकर्यमनुमेयं विपश्चिता ॥४९॥ कौर्मे ॥ त्रिपुण्ड्रं ये विनिंदन्ति निन्दन्ति शिवमेव ते ॥ धारयन्ति च ये भक्त्या धारयन्ति तमेव ते ॥५०॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ किमत्र

---

नाहीं. (४३) स्कंदपुराणांत ह्मटलें कीं,—सर्व प्राण्यांच्या कपाळांवर रेखा आडव्या दिसत असून मूर्खलोक त्रिपुंड्र धारण करीत नाहींत (४४) ब्रह्मवादी मुनिश्रेष्ठहो, मोहाचें माहात्म्य काय जबर आहे पहा! मूर्ख मानव भस्म सोडून दुसरेंच कांहीं तरी शांतपणें लावतात. (४५) तिर्यक्त्रिपुंड्र सोडून दुसरेच श्रौत पुंड्र सर्वदां जो मोहानें लावतो, तो नरकांत पडतो, यांत संशय नाहीं. (४६) कूर्मपुराणांत सांगितलें कीं ---विद्वान ब्राह्मणानें मनानें देखील त्रिपुंड्राचें उल्लंघन करूं नये, असें श्रुतींत सांगितलें आहे, याचा त्याग करणारा प्राणी पतित आहे, असें समजावें. (४७) क्रियासारांत सांगितलें कीं ---ज्यांचें शरीर त्रिपुंड्राशिवाय दिसेल, त्याचें शरीर श्मशानासारखें आहे, असें समजून पुण्यकर्म करणाऱ्या लोकांनीं तें शरीर पाहूं नये. (४८) गरुडपुराणांत सांगितलें कीं,---भस्मरहित कपाळाला धिक्कार असो, शिवालय नसलेल्या गांवाला धिक्कार असो, शिवपूजा न करणाऱ्या जन्माला धिक्कार असो, आणि शिवतत्व प्रतिपादन न करणाऱ्या विद्येला धिक्कार असो. (४९) वासिष्ठलैंग्यांत सांगितलें कीं ---कपाळावर भस्म पाहून ज्यांना राग येतो, ते लोक संकर जातीचे आहेत, असें विद्वानानें मानावें. (५०) कूर्मपुराणांत सांगितलें कीं ---त्रिपुंड्राची निंदा जे करतात, ते शिवाची निंदा करतात, असें समजावें. जे भक्तीनें भस्माचे त्रिपुंड्र लावतात, ते लोक शिवलिंगधारण करतात, असें मानावें. (५१) ब्रह्मांडपुराणांत सांगितलें कीं ---यांत पुनः पुनः

बहुनोक्तेन वर्णितं च पुनः पुनः ॥ मुक्त्वा त्रिपुण्ड्रं मोक्षस्य साधनं नहि विद्यते ॥५१॥ मात्स्ये ॥ वृत्तम् ॥ किं यज्ञैः किमनेकतीर्थगमनैः किं वेदपाठश्रमैः किं घोरैर्विविधैस्तपोभिरमलैः किं मंत्रतंत्रैर्जपैः ॥ किं ध्यानैः किमनेकदाननिकरैः किं सांख्ययोगभ्रमैः मोक्षार्थी सितभस्मना च निपुणः कुर्यात्त्रिपुण्ड्रं बुधः ॥५२॥ क्रियासारे ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन सांबुसद्भस्मना बुधः ॥ स्वांगे त्रिपुण्ड्रं संधार्य सर्वदा शिवमर्चयेत् ॥५३॥ कौर्मे ॥ विभूतिमात्रमाहात्म्यं वक्तुं ब्रह्मा न शक्नुयात् ॥ कः पुनः संस्कृताग्न्युत्थभूतिं वक्तुं समुत्सहेत् ॥५४॥ गारुडपुराणे ॥ ये च ते खलु वै वेदाः सर्वशास्त्राणि भूरिशः ॥ अस्पृष्टमहिमा भूतेर्गदितुं चकिता मताः ॥५५॥ शैवसंहितायाम् ॥ शिवमंत्रात्परो मंत्रस्तत्वं चापि शिवात्परम् ॥ शिवार्चनात्परं पुण्यं नहि तीर्थं च भस्मनः ॥५६॥ शिवधर्मे ॥ रुद्राग्नेर्यत्परं वीर्यं तद्भस्म परिकीर्तितम् ॥ ध्वंसनं सर्वदुःखानां सर्वपापविशोधनम् ॥५७॥ लैंग्ये॥ अंत्यजो वाऽधमो वापि मूर्खो

---

वर्णन काय करावयाचें आहे? त्रिपुंड्राला सोडून मोक्षाचें साधन दुसरें कोणतेंही नाहीं. (५२) मत्स्यपुराणांत सांगितलें कीं ---यज्ञ करून काय करावयाचें आहे? तीर्थयात्रा करून काय करावयाचें आहे? वेद पाठ करून विनाकारण श्रम करून घेण्यांत काय अर्थ आहे? कठिण कठिण अनेक तऱ्हेचें निर्मल निर्मल तप करण्यांत काय अर्थ आहे? मंत्रतंत्रांनीं व जपांनीं काय करावयाचें आहे? ध्यान, अनेक तऱ्हेचें दान, सांख्य, योग वगैरे काय करावयाचे आहेत? मोक्षार्थी प्राण्यानें शुभ्र भस्माचे त्रिपुंड्र धारण करावेत. (५३) क्रियासारांत ह्मटलें कीं --बुद्धिमानानें भस्म व उदक घेऊन त्याचे त्रिपुंड्र सर्वांगावर धारण करून शिवाची पूजा करावी. (५४) कूर्मपुराणांत ह्मटलें कीं --केवळ विभूतीचें माहात्म्य सांगावयास ब्रह्मदेव देखील समर्थ होत नाहीं. तर शिवाग्नीपासून झालेल्या भस्माचें माहात्म्य सांगावयास जगांत कोण समर्थ आहे? (५५) गरुडपुराणांत सांगितलें कीं - ते वेद व तीं सर्व शास्त्रें विभूतीचें माहात्म्य न कळल्यामुळें सांगावयास समर्थ होत नाहींत व चकित होतात. (५६) शैवसंहितेंत सांगितलें कीं -शिवमंत्रापेक्षां श्रेष्ठमंत्र दुसरा नाहीं. शिवतत्वापेक्षां श्रेष्ठ तत्व दुसरें नाहीं. शिवपूजेच्या पुण्यापेक्षां श्रेष्ठ पुण्य दुसरें नाहीं. भस्मापेक्षां श्रेष्ठ तीर्थ दुसरें नाहीं. (५७) शिवधर्मांत सांगितलें कीं --रुद्राग्नीचें श्रेष्ठ वीर्य हें भस्म होय. या भस्माच्या योगानें सर्व दुःखें, व सर्व पातकें नष्ट होतात. (५८) लिंगपुराणांत सांगितलें कीं--अंत्यज, अधम, मूर्ख, पंडित

वा पंडितोऽपि वा ॥ यस्मिन्देशे वसेन्नित्यं भूतिशासनसंयुतः ॥५८॥ तस्मिन्सदाशिवः सोमः सर्वभूतगणैर्वृतः ॥ सर्वतीर्थैश्च यज्ञैश्च साक्षिध्यं कुरुते सदा ॥५९॥ यस्मिन्देशे वसेन्नित्यं भूतिशासनसंयुतः ॥ सोऽपि देशो भवेत्पूतः किं पुनस्तस्य मंदिरम् ॥६०॥ स्कान्दे ॥ कीकटेष्वपि देशेषु यत्र भूतिविभूषणः ॥ मानवः प्राप्यतेऽतीव काशीक्षेत्रसमं हि तत्॥६१॥ शिवधर्मे॥ दुःशीलः शीलयुक्तो वा यो वा को वाऽप्यलक्षणः ॥ भूतिशासनसंयुक्तः स पूज्यो राजपुत्रवत्॥६२॥छद्मनाऽपि हि यो धत्ते भूतिशासनमैश्वरम् ॥ सोऽपि यां गतिमाप्नोति न तां यज्ञशतैरपि ॥६३॥मानवीयसंहितायाम्॥संपर्काल्लीलया वापि भयाद्वा धारयेत्तु यः॥ विधियुक्तविभूतिं तु स च पूज्यो यथा ह्यहम् ॥६४॥ शातातपस्मृतौ॥ वृत्तम् ॥ यदा कदा कुत्र च यत्र संभवं भस्माहृतं स्यादिह येन केन वा ॥न तेन तुल्यो भगवानजोऽपि श्रीभूतिधारी स शिवस्तथापि॥६५॥ शिवरहस्ये ॥ कश्चित्कंठगतप्राणः कालप्राप्तो मृतोपमः ॥ शेते श्मशाने

---

कोणी असो, असा प्राणी निरंतर भस्म लावून ज्या प्रदेशांत राहील, (५९) त्या प्रदेशांत सर्व भूतगणांसह उमासह सदाशिव वास करतो. त्या ठिकाणीं सर्व तीर्थें सर्व यज्ञ निरंतर राहतात. (६०) ज्या प्रदेशांत भस्मलिप्त प्राणी राहतो, तो देश पुनीत होतो, तर खुद्द त्याचें राहण्याचें घर पुनीत होतें ह्मणून काय सांगावें. (६१) स्कंदपुराणांत सांगितलें कीं -भस्मलिप्त मानव *कीकट देशामध्यें राहत असला तरी तो देश काशी क्षेत्राच्या बरोबरीचा आहे, असें समजावें. (६२) शिवधर्मांत सांगितलें कीं --दुःशील असो, सुशील असो, दुसरा कोणी दुर्लक्षणी असो परंतु तो भस्मनिष्ठ असला तर राजपुत्राप्रमाणें त्याला मान द्यावा. (६३) कपटानें जरी एखाद्यानें भस्म लाविलें तरी त्याला जी गति मिळते, ती गति कोट्यावधि यज्ञ केले तरी मिळत नाहीं. (६४) मानवीय संहितेंत सांगितलें कीं-सहवासानें, लीलेनें (गमतीनें), भीतीनें विधिपूर्वक जो भस्म लावतो, तो प्राणी माझ्याप्रमाणें जगांत पूज्य होतो. (६५) शातातपस्मृतींत सांगितलें कीं, कधींकाळीं कोठेंतरी उत्पन्न झालेलें भस्म कोणत्यातरी मनुष्यानें लाविलें, तर त्या मनुष्याची योग्यता ब्रह्मदेवालाही येत नाहीं. तो विभूतिधारी प्राणी साक्षात श्रीरुद्रच आहे. (६६) शिवरहस्यांत सांगितलें कीं ---कोणी एक प्राणी कंठगतप्राण

---

* कीकट देश ह्मणजे मागध देशाला ह्मणतात. त्या देशांत जरासंधानें राज्य केलें आहे तर तेथें जो मृत होईल तो नरकाला जातो असें गयामाहात्म्यांत सांगितलें आहे.

विवशो दस्युशस्त्रनिपीडितः ॥६६॥ अथ सेनां पुलिंदानां श्वाऽनुगः कश्चिदेव हि ॥ धावन् वेगात्तदंतस्थभस्मपुंज इतस्ततः ॥६७॥ तच्छयानललाटाग्रन्यस्तांघ्रिश्च ततो ययौ ॥ एतस्मिन्नंतरे नेतुं कालमृत्युर्यमानुगः ॥६८॥ तावतामुच्यमानासुं प्रत्यसर्पन्नमुं यदा ॥ तदानीमेव गणपा नानाप्रहरणोद्यताः ॥६९॥ विमानेऽप्सरसां वृन्दैस्तं मृतं पर्यवारयन् ॥ ततस्ते धर्मराट्प्रेष्या दृष्ट्वा भस्मांककारणम् ॥७०॥ शंभोस्तु शासनं स्मृत्वा हित्वाऽतस्तं च लिंगिनम्॥ प्रदद्रुवुर्दिश स्ते तं निन्युः शिवपुरं गणाः ॥७१॥ गारुडपुराणे ॥ श्रुतयः स्मृतयः सर्वाः पुराणान्यखिलान्यपि ॥ वदन्ति भूतिमाहात्म्यं ततस्तां धारयेद्द्विजाः ॥७२॥ वासिष्ठरामायणे ॥ यावन्तः पतिता भूमौ भस्मनः परमाणवः ॥ तावद्वर्षसहस्राणि नरो भवति किल्बिषी ॥७३॥ क्रियासारे ॥ यथा कृशानुरहितस्त्वध्वरो न विराजते ॥ अशेषसाधनोप्येवं भस्महीनं शिवार्चनम् ॥७४॥ वासिष्ठलैंग्ये ॥ येन भस्मोक्तमार्गेण न धृतं मुनिपुंगव ॥ तस्य

---

होऊन काळाच्या दाढेंत सांपडून प्रेताप्रमाणें स्मशानांत पडला होता. चोरांनीं त्याला शस्त्रास्त्रांनीं बेदम मारल्यामुळें परवश होऊन तसा पडला होता. (६७) तेव्हां त्या चोरांमध्यें एक कुत्रा होता, त्या कुत्र्यानें स्मशानांतल्या राखेंत लोळून धांवत येऊन. (६८) राख लागलेले पाय निजलेल्या त्या प्राण्याच्या कपाळावर ठेविले, तत्क्षणीं तो कुत्रा पळून गेला. इतक्यांत यमाचा सहकारी कालमृत्यु त्याला नेण्याकरितां आला. (६९) प्राण सोडीत असतां नंतर यमाचे दूत जेव्हां त्याच्या जवळ आले, त्याच वेळेस अनेक आयुधें घेऊन गणेश्वर तेथें आले. (७०) विमानांत बसून शेंकडो अप्सरा त्या मृताच्या भोंवतीं जमल्या. तेव्हां त्या यमदूतांनीं त्याच्या कपाळावरच्या भस्माचिन्हाचें कारण लक्षांत आणून, (७१) श्रीशिवाचें शासन लक्षांत आणून त्या भस्मचिन्ह असलेल्या प्राण्याला सोडून दक्षिण दिशेला ते यमदूत पळून गेले. मग गणेश्वरांनीं त्याला शिवपुराला आणिलें. (७२) गरुडपुराणांत सांगितलें की —श्रुति, सर्व स्मृति, अखिलपुराणें हीं विभूतींचें माहात्म्य फार फार सांगतात, याकरितां ब्राह्मणहो, विभूति धारण करावें. (७३) वासिष्ठरामायणांत सांगितलें कीं —भस्म लावतांना जमिनीवर भस्माचे रेणु जितके पडले असतील, तितके हजार वर्षेंपर्यंत प्राणी पातकी होऊन राहतो. (७४) क्रियासारांत सांगितलें कीं, अग्निरहित यज्ञ जसा शोभत नाहीं, तसें शिवपूजासाहित्य सर्व असून भस्म एक नसलें तर शोभत नाहीं. (७५) वासिष्ठलैंग्यांत

विद्धि मुने जन्म निष्फलं सूकरे यथा ॥७५॥ ये भस्मधारणं त्यक्त्वा श्रौतस्मार्तानुवर्तिनः ॥ तैः समाचरितं सर्वं विपरीतफलप्रदम् ॥७६॥ येषां नास्ति मुने श्रद्धा श्रौते भस्मनि सर्वदा ॥ गर्भाधानादिसंस्कारस्तेषां नास्तीति निश्चयः ॥७७॥ येषां भस्मनि विद्वेषो वर्तते हृदये सदा ॥ संकीर्णोऽसौ भवेद्ब्रह्मन् तेषां वंशपरंपरा ॥७८॥ ये भस्मधारिणं दृष्ट्वा वाचा निंदन्ति मानवाः ॥ तेषां शूद्रेण संभूतिरनुमेया विपश्चिता ॥७९॥ ये भस्मधारिणं दृष्ट्वा नराः कुर्वन्ति ताडनम् ॥ तेषां चंडालतो जन्म ब्रह्मन्नूह्यं विपश्चिता ॥८०॥ ये भस्मधारिणं दृष्ट्वा परितुष्टा भवंति ते ॥ देवा सुरमुनींद्रैश्च पूज्या नित्यं न संशयः ॥८१॥ येषां दानं श्रुतिर्यज्ञास्तपश्चान्यानि सुव्रत ॥ भस्मधारणपूर्वं स्यात्तेषां तत्सफलं भवेत् ॥८२॥ बहुनोक्तेन किं भस्मधारणं मोक्षसाधनम् ॥ भस्मना सदृशं पुण्यं नास्ति लोकत्रयेऽपि च ॥८३॥ मात्स्ये ॥ ब्रह्मणा विष्णुना चापि रुद्रेण च मुनीश्वराः ॥ भस्मधारणमाहात्म्यं न शक्यं परिभाषितुम् ॥८४॥ क्रियासारे ॥ एवं भस्मविधिः प्रोक्तः प्रेम्णा तव समासतः ॥ कृत्वैवं

---

सांगितलें कीं –मुनिश्रेष्ठा, उक्तविधीनें भस्मधारण जो करीत नाहीं, त्याचें जिणें डुकराच्या जन्माप्रमाणें निष्फल समजावें. (७६) श्रौतस्मार्त मार्गानें वागणरे प्राणी भस्म धारण न करतील तर त्यांनीं केलेलें सर्व कर्म विपरीत फल देतें. (७७) श्रौत भस्मावर ज्याची श्रद्धा नाहीं, त्यांना गर्भाधानादि संस्कार नाहींत, असा निश्चय शास्त्रांत केला आहे. (७८) ज्यांच्या मनांत भस्माचा द्वेष वागतो, हे ब्रह्मन्, त्यांचें कुळ संकरजातीचें आहे, असें समजावें. (७९) भस्मधारी प्राण्याला पाहून निंदा जे लोक करतात त्यांची उत्पत्ति शूद्रापासून झाली आहे, असें, पंडितानें समजावें. (८०) भस्मधारी प्राण्याला पाहून जे लोक त्याला मारतात, ते महारापासून झाले आहेत, असा तर्क विद्वानानें करावा. (८१) भस्मधारी प्राण्याला पाहून ज्यांना आनंद होतो, ते लोक देवासुरांलाही मान्य आहेत, यांत संशय नाहीं. (८२) भस्मधारण करून जे दान करतील, व वेदाध्ययन करितील व यज्ञ करतील, तप करतील, त्यांचें तें कर्म सफल होतें. (८३) फार काय सांगावें? भस्मधारण हें मोक्षाचें साधन आहे. भस्मधारणासारखें श्रेष्ठ पुण्य तीन्ही लोकांत नाहीं. (८४) मत्स्यपुराणांत सांगितलें कीं –मुनीश्वरहो, ब्रह्मा, विष्णु, रुद्र, हे देखील भस्मधारणमाहात्म्य सांगावयास असमर्थ आहेत. (८५) क्रियासारांत सांगितलें कीं, याप्रमाणें भस्माचें विधान संक्षेपानें तुला प्रेमानें सांगितलें. याप्रमाणें भस्म करून

भस्म यो भक्त्या धारयेत्स शिवं व्रजेत् ॥८५॥ मानवपुराणे ॥ अतः सर्वप्रयत्नेन पुमान्नित्यमतंद्रितः ॥ त्रिपुण्ड्रधारणं कुर्याद्भस्मना देहगुंठनम् ॥८६॥ रुद्राक्षं च विशेषेण धारयेद्वेदवित्तमः ॥ इतःपरं न वक्तव्यं शेषोऽन्यो ग्रन्थविस्तरः ॥८७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे श्रीत्रिपुण्ड्रविधितन्माहात्म्यं नाम पंचाशोऽध्यायः ॥

---

जो धारण करतो, तो शिवाजवळ जातो. (८६) मानवपुराणांत सांगितलें कीं, याकरितां पुष्कळ प्रयत्न करून मनुष्यानें आळस सोडून भस्मानें त्रिपुंड्र धारण व उद्धूलन करावें. (८७) वेदोक्तमार्गानें वागणाऱ्या प्राण्यांनीं विशेषेंकरून रुद्राक्षधारण करावें, या पुढें सांगावयाचें राहिलें नाहीं. कारण विनाकारण ग्रंथविस्तार होतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारानिरूपणांतील श्रीमत्त्रिपुंड्रविधिमाहात्म्यकथन नांवाचा ५० वा अध्याय संपला.

---

## ॥ अथैकपंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ कात्यायनशाखायाम् ॥ आदौ ह्येनं भगवन्तं रुद्रं कुमारः पप्रच्छ भगवन्कथं रुद्राक्षोत्पत्तिस्तद्धारणं किमिति स होवाच भगवान्रुद्रः पुरा त्रिपुरवधायोन्मीलिताक्षोऽहं तेभ्यो जलबिन्दवो भूमौ पतितास्ते रुद्राक्षा जाताः सर्वानुग्रहार्थाय तेषां नामोच्चारणेन दशशतगोदानफलं दर्शनस्पर्शनाभ्यां द्विगुणत्रिगुणफलं भवति ॥१॥ अत ऊर्ध्वं वक्तुं न शक्नोमीति ॥२॥ कुमार ततस्समंत्रकधारणविधिं कथयामि स्नानविधिना स्नातः शुचिराग्नेयस्नानं त्रिपुण्ड्रधारणं च कृत्वा शिखायामेकमेकास्यं श्रीसदाशिवाय नम इति द्वित्रिद्वादशवक्त्राणि त्रीणि शिरसि वन्हिसूर्यसोमाधिपाय शिवाय नम इति एकादशवक्त्रं षट्त्रिंशन्मूर्ध्नि षट्त्रिंशत्तत्वात्मकाय परशिवाय नम इति पंचदशसप्तवक्त्राणि कर्णयोरेकमेकं सोमाय नम इति षडष्टवक्त्राणि कण्ठे द्वात्रिंशत्त्रियंबककलात्मने श्रीकंठाय नम इति चतुर्वक्त्राणि पंचाशन्मा-

---

श्रीशिवास नमस्कार असो. कात्यायनशाखेंत सांगितलें कीं –(वाक्य) (१) प्रथम भगवान रुद्राला कुमारानें प्रश्न केला कीं, हे भगवन्, रुद्राक्षांची उत्पत्ति कशी झाली, त्यांचें धारण कां करावें ? नंतर शिव बोलले कीं –हे कुमारा, पूर्वी भगवान् रुद्र मीं त्रिपुराला मारण्या करितां डोळे उघडिलें, तेव्हां डोळ्यांतून अश्रुबिंदु भूमीवर पडले, तेच सर्वांच्या अनुग्रहाकरितां रुद्राक्ष झाले. त्या रुद्राक्षाचें नामस्मरण केलें असतां हजार गोदानें केल्याचें फल मिळतें. त्याचें दर्शन स्पर्शन केलें असतां दुप्पट तिप्पट फल मिळतें. (२) यापुढें सांगावयास मी समर्थ होत नाहीं. (३) कुमारा, मंत्रोच्चारपूर्वक रुद्राक्षधारणाविधि सांगतों. विधिपूर्वक स्नान करून शुचिर्भूत होऊन भस्माचे त्रिपुंड्र लावून शिखेंत एकमुखी एक रुद्राक्ष "श्रीसदाशिवाय नमः" या मंत्रानें धारण करावा. द्विमुखी, त्रिमुखी, द्वादशमुखी तीन रुद्राक्ष "वन्हिसूर्यसोमाधिपाय शिवाय नमः" या मंत्रानें शिरावर धारण करावेत. एकादशमुखी (अकरा तोंडाचे) छत्तीस रुद्राक्ष "षट्त्रिंशत्तत्वात्मिकाय पराशिवाय नमः" या मंत्रानें मस्तकावर धारण करावेत. पंचदशमुखी व सप्तमुखी ( सात तोंडाचा) एक एक रुद्राक्ष "सोमाय नमः" या मंत्रानें कानांत धारण करावा. षण्मुखी व अष्टमुखी बत्तीस रुद्राक्ष "त्रियंबककलात्मने श्रीकंठाय नमः" या मंत्रानें गळ्यांत धारण करावेत. चतुर्मुखी पन्नास रुद्राक्षांची माळ

लिकामुरसि श्रीकण्ठादिमूर्त्यात्मकाय श्रीसर्वज्ञाय नम इति बाह्वोस्त-योर्दशवक्त्राणि षोडश षोडश सुखासनादिषोडशमूर्त्यात्मकाय श्री-कण्ठाय नम इति दक्षिणे श्रीसोमकलात्मकाय श्रीसोमनाथाय नम इ-ति वामे मणिबन्धयोर्नववक्त्राणि द्वादश द्वादशादित्याधिपाय नम इति केशवादिमूर्त्यधिपाय उमापतये नम इति अष्टोत्तरशतं सोपवीतं चतुर्दशवक्त्राणि शतरुद्रविद्यास्वरूपात्मकाय श्रीविश्वेश्वराय नम इ-ति ॥३॥ दिव्यागमे ॥ साष्टाष्टद्विशतं धीमान् धारयेन्नियतात्मवान् ॥ स रुद्रो नात्र संदेहः सर्वलोकनमस्कृतः ॥४॥ स्कान्दे ॥ बभूवुस्ते च रु-द्राक्षा ह्यष्टत्रिंशत्प्रभेदतः॥सूर्यनेत्रसमुद्भूताः कपिला द्वादश स्मृताः॥५॥ सोमनेत्रोत्थिताः श्वेतास्ते षोडशविधाः क्रमात् ॥ वन्हिनेत्रोत्थिताः कृ-ष्णा दशभेदा भवंति हि ॥६॥ पद्मपुराणे ॥ सुवर्णवर्णमच्छिद्रं ध्रुवं ना-न्यैर्धृतं शुभम् ॥ रुद्राक्षं शिरसा ह्येकं धार्यं रुद्रपरैः सदा ॥७॥ ध्वंसनं

---

"श्रीकंठादिमूर्त्यात्मकाय श्रीसर्वज्ञाय नमः" या मंत्रानें उरावर धारण करावी. दशमुखी सोळा सोळा रुद्राक्षांची माळ "सुखासनादिषोडशमूर्त्यात्मकाय श्रीकं-ठाय नमः" या मंत्रानें उजव्या हातांत बांधावी, "श्रीसोमकलात्मकाय श्रीसोम-नाथाय नमः" या मंत्रानें डाव्या हातांत बांधावी. नवमुखी बारा बारा रुद्राक्षांची माळ "द्वादशादित्याधिपाय नमः" या मंत्रानें मनगटांत बांधावी, दुसऱ्या मन-गटांत "केशवादिमूर्त्याधिपाय उमापतये नमः" या मंत्रानें बांधावी चतुर्दश-मुखी एकशेआठ रुद्राक्षांची माळ उपवीताकारानें "शतरुद्रविद्यास्वरूपात्मकाय श्रीविश्वेश्वराय नमः" या मंत्रानें गळ्यांत घालावी. (४) दिव्यागमांत सांगितलें कीं —मन स्वाधीन ठेवून दोनशेसोळा रुद्राक्षांची माळ जो गळ्यांत घालतो, तो साक्षात रुद्र आहे, असें मानून सर्व लोक त्याला नमस्कार करतात. (५) स्कं-दपुराणांत सांगितलें कीं—या रुद्राक्षांत अडतीस भेद आहेत, ते असे कीं, सूर्य-नेत्रापासून उत्पन्न झालेले कपिल रंगाचे रुद्राक्ष बारा आहेत, (६) चंद्रनेत्रापासून उत्पन्न झालेले पांढऱ्या रंगाचे रुद्राक्ष सोळा आहेत, आणि अग्निनेत्रापासून उत्पन्न झालेले काळ्या रंगाचे रुद्राक्ष दहा आहेत. असे एकूण अडतीस होत. (७) पद्मपुराणांत सांगितलें कीं—सोन्यासारखे लाल असून छिद्रें पडलेलीं नसावींत, दुसऱ्यानें धारण केलेले नसून शुभ असावें. असा एक रुद्राक्ष रुद्र भक्तांनीं शिरा-वर धारण करावा. (८) त्या योगानें त्याचीं सर्व दुःखें लयाला जात असून सर्व

सर्वदुःखानां सर्वपापविशोधनम् ॥८॥ गारुडपुराणे ॥ रुद्राक्षतरुसंभूतवातोद्धूततृणान्यपि ॥ पुण्यलोकं गमिष्यंति पुनरावृत्तिदुर्लभम् ॥९॥ स्कांदे ॥ ईश्वर उवाच ॥ शृणु षण्मुख तत्वेन वक्त्रे वक्त्रे यथा फलम् ॥ गोप्यं शिखायामेकास्यं धारयेत्सर्वसिद्धिदम् ॥१०॥ शिरसा धारयेत्स्कंद द्विवक्त्रं भुक्तिमुक्तिदम् ॥ द्वित्रिद्वादशवक्त्रं च धारयेन्मूर्ध्नि भोगदम् ॥११॥ षट्सप्तपंचवक्त्रं तु कर्णयोर्ज्ञानमोक्षदम् ॥ कण्ठे च धारयेन्नित्यमष्टवक्त्रं भयापहम् ॥१२॥ बाह्वोस्त्रयोदशास्यं च धारयेच्छांतिदं परम् ॥ नववक्त्रं तु रक्षार्थं धारयेन्मणिबंधयोः ॥१३॥ दशवक्त्रं चतुर्वक्त्रं धारयेन्वनमालिकाम् ॥ शांतिदं पुष्टिदं चैव भुक्तिदं मुक्तिदं सदा ॥१४॥ वक्त्रं चतुर्दशं चैव धारयेदुपवीतवत् ॥ शिवज्ञानप्रदं शश्वदिष्टसिद्धिकरं परम् ॥१५॥ नाभेरधो न बध्नीयाद्रुद्राक्षं चरणावधि ॥ शिरसा धारयेत्कोटिं कर्णाभ्यां दशकोटयः ॥१६॥ गले वध्वा कोटिशतं

---

पापें आपोआप नाहींशीं होतात. (९) गरुडपुराणांत सांगितलें कीं—रुद्राक्षाच्या झाडावरून वाहत आलेला वारा लागून तृण देखील उत्तम गतीला जातें आणि पुनः जन्माला येत नाहीं. (१०) स्कांदपुराणांत सांगितलें कीं,—

ईश्वर बोलले कुमारा, प्रत्येक रुद्राक्षाचे मुखाचें फल काय हें यथार्थ रीतीनें सांगतों ऐक एकमुखी रुद्राक्ष शिखेंत धारण केलें असतां सर्व सिद्धि मिळतात. (११) हे स्कंदा, द्विमुखी रुद्राक्ष शिरावर धारण केलें असतां भुक्ति मुक्ति मिळतात. द्विमुखी, त्रिमुखी, द्वादशमुखी रुद्राक्ष मस्तकावर धारण केलें असतां भोग मिळतो. (१२) षण्मुखी, सप्तमुखी, पंचमुखी रुद्राक्ष कानांत धारण केलें असतां ज्ञान आणि मोक्ष मिळतो. अष्टमुखी रुद्राक्ष गळ्यांत निरंतर धारण केलें असतां भीति नष्ट होते. (१३) त्रयोदशमुखी रुद्राक्ष बाहूंवर धारण केलें असतां उत्तम शांति मिळते. नवमुखी रुद्राक्ष मनगटांत धारण केलें असतां चोहोंकडून आपलें संरक्षण होतें. (१४) दशमुखी चतुर्मुखी रुद्राक्षांची वनमाला गळ्यांत घातली तर शांति, पुष्टि, भुक्ति, मुक्ति वगैरे मिळतात. (१५) चतुर्दशमुखी रुद्राक्षांची माळ उपवीताकार घातली असतां नेहमीं इष्टसिद्धि देणारें शिवतत्वज्ञान प्राप्त होतें. (१६) बेंबीच्या खालीं पायापर्यंत रुद्राक्ष धारण करूं नये. कोटि फल देणारे रुद्राक्ष शिरावर धारण करावेत कानांत दशकोटि फल देणारे रुद्राक्ष धारण करावें. (१७) शतकोटि फल देणारे रुद्राक्ष गळ्यांत बांधावे. सहस्रकोटि फल देणारे रुद्राक्ष

मूर्ध्नि कोटिसहस्रकम् ॥ अयुतं चोपवीतं च लक्षकोटिं भुजद्वये ॥१७॥ अप्रमेयफलं हस्ते रुद्राक्षं मोक्षसाधनम् ॥ अवध्यः सर्वभूतानां रुद्रवद्विचरेद्भुवि ॥१८॥ रुद्राक्षाणां फलं वत्स त्रिषु लोकेषु विश्रुतम् ॥ लिंगस्य दर्शने पुण्यं भवेद्रुद्राक्षदर्शनात् ॥१९॥ भक्त्या रात्रौ दिवा पापं दिवा रात्रिकृतं हरेत् ॥ लक्षं तु दर्शनात्पुण्यं कोटिस्तत्स्पर्शनाद्भवेत् ॥२०॥ सप्तकोटिशतं पुण्यं लभते धारणान्नरः ॥ लक्षकोटिसहस्राणि लक्षकोटिशतानि च ॥२१॥ तज्जपाल्लभते पुण्यं नात्र कार्या विचारणा ॥२२॥ पद्मपुराणे ॥ सर्वयज्ञतपोदानवेदाभ्यासैश्च यत्फलम् ॥ तत्फलं लभते सद्यो रुद्राक्षस्य तु धारणात् ॥२३॥ वेदैश्चतुर्भिर्यत्पुण्यं पुराणपठनेन तु ॥ यत्तीर्थगमने चैव सर्वविद्यादिभिस्तथा ॥२४॥ तत्पुण्यं लभते सर्वं रुद्राक्षस्य तु धारणात् ॥ प्रयाणकाले रुद्राक्षं भक्षयित्वा म्रियेद्यदि ॥२५॥ स रुद्रत्वमवाप्नोति पुर्नजन्म न विद्यते ॥२६॥ विमला-

---

मस्तकाला बांधावे अयुत (दहाहजार) फल देणारे रुद्राक्ष उपवीताकार घालावे, लक्षकोटि फल देणारे रुद्राक्ष दोनी भुजांला बांधावे. (१८) मोक्षाचें साधन व अमित फल देणारे रुद्राक्ष हातांत बांधावे. अशा रीतीनें रुद्राक्ष धारण करणारा प्राणी सर्वांना अवध्य (मारावयास अशक्य) होऊन रुद्राप्रमाणें भूमीवर फिरतो. (१९) हे वत्सा, त्रैलोक्यांत रुद्राक्षाचें फल प्रख्यात झालें आहे. रुद्राक्षाच्या दर्शनानें शिवलिंग दर्शनाचें पुण्य मिळतें. (२०) रात्रीं रुद्राक्षाचें दर्शन घेतलें असतां दिवसा केलेलीं सर्व पापें जळतात, दिवसा दर्शन घेतलें असतां रात्रीचीं सर्व पापें जळतात. दर्शनानें लक्षपट पुण्य मिळतें, स्पर्शनानें कोटिपट फल मिळतें. (२१) धारण केल्यानें शतसप्तकोटि फल (सातशे कोटपट) मिळतें. लक्षकोटि सहस्रफल, व लक्षकोटि शतफल (२२)रुद्राक्षाच्या माळेनें जप केला असतां पुण्य मिळतें यांत विचार करावयास नको. (२३) पद्मपुराणांत सांगितलें कीं---सर्व यज्ञ, तप, दान, वेदाभ्यास यांनीं जें फल मिळतें, तें फल रुद्राक्ष धारणानें तात्काळ मिळतें. (२४) चार वेदांचें अध्ययन केलें असतां जें फल मिळतें, व पुराणपठन केल्यानें जें फल मिळतें, व तीर्थयात्रा केल्यानें जें फल मिळतें, व सर्वविद्या अवगत करून घेतल्या तर काय फल मिळतें, (२५) तें सर्व पुण्य रुद्राक्षधारणानें मिळतें. प्राण जातेवेळेस रुद्राक्ष भक्षण करून जो प्राण सोडतो, (२६) तो परलोकांत दुसरा रुद्रच होऊन बसतो, पुनः जन्माला येत नाहीं. (२७) विमलाग-

गमे ॥ नातःपरतरं तीर्थं नातःपरतरं तपः ॥ रुद्राक्षं यस्य कण्ठे वा बाह्वोर्वा ध्रियते ध्रुवम् ॥२७॥ कुलैकविंशमुत्तार्य रुद्रलोके वसेन्नरः ॥२८॥ वासिष्ठलैंग्ये ॥ पश्यन्वापि निषिद्धांश्च तथा शृण्वन्नपि स्मरन् ॥ जिघ्रन्नपि तथाचाश्नन् प्रलपन्नपि संततम् ॥२९॥ कुर्वन्नपि तथा गच्छन् विसृजन्नपि मानवः ॥ रुद्राक्षधारणादेव पापैः सर्वैर्न लिप्यते ॥३०॥ रुद्राक्षधारणाद्रुद्रो भवत्यत्र न संशयः ॥ हारं वा कटकं वापि तथान्यद्वा द्विजोत्तम ॥३१॥ रुद्राक्षसहितं भक्त्या धारयेद्रुद्रतामियात् ॥ अमंत्रकं वा मंत्रेण सहितं भाववर्जितम् ॥३२॥ यो वा को वा नरो नित्यं धारयेल्लज्जया विना ॥ सर्वपापविनिर्मुक्तः सम्यग्ज्ञानमवाप्नुयात् ॥३३॥ ब्राह्मणो वापि चण्डालो दुर्गुणः सुगुणोऽपि वा ॥ भस्मरुद्राक्षकण्ठेन देहान्ते तु शिवं व्रजेत् ॥३४॥ शिवधर्मे ॥ रुद्राक्षाणि स्वयं रुद्रो भवेद्रुद्राक्षधारकः ॥ रुद्राक्षं धारयेत्तस्मादिह रुद्रः परत्र च ॥३५॥ रुद्रो रुद्राक्षदानेन भवतीति किमद्भुतम् ॥ तन्मालया तथा हस्ते रुद्र-

---

मांत सांगितलें कीं, --रुद्राक्ष जो गळ्यांत व बाहूंवर धारण करितो, त्याला तीर्थयात्रेचें पुण्य तपश्चर्येचें पुण्य कांहीं वाटत नाहीं. कारण रुद्राक्षधारणाच्या पुण्यापुढें तीर्थांचें व तपाचें पुण्य कांहीं नाहीं . (२८) रुद्राक्ष धारण करणारा प्राणी आपल्या एकवीस कुळांचा उद्धार करून स्वतः आपण रुद्रलोकांत सुखानें राहतो. (२९) वासिष्ठलैंग्यांत सांगितलें कीं —निषिद्धपदार्थ पाहतांना, कानानें ऐकतांना, स्मरण करीत असतांना, हुंगतांना, खातांना, संतत प्रलाप करतांना, (३०) कार्य करीत असतांना, जात असतांना, त्याग करीत असतांना रुद्राक्ष धारण केलें असतां सर्व पापांपासून प्राणी मुक्त होतो. (३१) रुद्राक्ष धारणानें प्राणी प्रत्यक्ष रुद्रच होतो, यांत संशय नाहीं. द्विजश्रेष्ठा, रुद्राक्षाचा हार किंवा रुद्राक्षाचें हस्तभूषण (३२) भक्तीनें रुद्राक्षसहित इतर दागिने घातले तर त्याला रुद्रत्व मिळतें. मंत्ररहित, किंवा मंत्रसहित, भावरहित होऊन (३३) कोणत्यातरी एका प्राण्यानें लाज सोडून निरंतर रुद्राक्ष धारण केलें तर तो सर्व पापांपासून मुक्त होऊन चांगलें ज्ञान मिळवितो. (३४) ब्राह्मण असो, चांडाळ असो, दुर्गुणी असो, सुगुणी असो, भस्मरुद्राक्ष धारण करून देह सोडला तर तो शिवलोकाला जातो. (३५) शिवधर्मांत सांगितलें कीं— रुद्राक्ष हे रुद्रस्वरूप असल्यामुळें मानवानें रुद्राक्ष धारण करावें. रुद्राक्ष धारण करणारा प्राणी इहलोकीं व परलोकीं रुद्रच आहे यांत संशय नाहीं. (३६) रुद्राक्षाच्या दानानें रुद्र झाला तर त्यांत काय आश्चर्य आहे!

श्च क्रमते क्षितौ ॥३६॥ स्कान्दे ॥ सुराणामसुराणां च वंदनीयो यथा शिवः ॥ रुद्राक्षधारणान्नित्यं वंदनीयो नरैरिह ॥३७॥ रुद्राक्षमालिकां कण्ठे धारयेद्भक्तिवर्जितः ॥ पापकर्मापि यो मर्त्यो रुद्रलोके महीयते ॥३८॥ उच्छिष्टो वा विकर्मस्थो युक्तो वा सर्वपातकैः ॥ मुच्यते सर्वपापेभ्यो नरो रुद्राक्षधारणात् ॥३९॥ ध्यानधारणहीनोऽपि रुद्राक्षं यदि धारयेत् ॥ सर्वपापविनिर्मुक्तः स याति परमां गतिम् ॥४०॥ शुचिर्वाप्यशुचिर्वापि अभक्षस्य च भक्षकः ॥ म्लेंच्छो वाप्यथ चाण्डालो युक्तो वा सर्वपातकैः॥४१॥रुद्राक्षधारणादेव स रुद्रो नात्र संशयः॥४२॥ मानवपुराणे ॥ रुद्राक्षं धारयन्पापं कुर्वन्नपि च मानवः ॥ सर्वं तरति पाप्मानं जावालश्रुतिराह हि ॥४३॥ मृण्मयं वापि रुद्राक्षं कृत्वा यत्नेन धारयेत् ॥ अपि दुष्कृतकर्मा च स याति परमां गतिम् ॥४४॥ शिवधर्मे ॥ पशवोऽपि हि रुद्राक्षधारणाद्यांति रुद्रताम् ॥ किमु ये धारयंतिस्म नरा रुद्राक्षमालिकाः ॥४५॥ रुद्राक्षं कंठमाश्रित्य श्वापि वा म्रियते

---

रुद्राक्षमाला धारण करणारा प्राणी पृथ्वीवर रुद्रच होऊन फिरतो, असें समजावें. (३७) स्कंद पुराणांत सांगितलें कीं, साक्षात शिव ज्याप्रमाणें सुरासुरांना वंद्य आहे, त्याप्रमाणें रुद्राक्ष धारण करणारा प्राणी मानवांना या लोकांत वंद्य आहे. (३८) भक्ति नसून गळ्यांत रुद्राक्षांची माळ घालून मर्त्यलोकांत पापकर्म करीत जो फिरतो तो देखील रुद्रलोकांत पूज्य होतो. (३९) उच्छिष्ट असो, विरुद्ध कर्म करो, किंवा सर्वपातकी असो, त्यानें रुद्राक्ष धारण केलें तर सर्व पापांपासून तो मानव मुक्त होतो. (४०) ध्यानधारणेनें हीन होऊन रुद्राक्ष धारण करील तर तो सर्व पातकांपासून मुक्त होऊन सद्गतीला जातो. (४१) शुचि असो, अशुचि असो, अभक्ष्यभक्षण करणारा असो, म्लेंच्छ असो, चांडाल असो, सर्व पातकांनीं युक्त असो, (४२) रुद्राक्ष धारण करीत असेल तर तो रुद्रच आहे, यांत संशय नाहीं (४३) मानवपुराणांत सांगितलें कीं— रुद्राक्ष धारण करून पाप करीत असला तरी तो सर्व पापांला तरतो, असें जावालश्रुति सांगते. (४४) रुद्राक्ष सांपडले नाहींत तर प्रयत्नपूर्वक मातीचे रुद्राक्ष करून धारण केलें तरी पापकर्म करणारा प्राणी देखील सद्गतीला जातो. (४५) शिवधर्मांत सांगितलें कीं–रुद्राक्ष धारणानें पशुदेखील रुद्रपणा पावतात. तर मानवांनीं गळ्यांत रुद्राक्षांची माळ घातली तर ते रुद्र होतील ह्मणून काय सांगावयाचें आहे ? (४६) रुद्राक्ष गळ्यांत घातलेला कुत्रा जर मरण पावला तर तो जर रुद्र होऊन रुद्रलोकाला जातो, तर मानव

यदि ॥ सोऽपि रुद्रत्वमाप्नोति किं पुनर्मानुषादयः॥४६॥वासिष्ठलैंग्ये।
ईश्वर उवाच ॥ कश्चित्पुरा मुने जात्या चण्डालोऽतीवदुर्जनः ॥ आसीद्ब्रह्मन् कृतं तेन ब्रह्महत्यासहस्रकम् ॥४७॥ गवां सहस्रं निहतं ब्राह्मणानां धनं हृतम् ॥ अन्यानि यानि कर्माणि घोराण्याचरितानि च ॥४८॥ तथापि तस्य पापानि मुने रुद्राक्षधारणात् ॥ दग्धानि शाल्मलीतूलं यथा दावाग्निना युतम् ॥४९॥ कालेन मरणं प्राप्तः स पुनर्यममागतः ॥ सोऽपि तं प्राह भगवान्यमः सर्वार्थवित्तमः ॥५०॥ अहो पापं कृतं सर्वं त्वया लोकेऽविचारतः ॥ तत्फलं त्वां मया बुध्वा शक्यं भोजयितुं न हि ॥५१॥ महात्मन् सकलं दग्धं तव रुद्राक्षधारणात् ॥ गच्छ गच्छ विमानेन शिवलोकं सुखावहम् ॥५२॥ सोऽपि सूर्यप्रतीकाशं विमानं सार्वकामिकम् ॥ आरुह्य नृत्यगीताद्यैर्वृतः शिवपुरं गतः ॥५३॥ तत्र दत्तं मया तस्य ब्रह्मन्रौद्रपदं मुदा ॥ देवैश्च मुनिभिश्चान्यैः पूजितश्च सदाप्यसौ ॥५४॥ तस्मात्सर्वैः सदा कार्यं रुद्राक्षाणां च धारणम् ॥

---

रुद्र होतो, ह्मणून काय सांगावयाचें आहे (४७), वासिष्ठलैंग्यांत सांगितलें कीं,-
ईश्वर बोलले-हे मुने, कोणी एक प्राणी जातीनें चांडाल असून अतिशय दुर्जन होता. हे ब्रह्मन्, त्यानें हजारो ब्रह्महत्या केल्या होत्या. (४८) हजारो गाई मारिल्या. ब्राह्मणांच्या धनाचा अपहार केला, इतर अनेक घोर कर्में त्यानें केलीं. (४९) तथापि त्यानें रुद्राक्ष धारण केलें होतें. ह्मणून त्याचीं सर्व पातकें आग लागलेल्या शाल्मलीच्या कापसाप्रमाणें जळून गेलीं (५०) पुढें कांहीं दिवसांनें तो मरण पावला, नंतर यमाजवळ गेला. सर्वार्थ जाणणारा भगवान यम त्याला ह्मणाला कीं– (५१) हे चांडाळा, जगांत अविचारानें अनेक पापकर्म तूं केलेंस, परंतु त्याचीं सर्व फलें मी जाणत असून त्याचा उपभोग तुला देण्यास मी समर्थ नाहीं. (५२) हे माहात्म्या, याला कारण असें कीं, तूं रुद्राक्ष गळ्यांत धारण केल्यामुळें तुझीं पातकें सगळीं जळून गेलीं. याकरितां विमानांत बसून सुखानें सुखकर शिवलोकाला जा. (५३) असें यमाचें भाषण ऐकून सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या सूर्यासारख्या तेजस्वी विमानांत बसून नर्तन गायन वैभवांसह शिवपुरास तो चांडाल गेला. (५४) हे ब्रह्मन् तेथें त्याला आनंदानें रुद्रपद मीं दिलें. त्याठिकाणीं देव, मुनि, इतर प्राणी या सर्वांना तो मान्य झाला. (५५) याकरितां सर्वांनीं रुद्राक्षधारण करावें. त्या योगानें भोग मिळतात, व शेवटीं मोक्ष मिळतो

भोगमोक्षप्रदं पुंसां मया चैव धृतं सदा ॥५५॥ रुद्राक्षधारणादेव ब्रह्मा ब्रह्मत्वमाप्तवान् ॥ रुद्राक्षधारणाच्छ्रेष्ठं न किंचिदिह विद्यते ॥५६॥ स्कान्दे ॥ अमंत्रधारणादेव गुणा ह्येते प्रकीर्तिताः ॥ यः पुनर्मंत्रसंयुक्तं धारयेद्यदि मानवः ॥५७॥ गुणानां तस्य माहात्म्यं कथितुं नैव शक्यते ॥ किं पुनर्बहुनोक्तेन वर्णनेन पुनः पुनः ॥५८॥ रुद्राक्षधारणं तस्मान्नित्यमेव प्रशस्यते ॥ शिवसायुज्यवन्नित्यमुपरि ज्ञानमाप्नुयात् ॥५९॥ रुद्राक्षाश्रितकण्ठो यो गृहे यस्य वसेद्ध्रुवम् ॥ कुलैकविंशमुद्धृत्य शिवलोके महीयते ॥६०॥ वासिष्ठलैंग्ये ॥ रुद्राक्षधारिणः पादौ प्रक्षाल्याद्भिः पिबेन्नरः ॥ सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोके महीयते ॥६१॥ रुद्राक्षधारिणे भक्त्या वस्त्रं धान्यं ददाति यः ॥ सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोकं स गच्छति ॥६२॥ मूर्ध्नि हस्तोपवीते वा धृत्वा रुद्राक्षमालिकाम् ॥ यस्तु भुंक्ते न तद्भुक्तं स्वयं रुद्रो न संशयः॥६३॥अनेन भुक्तं रुद्रेण भुक्तं यद्यत्तथा भवेत् ॥ पीतं रुद्रेण पीतं स्याद्घ्रातं घ्रातं शिवेन तत्॥६४॥रुद्रा-

मी देखील सर्वदां रुद्राक्ष धारण करितों. (५६) रुद्राक्ष धारणानेंच ब्रह्मदेवाला ब्रह्मत्व मिळालें. रुद्राक्षधारणोपक्षां श्रेष्ठ साधन दुसरें नाहीं. (५७) स्कंदपुराणांत ह्मटलें कीं— मंत्रधारण न करितां रुद्राक्षधारण केलें तर काय गुण आहेत, ते सांगितले, मंत्रोपदेश घेऊन रुद्राक्षधारण करील तर (५८) त्याच्या गुणाचें माहात्म्य सांगावयास मी समर्थ होत नाहीं. वारंवार पुष्कळ वर्णन करण्यांत काय मतलब आहे ? (५९) सारांश एवढाच कीं, निरंतर मानवांनीं रुद्राक्षधारण करावें त्यामुळें शिवसायुज्य मिळून शिवतत्वज्ञान प्राप्त होतें. (६०) रुद्राक्ष गळ्यांत घालणारा प्राणी कोणाच्या घरांत राहतो, त्याच्या एकवीस कुळांचा उद्धार करून तो स्वतः शिवलोकांत पूज्य होतो. (६१) वासिष्ठलिंगपुराणांत सांगितलें कीं—रुद्राक्षधारी प्राण्याचे पाय धुऊन तें पादोदक जो पितो, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (६२) रुद्राक्षधारी प्राण्याला धान्य वस्त्र भक्तीनें जो देतो, तो सर्व पापांतून मुक्त होऊन शिवलोकाला जातो. (६३) मस्तक, हात याठिकाणीं किंवा गळ्यांत उपवीताकार रुद्राक्षांची माळ जो घालून जेवतो, तें जेवण त्याचें नसून रुद्रानेंच भोजन केलें असें समजावें यांत संशय नाहीं.(६४) यानें भोजन केलें तर रुद्रानें केलें, ह्मणून समजावें. यानें जें केलें असेल तें रुद्रानें केलें ह्मणून समजावें. यानें पान केलें तर रुद्रानें केलें असें समजावें. यानें हुंगिलें तर रुद्रानें हुंगिलें असें मानावें. (६५) रुद्राक्षधारी प्राण्याला पाहून जो

क्षधारिणं दृष्ट्वा परीवादं करोति यः ॥ उत्पत्तौ तस्य सांकर्यमनुमेयं विपश्चिता ॥६५॥ स्कान्दे ॥ कुलीनमकुलीनं वा भूतिरुद्राक्षधारिणम् ॥ दृष्ट्वोन्नतासने स्थित्वा रौरवं नरकं व्रजेत् ॥६६॥ वासिष्ठलैंग्ये ॥ रुद्राक्षधारणे लज्जा येषां चास्ति महामुने ॥ संकीर्णोऽसौ भवेद्ब्रह्मन् तेषां वंशपरंपरा ॥६७॥ रुद्राक्षधारणं येषां नास्ति नित्यं महामुने ॥ तेषां नास्ति विनिर्मोक्षः संसाराज्जन्मकोटिभिः ॥६८॥ शातातपस्मृतौ ॥ अरुद्राक्षधरो भूत्वा यत्किंचित्कर्म वैदिकम् ॥ कुर्याद्विप्रस्तु यो मोहान्नासावाप्नोति तत्फलम् ॥६९॥ श्राद्धे कर्मणि यज्ञे वा प्रायश्चित्ते सुरार्चने ॥ होमे मंत्रजपे दीक्षाकाले सर्वत्र धारयेत् ॥७०॥ रुद्राक्षं धारयेद्विप्रः संध्यादिषु च कर्मसु ॥ तत्सर्वं समवाप्नोति कोटिकोटिगुणं सदा ॥७१॥ वासिष्ठलैंग्ये ॥ अहो रुद्राक्षमाहात्म्यं मया वक्तुं न शक्यते ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन कुरु रुद्राक्षधारणम् ॥७२॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे रुद्राक्षधारणविधिस्तन्माहात्म्यकथनं नामैकपंचाशोऽध्यायः

---

तिरस्कार करितो, त्याचा जन्म संकर जातीपासून झाला आहे, असें पंडितानें मानावें. (६६) स्कंदपुराणांत ह्मटलें कीं —विभूति रुद्राक्षधारण करणारा प्राणी कुलीन अकुलीन असो, त्याला पाहूनही उच्चासनावर जो बसतो, तो प्राणी रौरव नरकाला जातो. (६७) वासिष्ठलिंगपुराणांत सांगितलें कीं, हे महामुने, रुद्राक्षधारण करावयास जो लाजतो, त्याचें कुळ संकर जातीचें आहे, असें मानावें. (६८) निरंतर रुद्राक्षधारण जे करीत नाहींत, त्यांना कोट्यावधि जन्मांत फिरावें लागत असून संसारापासून मुक्तता होत नाहीं, (६९) शातातपस्मृतींत सांगितलें कीं –रुद्राक्षधारण न करितां एखादें वैदिक कर्म मोहानें केलें तर विप्र (ब्राह्मण) त्या कर्माचें फल पावत नाहीं. (७०) श्राद्धकर्मांत, यज्ञांत, प्रायश्चित्तांत, देवपूजेंत, होमाच्या वेळेस, मंत्रजपाच्या वेळेस, दीक्षेच्यावेळेस केव्हांही रुद्राक्ष धारण करावें. (७१) संध्यादिकर्म करीत असतांना ब्राह्मणानें रुद्राक्षधारण करावें. त्यायोगानें कोटिकोटि फल त्याला मिळतें. (७२) वासिष्ठलिंगपुराणांत सांगितलें कीं – रुद्राक्षाचें माहात्म्य सांगणें माझ्यानें होत नाहीं, हें आश्चर्य आहे. हे कुमारा, याकरितां तूं रुद्राक्ष धारण कर.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील रुद्राक्षधारणविधिमाहात्म्यकथन नांवाचा एकावन्नावा अध्याय संपला.

## ॥ अथ द्विपंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ अथ भव्यानि पूजाया यानि द्रव्याणि वाक्पते ॥ तानि तेषां प्रवक्ष्यामि लक्षणानि शृणु क्रमात् ॥१॥ गृहस्येशानदिग्भागे पूजास्थानमिति स्मृतम् ॥२॥ कालोत्तरे ॥ ऐशान्यां दिशि संस्थं तु पूजागारं मनोहरम् ॥ द्वात्रिंशद्धस्तमात्रं तु विंशद्धस्तमथापि वा ॥३॥ बहुस्तंभसमायुक्तं चतुर्द्वारं सतोरणम् ॥ सुगुप्तं विजनं रम्यं प्रकीर्णकुसुमं शुभम् ॥४॥ सुधूपामोदगन्धाढ्यं चर्चितं चंदनादिभिः ॥ वितानोपरिसंच्छन्नमुक्तादामविलंवितम् ॥५॥ सुविचित्रपताकाढ्यं सितवस्त्रध्वजोच्छ्रितम् ॥ कुंकुमक्षोदसंसिक्तं कर्पूरक्षोदधूपितम् ॥६॥ निष्कंपाभिः प्रदीपाभिर्दर्पणांशुप्रदीपितम् ॥ इति नित्यार्चने शस्तं मंदिरं भुक्तिमुक्तिदम् ॥७॥ शिवधर्मे ॥ सुधाधवलितं कुर्याद्विधिवच्छिवमंदिरम् ॥ तावत्पुण्यं लभेत्सोऽपि यावदायतने कृतम् ॥८॥ यः कुर्यात्कुट्टिमां भूमिं दर्पणोदरसन्निभाम् ॥ नानावर्णविचि-

---

श्रीशिवास नमस्कार असो. क्रियासारांत सांगितलें कीं —ईश्वर बोलले (१) हे ब्रह्मन्, श्रीशिवाच्या पूजेचीं द्रव्यें कोणतीं आहेत, तीं सांगतों, व त्यांचीं लक्षणें सांगतों ऐक. (२) आपल्या घराच्या ईशान्यदिशेला पूजेचें स्थान करावें, असें सांगितलें आहे. (३) कालोत्तरांत सांगितलें कीं– ईशान्यदिशेला केलेलें पूजास्थान ( देवघर ) सुंदर असावें, व प्रमाणानें बत्तीस हातांचें किंवा वीस हातांचें केलेलें असावें. (४) त्यांत खांब दिलेले असून चार दारें केलेलीं असावींत, त्या घराला तोरण बांधलेलें असावें तें अत्यंत गुप्त ( मजबूत ) एकांतीं बांधलेलें असावें. तें रम्य केलेलें असून नेहमीं तेथें फुलें टाकलेलीं असावींत (५) तें घर धूपाच्या सुगंधानें सुवासित केलेलें असून चंदनादिकानें चर्चित झालें असावें. छत मारलेलें असून छताभोंवतीं मोत्याच्या झालरी लोंबत ठेवलेल्या असाव्यात. (६) चित्रविचित्र पताका उभारलेल्या असून पांढऱ्या वस्त्राचे उंच ध्वज उभारिलेले असावेत. ध्वजाच्या वस्त्राला कुंकुम लावून कापूर व धूपद्रव्य यांनीं सुवासित केलेलें असावें. (७) निवाऱ्याच्या जागेंत न हालण्यासारखे दीप लावलेले असून जागोजाग आरसे लावून देवघर सुशोभित केलेलें असावें यांप्रमाणें केलेलें देवघर निरंतरच्या देवपूजेला प्रशस्त मानिलेलें आहे. असें हें मंदिर भक्तिमुक्ति देणारें होतें. (८) शिवधर्मांत सांगितलें कीं, शिवमंदिराला विधिपूर्वक चुना लावावा. जितकी शोभा घराला केलेली असेल तितकें पुण्य मिळतें. (९) देवघराची जमीन आरशा-

त्रां वा विचित्रकुसुमोज्वलाम् ॥९॥ क्वचित्कनकविन्यासां पंकजाद्युप-शोभिताम् ॥ मनोऽभिरामां सुसमां शिवायतनसंस्थिताम् ॥१०॥ याव-द्दण्डा भवेद्भूमिः समन्तादुपशोभिता ॥ तावद्युगसहस्राणि स शैवं पद-मश्नुते ॥११॥ लैंग्ये ॥ यो रुद्रायतने भक्त्या कुरुते मार्जनक्रियाम् ॥ स पांसुभूमेर्देहान्ते सर्वपापं व्यपोहति ॥१२॥ यावत्यः पांसुकणिका मा-र्जितास्तु शिवालये॥दिनानि दिवि तावन्ति तिष्ठत्यस्तिमितो नरः॥१३॥ अहन्यहनि यत्पापं कुरुते मुनिसत्तम ॥ गोचर्ममात्रं संमार्जन् हंति तत्तु शिवालये ॥१४॥

स्कान्दे ॥ शिवरहस्ये ॥ दूर्वासा उवाच ॥ संमार्जनं तु यः कुर्यान्मार्जन्या मृदुसूक्ष्मया ॥ चांद्रायणसहस्रेण फलं मासेन लभ्यते॥१५॥नैरंतर्येण यः कुर्यात्पक्षं संमार्जनादिकम्॥ युगकोटिशतं साग्रं रुद्रलोके महीयते॥१६॥ शिवमाल्यापनयनं पूजान्ते च प्रमार्जनम् ॥ एकैकमेव तुल्यं स्याच्चां-द्रायणशतेन तु॥१७॥संमार्जनादिकर्तारो मार्गशोभाकराश्च ये ॥ तेऽवश्यं

---

प्रमाणें चकाकणारी, अनेक रंगांनीं चित्रविचित्रित, विचित्र फुलांनीं उजळ दिस-णारी अशी जो करितो, (१०) व कांहीं ठिकाणीं सोन्याची चकाकी आणून पद्म-स्वस्तिक वगैरे काढून सुशोभित करतो, व मनाला अल्हाद देण्यासारखी करून सरळ अशी शिवमंदिराची जमीन करतो (११) आणि जितक्या दंडाच्या ( माप ण्याची काठी ) मापानें चोहोंकडे देवघराची जमीन सुशोभित केली असेल, तितकीं हजार युगेंपर्यंत तो शैवपदाचें सुख भोगतो. (१२) लिंगपुराणांत सांगि-तलें कीं—जो प्राणी शिवमंदिरांत सडासंमार्जन करतो, तो आपल्या देहाच्या अवसानकालीं सर्व पापाचा नाश करून घेतो. (१३) सडासंमार्जन केल्यानें देवळांतल्या जमिनीवरचे रज ( धुराळा ) जितके बसले असतील, तितके दिवस पर्यंत स्वर्गसुख भोगतो. (१४) हे मुनिश्रेष्ठा, प्रतिदिवशीं मनुष्य जितकें पापकर्म करतो, तितकीं सर्व पापें शिवालयांत संमार्जन( सारविणें )केल्यानें जळून जातात.

(१५) स्कंदपुराणांतील शिवरहस्यांत सांगितलें कीं—दूर्वास ऋषि बोलले-मऊ सूक्ष्म अशा केरसुणीनें जो प्राणी देवळांतला केर झाडून काढतो, तो प्राणी हजार चांद्रायणांचें फल एका महिन्यांत मिळवितो. (१६) मध्यें न सोडतां निरंतर पंधरादिवसपर्यंत संमार्जन जो करतो, तो साग्र हजार कोटि युगपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (१७) शिवपूजा झाल्यानंतर निर्माल्य काढून जो सारवितो,त्याला एक एक शंभरचांद्रायणाच्या बरोबरीचें फल मिळतें(१८) देव-

पृथिवीपाला भवंति त्रिदशोपमाः ॥१८॥ देवायतनभूमौ तु मार्जन्या मृदुसूक्ष्मया ॥ शनैः संमार्जनं कृत्वा महत्पुण्यमवाप्नुयात् ॥१९॥ पांसूनां यावतां कुर्याद्गेहे संमार्जनं विभोः ॥ तावन्त्यब्दसहस्राणि शिवलोके महीयते ॥२०॥ अस्मिन्नर्थे पुरावृत्तं तच्छृणुष्व महामते ॥ यच्छ्रुत्वा प्राणिनः प्रायो न मोहमुपयान्ति हि ॥२१॥ स्वायंभुवान्तरे ह्यासीद्राजा परमधार्मिकः ॥ पुरिकायां पुरि पुरा पुरंदरसमो युवा ॥२२॥ दिव्यमंत्रप्रभूत्साहशक्तियुक्तः प्रतापवान् ॥ षाड्गुण्यविन्महासत्वः स्मितपूर्वाभिभाषकः ॥२३॥ नरवर्मेति विख्यातो गुणैरभिवृतः स्वयम् ॥ तस्य भार्यासहस्राणां दर्शनीयतमाकृतिः ॥२४॥ दशानामग्रमहिषी सुदेवीति भुवि श्रुता ॥ सर्वलक्षणसंपन्ना शचीव वरवर्णिनी॥ २५॥ भर्तुश्चैव प्रिया साध्वी चंद्रकांतिसमप्रभा ॥ प्रत्यहं सा करोत्यग्र्यां राज्ञी संमार्जनादिभिः ॥२६॥ द्वारशोभां मार्गशोभां शिवस्यायतने सदा ॥ तां तथाभिर-

---

ळांत संमार्जन करणारे, व देवळाचा रस्ता झाडणारे आवश्य ( जरूर ) पृथ्वीचे पति होऊन देवासारखे पूज्य होतात. (१९) देवळांतल्या जमिनी मऊ सूक्ष्म केरसुणीनें जो झाडतो, व हळुहळु सारवून काढतो, तो पुष्कळ पुण्य संपादन करतो. (२०) श्रीशिवमंदिरांत संमार्जन करून जितके रज बसले असतील, तितके हजार वर्षेपर्यंत शिवलोकांत पूज्य होतो. (२१) हे महामते, याविषयीं पूर्वीची कथा एक सांगतों ऐक. ती कथा ऐकिली असतां मनुष्य प्रायशः मोहांत पडत नाहीं. (२२) स्वायंभुमनूच्या वेळेस परमधार्मिक, इंद्रासमान, तरुण असा राजा पुरिकानांवाच्या पुरींत राज्य करीत होता. (२३) तो राजा मोठ्या उमेदीचा असून मंत्रांमध्यें ( मसलतीमध्यें ) मोठा समर्थ होता. अर्थात जरब बसविणारा असून संधि, विग्रह वगैरे षाड्गुण्य चांगलें जाणीत होता. व तो लोकांशीं हंसून खेळून बोलत असे. (२४) तो सर्व गुणांनीं युक्त असून त्याचें नांव " नरवर्मा " असें होतें. त्याला हजार बायका असून तो त्यांना प्रिय होता, रूपानें फार सुंदर होता. (२५) त्यांत निवडक दहा बायकांमध्यें सुदेवी नांवाची बायको त्याची पट्टराणी असून ती लोकांत प्रख्यात होती, व सर्व लक्षणांनीं संपन्न असून इंद्राणीप्रमाणें सुंदर होती, (२६) शिवाय नवऱ्याला अतिशय प्रिय असून साध्वी होती. व चंद्राप्रमाणें तिची अंगकांति होती. ती निरंतर प्रतिदिवशीं देवळांत सडासंमार्जन करीत होती. (२७) शिवालयांतले रस्ते झाडीत होती व दारांत रांगोळी वगैरे

तां दृष्ट्वा तस्य राज्ञः पुरोहितः ॥२७॥ पप्रच्छेदं स तन्वंगीं गालवो र-हसि स्थिताम् ॥ ब्रूहि त्वं नो महाभागे किमर्थं हरमंदिरे ॥२८॥ सं-मार्जनरता नित्यमन्यकर्मपराङ्मुखी ॥ सैवमुक्ता तदा तेन मुनिना विनयान्विता ॥२९॥ प्रहस्याह विशालाक्षी दशनोद्भासितानना ॥ न मेऽन्यत्र परा भक्तिर्यथा संमार्जनादिषु ॥३०॥ तथाहं कथयिष्यामि पुरा कर्मकृतं मया ॥ पूर्वमासमहं विप्र पक्षिणी व्योमचारिणी ॥३१॥ कदाचिद्भ्रममाणा तु गता किष्किंधपर्वतम् ॥ सिद्धविद्याधराकीर्णं हे-मकूटमिवापरम् ॥३२॥ आश्चर्यवन्निराबाधं स्वर्लिंगं यत्र तिष्ठति॥तस्य संस्पर्शनादेव स्वर्गं यान्ति मनीषिणः ॥३३॥ संपूज्याथ तमेवेशं पुष्प-धूपाक्षतादिभिः ॥ न्यस्तं केनापि तत्पार्श्वे नैवेद्यान्नं तथैव हि ॥३४॥ म-यापि क्रममादाय लिंगं कृत्वा प्रदक्षिणम् ॥ क्षुधार्तया महर्षे तद्गृहीतं

---

घालून सुशोभित करीत होती. याप्रमाणें देवळाच्या कामांत रत झालेल्या त्या-सुदेवीला एकेदिवशीं राजपुरोहितानें पाहिलें. (२८) एकांतांत उभी असतां गाल-वनांवाच्या पुरोहितानें तिला विचारिलें कीं, हे सुदेवी, महाभागे, या शिवालयांत हें काम कां करितेस ? सांग. (२९) दुसरीं सगळीं कामें सोडून निरंतर देवळांत संडासंमार्जन कां करतेस ? हें सांग. असें मुनीनें विचारिल्याबरोबर विनयानें व नम्रपणें (३०) हंसून ती विशालाक्षी बोलली. ती हंसतांना तिच्या दांतांनीं तिच्या वदनाला विलक्षण शोभा आली होती. असो ती ह्मणाली कीं, प्रभो, संमार्जन वगैरे कामांशिवाय दुसऱ्या कामांत माझी भक्ति वसत नाहीं. (३१) कारण पूर्वी मीं मागच्या जन्मांत केलेलें कर्म सांगत्यें ऐका. मागच्या जन्मांत एक पक्षिणी ( पक्ष्याची मादी ) असून आकाशांत फिरत होत्यें. (३२) असें फिरत असतां एके दिवशीं किष्किंध नांवाच्या डोंगरावर गेल्यें. तेथें सिद्ध, विद्याधर, गंधर्व हे देव जिकडे तिकडे भरले होते. त्या पर्वतावर सोन्याचे सुळके असल्यामुळें दु-सरा मेरूच कीं काय ? असा भास पाहणारांना होत असे. (३३) त्या पर्वतावर स्वर्लिंग ह्मणून एक शिवलिंग होतें तें पाहिल्याबरोबर आश्चर्य होत होतें. मला असें वाटलें कीं, या स्वर्लिंगाचा स्पर्श जे बुद्धिमान करतील, ते तात्काळ स्वर्गाला जात असले पाहिजेत. (३४) असो. तेथें कोणी एका प्राण्यानें पुष्प, धूप दीप, अक्षता यांनीं श्रीशिवाची पूजा करून श्रीशिवाच्या एका बाजूला नैवेद्याचें अन्न ठेविलें होतें. (३५) हे महर्षे, तें पाहून मीं हीं क्रमानें लिंगाला प्रदक्षिणा घालून तें

कृत उद्यमः ॥३५॥ क्रमाच्च तद्गृहीतं च पक्षैः पांसुर्निमार्जितः॥ पुनर्दत्त-क्रमा यावद्गृहीतुं पांसुमार्जनात् ॥३६॥ तावत्तत्र समायातो दैवयोगा-त्स पूजकः ॥ नष्टा चाहं ततः कालान्मृता जाता वसोर्गृहे ॥३७॥ नृव-र्मणे च तेनाहं प्रदत्ता प्रथमा वधूः ॥ दशराज्ञिसहस्राणामुत्तमा तत्प्र-भावतः ॥३८॥ नान्या च दयिता राज्ञः पुत्रपौत्रसमन्विता ॥ अकामादी श्वरागारे कृत्वैवं पांसुमार्जनम् ॥३९॥ दुहिताहं वसोर्जाता राज्ञो जा-तिस्मरा तथा ॥ कामात्संमार्जनं कृत्वा किं भविष्यामि वेद्मि न ॥४०॥ एवमुक्तस्तया राज्ञ्या प्रहृष्टस्तामथाब्रवीत् ॥ समाराध्य महेशानं सर्वदं त्रिपुरान्तकम् ॥४१॥ किमाश्चर्यं गुणावासे यदेतत्प्राप्तवत्यसि ॥ फलं प्रयासाज्जायेत क्रमात्कालेन देहिनाम् ॥४२॥अर्थिनां त्वखिलान् कामा-न्सद्यः फलति शंकरः ॥ तावद्भ्रमन्ति संसारे शोकमोहपरायणाः॥४३॥

---

नैवेद्यान्न घेण्याकरितां पुढें गेल्यें. कारण तेव्हां मला अतिशय भूक लागली होती (३६) क्रमानें तें अन्न मीं खाल्लें, याप्रमाणें एक पंधरवड्यापर्यंत माझ्या पंखानें देवळांतला केर काढून तें नैवेद्यान्न खात होत्यें. पुढें एके दिवशीं याच क्रमानें केर काढून तें अन्न घेत असतां (३७) इतक्यांत तेथें अकस्मात देवाचा पुजारी आला त्यानें हें माझें कृत्य पाहून संतापून मला जिवानिशीं मारून टाकिलें. नंतर मी सुदैवानें वसुनांवाच्या एका राजाच्या घरांत जन्मास आल्यें. (३८) नंतर त्या वसूनें नृवर्मराजाला देऊन माझें लग्न करून टाकिलें. त्या नृवर्माला मीच पहिली बायको झाल्यें. अर्थात नंतर लग्न करून घेतलेल्या दहा हजार बायकांमध्यें मला पहिला मान मिळत आहे. हा सगळा प्रभाव त्या संमार्जनाचा आहे. (३९) मुलें नातु मला पुष्कळ झाले असून राजाची मोठीं आवडती झाल्यें आहे. मनांत नसून शिवालयांत पंखानें केर काढल्यामुळें (४०) वसूच्या पोटीं राजकन्या होऊन आल्यें, त्या पुण्यानें मला पूर्व जातीचें स्मरण राहिलें. हे ब्राह्मणा, आतां जाणूनबुजून जर संमार्जन करित्यें, तर पुढें मी काय होईन हें माझ्यानें सांगवत नाहीं. (४१) असें राजपत्नीचें वाक्य ऐकून तो ब्राह्मण बोलला. राजकन्ये, सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या त्रिपुरांतक महेशाची आराधना करून (४२) राजघराण्यांत जन्मलीस, व राजघराण्यांत पडलीस, यांत काय आश्चर्य आहे ? शरीरधारी प्राण्यांना इतर कर्मांनें पुष्कळ कालानें क्रमाला अनुसरून फार प्रयासानें फल मिळतें. (४३) परंतु शंकराच्या पूजेनें याचकांचे ( पूजकाचे ) सर्व मनोरथ ता-त्काळ पूर्ण होतात. शोक मोहानें व्याप्त होऊन तोंपर्यंतच लोक संसारांत फिरतात.

नार्चयंति विरूपाक्षं यावदेते शरीरिणः ॥ चराचरगुरोरस्य शंभोरमिततेजसः ॥४४॥ न कृता यैर्दृढा भक्तिर्वंचितास्ते स्फुटं जनाः ॥ इदं हितमिदं पथ्यमिदं सर्वार्थसाधकम् ॥४५॥ पुनः पुनो मयाख्यातं शिवे भक्तिर्विधेयताम् ॥ येन केन प्रकारेण यः पूजयति शंकरम् ॥४६॥ सर्वावस्थोऽप्यसौ जन्तुर्न पुनर्याति दुर्गतिम् ॥ सुखं स्वल्पं चला लक्ष्मीः परिणामि शरीरकम् ॥४७॥ निरुद्यमा किमत्रासीः क्रियतां शंकरार्चनम् ॥ लोके धन्यतरां मन्ये त्वामेवाहं सुलोचने ॥४८॥ या सदैव महादेवे भक्तासि कुलनंदिनि ॥ इतो वर्षायुतांते ते भर्त्रा सह विलासिनि ॥४९॥ विलासं देवि पश्यामि शाश्वतं शिवसद्मनि ॥ सुदेवीं गालवो धीमान् जगादैवं पुरा मुने ॥५०॥ इति विज्ञाय यत्नेन पूज्यो ध्येयश्च शंकरः ॥५१॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णये पूजागारनिर्माणतत्संमार्जनमाहात्म्यं नाम द्विपंचाशोऽध्यायः ॥

---

(४४) जोंपर्यंत प्राणी शिवपूजा करीत नाहींत, तोंपर्यंत संसार सुटत नाहीं. चराचराचागुरु, अमित तेजस्वी अशा शंभूची (४५) दृढ भक्ति ज्यांनीं केली, नाहीं, ते लोक स्पष्टपणें फसले ह्मणून समजावें. कारण हेंच ( शिवार्चन ) पथ्यकर असून हितकर आहे व सर्वार्थ साधून देणारें आहे. (४६) पुनः पनः मी सांगतों कीं – शिवावर दृढ भक्ति करा. कोणत्याही प्रकारानें श्रीशिवाची पूजा जो करितो, (४७) तो सर्वापदेंत पडलेला असला तरी मुक्त होऊन पुनः दुर्गतीला जात नाहीं. संसारांत सुख थोडें असून लक्ष्मी चंचल आहे. व शरीर अनिश्चित आहे. (४८) याकरतां निरुद्योगी न होतां शंकराची पूजा कर. हे सुलोचने, जगांत तूं एकटीच धन्य आहेस, असें मी समजतों. (४९) हे कुलनंदिनि, नेहमीं महादेवावर भक्ति करित्येस याकरितां एथपासून हजारो वर्षपर्यंत नवऱ्यासह (५०) शिवमंदिरांत शाश्वत विलास करशील तें मी पाहीन. हे मुने, याप्रमाणें गालवानें पूर्वी सुदेवीला ह्मटलें. (५१) प्रत्येकानें असेंच जाणून श्रीशिवाची पूजा व ध्यान प्रयत्नपूर्वक करावें.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयांतील पूजागारनिर्माणतत्संमार्जनमाहात्म्यकथन नांवाचा बावन्नावा अध्याय संपला.

## ॥ अथ त्रिपंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ ग्रंथान्तरे ॥ अनुलेपविधिं वक्ष्ये सर्वपापप्रणाशनम् ॥ खसंस्थं गोमयं ग्राह्यं स्थाने वा पतितं शुभे ॥१॥ उपर्यधश्च संत्यज्य प्रत्यग्रं जंतुवर्जितम् ॥ आहरेज्जीर्णवत्साया न वंध्याक्षीरवत्सयोः ॥२॥ रोगार्तनवसूतानां गोषु गोमयमाहरेत् ॥ गोमयेन सतोयेन यः कुर्यादनुलेपनम् ॥३॥ पश्यन् परिहरन् जंतून् चांद्रायणफलं लभेत् क्षरंति सर्वदानानि यज्ञहोमबलिक्रियाः ॥४॥ न क्षरेत महादानमभयं सर्वदेहिनाम्॥५॥लैंग्ये ॥ वस्त्रपूतेन तोयेन कार्यं चैवोपलेपनम् ॥शिवक्षेत्रे मुनिश्रेष्ठा नात्र कार्या विचारणा ॥६॥ आपः पूता भवन्त्येता वस्त्रपूताः समुध्दृताः ॥ आफेना मुनिशार्दूला न देयाश्च विशेषतः ॥७॥ तस्माद्वै सर्वकार्याणि दैविकानि द्विजोत्तमाः ॥ अद्भिः कार्याणि सततं पूताभिः सर्वसिद्धये ॥८॥ जंतुभिर्मिश्रिता ह्यापः सूक्ष्माभिस्तान्निहत्य तु ॥ यत्पापं सकलं चाद्भिरपूताभिश्च तल्लभेत् ॥९॥ संमार्जने तथा नृणां मंडले च विशेषतः ॥ अग्नौ खंडनके चैव पेषणे तोयसंग्रहे॥१०॥

---

श्रीशिवास नमस्कार असो. ग्रंथांतरांत सांगितलें कीं,–(१) आतां अनुलेपनविधान सांगतों, तें सर्व पाप नाश करणारें आहे. अधांतरीं पडत असलेलें शेण घ्यावें, किंवा योग्य स्थानांत पडलेलें शेण घ्यावें. (२) वरचें व खालचें सोडून किडे नसलेलें ताजें शेण घ्यावें. पारठ्या गायीचें, वांझ गायीचें, पहिलारु गायीचें कालवडीचें, शेण घेऊं नये. (३) रोगट नुक्तीच फळलेली, अशा गायींचें, शेण घेऊं नये. शेण व पाणी मिसळून शिवालय जो सारवतो, (४) त्यांतले किडे दूर जो करतो, त्याला चांद्रायण केल्याचें फल मिळतें. सर्वदान, यज्ञ, होम, बलिकर्म हे सर्व नाश पावतात. (५) सर्व प्राण्यांना अभय देणारें महादान नाश पावत नाहीं. (६) लिंगपुराणांत सांगितलें कीं--- पाणी वस्त्रांतून गाळून घेऊन शिवक्षेत्र सारवावें. हे मुनिश्रेष्ठहो, यांत विचार करावयास नको. (७) वस्त्रांतून पाणी गाळून घेतलें असतां तें पाणी पवित्र समजलें आहे. मुनिश्रेष्ठहो, फेंस असलेलें पाणी विशेषेंकरून देऊं नये. (८) हे द्विजश्रेष्ठहो, सर्व दैविक कार्यं नेहमीं पवित्र पाण्यानें करीत असावें, ह्मणजे सर्व सिद्धि मिळतात. (९) बारीक किडे असलेलें पाणी घेऊन सारविलें असतां त्यांतले किडे मरतात, यामुळें तसल्या अपवित्र पाण्यानें पाप येतें. (१०) संमार्जन, मंडल, विस्तव घालून पेटूं घातलें असतां, लांकडें तोडीत असतां, दळीत असतां, पाण्याचा संग्रह करीत असतां

हिंसा तथा गृहस्थानां तस्माद्धिंसां विवर्जयेत् ॥ अहिंसेयं परो ध- र्मः सर्वेषां प्राणिनां यतः ॥११॥ यद्दानमभयं पुण्यं सर्वदानोत्तमं शु- भम् ॥ तस्मात्तु परिहर्तव्या हिंसा सर्वत्र सर्वदा ॥१२॥ मनसा क- र्मणा वाचा सर्वदाऽहिंसकं नरम् ॥ रक्षंति जन्तवः सर्वे हिंसकं बा- धयंति च ॥१३॥ त्रैलोक्यमखिलं दत्वा यत्फलं वेदपारगे ॥ तत्फलं कोटिगुणितं लभतेऽहिंसको नरः ॥१४॥ मनसा कर्मणा वाचा सर्व- भूतहिते रताः ॥ दयादर्शितपंथानो इंद्रलोकं व्रजन्ति ते ॥१५॥ स्वा- मिवत्परिरक्षन्ति बहूनि विविधानि च ॥ पुत्रवत्पौत्रवत्स्नेहाद्रुद्रलोकं व्रजंति ते ॥१६॥ त्रैलोक्यमखिलं हत्वा यत्पापं परिकीर्तितम् ॥ शि- वालये निहत्यैकमपि तत्सकलं लभेत् ॥१७॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन व- स्त्रपूतेन वारिणा ॥ कार्यमभ्युक्षणं चैव परिहृत्योपलेपनम् ॥१८॥ ग्रं- थान्तरे ॥ यः कुर्याद्वस्त्रपूतेन गंधगोमयवारिणा ॥ आलेपनं यथा- न्यायं वर्षचांद्रायणं लभेत् ॥१९॥ लैंग्ये ॥ वर्णं वक्ष्यामि विप्रेंद्रास्स-

(११)गृहस्थांना हिंसा घडून पाप लागण्याचा संभव असतो, या करितां हिंसा जशी न होईल त्याप्रमाणें गृहस्थानें आचरण करावें. कारण सर्व प्राण्यांचा उत्तम धर्म अहिंसाच आहे, असें ह्मटलें आहे. (१२) ज्या दानांत भीति नसेल, तें दान पुण्यकर असून त्याला सर्व दानांत श्रेष्ठ व शुभ ह्मणतात. याकरितां होतां होईल तितक्या प्रयत्नांनीं हिंसा सोडून द्यावी. (१३) मनानें, कर्मानें, वाणीनें जो प्राणी हिंसाकर्म सोडून देतो, त्याचें रक्षण सर्व प्राणी करतात. हिंसा करणाऱ्याला सर्व प्राणी उपद्रव देतात. (१४) वेदपारंगत ब्राह्मणाला त्रैलोक्य दान केलें असतां जें पुण्य मिळतें, त्यापुण्यापेक्षां कोटिपटीनें जास्त पुण्य अहिंसक प्राण्याला मिळतें. (१५) मनानें, वाणीनें, कर्मानें सर्व प्राण्यांच्या हितासाठीं जे झटतात, व कृपेनें सन्मार्ग जे दाखवतात, ते लोक रुद्रलोकाला जातात. (१६) आपल्या धन्या- प्रमाणें अनेक प्राण्यांचें रक्षण जे करतात, व मुलाप्रमाणें नातूप्रमाणें प्रेमानें जे प्राण्यांचें रक्षण करतात ते रुद्रलोकाला जातात. (१७) त्रैलोक्याचा संहार करून जें पाप लागतें तें पाप शिवालयांत एका प्राण्याचा घात केल्यानें लागतें. (१८) याकरितां मोठ्या प्रयत्नानें पाणी वस्त्रगाळ करून त्या पाण्यानें सडा घालावा, व किडे काढून सारवावें. (१९) ग्रंथांतरांत सांगितलें कीं--- वस्त्रपूत व सुगंध पाण्या- नें विधिपूर्वक जो शिवालय सारवतो, त्याला एका वर्षाचें चांद्रायणाचें फल मि- ळतें. (२०) लिंगपुराणांत सांगितलें कीं,---विप्रश्रेष्ठहो, सर्व काम व अर्थ साधक

र्वकामार्थसाधनम् ॥ गोचर्ममात्रमालिप्य मंडलं गोमयेन च ॥२०॥ चतुरस्रं विधानेन चाद्भिरभ्युक्ष्य मंत्रवित् ॥ मुक्ताफलमयैश्चूर्णैरिंद्रनीलमयैस्तथा ॥२१॥ पद्मरागमयैश्चैव स्फाटिकैश्च सुशोभनैः ॥ तथा मारकतैश्चैव सौवर्णैराजतैस्तथा ॥२२॥ शालिपिष्टादिभिर्वापि पद्ममालिख्य निर्धनः ॥ निवेद्य देवदेवाय क्षितिदानफलं लभेत् ॥२३॥ मात्स्ये ॥ शंखचक्रैः सकटकैः स्वस्तिकांकुशचामरैः ॥ पद्मोत्पलानि रजसा नानावर्णानि कारयेत् ॥२४॥यावन्तः पांसवस्तत्र रजसः पतिता भुवि ॥तावद्वर्षसहस्राणि शिवलोके महीयते॥२५॥ग्रंथान्तरे ॥ सुपुण्ये नैमिषारण्ये मुनयः शंसितव्रताः ॥ सहिताः परिपप्रच्छुर्नंदिनं ते तपस्विनः ॥२६॥

ऋषय ऊचुः ॥ केन तुष्यति देवेशः सर्वलोकनमस्कृतः ॥ एतत्कथय तत्त्वेन सर्वज्ञोऽसि तपोनिधे ॥२७॥

नंदिकेश्वर उवाच ॥ साधु साधु महाप्राज्ञा युष्माभिर्वीतकल्मषैः ॥ परिपृष्टमिदं भूयो गोपनीयं प्रयत्नतः ॥२८॥ रोमशेन पुरा प्रोक्तं गिरि-

---

करून देणारे वर्ण (रंग) सांगतों. गोमयानें गोचर्मप्रमाण जमीन मंडलाकार सारवून (२१)किंवा चौकोनी सारवून मंत्रवेत्त्यानें उदक शिंपडून मोत्याची रांगोळी किंवा इंद्रनीलमण्याची रांगोळी, (२२) किंवा पद्मरागमण्याची, किंवा उत्तम स्फटिकाची, तशीच मरकतमण्याची, सोन्याची, रुप्याची रांगोळी त्यावर घालावी. (२३) किंवा निर्धन मानवानें तांदुळांच्या पिठानें तरी स्वस्तिक काढावें. असें पद्म काढलें असतां देवादिदेवाला पृथ्वीदान केल्याचें फल मिळतें. (२४) मत्स्यपुराणांत सांगितलें कीं,---शंख, चक्र, कटक, स्वस्तिक, अंकुश, चामर, पद्म, उत्पल वगैरे अनेक रंगाचे काढावेत. (२५) रांगोळीचे कण शिवालयांतल्या जमिनीवर जितके पडले असतील, तितके हजार वर्षेपर्यंत शिवलोकांत पूज्य होतो. (२६) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,---पुण्यकर नैमिषक्षेत्रांत बसून व्रतस्थ सर्व ऋषि एका ठिकाणीं मिळून नंदिकेश्वराला प्रश्न करतात—

(२७) ऋषि बोलले—नंदिकेश्वरा, सर्व लोकांना वंद्य असा शिव कोणत्या कर्मानें तुष्ट होतो, हें यथार्थ सांगा. हे तपोनिधे, आपण सर्वज्ञ आहांत.

(२८) नंदिकेश्वर बोलले---महाप्राज्ञहो, निष्कल्मष तुह्मीं हा चांगला प्रश्न केला, परंतु जे गुह्य सांगणार आहे, तें प्रयत्नपूर्वक जपून ठेवा. (२९) पूर्वी रोमशऋषीनें गिरिजेला सांगितलें होतें, गिरिजेनें देवाधिदेव श्रीशिवाला (आपल्या

जायै तयापि च ॥ प्रोक्तं तु देवदेवाय भर्त्रे तुष्टाय तेन च ॥२९॥ कथितं मे प्रसन्नेन देवदेवेन मत्प्रियम् ॥ रहस्यमपि तत्सर्वं कथयामि निशम्यताम् ॥३०॥ पुरा हैमवते शृंगे विपुले पुष्पितद्रुमे ॥ संलब्धुमीश्वरं गौरी भर्तारं कृतनिश्चया ॥३१॥ उग्रं नियममास्थाय चचार तप उत्तमम् ॥ तपस्यन्तीं तु तां गौरीं रोमशो मुनिपुंगवः ॥३२॥ द्रष्टुकामः समागच्छत्तयाथ बहुसत्कृतः ॥ उपविश्यासने तत्र व्याजहार वचस्तदा ॥३३॥

रोमश उवाच ॥ गिरिजे नियमैरेतैर्दुर्लभो हि महेश्वरः ॥ एकेन तोष्यते क्षिप्रं वर्णकेन विशेषतः ॥३४॥ तस्मात्त्वं वर्णकेनैव नानावर्णेन पार्वति ॥ भक्त्या परमया युक्ता प्रसादयितुमर्हसि ॥३५॥

देव्युवाच ॥ भगवन् ब्रूहि मे सर्वं वर्णकस्य विधिं परम् ॥ कथं वै क्रियतां विप्र कस्मिन्काले तपोधन ॥३६॥ कस्मिन्देशे फलं किं वा यत्तथावद्वक्तुमर्हसि ॥३७॥

रोमश उवाच ॥ शृणु गौरि यथातत्त्वं वर्णकस्य विधिं तव ॥ कथ-

---

नवऱ्याला) संतोषाचे वेळेस सांगितलें होतें, (३०) पुढें त्यानें प्रसन्न अंतःकरणानें प्रेमानें मला सांगितलें, तर तें फार रहस्य आहे, तथापि तुह्मांला सांगतों, ऐका. (३१) जेथें अनेक फुलझाडें फुललीं होतीं, त्या हिमालयाच्या सुळक्यावर पूर्वी स्वयंवराच्या इच्छेनें ईश्वर प्रसन्न करून घेण्याकरितां निश्चय करून (३२) उग्र नियम धरून पार्वतीनें उत्तम तप केलें. तपश्चर्या करणाऱ्या पार्वतीच्या वृत्तांताला ऐकून मुनिश्रेष्ठ रोमशमुनि (३३) तिला पाहण्याकरितां तेथें आले, तेव्हां तिनें मुनीचा सत्कार चांगला केला. आसनावर बसून मुनीनें तिला ह्मटलें कीं–

(३४) रोमश बोलले—गौरि, अशा नियमांनीं महेश्वर पावत नाहीं. परंतु विशेषेंकरून एका वर्णकानें शिव लौकर प्रसन्न होतात. (३५) याकरितां त्या वर्णकानें शिवाची आराधना कर. बाकीचें व्रत घेऊन काय करित्येस. श्रेष्ठ भक्तीनें शिवाला प्रसन्न करून घे.

(३६) देवी बोलली–भगवन् वर्णकाचें श्रेष्ठ विधान मला सांगा. तें कसें करावें ? व केव्हां करावें ? (३७) कोणत्या स्थानांत करावें ? व त्याचें फल काय हें सर्व सांगा–

(३८)रोमश बोलले–गौरि वर्णकाचें विधान तुला सांगतों, ऐक. तें परमरहस्य

थामि रहस्यं तु समीहितफलप्रदम् ॥३८॥ कोटिशो जप्यमानाद्धि जपादथ सवैदिकात् ॥ अधिकं वर्णकं प्राहुरशेषफलदायकम् ॥३९॥ शिवस्य भवनं सर्वं भक्त्या वै गोमयांबुना ॥ अनुलिप्याथ सन्नव्यमणिवर्णकमुत्तमम् ॥४०॥ विरच्य विधिवत्तत्र सप्तलोकेश्वरो भवेत् ॥ यवगोधूमपिष्टेन शालिपिष्टेन चांबिके ॥४१॥ वर्णकेन चतुर्वर्णानीश्वरस्य पुरः क्षितौ ॥ गोमयेनोपलिप्तायां शुद्धायां भक्तिमान्नरः ॥४२॥ लेखयेत्प्रियवत्तत्र शिवलोके महीयते ॥४३॥

देव्युवाच ॥ भगवन्भवता मह्यं सामान्यं कथितं त्विदम् ॥ ब्रूहि मे सकलं विद्वन्विस्तरेण तपोधन ॥४४॥

रोमश उवाच ॥ साधु पृष्टं महाप्राज्ञे गिरिजे शुभया त्वया ॥ शृणु देवि प्रसादेन कथयामि यथा श्रुतम् ॥४५॥ नूतनाः शालयः पिष्टाः फलकेषु विशोधिताः ॥ गव्येन पयसा सार्द्धं पेषणीयाः प्रयत्नतः ॥४६॥ अतिचूर्णीकृतं पिष्टं हरिद्रासहितं तथा ॥ हरितालयुतं चैव कांस्यमर्दं युतं तथा ॥४७॥ तथैव सितवर्णं च पीतवर्णं तथैव च ॥ पंचवर्णमिति

---

असून इच्छित फल देणारें आहे.(३९)कोट्यावधि इतर मंत्रांच्या व वैदिकमंत्रांच्या जपापेक्षां हें वर्णक अधिक असून अशेष फल देणारें आहे. (४०) शिवमंदिर सर्व भक्तीनें गोमयोदकानें सारवून उत्तम रांगोळीनें चित्रविचित्र वर्णक काढावें.(४१) याप्रमाणें विधिपूर्वक जो काढतो, तो सात लोकांचा स्वामी होतो. हे अंबिके, गव्हाच्या रव्यानें किंवा तांदुळाच्या पिठानें स्वस्तिक वगैरे काढावें. (४२) ईश्वराच्या पुढच्या जमिनीवर चार रंगाचें स्वस्तिक वगैरे काढावें. भक्तिमान प्राण्यानें गोमयानें सारविलेल्या शुद्ध भूमीवर (४३) प्रेमानें रांगोळी काढिली तर तो शिवलोकांत पूज्य होतो.

(४४) देवी बोलली—भगवन् हें साधारणपणें मला सांगितलें, हे विद्वन् तपोधना, आतां सविस्तर सांगा.—

(४५) रोमश बोलले—महाप्राज्ञे, गिरिजे चांगला प्रश्न केलास प्रसन्नपणें मीं जसें ऐकिलें तसें तुला सांगतों, ऐक. (४६) नवीन साळी आणून भरडून पाखडून गायीच्या दुधांत प्रयत्नपूर्वक वाटाव्या. (४७) बारीक पीठ झाल्यानंतर हळद त्यांत मिसळावी, व हरताळ घालून कांस्याच्या वाटीनें तें वाटावें. (४८) तसेंच पांढरा व तांबडा असे पांच रंग मिसळून रांगोळी करावी, असें तत्ववेत्ते मुनि

प्रोक्तं मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः ॥४८॥ शुक्लकृष्णारुणश्यामपीतवर्णा महात्मनः ॥ पंचवर्णा महेशस्य कथिताः पंचमूर्तयः ॥४९॥ एतैः शिवस्य पुरतः पद्मान्यष्टदलानि तु ॥ सततं विन्यसेद्भक्त्या नियमस्थः समाहितः ॥५०॥ काचपाषाणवज्रैश्च दारवेनैव कारयेत् ॥ कदाचिद्वर्णकं कुर्यात्कृत्रिमैश्च विशेषतः ॥५१॥ स तु सर्वप्रदो नृणां शिवसायुज्यकारकः ॥ गजवाजिरथांदोलछत्रचामरमंकुशम् ॥५२॥ पताकाशंखचक्रैकशंखकल्पलतावलिम् ॥ आस्थानमंटपं पूर्णकलशं पतिमेव च ॥५३॥ नाट्यक्रमं तोरणं च हेमरत्नविभूषितम् ॥ दोलां च सर्वतोभद्रं चंद्रं कुसुमबंधनम् ॥५४॥ पुष्पास्त्रदहनं पुष्पमंडपं पुष्पमालिकाम् ॥ देवालयं सुपुण्यं च देवसिंहासनं तथा॥५५॥नागबंधं नागवल्लीं कुलपर्वतसंहतिम् ॥ तथा कुवलयाकारमष्टकोणं तथैव च ॥५६॥ षट्कोणं पंचकोणं च चतुरष्टदलान्वितम् ॥ तथा षोडशपत्रं च न्यसेत्पद्मसहस्रकम् ॥५७॥ चंद्रार्कमंडलं पद्मबंधं पद्मासनं तथा ॥ इत्येवमादिविविधं वर्णकं सुमनोहरम् ॥५८॥ भक्त्या विरचयेत्प्रीत्या देवदेवस्य सन्निधौ ॥ फलं तस्य विशालाक्षि ब्रह्मादिभिरपि ध्रुवम् ॥५९॥ श्रोतुं वर्णयितुं

---

सांगतात. (४९) शुक्ल ( पांढरा ), काळा, तांबडा, सावळा, हळदी असे पांच वर्ण महात्म्या महेशाच्या पांच मूर्ति होत. (५०) यावर्णांनीं शिवापुढें अष्टदल पद्म लिहावें. नियमानें मन शांत ठेवून भक्तीनें सतत लिहावें. (५१) कांच, दगड, वज्र लांकूड यांचें तरी पीठ काढून कदाचित वर्णक ( स्वस्तिक ) काढिलें तर (५२) तेंही सर्व मनोरथ पूर्ण करणारें होऊन शिवसायुज्याला देतें. हत्ती, घोडे, रथ, झोंपाळा, पाळणा छत्र, चामर, अंकुश, (५३) पताका, शंख, चक्र, शंख, कल्पलता, आस्थान मंडप, पूर्ण कलश, (५४) नाट्यक्रम (तसवीर) सुवर्ण रत्नांनीं सुशोभित तोरण, दोला, सर्वतोभद्र, चंद्र, फुलाची सांखळी, (५५) कामदहन ( चित्र ) पुष्पमंडप, पुष्पमाला, देवालय, देवाचें पुण्यकर सिंहासन, (५६) नागबंध, नागवल्ली, कुलपर्वत, अष्टकोणाकृति कमल (५७) षट्कोण पंचकोण, चार, आठ दळांचें कमल, षोडशपत्र, सहस्रपत्र कमल, (५८) चंद्रसूर्य मंडल, पद्मासन, वगैरे मनोहर वर्णक (५९) भक्तीनें व प्रेमानें देवाजवळ काढावें. हे विशालाक्षि, याचें फल सांगावयास ब्रह्मादिदेव देखील समर्थ होत नाहींत. (६०) पार्वति, ऐकावयास वर्णन करण्यास समर्थ होत नाहींत. तथापि

नापि शक्यं गिरिवरात्मजे ॥ तथापि शक्यतेऽस्माभिर्यथाशक्ति यथा श्रुतम् ॥६०॥ यज्ञानां कोटयश्चास्य तथा नियमकोटयः ॥ तीर्थानां कोटयश्चैव कोट्यंशेन समा न ताः ॥६१॥ अयुताब्जसहस्रेण साधितस्य महीयसः ॥ पंचाग्निमध्ये तपसः फलं यत्समुदाहृतम् ॥६२॥ तत्फलं लभते मर्त्यो मासत्रयमतंद्रितः ॥ विधाय वर्णकं भक्त्या देवदेवस्य शूलिनः ॥६३॥ पुरा चित्ररथो नाम राजा वर्णकमुत्तमम् ॥ चित्रं विन्यस्य देवाय शिवसायुज्यमाप्तवान् ॥६४॥ तस्मात्त्वमपि गौरीह वर्णकं रुचिरं विभोः ॥ विन्यस्य पतिमीशानं लभस्व वरवर्णिनि ॥६५॥

नंदिकेश्वर उवाच ॥ इति प्रोक्तं वचः श्रुत्वा रोमशेन महात्मना ॥ गौरी भक्त्या हि विन्यस्य वर्णकं रुचिराकृति ॥६६॥ चित्रं विचित्रं विख्यातं पद्मं च सुमनोहरम् ॥ मुदा संतोष्य देवेशं तत्क्षणाच्च महेश्वरम् ॥६७॥ कृत्वा प्रसादं कल्याणी पतिमेनमवाप ह ॥ इति श्रुतं मया पूर्वमृषयः शंसितव्रताः ॥६८॥ वर्णकस्य विधानं तत्सकलं सर्वकामदम् ॥ तस्मादुक्तप्रकारेण वर्णकं च विरच्य च ॥६९॥ प्रीत्यर्थं देवदेवस्य पुरो भक्तिसमन्विताः ॥ प्रसादयत गौरीशं दुर्लभं तपसां चयैः ॥७०॥ इत्यु-

---

जसें आम्हीं ऐकिलें, तसें वर्णन तुझ्यापुढें केलें. (६१) कोट्यावधि यज्ञ, कोट्यावधि नियम, कोट्यावधि तीर्थ यांच्या कोट अंशाच्या बरोबरीला येत नाहींत. (६२) हजारो अब्ज वर्षें बसून साधन केलेल्या पंचाग्नीचें फल जें सांगितलें आहे (६३) तें फल विन आयासानें देवापुढें तीन महिनेपर्यंत वर्णक काढिलें तर मिळतें (६४) पूर्वीं चित्ररथ नांवाच्या राजानें उत्तम वर्णक काढून देवापुढें चित्र ठेवून शिवसायुज्य मिळविलें. (६५) हे देवि, याकरितां तूंही देवापुढें सुंदर वर्णक काढून श्रीशिवाला पति करून घे.

(६६) नंदिकेश्वर बोलला—महात्म्या रोमशाचें वाक्य ऐकून गौरीनें भक्तीनें देवापुढें सुंदर सुंदर वर्णक काढिलें. (६७) चित्रविचित्र सुंदर पद्म काढिलें. या प्रमाणें वर्णक काढून तिनें देवेशाला प्रसन्न करून घेतलें (६८) प्रसन्न झाल्यानंतर थोड्या वेळांतच ती श्रीशिवाची बायको झाली व्रतस्थ ब्राह्मणहो, याप्रमाणें पूर्वींची ही कथा ऐकिली आहे. (६९) वर्णकाचें विधान सर्व मनोरथ पूर्ण करणारें आहे. याकरितां सांगितल्याप्रमाणें वर्णक काढून (७०) देवाधिदेवाची प्रीति संपादन करावी. देवापुढें रांगोळी भक्तिपूर्वक काढून व तपश्चर्येलाही दुर्लभ अशा गौरीशाला प्रसन्न करून घ्या.(७१)याप्रमाणें मुनींला सांगून तो तेथेंच अंतर्धान

क्त्वा स मुनिभ्योऽथ तत्रैवान्तरधीयत ॥ ततस्ते मुनयः सर्वे नंदिनोक्तं समासतः ॥७१॥ श्रुत्वा विधिं वर्णकस्य फलं चातीव पुष्कलम् ॥ हर्षाविष्टाः समभवन् वर्णकस्य विधौ स्वयम् ॥७२॥ कृतयत्ना महाभागाः शिवप्रियचिकीर्षवः ॥ यः पठेदिदमाख्यानं शृणुयाद्वा समाहितः ॥७३॥ वर्णकाख्यमिदं प्रोक्तमनंतफलमाप्नुयात् ॥७४॥ क्रियासारे ॥ स्वर्णेन वाथ रौप्येण शुद्धसौराष्ट्रकेन वा ॥ कृत्वा बुद्बुदवत्सूक्ष्मचषकाकारसंमितान् ॥७५॥ तान् रन्ध्रद्वितयं कुर्यात्प्रत्येकं सकलादपि ॥ सूत्रेण प्रोत्य मालावद्द्वारस्य प्रतिबंधयेत् ॥७६॥ शिवधर्मे ॥ शिवस्यायतनं कुर्याच्चित्रवस्त्रोपशोभितम् ॥ दुकूलपट्टदेवांगैर्वस्त्रैर्वा वर्णकान्वितैः ॥७७॥ पट्टादिवस्त्रतंतूनां परिसंख्या च यावती ॥ तावद्युगसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥७८॥ ध्वजमालाकुलं कुर्याद्यः प्रान्ते तु शिवालयम् ॥ कल्पायुतशतं दिव्यं मोदते दिवि रुद्रवत् ॥७९॥ क्रियासारे ॥ पट्टदेवांगचीनानि वितानान्युत्तमानि वै ॥ कार्पासं धवलं वस्त्रं मध्ये कमलभूषितम् ॥८०॥ एतन्मौक्तिकमालाख्यं वितानमपि वा भवेत् ॥८१॥

---

पावला. नंतर सर्व मुनि संक्षेपानें नंदीनें सांगितलेलें ऐकून (७२) वर्णकाचें विधान व फल ऐकून आनंदभरित होऊन स्वतः वर्णक काढण्याच्या उद्योगाला लागले. (७३) यत्न करून भाग्यशाली मुनि शिवप्रीति मिळविण्याकडे वळले. हें आख्यान जो ऐकतो, व पठन करितो, (७४) व हें वर्णकाख्यान जो सांगतो, त्याला अनंत फल मिळतें. (७५) क्रियासारांत ह्मटलें कीं, सोन्याचे, रुप्याचे, सौराष्ट्रकाचे ( पितळेचे ) चाषपक्ष्याच्या आकाराचे बुडबुडे करून (७६) त्यांमध्यें प्रत्येकीं दोन दोन छिद्रें पाडून दोरींत ते सर्व गोवून ती माळ देवाच्या दाराला बांधावी. (७७) शिवधर्मांत सांगितलें कीं,—शिवमंदिर चित्रविचित्र वस्त्रांनीं सुशोभित करावें. दुकूल, पट्ट, देवांग, अशा नानातऱ्हेच्या वस्त्रांनीं व वर्णकांनीं सुशोभित करावें. (७८) पट्टादिवस्त्राचे तंतु किती असतील, तितके हजार युगपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (७९) शिवालयाच्या शेवटीं ( कडेला ) ध्वजाची माळ जो बांधतो, तो हजारो कल्पपर्यंत स्वर्गांत रुद्राप्रमाणें फिरतो. (८०) क्रियासारांत सांगितलें कीं, पट्टांग देवांग चीन या वस्त्रांनीं उत्तम छत जो मारतो, त्यांत मध्यें कापसाच्या शुभ्र वस्त्राचे कमल जो काढतो, तो सद्गतीला जातो. (८१) मोत्याच्या माळेसहित छत जो देवालयांत मारतो, तोही सद्गतीला जातो. (८२)

शिवधर्मे ॥ वितानं शशिपद्माभं मध्ये कमलभूषितम् ॥ विचित्रमेकवर्णं वा नववस्त्रोपकल्पितम् ॥८२॥ किंकिणीरवकोपेतं कंदुकैश्चोपशोभितम् ॥ मुक्तामालाभिरालंबं घंटाचामरभूषितम् ॥८३॥ शिवस्योपरि यो दद्यात्पुरतो वापि कल्पयेत् ॥ गुरुवत्सर्वलोकेषु युगकोटिं प्रमोदते ॥८४॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णयानुलेपनवर्णकविधिपूजागृहालंकरणक्रमतन्माहात्म्यं नाम त्रिपंचाशोऽध्यायः ॥

---

शिवधर्मांत सांगितलें कीं,—चंद्राप्रमाणें सुशोभित छत मारून मध्यें कमल काढून तयार करावें. त्यांत विचित्र रंगाचीं अनेक वस्त्रें असावीं, किंवा एका रंगाचें एक वस्त्र तरी असावें. (८३) सभोंवतीं लहान घंटा बांधाव्या, कंदुकांनीं ( गोळे बांधावेत ) सुशोभित करावें. मोत्यांच्या माळा लोंबत ठेवाव्या. शिवमंदिर घंटा चामरांनीं सुशोभित करावें. (८४) शिवाच्या ऊर्ध्व भागीं किंवा पुढें याप्रमाणें जो करतो, तो सर्व लोकांत गुरु होऊन कोटि युगांपर्यंत आनंदानें फिरतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयानुलेपनवर्णकविधिपूजागृहालंकरणक्रमतन्माहात्म्यकथन नांवाचा त्रेपन्नावा अध्याय संपला.

## ॥ अथ चतुःपंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ सौवर्णं राजतं ताम्रमिति पात्रं त्रिधा स्मृतम् ॥ कांस्यपात्रमपि द्रौममलाभे मृण्मयं तु वा ॥१॥ अर्घ्यादीनां न योग्यानि भिन्नपात्राणि जातुचित् ॥ अभिन्नानि विशुद्धानि पात्राण्येवं भवंति हि ॥२॥ ताम्रस्फटिकशंखेषु सुवर्णकलधौतयोः ॥ न विद्यते भिन्नदोषो द्रव्येष्वन्येषु विद्यते ॥३॥ शंखस्वर्णादिपात्राणां स्पृष्टदोषो न विद्यते ॥ दारुमृत्पात्रयोरस्ति स्पृष्टदोषोऽत्यजादिभिः॥४॥शंखः शुद्धो भवेत्तत्र तुषाभ्यां घर्षणेन च ॥ आम्लेन ताम्रकं भूत्या कांस्यं चूर्णेन पित्तलम्॥५॥पलालमप्याव्रीहीणां पात्रे पैत्तललोहके ॥ संघर्षयेद्विशुध्यर्थं कांतिप्रसरणाय च ॥६॥ रौप्यं हैमं विशुद्धं स्यात्केवलं क्षालनाज्जलैः ॥ पात्रं गोकर्णवत्कुर्यात्तद्धनं तिलमात्रकम् ॥७॥ तेषामलाभे पात्राणां नालिकेरकपात्रकम् ॥ कुशाग्रतिलसिद्धार्थयवव्रीहिपयांसि च ॥८॥ द्रव्याण्यमूनि षट् प्राहुरर्घ्यस्य मु-

---

श्रीशिवास नमस्कार असो. क्रियासारांत सांगितलें कीं,–श्रीशिव बोलले–(१) सोनें, रुपें, तांबें, याप्रमाणें पात्रांत तीन प्रकार आहेत. कांशाचें पात्र, द्रौमपात्र (लांकडीपात्र), यांपैकीं कांहीं मिळालें नाहीं तर मातीचें पात्र घ्यावें.(२) अर्घ्याकरितां घ्यावयाचीं पात्रें फुटलेलीं नसावींत. न फुटलेलीं शुद्ध पात्रें घ्यावींत. (३) ताम्र, स्फटिक, शंख, सोनें, रुपें या पात्रांत भेद दोष (फुटकेपणा) मुळींच नाहीं. बाकीच्या पात्रांत भेदाचा दोष (फुटकेपणाचा दोष) आहे. (४) शंख, सोनें वगैरे धातूंच्या पात्राला स्पर्श दोष मुळीं नाहीं, व लांकडाच्या मातीच्या पात्रांला अंत्यजादि कमी जातीच्या लोकांच्या स्पर्शाचा दोष आहे. (५) धान्याच्या कोंड्यानें घासलें असतां शंख शुद्ध होतो. चिंचेनें घासलें असतां तांबें शुद्ध होतें, विभूतीनें कांशाचें पात्र शुद्ध होतें, चूर्णानें (रांगोळीनें) पितळ शुद्ध होतें. (६) साळी वगैरेच्या कोंड्यानें पितळेचें व लोहाचें पात्र शुद्धीकरितां सतेज होईपर्यंत घांसावें. (७) रुप्याचें सोन्याचें पात्र नुसत्या पाण्यानें विसळून काढिलें तरी शुद्ध होतें. पात्र करावयाचें झाल्यास गोकर्णाच्या (गायीच्या कानाच्या) आकृतीचें करावें. त्याची जाडी तिला एवढी केलेली असावी. (८) हीं पात्रें करण्याची शक्ति नसेल, किंवा मिळत नसतील तर नारळाचें पात्र (नारळी द्रोण) करावें. कुशाग्र, तीळ, अक्षता, यव, साळी, दूध किंवा पाणी (९) मुनिश्रेष्ठहो, इतके सहा

निपुंगवाः ॥ सिद्धार्थं कुंकुमं दूर्वा कोष्ठं लामज्जकं शशी ॥९॥ अमूनि चात्र द्रव्याणि पाद्यस्य कथयंति षट् ॥ फलं कचोरकर्पूरकोष्ठैलोशीरकानि च ॥१०॥ अमून्याचमनीयस्य द्रव्याणि प्रवदंति षट्॥११॥कौर्मे॥ अर्घ्यपात्रे क्षिपेत्पुष्पं यवक्षारकुशाक्षतान् ॥ तिलसर्षपगंधांश्च पुष्पं वा केवलं क्षिपेत् ॥१२॥ उशीरं चंदनं चैव पाद्ये तु परिकल्पयेत् ॥ जातितक्कोलकर्पूरबहुमूलतमालकान् ॥१३॥ क्षिपेदाचमनीये च पूर्वं दत्वा विशेषतः ॥ शुद्धाभिरद्भिर्विहितं मतमाचमनीयकम् ॥१४॥ एलां सर्वेषु पात्रेषु कर्पूरं चंदनं तथा ॥ अर्घ्यं शिरसि देवस्य गंधपुष्पाक्षतादिभिः ॥१५॥ पाद्यं पादांबुजद्वंद्वे वक्त्रेष्वाचमनक्रियाम् ॥ पात्रं हैमं राजतं च मुक्तामयमथापि वा ॥१६॥ ताम्रं वा नालिकेरं वा प्रक्षाल्याद्भिः प्रपूरयेत् ॥ अष्टांगमर्घ्यमापूर्य लिंगमूर्तौनिवेदयेत् ॥१७॥ दशवर्षसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥ पात्रान्तरविशेषेण तत्फलं चोत्तरोत्तरम् ॥१८॥ दारुजेनार्घ्यपात्रेण दत्वार्घ्यं यत्फलं भवेत् ॥ तस्माद्दशगुणं

---

पदार्थ अर्घ्याला योग्य आहेत, असें मानिलें आहे. अक्षता, कुंकुम, दूर्वा ( हरळी) कोष्ठ, लामज्जक ( वाळा ) शशी ( पंच कापूर ) (१०) हीं सहा द्रव्यें पाद्याला योग्य मानिलीं आहेत. नारळ, कचोरा, कापूर, कोष्ठ, वेलची, वाळा. (११) हीं सहा द्रव्यें आचमनाला योग्य आहेत, असें मानिलें आहे. (१२) कूर्मपुराणांत सांगितलें कीं,–पुष्प, यव, क्षीर, कुश, अक्षता हीं द्रव्यें अर्घ्यपात्रांत टाकावींत, किंवा तीळ, सर्षप, (मोहऱ्या) गंध हीं द्रव्यें टाकावीं, किंवा नुसतें फूल तरी टाकावें. (१३) वाळा व चंदन हीं पाद्यांत टाकावीं. जाई, तक्कोल, कापूर, बहुमूल तमालपत्र (१४) हीं द्रव्यें आचमनपात्रांत टाकून पूर्वीं आचमन द्यावें. शुद्ध पाण्यानें आचमन द्यावें, असें सांगितलें आहे. (१५) सर्व पात्रांत वेलची, कापूर, चंदन हीं टाकावीं, व देवाच्या डोक्यावर अर्घ्य घालावें. गंध, फूल, अक्षता यांनीं (१६) देवाच्या पायावर पाद्य घालावें. आचमन देवाच्या मुखांत घालावें. सोन्याचें, रुप्याचें, मोत्याचें, (१७) तांब्याचें, नारळाचें पात्र पाण्यानें स्वच्छ धुवून त्यांत पाणी भरावें. अष्टांग अर्घ्य भरून लिंगमूर्तीला तें निवेदन करावें. (१८) तो पुरुष दहाहजार वर्षांपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. विशेष पात्रानें उत्तरोत्तर अधिकाधिक फल सांगितलें आहे. (१९) लाकडी पात्रानें अर्घ्य दिलें असतां जें पुण्य मिळावें, त्यापेक्षां दसपट फल मातीच्या पात्रानें दिलें असतां

पुण्यं मृत्पात्रेण प्रकीर्तितम् ॥१९॥ ताम्रपात्रेऽर्घ्यदानेन पुण्यं दशगुणो- त्तरम् ॥ पलाशपद्मपत्राभ्यां ताम्रपात्रं समं भवेत् ॥२०॥ रौप्यपात्रेण विज्ञेयमर्घ्यं लक्षगुणोत्तरम् ॥ सुवर्णपात्रे विन्यस्य अर्घ्यं कोटिगुणं ल- भेत् ॥२१॥ स्फाटिकेनार्घ्यपात्रेण दद्यादर्घ्यं विधानतः॥सोऽन्ते विधूय- पापानि शिवसायुज्यमाप्नुयात् ॥२२॥ पद्मरागमये पात्रे योऽर्घ्यं दद्या- च्छिवाय च ॥ तेजोलोकमवाप्नोति तेजोमंडलमंडितः॥२३॥ वैडूर्यस्यें- द्रनीलस्य पात्रे मरकतस्य च ॥ अर्घ्यं दद्याच्छिवायैव स शिवो नात्र संशयः ॥२४॥ रौप्यपात्रप्रदानेन यत्फलं वेदपारगे ॥ तस्माच्छतगुणं पुण्यं शिवे मृत्पात्रदानतः ॥२५॥ हेमपात्रं तु यद्दत्वा पुण्यं स्याद्वेदपा- रगे ॥ ताम्रपात्रप्रदानेन तस्माच्छतगुणं भवेत् ॥२६॥ शतकोटिं सुव- र्णस्य यो दद्याद्वेदपारगे ॥ शिवाय रौप्यपात्रेण तस्य पुण्यं ततोऽधि- कम् ॥२७॥ हेमपात्रं तु यो भक्त्या शिवाय विनिवेदयेत् ॥ न तस्य श- क्यते वक्तुं पुण्यानंतं विशेषतः ॥२८॥ पद्मरागमयं पात्रं स्फाटिकं चें-

---

मिळतें. (२०) तांब्याच्या पात्रानें अर्घ्य दिलें असतां त्याहून दसपट पुण्य मिळतें. पलाश (पळस) पत्रानें किंवा पद्मपत्रानें दिलें असतां तांब्या एवढेंच फल मिळतें. (२१) रौप्य पात्रानें अर्घ्य दिलें असतां लक्षपट फल मिळतें. सोन्याच्या पात्रांत अर्घ्य ठेवून दिलें असतां कोटिपट फल मिळतें. (२२) स्फटिकाच्या पात्रानें वि- धानपूर्वक अर्घ्य द्यावें ह्मणजे तो निष्पाप होऊन शेवटीं शिवसायुज्याला पावतो. (२३) पद्मरागाच्या पात्रांत अर्घ्य ठेवून तें शिवाला दिलें तर तो मोठा तेजस्वी होऊन तेजोलोकाला जातो. (२४) वैडूर्य, इंद्रनील, मरकत यांच्या पात्रांत अर्घ्य ठेवून तें शिवाला दिलें असतां तो शिवच होतो, यांत संशय नाहीं. (२५) रुप्याच्या पात्रांत अर्घ्य ठेवून तें वेदपारंगत ब्राह्मणाला दिलें असतां जें पुण्य मिळावें, त्यापेक्षां शतपट पुण्य मातीच्या पात्रानें शिवाला अर्घ्य दिलें तर मिळतें. (२६) सोन्याच्या पात्रांत अर्घ्य ठेवून वेदपारंगत ब्राह्मणाला दिलें तर काय पुण्य मिळतें, तें पुण्य तांब्याच्या पात्रांत ठेवून तें शिवाला दिलें असतां तितकें पुण्य मिळतें. (२७) वेदपारंगत ब्राह्मणाला सोन्याच्या पात्रानें अर्घ्य दिलें तर शतकोटपट फल मिळतें, परंतु रुप्याच्या पात्रानें शिवाला अर्घ्य दिलें तर त्याहून अधिक पुण्य मिळतें. (२८) सुवर्णपात्रानें शिवाला जो अर्घ्य भक्तीनें देतो, त्याचें पुण्य अनंत असून तें सांगावयास अशक्य आहे. (२९) पद्मरागाचें, इंद्रनीलमण्याचें, स्फटि-

द्रनीलजम् ॥ वैडूर्यजं मारकतं दत्तं पुण्यफलं बहु ॥२९॥ तुल्यमेव फलं प्रोक्तं शिवे चाढ्यदरिद्रयोः ॥ तयोरप्यधिकं पुण्यं यः शिवे भावनाधिकः ॥३०॥ विभवे सति यो मोहान्न कुर्याद्विधिविस्तरम् ॥ नैतत्फलमवाप्नोति प्रलोभाक्रान्तमानसः ॥३१॥ तस्मात्पत्रैः फलैस्तोयैरेवमाद्यैश्च यत्कृतम् ॥ तदनंतफलं ज्ञेयं भक्तिरेवात्र कारणम् ॥३२॥

शैवे ॥ धर्मसंहितायाम् ॥ कुमार उवाच ॥ श्रुतमेतत्त्वयाऽऽख्यातं भगवन्नंदिकेश्वर ॥ अर्घ्यदानात्फलं वक्तुमिहार्हसि जगद्गुरो ॥३३॥

श्रीनंदिकेश्वर उवाच ॥ वृत्तम् ॥ जीर्णार्कपर्णपुटसंस्थितमर्घ्यमार्यो व्यासः समस्तगुणबुद्धिमवाप्य चाभूत् ॥ सर्वैः समर्चितपदाब्जयुगो मुनीन्द्रैर्दत्वा शिवाय विधिवत्स्वपितुर्नियोगात् ॥३४॥ अद्यापि चाक्षयं तस्य कुलं ज्ञानेन नो समम् ॥ जीवोऽपि चास्य विप्रस्य व्यासस्य मुनिसत्तम ॥३५॥ तस्मादर्घ्यप्रदो ज्ञानमक्षयं तदवाप्नुयात् ॥३६॥

---

काचें, वैडूर्याचें, मरकतमण्याचें पात्र करून अर्घ्य दिलें तर पुष्कळ पुण्य मिळतें. (३०) श्रीमंतानें शिवाला अर्घ्य दिलें तर त्याला जितकें पुण्य मिळावें, तितकेंच पुण्य दरिद्याला मिळतें. ज्याची भावना अधिक असेल, त्याला जास्त पुण्य मिळतें. (३१) वैभव असून मोहानें विधिपूर्वक कर्म जो करीत नाहीं, त्या लोभ्याला कांहीं एक फल मिळत नाहीं. (३२) याकरितां पत्र, फल, उदक वगैरे भक्तीनें दिलें तर त्यापासून अनंत फल मिळतें याला भक्तीच मूलकारण आहे.

(३३) शैवपुराणांत धर्मसांहितेंत सांगितलें आहे कीं– कुमार बोलतो, हे भगवन् नंदिकेश्वरा,– हें त्वां सांगितलेलें आख्यान ऐकिलें. हे जगद्गुरो, आतां अर्घ्यदानाचें फल सांगा.

(३४) श्रीनंदिकेश्वर बोलले–आर्य व्यासानें रुईच्या पिकलेल्या पानांत अर्घ्य ठेवून शिवाला दिलें, यामुळें तो सर्व गुणांनीं युक्त असा मोठा बुद्धिमान झाला. व त्या शिवाला प्रेमानें आपल्या पित्याच्या आज्ञेप्रमाणें अर्घ्य दिल्यामुळें मोठमोठे मुनि व्यासाला नमस्कार करतात. (३५) आजपर्यंत व्यासाचा वंश अक्षय राहून मोठा बुद्धिमान होऊन राहिला आहे. ज्ञानामध्यें त्याची बरोबरी कोणी करूं शकत नाहीं. हे मुनिसत्तमा, ब्राह्मण अशा व्यासाचा श्रेष्ठपणा अशा तऱ्हेचा असून त्याच्या बरोबरीला बृहस्पति देखील येत नाहीं. (३६) ह्मणूनच अर्घ्यदान

वृत्तम् ॥ तस्माद्वदामि शृणु संप्रति सर्वयत्नाद्भक्त्या भवांघ्रियुगलं प्रतिदत्तमार्ये ॥ यत्किंचिदर्थरहितेन नरेण तत्स्यादर्घ्यं भवार्णवहरं किमिहाद्भुतं तत् ॥३७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णयार्घ्यादिप्रदानतन्माहात्म्यं नाम चतुःपंचाशोऽध्यायः ॥

---

करणारा अक्षय ज्ञानी होतो. (३७) हे आर्या, याकरितां सांगतों कीं, सर्व यत्न करून शिवचरणाला अर्घ्य भक्तीनें द्यावें कांहीं स्वत्व (द्रव्य) नसलेल्या दरिद्री मानवानें अर्घ्य दिलें असतां संसारसमुद्र शोषून जातो, यांत काय आश्चर्य आहे?

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधन द्रव्यनिर्णयार्घ्यादिप्रदानतन्माहात्म्य नांवाचा चौपन्नावा अध्याय संपला.



## ॥ अथ पंचपंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ उत्तमं स्यान्नदीतोयं तटाकाम्भस्तु मध्यमम् ॥ कनिष्ठं कूपसलिलं स्नानादिषु यथाक्रमम् ॥१॥ तत्र स्वादु पयः श्रेष्ठं लवणाम्भः कनीयसम् ॥ मध्यमं मिश्रसलिलमिति वारि त्रिधा स्मृतम् ॥२॥ सुस्वादुवार्यलाभे तु मिश्रैरपि च कारयेत् ॥ स्नापनादीनि कर्माणि न कुर्याल्लवणांभसा ॥३॥ दुर्जात्यधीनं दुर्गन्धं क्रिमिमिश्रं ससूनकम् ॥ सकर्दमं सशैवालं वार्यवश्यं परित्यजेत् ॥४॥ यत्र नैवेद्यनिर्माल्यसंकीर्णकलशादिभिः ॥ स्नानं तु क्रियते भक्त्या न तद्गृण्हाति शंकरः ॥५॥ यानि कार्याणि कर्माणि वस्त्रपूतेन वारिणा ॥ तानि सर्वाणि कुर्वीत देवताराधने सदा ॥६॥ एतानि ताम्रकुंभेषु पंचप्रस्थमितेषु च ॥ वस्त्रपूतानि तोयानि समापूर्य विनिक्षिपेत्॥७॥ सपुष्पशीर्षकं लिंगं ततः स्नपनमाचरेत् ॥पयोदध्याज्यमध्विक्षुरसैर्मूलेन पंचभिः ॥८॥ ततो गोधूमचूर्णेन घृष्ट्वा कोष्णेन वारिणा ॥ स्नापयेदनिषिद्धैर्वा मुद्गचूर्णैरलाभतः॥९॥ ततो हरिद्रया देवमा-

---

श्रीशिवास नमस्कार असो, क्रियासारांत सांगितलें कीं,–ईश्वर बोलले–(१) नदीचें पाणी उत्तम असून तळ्याचें पाणी मध्यम होय. विहिरीचें पाणी कनिष्ठ होय. याप्रमाणें स्नान वगैरेचा क्रम आहे. (२) त्यांत गोडें पाणी श्रेष्ठ असून खारें पाणी कनिष्ठ आहे. आणि मिसळ पाणी (गोडें खारें मिसळलेलें) मध्यम होय. याप्रमाणें पाण्यांत तीन प्रकार आहेत. (३) चांगलें गोडें पाणी मिळालें नाहीं तर मिश्र पाण्यानें तरी स्नानादि कर्में करावींत. परंतु खारट पाण्यानें स्नानादि कर्में करूं नयेत. (४) वाईट जातीचे लोकांच्या ताब्यांत असलेलें,( विहीर वगैरे) दुर्गंध, किडे असलेलें, दोषी असलेलें, चिखल असलेलें, शेवाळ असलेलें असें पाणी बिलकुल घेऊंनये. (५) नैवेद्य, निर्माल्य वगैरे मिसळलेल्या पाण्याच्या घागरीनें भक्तीनें स्नान घातलें तरी तें श्रीशिव घेत नाहीं. (६) देवताराधनेचीं करावयाचीं सर्व कर्में वस्त्रपूत पाण्यानें करावींत. (७) तांब्याच्या पात्रांत पांचप्रस्थप्रमाण वस्त्रपूत (कापडांतून गाळून घेतलेलें) पाणी भरून ठेवावें. (८) नंतर लिंगाच्या डोक्यावर फूल ठेवून लिंगाला स्नान घालावें. दूध, दहीं, तूप, मध, उंसाचा रस या पांच द्रव्यांनीं मूलमंत्रानें स्नान घालावें. (९) नंतर कणीक घेऊन तिनें चांगलें घासून वर कोमट पाणी घालून स्वच्छ धुवून काढावें. कणीक न मिळाल्यास निर्दोष मुगाच्या पिठानें घासून स्नान घालावें. (१०) नंतर हळद

लिप्य स्नानमाचरेत्॥स्नापयेदथ गंधाद्भिः पुष्पाद्भिः स्नापयेदथ॥१०॥ स्नापयेदथ हेमाद्भीः रत्नाद्भिः स्नापयेदथ ॥ स्नापयेदथ मंत्राद्भिः क्रमेणैव समाचरेत् ॥११॥ सर्वाण्यमूनि स्नानानि मूलेन ब्रह्मभिश्चरेत् ॥१२॥ पारमेश्वरतंत्रे ॥ दृढं वाऽसुषिरं स्निग्धं नवं स्थूलं मनोहरम् ॥ मृण्मयं दारवं ताम्रं राजतं हैममेव च ॥१३॥ शिवस्य मज्जनार्थं च कलशं संप्रकल्पयेत् ॥ मृदादीनां फलं प्रोक्तं कोटिकोटिगुणोत्तरम्॥१४॥ जलभाण्डैः पवित्रैस्तु मंत्रैस्तोयं क्षिपेत्ततः ॥ सुवर्णकलशेनाथ तथा वै राजतेन च ॥१५॥ ताम्रेण पद्मपत्रेण पालाशेन दलेन वा॥ शुद्धेन मृण्मयेनाथ शोभितेन शुभेन च ॥१६॥ कलशेनापि शंखेन वर्द्धन्या पाणिनाथ वा ॥ सकूर्चेन सपुष्पेण स्नापयेन्मंत्रपूर्वकम्॥१७॥शैवागमे ॥ पयोमधुघृतादीनां द्विसहस्रपलेन तु ॥ महास्नानं प्रकर्तव्यं फलानामपि तत्समम् ॥१८॥ तक्कोलजातिपुन्नागत्रिफलानां तथैव च॥ महावर्तिं तद्वदेव शिवस्याग्रे प्रकल्पयेत् ॥१९॥ लैंग्ये ॥ स्नाप्य लिगं मदीयं च गव्ये

---

लावून स्नान घालावें. नंतर गंधोदकानें स्नान घालावें, नंतर पुष्पोदकानें स्नान घालावें, (११)नंतर सुवर्णोदकानें स्नान घालावें, नंतर रत्नोदकानें स्नान घालावें, नंतर मंत्रोदकानें क्रमानें स्नान घालावें. (१२) हीं सर्व स्नानें मूलमंत्रानें किंवा पंच ब्रह्ममंत्रांनीं घालावीत. (१३) पारमेश्वर तंत्रांत सांगितलें कीं, मजबूत, सुंदर, दाट, नवीन, मोठें, मनोहर असें पात्र करावें. तें मातीचें लांकडाचें, तांब्याचें, रुप्याचें, सोन्याचें कशाचें तरी करावें. (१४) शिवाला अभिषेक घालण्याकरितां कळशी करावी. मृदादि पात्राचीं फलें उत्तरोत्तर कोट कोट गुणांनीं अधिक आहेत. (१५) पवित्र जलपात्रानें मंत्रपूर्वक स्नान घालावें. सोन्याच्या कळशीनें तसेंच रुप्याच्या कळशीनें स्नान घालावें. (१६) तांब्याच्या पात्रानें, पद्मपत्रानें, पळसाच्या पानानें, शुद्ध मंगलकर सुशोभित मातीच्या कळशीनें स्नान घालावें. (१७) कळशीनें, शंखानें, वर्द्धनीनें, हातानें कूर्चसहित, फुलांसहित पाणी घेऊन मंत्रपूर्वक स्नान घालावें. (१८) शिवागमांत सांगितलें कीं,–दूध, मध, तूप हीं दोन हजार पल (वजन) पर्यंत घेऊन महास्नान घालावें. फलांत सर्व समान आहे. (१९) तक्कोल, जाई, पुन्नाग, त्रिफला, महावर्ति (मोठ्या वातीचे दिवे.) शिवापुढें करावेत. (२०) लिंगपुराणांत सांगितलें कीं,–माझ्या शिवलिंगाला गायीच्या तुपानें अभिषेक घालून सर्व द्रव्यांनीं शुद्ध करून मग पाण्यानें अभिषेक

नैव घृतेनच ॥ विशोध्य सर्वद्रव्यैस्तु तथाद्भिरभिषेचयेत् ॥२०॥ भेरीमृदंगमुरजतिमिलापटहादिभिः ॥ वादित्रैर्विविधैश्चान्यैर्नृत्तैश्च विविधैरपि ॥२१॥ जागरं कारयेत्तत्र प्रार्थयेत यथाक्रमम् ॥ द्रव्यहीनैः क्रियाहीनैः श्रद्धाहीनैः सुरेश्वर ॥२२॥ कृतं वाप्यकृतं वापि क्षंतुमर्हसि शंकर ॥ पंचाक्षरं जपेद्भक्त्या देवदेवस्य सन्निधौ ॥२३॥ एवं यः कुरुते स्नानं शिवस्य परमात्मनः ॥ स एव सर्वतीर्थेषु सर्वयज्ञेषु यत्फलम् ॥२४॥ तत्फलं सकलं प्राप्य वाराणस्यां यथा मृतः ॥ तथैव मम सायुज्यं लभते नात्र संशयः ॥२५॥ मत्प्रियार्थमिदं कार्यं मद्भक्तैर्विधिपूर्वकम् ॥ महास्नानमशक्तस्य स्नानमष्टगुणं स्मृतम् ॥२६॥ जलेन केवलेनैव गंधतोयेन भक्तितः ॥ आलेपनं च तत्सर्वं पंचविंशत्पलेन वै॥२७॥ शतद्रोणैर्महादेवमष्टद्रोणैरथापि वा ॥ शतद्रोणसमं पुण्यमाढकेऽपि विधीयते ॥२८॥

शैवे ॥ धर्मसंहितायाम् ॥ सनत्कुमार उवाच ॥ भगवन्सर्वधर्मज्ञ

---

घालावा. (२१) भेरी, मृदंग, मुरज, तिमिला, पटह वगैरे विविध वाद्यांनीं व अनेक तऱ्हेच्या नर्तनांनीं (२२) जागर करावा, नंतर क्रमानें देवाची प्रार्थना करावी कीं, हे देवा, द्रव्याची, क्रियांची, श्रद्धेची न्यूनता असो, किंवा नसो, (२३) किंवा कर्म केलें असो, किंवा नसो, क्षमा कर. इतकें करून भक्तीनें देवाधिदेवाजळ बसून पंचाक्षराचा जप करावा. (२४)याप्रमाणें परमात्म्या शिवाला जो अभिषेक घालतो, तो शिवच समजावा. सर्व तीर्थांत स्नान केलें असतां जें फल मिळतें, व सर्व यज्ञ केले असतां जें फल मिळतें (२५) तीं सर्व फलें मिळून काशींत मरण आल्यानें जसें सायुज्य मिळतें तसेंच त्याला माझें सायुज्य मिळतें, यांत संशय नाहीं.(२६) माझ्या भक्तांनीं माझ्या प्रीतीकरितां विधिपूर्वक हें कर्म करावें. महाभिषेक घालवयास जो अशक्त असेल, त्यानें अष्टगुणस्नान घालावें, असें सांगितलें आहे (२७) केवल पाण्यानें किंवा गंधोदकानें भक्तिपूर्वक स्नान घालावें. सर्व आलेपन पंचवीस पलाच्या प्रमाणाचें (शंभर तोळे) करावें. (२८) शंभर द्रोणांनीं (या नांवाचें माप) अथवा आठ द्रोणांनीं स्नान घालावें. शंभर द्रोण परिमितीचें पुण्य आढकांत देखील सांगितलें आहे.

(२९) शैवपुराणांत धर्मसंहितेंत सांगितलें कीं,- -सनत्कुमार बोलले---सर्व धर्म जाणणाऱ्या भगवन् नंदिकेश्वरा, गणाधीशा देवाधिदेवा शिवाला अभिषेक

नंदीश्वर गणेश्वर ॥ वक्तुमर्हसि देवेश स्नाप्यं पुण्यफलं मम ॥२९॥

नंदिकेश्वर उवाच ॥ वृत्तम् ॥ वदामि सर्वं श्रृणु देवदेवं महेशमीशानमुमेशमीशम् ॥ जलादिभिः स्नाप्य फलं पवित्रैर्यथाक्रमं संप्रति विस्तरेण ॥३०॥ नद्याःसमुद्रगामिन्यास्तटाकाद्वा समाहृतम् ॥ वस्त्रपूतं च शीतं च विशिष्टं स्नानदानयोः ॥३१॥ पाटलोत्पलपद्मानिकरवीराणि सर्वदा ॥ स्नानतोयेषु योज्यानि स्थिराणि सुरभीणि च॥३२॥ लिंगं शीतांबुना स्नाप्य धारोष्णपयसा तथा ॥ स्नापयित्वा पुनर्दध्ना घृतस्नानं ततःपरम् ॥३३॥एवं स्नानत्रयं कृत्वा पूजयित्वा तु भक्तितः॥ अश्वमेधसहस्रस्य फलं प्राप्नोति मानवः ॥३४॥ पयोदधिघृतक्षौद्रशर्करांद्यैरनुक्रमात् ॥ ईशादिमंत्रितैः शंभुमायुरक्षयमाप्नुयात् ॥३५॥ अयुतं यो गवां दद्याद्दोग्ध्रीणां वेदपारगे ॥ वस्त्रालंकारयुक्तानां क्षीरस्नानेन तत्फलम् ॥३६॥ इहामुत्र कृतं पापं घृतस्नानेन देहिनाम् ॥ क्षप-

---

घातला असतां काय फल मिळतें, तें सांगा.

(३०) नंदिकेश्वर बोलले–हे देवा, सनत्कुमारा, सर्व कांहीं सांगतों ऐक महेश, ईशान, उमेश, ईश याला पवित्र पाण्यानें वगैरे स्नान क्रमानें घातलें असतां काय फल मिळतें, तें विस्तारपूर्वक सांगतों ऐक. (३१) समुद्रगामिनी नदीचें, अथवा तळ्याचें पाणी आणून तें वस्त्रांतून शोधून पवित्र करून ठेविलें असतां तें पाणी अभिषेकाला व दानाला योग्य होतें. (३२) पाटल, उत्पल, पद्म, करवीर इत्यादि न कोमेजणारीं सुगंधीं फुलें सर्वदां स्नानाच्या पाण्यांत घालून मग देवाला अभिषेक घालावा. (३३) प्रथम थंडपाण्यानें इष्टलिंगाला अभिषेक घालून नंतर धार काढल्या बरोबर ऊन ऊन असलेलें दूध घेऊन त्यानें अभिषेक घालावा. नंतर दह्याचें स्नान घालावें, नंतर घृतस्नान घालावें. (३४) याप्रमाणें तीन अभिषेक घातल्यानंतर भक्तीनें पूजा करावी. असें केलें असतां हजार अश्वमेधांचें पुण्य मिळतें. (३५) दूध, दहीं, घृत, मध, साखर इत्यादि पदार्थांचा अभिषेक शिवाला अनुक्रमानें ईशानादिमंत्रांनीं करावा. या योगानें अक्षय आयुष्य मिळतें. (३६) वेदपारंगत ब्राह्मणाला दहा हजार गायी वस्त्रालंकारांनीं सुशोभित करून दिल्या असतां जें फल मिळतें तें फल देवाला क्षीराभिषेक घातला असतां मिळतें. (३७) श्रीशिवाला घृताचा अभिषेक घातला असतां इहलोकांत व परलोकांत केलेलें पातक श्रीशिवाच्या कृपेनें जळून जातें. याकरितां अवश्य घृता-

येऽच्छंकरो यस्मात्तस्मात्स्नानं समाचरेत् ॥३७॥ कपिलाया घृतेनैव लिंगं यः स्नापयेत्सकृत् ॥ सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोके महीयते॥३८॥ कलशेनाज्यपूर्णेन रात्रौ स्नापयते नरः ॥ शुद्धस्फटिकसंकाशो गणो भवति शूलधृत् ॥३९॥ नैरंतर्येण यो मासं घृतस्नानं समाचरेत्॥ततः कुलैकविंशत्या न चलत्यैश्वरात्पदात् ॥४०॥ मुने पलशताज्येन स्नापयित्वा सदाशिवम् ॥ स याति शिवसायुज्यं नात्र कार्या विचारणा ॥४१॥ मंत्राष्टशतजप्तेन विमलेनांभसा शिवम्॥स्नापयित्वा सकृद्भक्तया शिवलोके महीयते ॥४२॥ सकृन्नमःशिवायेति मंत्रेणानेन सुव्रत ॥ सहस्रकलशैः स्नाप्य सद्रव्यैः साधितैस्ततः ॥४३॥ ब्रह्मघ्नोऽपि मुनिश्रेष्ठ सर्वपापैः प्रमुच्यते ॥ मुने नमः शिवायेति मंत्रेणानेन यः सकृत् ॥४४॥ शतेन कलशैश्चापि स्नाप्य देवं सदाशिवम् ॥ शतरुद्रवलो भूत्वा रुद्रलोके महीयते ॥४५॥ पितॄनुद्दिश्य यो लिंगं स्नापयेच्छीतवारिणा ॥ तृप्ताः स्वर्गं गमिष्यन्ति पितरो नरकादपि ॥४६॥ कुंकुमांभोभिरप्येवं

---

भिषेक घालावा. (३८) कपिला गायीच्या घृताचा अभिषेक इष्टलिंगाला एकवार जो घालतो, तो सर्व पापांतून मुक्त होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (३९) तुपानें भरलेल्या घागरीनें रात्रीच्या वेळेस जो देवाला अभिषेक घालतो, तो प्राणी शुद्ध स्फटिकाप्रमाणें सतेज होऊन शूलधारी गणाधीश होतो. (४०) निरंतर एक महिन्यापर्यंत घृतस्नान जो मानव घालतो, तो प्राणी आपल्या एकवीस कुळांसह श्रीशिवपदाचें सुख भोगतो, त्या पदापासून कधींही ढळत नाहीं. (४१) हे मुने, शंभर *पलाच्या प्रमाणाच्या तुपाचा अभिषेक सदाशिवाला जो घालतो, तो शिवसायुज्याला जातो, यांत विचार करावयास नको आहे (४२) मंत्राचा अष्टोत्तरशत जप करून निर्मल उदकानें शिवाला एकवार जो अभिषेक घालतो, तो शिवलोकांत पूज्य होतो. (४३) हे सुव्रता, "नमःशिवाय" या मूलमंत्रानें सहस्र कलशांनीं सुगंध द्रव्ययुक्त पाण्यानें अभिषेक जो देवाला घालतो. (४४) तो प्राणी ब्रह्महत्या करणारा असला तरी सर्वपापांतून मुक्त होतो. हे मुने, "नमःशिवाय" या मंत्रानें एकवार (४५) शंभर कलशांनीं सदाशिवाला जो अभिषेक घालतो तो प्राणी शंभर रुद्रांप्रमाणें ( गणाप्रमाणें ) तेजस्वी होऊन रुद्रलोकांत पूज्य होतो. (४६) पितरांच्या उद्देशानें शिवलिंगावर जो थंडपाणी घालतो, त्या प्राण्याचे वंशज नरकांतून निघून तृप्त होऊन स्वर्गाला जातात. (४७) कुंकुमोदकानें एकवार शि-

---

* १ पल ह्मणजे ३ रुपये भार.

स्नापयेदीश्वरं सकृत् ॥ शिवलोकं समासाद्य शिवेन सह मोदते॥४७॥ कर्पूरागुरुतोयेन यो लिंगं स्नापयेत्सकृत् ॥ सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोके महीयते ॥४८॥ सितेन भस्मना स्नाप्य सकृल्लिंगं प्रमोदते ॥ चंद्रांशुनिर्मलः श्रीमांच्छिववत्सोममण्डले ॥४९॥ एकाहमपि यो लिंगे भस्मस्नानं समाचरेत् ॥ विधूय सर्वपापानि शिवलोके महीयते ॥५०॥ येषामेकतमं स्नानं यः कुर्याद्भक्तितः शिवे ॥ विधूय सर्वपापानि शिवलोके महीयते ॥५१॥ येन केन शिवं स्नाप्य सर्वपापैः प्रमुच्यते ॥ एतत्ते कथितं सर्वं मुने पद्मजसंभव ॥५२॥ न शक्यं विस्तराद्वक्तुं युगकोटिशतैरपि ॥५३॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णये स्नानक्रमतन्माहात्म्यं नाम पंचपंचाशोऽध्यायः ॥

---

वाला अभिषेक घातला असतां प्राणी शिवलोकाला जाऊन शिवाबरोबर आनंदामध्यें राहतो. (४८) कापूर, कृष्णागरु मिसळलेल्या पाण्यानें जो लिंगाला एकवार अभिषेक घालतो, तो प्राणी सर्व पापांतून मुक्त होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (४९) एकवार इष्टलिंगाला शुभ्र भस्माचें स्नान जो घालतो, तो प्राणी चंद्रकिरणाप्रमाणें निर्मल होऊन शिवाप्रमाणें सोममंडलावर सुख भोगतो. (५०) एक दिवस तरी इष्टलिंगाला जो भस्मस्नान घालतो, तो प्राणी निष्पाप होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (५१) यांपैकीं एकतरी अभिषेक शिवाला जो घालतो, तो प्राणी निष्पाप होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (५२) कोणत्याही प्रकारानें शिवाला अभिषेक घातला तरी तो प्राणी सर्व पापांपासून मुक्त होतो. हे ब्रह्मपुत्रा मुने, हें सर्व तुला सांगितलें. (५३) हें विस्तारानें सांगावयास शंभरकोटयुगें गेलीं तरी वेळ पुरत नाहीं.

यात्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयांतील स्नानक्रमतन्माहात्म्यकथन नांवाचा पंचावन्नावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ षट्पंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ पट्टदेवांगचीनानि विचित्राणीतराणि वा ॥ सितानि सूक्ष्मवासांसि प्रशस्तानि पितामह ॥१॥ न्यायागतानि नूत्नानि दृक्प्रियाणि दृढानि च ॥ अंशुकानि विशुद्धानि प्रशस्तान्युदितेष्वपि ॥२॥ जीर्णं दग्धं धृतं स्थूलमाखुदष्टं सरंध्रकम् ॥ देवस्वं दुष्क्रियायुक्तं वस्त्रेष्वेवंविधं त्यजेत् ॥३॥ वासांसि सुविचित्राणि सारवंति मृदूनि च ॥ धूपितानि शिवे दद्याद्धिकोशानि नवानि च ॥४॥ यावत्तद्वस्त्रतन्तूनां परिसंख्या समन्ततः ॥ तावद्वर्षसहस्राणि शिवलोके महीयते ॥५॥ क्रियासारे ॥ कृतं शास्त्रोक्तविधिना सौवर्णं देवमानतः ॥ सुकालधौतवैवक्ष्यमुपवीतमिति स्मृतम् ॥६॥ मृदुशुक्लसमं चैव पट्टसूत्रादिनिर्मितम् ॥ दत्वोपवीतं रुद्राय भवेद्देहान्तगः सुखी ॥७॥ शैवे ॥ स्वर्णयज्ञोपवीतेन राजतेनोत्तरीयकम् ॥ कृत्वा यो विधिवद्दत्वा शिवस्य स शिवो भवेत् ॥८॥ क्रियासारे ॥ हेमरत्ना-

---

श्रीशिवास नमस्कार असो. क्रियासारांत सांगितलें आहे कीं, श्रीशिव बोलले—(१) हे ब्रह्मदेवा, पट्ट, देवांग, चीन नांवाचीं चित्रविचित्र, शुभ्र, सूक्ष्म, अशीं वस्त्रें प्रशस्त गणिलीं आहेत. (२) न्यायानें मिळविलेलीं, नवीन, पाहण्यालायक, मजबूत, शुद्ध अशीं वस्त्रें प्रशस्त गणिलीं आहेत. (३) जुनीं, जळलेलीं, आंगावर घेतलेलीं, जाड, उंदरानें कुरतुडलेलीं, छिद्रें पडलेलीं, देवाच्या सत्तेचीं (देवस्व), दुष्ट क्रियेनें युक्त अशीं वस्त्रें घेऊं नयेत. (४) चित्रविचित्र, मजबूत, मऊ, किडे न लागलेलीं, नवीन, सुवासित केलेलीं अशीं वस्त्रें शिवाला द्यावींत. (५) चोहोंकडे त्या वस्त्रांत जितके तंतु असतील, तितक्या हजार वर्षांपर्यंत शिवलोकांत पूज्य होतो. (६) क्रियासारांत सांगितलें कीं,— शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें देवाच्या आकृतीच्या मानानें तयार केलेलें सोन्याचें उपवीत देवाला अर्पण करावें. चांगल्या वेळेस केलेलें, व धुतलेल्या सुताचें, व विवक्षारहित ( अमक्याच्या उद्देशानें न केलेलें ) असें उपवीत देवाला द्यावें. (७) मऊ, शुभ्र, सरळ, पट्टसूत्रानें केलेलें असें उपवीत रुद्राला द्यावें, याच्या प्रभावानें प्राणी वेदांत पारंगत होऊन सुखानें राहतो. (८) शैवपुराणांत सांगितलें कीं, सोन्याचें यज्ञोपवीत व रुप्याचें उत्तरीय करून जो शिवाला अर्पण करतो, तो प्राणी साक्षात शिवच होतो. (९) क्रियासारांत सांगितलें कीं, सोन्याचे, रत्नाचे, व इतर कांहीं असे दागिने शिवाला

नि चान्यानि धार्याण्याभरणानि च ॥ कर्तव्या गोलका हेम्ना शुद्धेन रजतेन वा ॥९॥ लिंगस्य परितश्चोर्ध्वमंतरं त्र्यंगुलं वरम् ॥ अंगुलिद्वितयं मध्यमंगुलैकं कनीयसम् ॥१०॥ लिंगवल्लिंगमानेन सशिखारत्नसंयुतम् ॥ एषाप्याभरणेषूक्ता मकुटं चेति कीर्तितम् ॥११॥ कर्तव्यं तु प्रभावृत्तं लिंगस्यैव प्रमाणतः ॥ उत्सेधश्चास्य विस्तारो हेम्ना वा रजतेन वा ॥१२॥ पर्यायेण प्रभावृत्ते रत्नपद्मावलिद्वयम् ॥ यदन्यत्कुशलं कर्म तच्च नेत्रप्रियं यथा ॥१३॥ प्रभावृत्तमिति प्रोक्तमित्थमेतद्विभूषणम् ॥ हेम्ना पंकजवत्कृत्वा न्यसेन्मध्यदलेषु च॥१४॥नवरत्नानि नालं च कुर्यात्तत्कुण्डलं स्मृतम् ॥१५॥ लैंग्ये ॥ मणिमुक्ताप्रवालादिग्रथितान् स्वर्णभूषणान् ॥ रुद्राक्षमालिकाद्यैर्वा देवदेवाय शंभवे ॥१६॥ समर्प्य दीप्तिमान्याति शिवलोके चिरं स्थितिम् ॥१७॥ क्रियासारे ॥ चंदनागरुकर्पूरकुंकुमान्यनुलेपने ॥ शस्तान्यमूनि द्रव्याणि न योग्यानीतराण्यपि ॥१८॥ गंधानुलेपनात्पुण्यं द्विगुणं चंदनस्य तु ॥ चंदनादग-

---

अर्पण करावेत, व सोन्याचे किंवा शुद्ध चांदीचे गोळे करून शिवाला अर्पण करावेत, (१०) शिवलिंगाभोंवतीं व वर तीन बोटांच्या प्रमाणानें केलें असतां उत्तम असें ह्मटलें आहे. दोन बोटांच्या प्रमाणानें केलें असतां मध्यम गणिलें आहे, एक बोटाच्या प्रमाणाचें केलें असतां तें कनिष्ठ असें मानिलें आहे.(११)शिवलिंगाच्या मानानें लिंगाकार, शिखारत्नानें युक्त असा मुकुट करावा. मुकुटही दागिन्यांपैकींच एक दागिना आहे. (१२) शिवलिंगाच्या मानानें एक प्रभावली करावी, लिंगाइतकीच उंची व लिंगाइतकाच विस्तार केलेला असून सोन्याची किंवा चांदीची प्रभावळी केलेली असावी. (१३) प्रभावळीवर दोन्ही बाजूला क्रमानें रत्नाचीं पद्में चिकटविलेलीं असावींत, व दुसरें कांहीं पाहण्यालायक मनोहर चित्र काढावें. (१४) प्रभावली देखील दागिन्यांतच गणिली गेली आहे. सोन्याचें कमल करून मध्यदलावर त्या कमलाचा न्यास करावा ( मध्यें कमल काढिलेलें असावें. ) (१५) नवरत्नांचा नाल करावा, याला कुंडल असें ह्मणतात. (१६) लिंगपुराणांत सांगितलें कीं,- मणि, मोत्यें, पोवळीं गोवलेले सोन्याचे दागिने किंवा मणी, मोत्यें, पोवळीं गोवलेली रुद्राक्षांची माळ देवाला अर्पण करावी. (१७) समर्पण करणारा तो प्राणी तेजस्वी होऊन शिवलोकांत चिरकाल राहतो. (१८) क्रियासारांत सांगितलें कीं,—चंदन, अगरु, कापूर, कुंकुम, अनुलेपन वगैरे द्रव्यें प्रशस्त आहेत, इतर पदार्थ योग्य मानिले नाहींत. (१९) गंध-

रोर्ह्येयं पुण्यमष्टगुणाधिकम् ॥१९॥ कृष्णागरोर्विशेषेण द्विगुणं फल-मिष्यते ॥ तस्माच्छतगुणं पुण्यं कुंकुमस्य विधीयते ॥२०॥ चंदनागरु-कर्पूरैः श्लक्ष्णपिष्टैः सकुंकुमैः ॥ लिंगं पर्याप्तमालिप्य शिवलोके मही-यते ॥२१॥ शैवे ॥ चंदनागरुकर्पूरकुंकुमाद्यैश्च पुण्यकृत् ॥ लिंगमाले-पयेद्यश्च सर्वपापैः प्रमुच्यते ॥२२॥ ज्ञानाज्ञानकृतैश्चापि मनोवाक्काय-संभवैः ॥ बिल्वमूलमयं गन्धमुमामाहेश्वराय वै ॥२३॥ महदैश्वर्यमा-प्नोति दत्वा शिवपुरं व्रजेत् ॥ देवदारुमयं गन्धं शिवाय विनिवेदयेत् ॥२४॥ शिवलोकमवाप्नोति कल्पमेकं न संशयः ॥ गंधं सुचंदनं चैव देवदेवाय शंभवे॥२५॥दत्वा विजयमाप्नोति शिवसायुज्यमश्नुते॥२६॥ स्कान्दे ॥ आरग्वधमयं गंधं लेपयेन्मृत्युजिद्धरम् ॥ मृत्युजित्स भवेद्भ-क्त्या गाणपत्यमवाप्नुयात् ॥२७॥ शारदातिलके ॥ चंदनागरुकर्पूरत-मालदलकुंकुमम् ॥ उशीरं कोष्ठसंयुक्तं शिवगन्धाष्टकं स्मृतम् ॥२८॥ क्रियासारे ॥ अभिन्नाः शंखवच्छ्वेताः सुस्निग्धा व्रीहितंडुलाः ॥ स्मृ-

---

लेपनापेक्षां चंदनाचें फल दुपटीनें मिळतें, चंदनापेक्षां अगरूचें पुण्य आठ-पटीनें जास्त आहे. (२०) अगरूपेक्षां विशेषेंकरून कृष्णागरूचें फल दुपटीनें जास्त आहे. त्यापेक्षां शतपट कुंकुमाचें पुण्य जास्त आहे. (२१) चंदन, अगरु कापूर यांचें चांगलें पीठ करून त्यांत कुंकू मिसळून इष्टलिंगाला पुरे इतकें जो लावतो, तो शिवलोकांत पूज्य होतो (२२) शिवपुराणांत सांगितलें कीं,---चंदन, अगरु, कापूर, कुंकुम इत्यादि पदार्थांचें लेपन इष्टलिंगाला जो करतो, तो पुण्य-वान सर्व पापांपासून मुक्त होतो. (२३) ज्ञानानें (समजून) अज्ञानानें (न समजून) केलेलीं कायिक, वाचिक,मानसिक पातकें देखील नष्ट होतात. बिल्वाच्या मुळी-चा गंध उमामाहेश्वरांस (२४) जो अर्पण करतो, तो या लोकांत मोठें ऐश्वर्य भोगून शेवटीं शिवपुराला जातो. देवदारूचा गंध शिवाला जो अर्पण करितो, (२५) तो प्राणी एक कल्पपर्यंत शिवलोकांत राहतो, गंध व चंदन देवाधिदेव शिवाला जो अर्पण करतो, (२६) तो प्राणी विजयी होऊन शिवसायुज्याला जातो. (२७) स्कंदपुराणांत सांगितलें कीं,--आरग्वधाचा गंध (बाहव्याचा गंध) जो हराला भक्तीनें लावतो, तो प्राणी मृत्यूला जिंकून शेवटीं गणाधीश होतो. (२८) शारदातिलकांत सांगितलें कीं,---चंदन, अगरु, कापूर, तमाल, कुंकुम, वाळा, कोष्ट वगैरेच्या गंधाला शिवगंधाष्टक असें ह्मणतात. (२९) क्रियासारांत सांगितलें कीं,---हे ब्रह्मदेवा, न फुटलेले, शंखाप्रमाणें शुभ्र, स्निग्ध असे व्रीहि

ताः शिवार्चने योग्याः नेतराश्चतुरानन ॥२९॥ लैंग्ये ॥ मुक्ताफलसमाभान् दाडिमीबीजवच्छुभान् ॥ अक्षतं पदमाप्नोति योऽक्षतानर्पयेत्सुधीः ॥३०॥ शुद्धशाल्यक्षतैः शुभ्रैः कुशपुष्पैः प्रयत्नतः ॥ शिवं यः पूजयेद्भक्त्या शिवलोकमवाप्नुयात् ॥३१॥ लैंग्ये ॥ रक्ताः पीतास्तथा शुक्लाः कापिलाः कृष्णवर्णकाः ॥ सहस्रवृध्या फलदाः शंभोराराधने तिलाः ॥३२॥ कृष्णाष्टम्यां चतुर्दश्यां रुद्रर्क्षे सोमवासरे ॥ रात्रौ कृष्णतिलै रुद्रं पूजयेच्छान्तिमाप्नुयात् ॥३३॥ नित्यं कृष्णतिलैः शंभुं पूजयेद्भक्तिसंयुतः ॥ पातकैर्मुच्यते सद्यः शिवलोके महीयते ॥३४॥ लैंग्ये ॥ बिल्वपत्रतिलाभ्यां यः शंकरं पूजयेत्सकृत् ॥ सर्वपातकयुक्तोऽपि शिवलोके महीयते ॥३५॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णये वस्त्रोपवीताभरणगंधाक्षततिलप्रदानतन्माहात्म्यं नाम षट्पंचाशोऽध्यायः ॥

---

( तांदूळ ) शिवपूजेला योग्य मानिले आहेत, दुसरे अयोग्य मानिले आहेत. (३०) लिंगपुराणांत सांगितलें कीं,---मोत्याप्रमाणें स्वच्छ असलेल्या, डाळिंबाच्या बियांप्रमाणें शुभ असलेल्या अक्षता जो बुद्धिमान शिवाला अर्पण करतो, तो अक्षत (नाशरहित) पदाला जातो. (३१) शुद्ध साळीच्या अक्षतांनीं व शुभ्र कुशपुष्पांनीं जो शिवाची पूजा भक्तीनें करतो, तो शिवलोकाला जातो. (३२) लिंगपुराणांत सांगितलें कीं,---तांबडे, हळदी, पांढरे, कपिल, काळे तीळ घेऊन शिवाची आराधना करावी, ह्मणजे हजारोपटीनें फलें मिळतात. (३३) कृष्णाष्टमीला, चतुर्दशीला, रुद्रनक्षत्राच्या दिवशीं, सोमवारीं रात्रीं काळ्या तिळांनीं श्रीशिवाची पूजा जो करतो, त्याला शांति मिळते. (३४) निरंतर कृष्णतिलांनीं शंभूची पूजा भक्तीनें जो करतो, तो पातकांपासून मुक्त होऊन तात्काळ शिवलोकांत पूज्य होतो. (३५) लिंगपुराणांत सांगितलें कीं, बिल्वपत्रांनीं व तिळांनीं शंकराची पूजा एकवार जो करतो, तो सर्वपातकी असला तरी शिवलोकांत पूज्य होतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयांतील वस्त्रोपवीताभरणगंधाक्षततिलप्रदानतन्माहात्म्यकथन नांवाचा छपन्नावा अध्याय संपला.

## ॥ अथ सप्तपंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ कालोत्तरे ॥ ईश्वर उवाच ॥ पुष्पाध्यायं प्रवक्ष्यामि यथावदनुपूर्वशः ॥ हिताय साधकानां च सर्वकामफलाप्तये ॥१॥ एकपुष्पफलं तावद्वक्ष्यामि श्रुणु षण्मुख ॥ तपःशीलगुणोपेते पात्रे वेदस्य पारगे ॥२॥ सुवर्णकोटिं यद्दत्वा तत्फलं कुसुमेन तु ॥ दत्वा दन्तिसहस्राणि वाजपेयशतानि च ॥३॥ कोटिकन्यामहादानमेकपुष्पं शिवार्चने ॥ एकस्यापि च पुष्पस्य दत्तस्यैव महेश्वरे ॥४॥ त्रैलोक्यं वशमायाति स्वेच्छयैव न संशयः॥ आंदोलिकादियानेषु हर्म्येषु परमेश्वरे ॥५॥ कामिनीकुचभारेषु वर्तते कुसुमप्रदः ॥ यो दद्यात्कांचनं मेरुं सस्यपूर्णां वसुंधराम् ॥६॥ लिंगन्यस्तैकपुष्पस्य सहस्रांशं न पूरयेत् ॥ यज्ञकोटिसहस्रेषु बहुयत्नेषु यत्फलम् ॥७॥ लिंगन्यस्तैकपुष्पस्य सहस्रांशेन नो समम् ॥ अग्निष्टोमसहस्राणि वाजपेयशतानि च ॥८॥ लिंगन्यस्तैकपुष्पस्य कोट्यंशं पूरयंति न ॥९॥ लिंगपुराणे ॥ गवांकोटिप्र-

---

श्रीशिवास नमस्कार असो. कालोत्तरांत सांगितलें कीं,---श्रीशिव बोलले--(१) साधकांच्या कल्याणाकरितां व सर्व मनोरथ परिपूर्ण होण्याकरितां क्रमानें पुष्पाध्याय सांगतों. (२) हे षण्मुखा, एका फुलाचें फल तोंपर्यंत सांगतों ऐक. तपस्वी, सुशील, सद्गुणी, वेदपारंगत अशा सत्पात्राच्या ठिकाणीं. (३) कोट सुवर्ण दिलें तर जें फल मिळावें, तें एका फुलानें शिवपूजा केली असतां मिळतें. हजारो हत्ती दिले तर, किंवा शेंकडो वाजपेय याग केले तर, (४) अथवा कोट कन्यादान केले तर जें पुण्य मिळावें, तें शिवपूजेंत एक फूल दिलें तर मिळतें. श्रीशिवास एकच फूल समर्पण केलें असतां (५) त्रैलोक्य आपोआप ताब्यांत राहतें. यांत संशय नाहीं. व एक फूल वाहिलें असतां आंदोलिका वाहन, व माडीचीं घरें,(६)युवती स्त्रिया यांचा लाभ होतो. जो प्राणी सोन्याचा मेरु दान करतो, त्याचें व सस्यपूर्ण पृथ्वीचें दान वगैरेचें पुण्य (७) शिवलिंगावर एक फूल वाहिलेल्या पुण्याच्या हजार अंशाच्या योग्यतेला पावत नाहीं. पुष्कळ प्रयत्न करून अनेक यज्ञ केले तर जें फल मिळतें, (८) तें फल शिवलिंगावर वाहिलेल्या एका फुलाच्या पुण्याच्या हजारांशाच्या योग्यतेला पावत नाहीं. हजारो अग्निष्टोम, शेंकडो वाजपेय. (९) शिवलिंगावर वाहिलेल्या एका फुलाच्या पुण्याच्या कोट्यंशाच्या योग्यतेला येत नाहींत. (१०) लिंगपुराणांत सांगितलें कीं,--

दानेन विधिदत्तेन यत्फलम् ॥ लिंगन्यस्तैकपुष्पस्य सहस्रांश न पूरयेत् ॥१०॥ मातृविप्रसतीमित्रभ्रातृगोसंचितं वधम् ॥ सर्वपातकसंहारमेकपुष्पं शिवार्चने ॥११॥ जलं वा पुष्पमेकं वा लिंगस्योपरि निक्षिपेत् ॥ अमंत्रं वा समंत्रं वा कुलकोटिं समुद्धरेत् ॥१२॥ क्रियासारे॥ अर्कारग्वधनीरेजनंद्यावर्तकजातयः॥ करवीरवकद्रोणवृहतीनवमालिका ॥१३॥ मल्लिकोत्पलपुन्नागकदंबाशोकचंपकाः ॥ सेवन्तिकर्णिकाराख्यात्रिसंध्यारक्तकेसराः ॥१४॥ असितोत्पलधत्तूरलोहितोत्पलकांचनाः॥ पलाशः पाटलीत्येषां प्रसवाः प्रवराः स्मृताः ॥१५॥ ग्रंथान्तरे ॥ पुष्पाणां लक्षणं वक्ष्ये समासान्मुनिपुंगवाः ॥ श्वेतपद्मं च पुन्नागं शंखपुष्पं च मल्लिका॥१६॥ नंद्यावर्तं श्रियावर्तं मंदारं बहुकर्णिका॥ विकुण्ठिकुरवं जातिलक्ष्मीश्च वकुलं तथा ॥१७॥ श्वेतार्कमालतीद्रोणमसितश्वेतलोध्रकम् ॥ पृषकाशशिकुरवं भद्रा च महती रसा ॥१८॥ व्याघ्री च वकपुष्पं च करवीरमशोकजम् ॥ पालिकाशतपत्रं च उन्मत्तं कुशपुष्पकम् ॥१९॥ एतानि श्वेतपुष्पाणि मुख्यान्यामुख्यभांजि हि ॥ रक्तपद्मं

---

विधिपूर्वक कोट गाई दिल्यातर जें फल मिळतें, तें फल शिवलिंगावर वाहिलेल्या एका फुलाच्या फलाच्या सहस्रांशाच्या योग्यतेचें होत नाहीं (११) आई, ब्राह्मण, साध्वी बायको, स्नेही, बंधु, गाई यांचा वध करणारा असला तरी त्यानें शिवपूजेच्या वेळेस एक फूल शिवावर वाहिलें असतां तितक्या पातकांचा संहार होतो. (१२) पाणी किंवा फूल इष्टलिंगावर मंत्र न ह्मणतां किंवा मंत्रानें वाहिलें असतां त्याचीं कोट कुळें उध्दत होतात. (१३) क्रियासारांत सांगितलें कीं,–रुई, बाहवा, कमल, नंद्यावर्त, जाई, करवीर, बक, द्रोण, बृहती, नवमल्लिका, (१४) मल्लिका, उत्पल, पुन्नाग, कदंब, अशोक, चांफा, सेवती, कर्णिकार, त्रिसंध्या, रक्तकेसर, (१५) काळें कमल, धत्तूर, रक्तकमल, कांचन पुष्प, पळसाचें फूल, पाटलीपुष्प, वगैरे फुलें श्रेष्ठ गणिलीं आहेत. (१६) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,–मुनिश्रेष्ठहो, फुलांचीं लक्षणें संक्षेपानें सांगतों. पांढरें कमल, पुन्नाग, शंखपुष्प, मल्लिका, (१७) नंद्यावर्त, श्रियावर्त मंदार, बहुकर्णिका, विकंठिकुरव, जाई, लक्ष्मी, वकुल, (१८) श्वेतार्क, पांढऱ्यारुईचें फूल मालती, द्रोण, पांढरें काळें लोध्र, पृष, काशीश, कुरव, भद्रा, महती, रसा, (१९) व्याघ्री, वकपुष्प, करवीर, अशोक, पालिका, शतपत्र, धत्तूर, कुशपुष्प (२०) वगैरे पांढरीं फुलें मुख्य अशीं

पलाशं च तद्रक्तोत्पलपाटले ॥ २० ॥ मौसली चैव धत्त-रबृहती करवीरकम् ॥ व्याघ्री च रक्तमंदारं पट्टिका वैजि-कस्तथा ॥२१॥ मुनिपुष्पं तु रक्तानि पुष्पाण्येतानि निर्दिशेत् ॥ शौनकं कर्णिकारं च चंपकं हेमधत्तुरम् ॥२२॥ आरग्वधं च को-रण्डा सौर्यं च गिरिकर्णिका ॥ एतानि पीतपुष्पाणि कृष्णनीलोत्पलं वरम् ॥२३॥कालोत्तरे॥ प्रत्यग्रैः कुसुमैः पूज्यो ह्यखण्डैर्ऋजुगुम्फितैः ॥ बकपुष्पैः सदा पूज्यः शिवः सर्वार्थसिद्धिदः ॥२४॥ नमेरुपत्रैश्च फलै-स्तथा कुंकुमकेसरैः ॥ सुगंधकुसुमैः पूतैर्ब्रह्मपत्रैर्विशेषतः ॥२५॥ नैषां पर्युषितं चैव स्थितं संवत्सरावधि ॥ पद्मानि नीलरक्तानि कुमुदान्यु-त्पलानि तु ॥२६॥ शुक्लपद्मानि नीलानि नागपुन्नागपत्रिका ॥ एषां प-र्युषिताशंका कार्या पंचदिनादतः ॥२७॥ इति प्रधानपुष्पाणि मध्यमा-नां समुच्चयः ॥ कुंदकुब्जककल्हारमल्लिकागस्तिकिंशुकम् ॥२८॥ अर्क-धत्तूरभृंगानि सुरभिर्दिग्धिका तथा ॥ मधूलिका मालती च तथा चं-पकपुष्पकम् ॥२९॥ मंदारकुसुमं चैव बंधकी कोष्ठकं तथा ॥ दमनं म-रुवं चैव द्रोणकं पाटलद्वयम् ॥३०॥ यूथिकालोध्रकं चैव तमालं क-

---

गणिलीं आहेत. रक्तपद्म, पलाश, रक्तोत्पल, पाटली, (२१) मौसली, धत्तूर, बृहती, करवीर, व्याघ्री, रक्तमंदार, पट्टिका, वैजिक, (२२) मुनिपुष्प, वगैरे फुलें तांबडीं होत, शौनक, कर्णिकार, चांफा, सोनधोतरा, (२३) बाहवा, कोरांटी, सौर्य, गिरिकर्णिका वगैरे फुलें हळदी होत. यांत काळें व निळें कमळ श्रेष्ठ मानिलें आहे. (२४) कालोत्तरांत सांगितलें कीं, नवीन, अखंड, अनिंद्य अशा फुलांनीं देवाची पूजा करावी. बकाच्या फुलांनीं नेहमीं पूजा केली तर सर्व मनोरथ पूर्ण होतील. (२५) मेरुपत्र, फल, कुंकु, केशर, सुगंध फुलें यांनीं पूजा केली असतां जें फल मिळावें, त्यापेक्षां अधिक फल ब्रह्मपत्रांनीं पूजा केली तर मिळतें. (२६) हीं फुलें एक वर्षपर्यंत ठेविलीं तरी शिळीं होत नाहींत. पद्म, नीलकमल, तांबडें कमल, उत्पल, (२७) पांढरें कमल, नीलकमल, नागपुन्नागाचीं पानें, इत्यादि पदार्थांला पांच दिवस लोटल्यानंतर शिळेपणाची शंका घ्यावी (पांच दिवसां-पुढें शिळीं होतात,) (२८) अशीं हीं मुख्य फुलें होत. आतां मध्यम फुलांचा संग्रह करतों. कुंद, कुब्ज, कल्हार, मल्लिका, अगस्ति, किंशुक, (२९) अर्क, धोतरा, भृंग, सुरभि, दिग्धिका, मधूलिका, मालती, चांफा, (३०) मंदार, बंधकी, कोष्ठ, दमन, मरुव, द्रोण, पाटल, (३१) यूथिका, लोध्र, तमाल, कर्णिकार, द्वितक-

र्णिकारकम् ॥ द्विताकं मंजमंजू च सुमना केसरं तथा ॥३१॥ जयंती कबला मोचा चतुर्थी विजया तथा॥ स्थलनीलोत्पलं शस्तं तथान्यत्स्थलपंकजम् ॥३२॥ गोविंदपुष्पं दातव्यं तथा कर्पूरपत्रिका ॥ गोपालतलसूर्यं च किंचित्स्थाप्यं तु मध्यमम् ॥३३॥ कन्यसं केसरीपुष्पं करविं दापयेत्सदा ॥ इति पुष्पाणि देयानि प्रत्यग्राणि फलानि च ॥३४॥ तत्वसारसंहितायाम् ॥ यावच्चंद्रश्च सूर्यश्च यावत्तिष्ठति मेदिनी ॥ पद्मपत्रं न निर्माल्यं तावदेव हि नारद ॥३५॥ स्कान्दे ॥ पलाशस्वर्णपुष्पैश्च तुलसीबिल्वपत्रकैः॥ पूजयेद्देवदेवेशं प्रक्षाल्य च पुनः पुनः ॥३६॥

मार्कण्डेयपुराणे॥ राजोवाच ॥त्वयोदितानि पत्राणि प्रसूनानि प्रियाणि च ॥ पुष्पाणामधिकं ब्रह्मन्कथयस्व परं च मे ॥३७॥

मार्कण्डेय उवाच ॥ करवीराच्छुभं पुण्यं कांस्यपुष्पसमर्पणे ॥ कांस्यपुष्पाच्छुभं पुण्यं शतपत्रस्य चार्चने ॥३८॥ शतपत्राच्छुभं पुण्यं कमलस्यार्चनेऽनघ ॥ पद्माच्छतगुणं पुण्यं जातीबकुलपूजने ॥३९॥ ताभ्यां शतगुणं पुण्यं मल्लिकाचंपकार्चने ॥ ताभ्यां

---

मंज, मंजु, सुमना, केसर, (३२) जयंती, कबला, मोचा, चौथी विजया, प्रशस्त भुईकमल, तसेंच दुसरें कमल, (३३) गोविंदपुष्प, कर्पूरपत्र, गोपालपुष्प, सूर्यपुष्प हीं फुलें मध्यम होत. (३४) केसरीपुष्प करविपुष्प हीं कनिष्ठ असलीं तरी (कळ्या असल्या तरी) देवांवर वाहावींत. याप्रमाणें फुलें आणि फलें ताजीं नवीन देवाला द्यावींत. (३५) तत्वसारसंहितेंत सांगितलें कीं,---जोंवर सूर्य चंद्र आहेत, जोंवर पृथ्वी आहे, तोंपर्यंत हे नारदा, पद्मपत्र निर्माल्य होत नाहीं. (३६) स्कंदपुराणांत सांगितलें कीं,--पळस सुवर्ण, तुलसी, बिल्वपत्र हीं वरचेवर धुवून देवादिदेवाची पूजा करावी.

(३७) मार्कंडेयपुराणांत सांगितलें कीं, राजा बोलतो--पत्रें, फुलें वगैरे कोणतीं प्रिय आहेत, तीं तुह्मीं सांगितलीं आतां हे ब्रह्मन्, फुलांमध्यें श्रेष्ठ फूल कोणतें? हें सांगा.

(३८) मार्कंडेय बोलले—हे राजा, करवीरापेक्षां कांस्यपुष्प वाहिलें तर फल अधिक मिळतें. कांस्यपुष्पापेक्षां शतपत्र (कमल) शिवाच्या पूजेला जास्त प्रशस्त मानिलें आहे. (३९) हे अनघा, शतपत्रापेक्षां कमल शिवपूजेला श्रेष्ठ असें मानिलें आहे, पद्मापेक्षां जाई व बकुलपुष्पाची पूजा पुण्यदायक आहे. (४०) यांपेक्षां मल्लिकाचंपकाची पूजा शतपटीनें श्रेष्ठ मानिली आहे, यांपेक्षां बिल्वमंदाराची

शतगुणं पुण्यं बिल्वमंदारपूजने ॥४०॥ ताभ्यां शतगुणं पुण्यं कुसुंभस्यार्चनेऽनघ ॥ पुष्पाणां लक्षणं राजन् ते सर्वं कथितं मया ॥४१॥

शिवधर्मे ॥ नंदिकेश्वर उवाच ॥ एवं पुष्पविशेषेण फलं तदधिकं भवेत् ॥ ज्ञेयं पुष्पांतरं तस्माद्यथा स्यात्तन्निबोधत॥४२॥ अर्कपुष्पसहस्रेभ्यः करवीरं विशिष्यते ॥ करवीरसहस्रेभ्यो बिल्वपत्रं विशिष्यते ॥४३॥ बिल्वपत्रसहस्रेभ्यः पद्ममेकं विशिष्यते ॥ पद्मपत्रसहस्रेभ्यः पुण्डरीकं विशिष्यते ॥४४॥ पुण्डरीकसहस्रेभ्यः शतपत्रं विशिष्यते ॥ शतपत्रसहस्रेभ्यः सहस्रारं विशिष्यते ॥४५॥ सहस्रारसहस्रेभ्यो बकपुष्पं विशिष्यते ॥ बकपुष्पसहस्रेभ्य एकं धत्तूरपुष्पकम् ॥४६॥ धत्तूरकसहस्रेभ्यो बृहत्पुष्पं विशिष्यते ॥ बृहत्पुष्पसहस्रेभ्यो श्वेतमंदारकं शुभम् ॥४७॥ मंदारकसहस्रेभ्यो द्रोणपुष्पं विशिष्यते ॥ द्रोणपुष्पसहस्रेभ्यो ह्यपामार्गं विशिष्यते ॥४८॥ अपामार्गसहस्रेभ्यः कुशपुष्पं विशिष्यते ॥ कुशपुष्पसहस्रेभ्यः शमीपुष्पं विशिष्यते ॥४९॥ शमीपुष्पसहस्रेभ्यो व्याघातं तु विशिष्यते॥ व्याघातस्य सहस्रेभ्यो शंखपुष्पं विशि-

---

पूजा शतपटीनें श्रेष्ठ आहे. (४१) यांपेक्षां शतपटीनें पुण्य कुसुंभपुष्पाची पूजा केली असतां मिळतें. हे राजा फुलांचीं लक्षणें सर्व तुला सांगितलीं.

(४२) शिवधर्मांत सांगितलें कीं, नांदिकेश्वर बोलले—याप्रमाणें त्या त्या पुष्पविशेषाला अनुसरून अधिक फल मिळतें. आतां दुसऱ्या पुष्पांचें फल जसें आहे, तसें सांगतों ऐक. (४३) हजार अर्कपुष्पें (रुईचींफुलें) वाहण्यापेक्षां करवीर जास्त श्रेयस्कर आहे. हजार करवीरांपेक्षां एक बिल्वपत्र श्रेष्ठ आहे. (४४) हजार बिल्वांपेक्षां एक पद्म श्रेष्ठ आहे. हजार पद्मांपेक्षां एक पुंडरीक श्रेष्ठ आहे. (४५) हजार पुंडरीकांपेक्षां एक शतपत्र श्रेष्ठ आहे. हजार शतपत्रांपेक्षां एक सहस्रपत्र (हजार दळांचेंकमल) श्रेष्ठ आहे. (४६) हजार सहस्रपत्रांपेक्षां एक बकपुष्प श्रेष्ठ आहे. हजार बकपुष्पांपेक्षां एक एक धोतरा श्रेष्ठ आहे. (४७) हजार धोतऱ्यांपेक्षां एक बृहत्पुष्प श्रेष्ठ आहे. हजार बृहत्पुष्पांपेक्षां एक श्वेतमंदार श्रेष्ठ आहे. (४८) हजारमंदारांपेक्षां एक द्रोणपुष्प श्रेष्ठ आहे. हजार द्रोणपुष्पांपेक्षां एक अघाडा (एक पान) श्रेष्ठ आहे. (४९) हजार अपामार्गांपेक्षां एक कुशपुष्प श्रेष्ठ आहे. हजार कुशपुष्पांपेक्षां एक शमीपुष्प श्रेष्ठ आहे. (५०) हजार शमीपत्रांपेक्षां एक व्याघात श्रेष्ठ आहे. सहस्र व्याघातांपेक्षां शंख-

ष्यते ॥५०॥ शंखपुष्पसहस्रेभ्यो व्याघ्रपुष्पं विशिष्यते ॥ व्याघ्रपुष्पसहस्रेभ्यः सदाभद्री विशिष्यते॥५१॥सदाभद्रीसहस्रेभ्यः कृष्णनिर्गुंडिका परा॥कृष्णनिर्गुंडिकायाश्च बृहत्पुष्पं विशिष्यते॥५२॥बृहत्पुष्पसहस्रेभ्यः श्वेतार्कं तु विशिष्यते॥श्वेतार्कानां सहस्रेभ्यो बृहद्द्रोणं विशिष्यते ॥५३॥ बृहद्द्रोणसहस्रेभ्यः सदानीलं विशिष्यते ॥ नीलोत्पलसहस्रेभ्यः स्वर्णपुष्पं विशिष्यते ॥५४॥ सर्वासां पुष्पजातीनां प्रवरं नीलमुत्तमम् ॥ जपापुष्पं कदंबं च पुन्नागं च तथैव च ॥५५॥ द्रोणपुष्पसमं ज्ञेयं मरुकं दमनं तथा ॥ बृहत्पुष्पसमं ज्ञेयं विष्णुक्रान्ताप्रसूनकम् ॥५६॥ अर्कपुष्पसमं ज्ञेयं मल्लिकाजातिपुष्पकम् ॥ धत्तूरकसमं ज्ञेयं चंपकं कर्णिकारकम् ॥५७॥ बिल्वपत्रसमं ज्ञेयं विजयस्य प्रसूनकम् ॥ कुब्जकं मालती चैव करवीरसमं भवेत्॥५८॥ पद्मपुष्पसमं ज्ञेयं वकुलं पाटली तथा ॥ अशोकश्वेतमंदारं व्याघ्रकस्य समं भवेत् ॥५९॥रक्तोत्पलं च कुमुदमपामार्गसमं भवेत् ॥ कर्णिकारमगस्तिश्च व्याघ्रीपुष्पसमं भवेत् ॥६०॥ जपा कुन्दं च पुन्नागं द्रोणपुष्पसमं भवेत् ॥ वकपुष्पसमा ज्ञेया मल्लिकाचातसी शुभा॥६१॥आर्यावर्तं च नागं च मयूरशिखमेव च॥ धत्तूरकसमा

---

पुष्प श्रेष्ठ आहे. (५१) सहस्र शंखपुष्पांपेक्षां व्याघ्रपुष्प श्रेष्ठ आहे. सहस्र व्याघ्रपुष्पांपेक्षां एक सदाभद्री श्रेष्ठ आहे. (५२) सहस्र सदाभद्रींपेक्षां एक काळी निर्गुंडी श्रेष्ठ आहे, सहस्र काळ्या निर्गुंडीपेक्षां एक वृहत्पुष्प श्रेष्ठ आहे. (५३) सहस्र वृहत्पुष्पांपेक्षां एक श्वेतार्क श्रेष्ठ आहे. सहस्र श्वेतार्कांपेक्षां एक बृहद्द्रोण श्रेष्ठ आहे. (५४) सहस्र बृहद्द्रोणांपेक्षां एक सदानील श्रेष्ठ आहे. सहस्र नीलोत्पलांपेक्षां एक स्वर्णपुष्प श्रेष्ठ आहे. (५५) सर्व फुलांच्या जातींमध्यें नीलकमल श्रेष्ठ आहे. जपापुष्प, कदंब, पुन्नाग, (५६) हीं द्रोणपुष्पाच्या तोडीचीं आहेत. मरुक (मरवा) दमन (दवना) बृहत्पुष्पाच्या बरोबरीचीं फुलें समजावींत. विष्णुक्रांता, (५७) अर्कासमान समजावी. मल्लिका जाती धोतऱ्यासमान समजावें. चांफा कर्णिकार, (५८) बिल्वपत्रासमान समजावें. विजयपुष्प, कुब्जक, मालती करवीरासमान समजावें. (५९) पद्मपुष्पासमान बकुल पाटलीपुष्प समजावें. अशोक श्वेतमंदार व्याघ्रकासमान समजावें.(६०)रक्तोत्पल कुमुद अपामार्गासमान (अघाड्यासमान) समजावें. कर्णिकार अगस्ति व्याघ्रपुष्पासमान समजावें. (६१) जपा, कुंद, पुन्नाग द्रोणपुष्पासमान समजावें. मल्लिका अतसी बकपुष्पसमान समजावें (६२) आर्यावर्त, नाग, मयूरशिख हीं फुलें धोतऱ्यासमान समजावींत. महाभद्र-

ज्ञेया महाभद्रतृणे अपि॥६२॥वज्रं च पद्मरागं च मरकं मौक्तिकं तथा॥ इंद्रनीलं महानीलं वैडूर्यं च प्रवालकम् ॥६३॥ नीलोत्पलसमानानि सर्वरत्नानि चैव हि ॥ सिंहकेसरिवालं च कृष्णा तुलसिका तथा ॥६४॥ आक्षोटकं तथा कोलं प्रियालुजाम्ब्वमेव च॥ अर्कपुष्पसमा ज्ञेयाः पूजयेत्तैर्विशेषतः ॥६५॥ पलाशपुष्पं विप्रेन्द्र सविस्मितमुदाहृतम् ॥ नवभाण्डे परिग्राह्य चूर्णैः संपूजयेच्छिवम् ॥६६॥ यवगोधूमनीवारशालिवैणवकानि च ॥ निष्पावमाषश्यामाकनीलकोद्रवमेव च ॥६७॥ एतेषामंकुरैश्चैव पूजयेच्छिवमादरात् ॥ व्याघातसममेवं तु इदमन्यच्छ्रुणुष्व वै ॥६८॥ कदंबार्जुनसिंदूरकुसुंभकुसुमानि च ॥ श्वेतं तु गिरिकर्णी च नंद्यावर्तं तथैव च ॥६९॥ शारि वा कदलीपुष्पं नागनंदि तथैव च ॥ न्हीवेर्याः पत्रपुष्पं च करवीरसमं भवेत् ॥७०॥ मधूकचूतपुष्पं च गण्डूलकुसुमं तथा ॥ सितार्कगिरिकर्णी च धत्तूरकुसमं भवेत् ॥७१॥ शमीपुष्पं कदंबस्य कुसुमं तुल्यमुच्यते ॥ करवीरसमा ज्ञेया जातीविजयपाटलाः॥७२॥नागचंपकपुन्नागधत्तूरकुसमाः स्मृताः ॥ श्वेतमंदारकुसुमं सितपद्मसमं भवेत् ॥७३॥ चंपकं मल्लिका चैव न्हीवेर्यं शंखपुष्पकम् ॥ एतानि पद्मतुल्यानि भक्त्या देयानि शंकरे ॥७४॥

---

तृण, (६३) वज्र, पद्मराग, मरकत, मोती, इंद्रनील, महानील, वैडूर्य, पौंवळें (६४) हे नीलोत्पलासमान समजावें. सर्व रत्न, सिंहकेसरिवाल, कृष्णतुलसी, (६५) अक्षोटक, कोल, प्रियालु, जांबु, हे अर्कपुष्पासमान समजावें, यांनीं विशेषें-करून पूजा करावी. (६६) हे विप्रश्रेष्ठा, पलाशपुष्प अत्याश्चर्यकर आहे. नव्या पात्रांत त्याचें चूर्ण संग्रह करून शिवाची पूजा करावी. (६७) यव, गहूं, नीवार, शालि, वैणवक, निष्पाव, माष ( उडीद ) श्यामाक, नीलक, द्रव (६८) यांच्या अंकुरांनीं शिवाची पूजा आदरानें करावी. व्याघाताबरोबरेंच हें दुसरें सांगतों ऐक. (६९) कदंब, अर्जुन, सिंदूर, कुसुंभपुष्प, श्वेतगिरिकर्णी, नंद्यावर्त, (७०) शारि, कदलीपुष्प, नागनंदी, न्हीवेरीपुष्प हीं फुलें करवीरासमान समजावींत. (७१) मधूक ( मोहाचीं फुलें ), आंब्याचे मोहोर, गंडूलपुष्प, सितार्क, गिरिकर्णी, हीं धोतऱ्यासमान आहेत. (७२) शमीपुष्प कदंबासमान समजावें जाती, विजय, पाटल हीं फुलें करवीरासमान आहेत. (७३) नाग, चांफा, पुन्नाग, हीं फुलें धोतऱ्यासमान आहेत. श्वेतमंदारपुष्प शुभ्रपद्मासमान समजावें. (७४) चंपक, मल्लिका न्हीवेरी, शंखपुष्प हीं पद्मासमान आहेत, हीं फुलें शंकराला भक्तिपूर्वक अर्पण करावींत.

महालिंगपुराणे ॥ ईश्वर उवाच ॥ नार्च्योऽहं कुसुमैर्देवि पुष्पैः पर्युषितैस्तथा ॥ न म्लानैर्नैव दुर्गन्धैर्नागन्धैस्तु सुलोचने ॥७५॥ अन्यैरप्यपवित्रैश्च विरुद्धैर्लोकनिंदितैः॥ अशुद्धदेशजैश्चान्यैर्नैवार्च्योऽहं कदाचन ॥७६॥ शैवे ॥ पुष्पाणि रुचिराण्येव पत्राणि च शिवार्थिनाम् ॥ निर्गंधान्युग्रगंधानि दूषितान्यशिवानि च ॥७७॥ स्वयमेव विशीर्णानि न देयानि शिवार्चने ॥ पतितैर्विकलैर्म्लानैर्विवृतैर्जन्तुदूषितैः॥७८॥आघ्रातैरंगसंस्पृष्टैः पुष्पैरेतैर्न पूजयेत् ॥ गंधवन्त्यपि निंद्यानि क्लिष्टान्युपहतानि च ॥७९॥ गंधहीनमपि ग्राह्यं यत्पवित्रं कुशादिकम् ॥ सात्विकं तद्धि कुसुमं तामसं त्वपवित्रकम् ॥८०॥केशकीटापविद्धानि शीर्णपर्युषितानि च ॥ स्वयं पतितपुष्पाणि त्यजेदुपहतानि च ॥८१॥ मुकुलैर्नार्चयेद्देवमपक्कं न निवेदयेत् ॥ फलं कुत्सितविद्धं च यत्नपक्वमपि त्यजेत् ॥८२॥ क्रियासारे ॥ सदुग्धकण्टकैः पत्रैर्जलजैरपि नार्चयेत् ॥ अतिपक्वैरपक्वैश्च संतप्तैश्छिन्नपल्लवैः ॥८३॥ सकेशकीटरंध्रैर्वा मुक्तपु-

---

(७५) महालिंगपुराणांत सांगितलें कीं, ईश्वर बोलले—हे देवि शिळ्या फुलांनीं माझी पूजा करूं नये. कोमजलेलीं, दुर्गंध निर्गंध अशा फुलांनीं पूजा करूं नये. (७६) दुसऱ्या अपवित्र फुलांनीं विरुद्ध फुलांनीं, लोकानिंदित फुलांनीं, अमंगळ जागेंतल्या फुलांनीं, केव्हांही पूजा करूं नये. (७७) शैवपुराणांत सांगितलें कीं, फुलें असोत, पत्र असो मंगल इच्छा करणाऱ्यानें निर्गंध, उग्रगंध, दूषित, अमंगळ, (७८) स्वतः गळून पडलेलीं, अशीं फुलें शिवपूजेला देऊं नयेत. पडलेलीं विकल झालेलीं कोमेजलेलीं फार फांकलेलीं किडे शिवलेलीं, (७९) वास घेतलेलीं, अंगास स्पर्श केलेलीं, अशा फुलांनीं पूजा करूं नये. निंद्य, क्लिष्ट, हत, अशीं फुलें सुगंध जरी असलीं तरी घेऊं नयेत.(८०) कुश वगैरे गंधहीन जरी आहेत, तरी पवित्र असले तर त्यांचें ग्रहण करावें. अशा फुलांना सात्विक असें ह्मणतात. बाकीचीं फुलें तामस असून त्यांचा त्याग करावा.(८१) केस पडलेलीं, फाटलेलीं चिरडलेलीं, शिळीं झालेलीं, स्वतः पडलेलीं अशा फुलांचा त्याग करावा. (८२)कळ्यांनीं पूजा करूं नये, व अपक्व अन्न नैवेद्य दाखवूं नये. कुजलेलें, फुटलेलें, जुलुमानें पिकविलेलें फल नैवेद्याला ठेवूं नये. (८३) क्रियासारांत सांगितलें कीं, चीक व कांटे असलेल्या पत्रांनीं व कमलांनीं पूजा करूं नये. अतिशय पिकलेलीं, कच्चीं, उन्हानें तापलेलीं, (८४)पानें फाटलेलीं केससहित अस-

ध्यैर्न पूजयेत् ॥अत्रोक्तपत्रपुष्पाणि च्छित्वा तैर्न शिवं यजेत्॥८४॥विना-धत्तूरनीरेजपलाशोत्पलकांचनान् ॥ सनालैः सदलैः पक्वैः प्रत्यग्रैर्नयन-प्रियैः ॥८५॥ पुष्पैर्यथोचितैरेवंविधैराराधयेच्छिवम् ॥८६॥

महालिंगपुराणे ॥ भगीरथ उवाच ॥ कैः पुष्पैः पूजयेद्ब्रह्मन् सर्वलो-केश्वरेश्वरम् ॥ भक्त्या युतो महादेवं तन्ममाख्याहि विस्तरात् ॥८७॥

वसिष्ठ उवाच ॥ शृणु वक्ष्यामि ते राजन् यथा पर्वतकन्यया ॥ कैलासपर्वते पृष्टः पूर्वं गौर्या महेश्वरः ॥८८॥

पार्वत्युवाच ॥ यैः पुष्पैः पूजितो देव प्रीतिमभ्येषि शंकर ॥ मुक्तिं प्रयच्छसि विभो तन्ममाख्यातुमर्हसि ॥८९॥

ईश्वर उवाच ॥ शृणु वक्ष्यामि देवेशि यैः पुष्पैः पूजितो ह्यहम् ॥ प्रिये भक्तिं च मुक्तिं च प्रयच्छामि वरानने ॥९०॥ वल्लभं करवीरस्य पुष्पं प्रथमतः शुभम् ॥ अनंतरं तु पुष्पाणि दुर्लभानि शृणु प्रिये ॥९१॥ धत्तूरार्कपलाशानां सुपुष्पाणीतराणि च ॥ मल्लिका मालती यूथिशत पत्रान्यपाटली॥९२॥कुब्जं च पारती कुंदं रक्तकुंदोऽथ चंपकम् ॥ जपा-

---

लेलीं, किडे असलेलीं, छिद्रें पडलेलीं, गळलेलीं अशा फुलांनीं पूजा करूं नये' येथें सांगितलेलीं फुलें काढून पूजा करावी, त्या निषिद्ध फुलांनीं पूजा करूं नये. (८५) धोतरा, कमल, पळस, उत्पल, कांचन याशिवाय करून नाळसहित, पक्व, नवीन, पाहण्यालायक, (८६) यथायोग्य अशा फुलांनीं शिवाची आराधना करावी.

(८७) महालिंगपुराणांत सांगितलें कीं, भगीरथ बोलला—हे ब्रह्मन्, सर्व लोकांच्या प्रभूची पूजा कोणत्या फुलांनीं भक्तीनें करावी ? हें विस्तारानें सांगा,

(८८) वसिष्ठ बोलले—हे राजा, पूर्वी कैलासामध्यें श्रीशंकराला पर्वतकन्या गौरीनें प्रश्न काय केला होता, तीच हकीकत सांगतों, ऐक.

(८९) पार्वती बोलली—हे देवा, शंकरा, कोणत्या फुलांनीं आपली पूजा केली तर प्रसन्न व्हाल ? आणि मुक्ति द्याल ? हें मला सांगा.

(९०) ईश्वर बोलले--हे देवेशि, कोणत्या फुलांनीं पूजा केली असतां मी प्रसन्न होऊन भुक्ति व मुक्ति देतों, हें सांगतों, ऐक. (९१) प्रथमतः शुभकर करवीर पुष्प मला प्रिय आहे. हे प्रिये, नंतर दुर्लभ फुलें सांगतों, ऐक. (९२) धोतरा, अर्क, पळस यांचीं फुलें व मल्लिका, मालती, यूथी, शतपत्र, पाटली, (९३) कुब्ज, पारती, कुंद, रक्तकुंद, चंपक, जपा, कुरंटक, वाम, बर्बरमूल (बाभळी

कुरटकं चैव वामो बर्बरमूलिका ॥९३॥ तमालकर्णिकारश्च कांचनारस्त थैव च ॥ अशोकागस्तिको रुद्रस्तथा चैवाटरूषकम् ॥९४॥ कदंबो मुचकुंदश्च मुद्गरो गिरिकर्णिका ॥ अगस्तिर्वकुलो धूमो मंदारो बीजपूरकम् ॥९५॥ जलजानां तथा पद्मं रक्तनीले तथोत्तरे ॥ कुमुदं चैव कल्हारं पुंडरीकं तथोत्पलम्॥९६॥एतैः पुष्पैः प्रयत्नेन पूज्योऽहं देवि भक्तितः ॥ प्रत्येकं सर्वपुष्पाणां फलं वक्ष्यामि सुंदरि ॥९७॥ देवानां तु महादेवः सर्वश्रेष्ठतमो यथा ॥ नदीनां जान्हवी यद्वन्मेरुः शिखरिणां यथा ॥९८॥ सर्वस्त्रीणां यथा गौरी यक्षाणां धनदो यथा ॥ मृगाणां च यथा सिंहो नक्षत्राणां यथा शशी ॥९९॥ यथौषधीनामन्नं च पानानाममृतं यथा ॥ शिरो यथा सर्वगात्र इंद्रियाणां मनो यथा ॥१००॥ सर्वेष्वेतेषु पुष्पेषु श्रेष्ठं नीलोत्पलं तथा ॥ नीलोत्पलैस्तु यो लिंगं सुसमर्चयते नरः ॥१०१॥ चंद्रतेजःसमो भूत्वा गणो भवति निर्मलः ॥ रक्तोत्पलैस्तु यो लिंगमर्चयित्वा समाधिना ॥१०२॥ सूर्यकोटिप्रभश्चैव कामरूपी गणो भवेत्॥श्वेतोत्पलैस्तु यो लिंगमर्चयित्वा तु वै नरः॥१०३॥ शुद्धरूपगणो नाम शिवलोके महीयते ॥ पीतोत्पलैस्तु यो लिंगं सम-

---

ची मुळी), (९४) तमाल, कर्णिकार, कांचनार, अशोक, अगस्ति, रुद्र, अटरूप, (९५) कदंब, मुचकुंद, मुद्गर, गिरिकर्णी, अगस्ति, वकुल, धूम, मंदार, बीजपूर, (९६) कमलजातीमध्यें पद्म, रक्तनील कमल, कुमुद, कल्हार, पुंडरीक, उत्पल. (९७) या पुष्पांनीं प्रयत्नपूर्वक भक्तीनें पूजा करावी. हे सुंदरि, सर्व फुलांचें प्रत्येक फल सांगतों, ऐक. (९८) देवांमध्यें महादेव जसा श्रेष्ठ आहे, नद्यांमध्यें जान्हवी जशी, पर्वतांमध्यें मेरु जसा, (९९) सर्व स्त्रियांमध्यें गौरी जशी, यक्षांमध्यें कुबेर जसा, मृगांमध्यें सिंह जसा, नक्षत्रांमध्यें, चंद्रजसा, (१००) औषधींमध्यें अन्न जसें, पानांमध्यें (पिण्याच्या पदार्थांमध्यें) अमृत जसें, सर्व गात्रांमध्यें शिर जसें, इंद्रियांमध्यें मन जसें, (१०१) सर्व यां फुलांमध्यें नीलोत्पल तसें श्रेष्ठ आहे. नीलोत्पलांनीं जो मानव शिवलिंगाची पूजा करतो, (१०२) तो चंद्रासमान तेजस्वी होऊन निर्मल गण होतो. एकाग्रमन करून रक्तोत्पलांनीं जो शिवाची पूजा करतो, (१०३) तो प्राणी कोटिसूर्यांप्रमाणें तेजस्वी होऊन स्वेच्छाविहारी गण होतो. श्वेतोत्पलांनीं श्रीशिवाची पूजा करून मानव (१०४) सुस्वरूपी गण होऊन शिवलोकांत पूज्य होतो. पीतोत्पलांनीं (पिंवळ्या कमलांनीं) समाधान

भ्यर्च्य समाहितः ॥१०४॥ कीर्तिमान् स्वर्गलोके तु गणो भवति शूलधृत् ॥ रक्तकरवीरकुसुमैर्यः शंभोरर्चनं शुभम् ॥१०५॥ कुर्यात्संपूर्णकलां लक्ष्मीं प्राप्नोतु सर्वकालज्ञः ॥ करवीरैर्गंधमयैरक्तैः शुद्धैर्मनोरमैश्चाथ ॥१०६॥ शंकरं पूजयेद्भक्त्या सर्वान्कामानवाप्नुयात् ॥ स्वर्णाभैः करवीरैश्च यो लिंगं सम्यगर्चयेत् ॥१०७॥ अणिमादिगुणैर्युक्तः शिवलोके महीयते ॥ उमामहेश्वरं स्वर्णवर्णाभैः करवीरकैः ॥१०८॥ यः कुंकुमाभैः संपूज्य सर्वान्कामानवाप्नुयात् ॥ शंखकुंदेन्दुधवलैः करवीरैर्मनोरमैः ॥१०९॥ शंकरं पूजयेद्भक्त्या सदाशिवपुरं व्रजेत् ॥ पाटलाभैर्महादेवं करवीरैः प्रपूजयेत् ॥११०॥ सर्वपापविनिर्मुक्तस्तेजस्वी शिववत्सुखी ॥ कुंकुमाभैः सुपुष्पैश्च यो लिंगं च प्रपूजयेत् ॥१११॥ स याति शिवलोकं च भोगान्भुक्त्वा सुनिर्मलान् ॥ सर्वेषां पुष्पजातीनां करवीरं महाफलम् ॥११२॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन सर्वदा पूजयेच्छिवम्॥करवीरैर्मासमेकं शंकरं पूजयेन्नरः॥११३॥शिवभक्तिं लभेद्धीमान् शिवलोकं

---

मनानें इष्टलिंगाची पूजा करून (१०५) कीर्तिमान होऊन स्वर्गामध्यें शूलधारी गण होतो. रक्तकरवीर पुष्पांनीं शंभूची पूजा जो नित्य करतो, (१०६) तो प्राणी सर्वकाल जाणणारा ज्ञानी होऊन संपूर्णकलायुक्त लक्ष्मीचा पति होतो. ( श्रीमान होतो. ) तांबड्या, शुद्ध, सुंदर, सुगंध करवीर पुष्पांनीं (१०७) श्रीशंकराची पूजा भक्तीनें जो करतो, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. पिंवळ्या करवीरांनीं जो इष्टलिंगाची पूजा करतो, (१०८) तो प्राणी आणिमादि ऐश्वर्यांनीं युक्त होऊन शिवलोकांत पूज्य होतो. सोन्यासारख्या करवीरांनीं उमामहेश्वराची पूजा जो करतो, (१०९) व कुंकुमासारख्या करवीरांनीं जो पूजा करतो, तो आपले सर्व मनोरथ पूर्ण करून घेतो. शंख, कुंद, चंद्रासारखे शुभ्र सुंदर करवीर यांनीं (११०) भक्तीनें सदाशिवाची पूजा करतो, तो शंकरपुराला जातो. पाटलीपुष्पासारख्या करवीरांनीं महादेवाची पूजा जो करतो, (१११) तो सर्व पापांपासून मुक्त होऊन तेजस्वी होऊन शिवाप्रमाणें सुख भोगतो. कुंकुमासारख्या उत्तम फुलांनीं जो इष्टलिंगाची पूजा करतो, (११२) तो निर्मल भोगांचा उपभोग घेऊन शेवटीं शिवलोकाला जातो. सर्व फुलांमध्यें करवीर महाफल देणारें आहे. (११३) याकरितां सर्व प्रयत्नांनीं शिवाची पूजा करावी. करवीर पुष्पांनीं एक महिन्यापर्यंत मनुष्यानें शंकराची पूजा केली तर (११४) त्याला शिवभक्तीची प्राप्ति होऊन बुद्धि चांगली मिळून शाश्वत शिवलोक मिळेल. मन ताब्यांत ठेवून शतपत्रांनीं

च शाश्वतम् ॥ शतपत्रैर्महादेवं पूजयेन्नियतात्मवान् ॥११४॥ अणिमादिगुणोपेतां लक्ष्मीं प्राप्नोति शाश्वतीम् ॥ नंद्यावर्तप्रसूनैस्तु यो लिंगं सम्यगर्चयेत् ॥११५॥ कीर्तिमान् ज्ञानवांश्चैव सुखी भवति सर्वदा॥११६॥ वृत्तम् ॥ येऽर्चंति देवं दृढभक्तियुक्ताः सकेसरैः सल्ललितैश्च पूगैः ॥ ते पारिजातद्रुमयुक्तगेहे क्रीडन्ति दिव्याब्दममेयरूपाः ॥११७॥ आरग्वधैर्महादेवं पूजयेद्भक्तिसंयुतः ॥ मृत्युं तरति स ब्रह्मन् श्वेतः कालं यथा तथा ॥११८॥ द्रोणपुष्पैः सकृल्लिंगं पूजयेद्भक्तिसंयुतः ॥ महदैश्वर्यमाप्नोति चान्ते शिवपुरं व्रजेत् ॥११९॥ बृहतीकुसुमैर्भक्त्या यो लिंगं सकृदर्चयेत् ॥ गवामयुतदानस्य फलं प्राप्य शिवं व्रजेत् ॥१२०॥ धत्तूरकैस्तु यो लिंगं सकृत्पूजयते नरः ॥ स गोलक्षफलं प्राप्य शिवलोके महीयते ॥१२१॥ श्वेतरक्तैस्सितैः पीतैः स्वर्णवर्णैर्मनोरमैः ॥ शतवृध्द्या फलं ज्ञेयं धत्तूरैः शंकरार्चनम् ॥१२२॥ उन्मत्तकैस्तु रात्र्यन्ते लिंगपूजां करोति यः ॥ स सूर्यायुतवर्णाभः शिवलोके महीयते ॥१२३॥ अर्चयन्तीह ये लिंगं श्वेतपुष्पैस्तु भाविताः ॥ ते यान्ति परमं दिव्यं

---

महादेवाची पूजा जो करतो, (११५) त्याला अणिमादि ऐश्वर्याची प्राप्ति होते, व शाश्वत लक्ष्मी त्याच्या घरांत नांदते. नंद्यावर्ताच्या फुलांनीं जो शिवलिंगाची पूजा करतो, (११६) तो जगांत कीर्ति मिळवून नेहमीं ज्ञानी व सुखी राहतो. (११७) जे लोक दृढभक्तीनें केसरसहित सुंदर पूगपुष्पांनीं शिवाची पूजा करतात, ते लोक पारिजाताचीं झाडें असलेल्या घरांत असंख्यरूपांनीं सुख भोगतात. (११८) बाहव्याच्या फुलांनीं महादेवाची पूजा भक्तीनें जो करतो, तो प्राणी श्वेत नांवाच्या राजाप्रमाणें कालमृत्यूलाही जिंकितो. (११९) द्रोणपुष्पांनीं एकवार भक्तीनें जो पूजा करितो, तो या लोकांत मोठें ऐश्वर्य भोगून शेवटीं शिवपुराला जातो. (१२०) बृहतीपुष्पांनीं भक्तीनें जो शिवलिंगपूजा करतो, तो हजार गोदानाचें फल मिळवून शेवटीं शिवाजवळ जातो. (१२१) जो प्राणी धोतऱ्याच्या फुलांनीं एकवार शिवलिंगपूजा करतो, तो लक्ष गोदानाचें फल मिळवून शिवलोकाला जातो. (१२२) पांढरीं, तांबडीं, काळीं, पिवळीं, सोन्यासारखीं, सुंदर अशा धोतऱ्याच्या फुलांनीं शंकराची पूजा केली असतां शतपटीनें जास्त पुण्य मिळतें. (१२३) पहांटेच्या वेळेस उत्तम पुष्पांनीं इष्टलिंगपूजा जो करतो, तो दहाहजार सूर्याप्रमाणें तेजस्वी होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (१२४) जे लोक श्वेतपुष्पांनीं इष्टलिंगपूजा करतात, ते लोक श्रेष्ठ, दिव्य, शाश्वत लोकाला जातात

शिवलोकं च शाश्वतम् ॥१२४॥ कदंबकुसुमैश्चैव यो लिंगं संप्रपूजयेत्॥ स याति देहपातेन यत्र शैवमनामयम् ॥१२५॥ ब्रह्मवृक्षभवैः पुष्पैः प्रोक्ष्यते गंधवारिणा॥येऽर्चयन्ति महादेवं ते यान्ति परमां गतिम् ॥१२६॥ श्वेतार्कपुष्पैर्देवेशं पूजयेन्नियतः शुचिः ॥ सर्वज्ञो जायते मर्त्यो ज्ञानवान् स भवेत्सुखी ॥१२७॥ अर्कपुष्पैस्तु यो लिंगं गंधमिश्रैः समर्चयेत् कामरूपगणो भूत्वा शिवलोके महीयते ॥१२८॥ मंदारपुष्पैर्यो लिंगं गन्धमिश्रेण वारिणा ॥ गाणपत्यमवाप्नोति शिवेन सह मोदते॥१२९॥ बकपुष्पैः सुगंधैश्च प्रोक्षितैर्गन्धवारिणा ॥ गाणपत्यमवाप्नोति रुद्रलोके महीयते ॥१३०॥ सिंधुवारैश्च पुष्पैस्तु दूर्वाब्राह्मिसलक्षणैः ॥ अर्चयेद्यः शिवं भक्त्या गाणपत्यमवाप्नुयात् ॥१३१॥ आटरूषकपुष्पैस्तु यो नरः शिवमर्चयेत् ॥ गाणपत्यं भवेद्देवि तस्यैव च वरानने ॥१३२॥ कांचनारस्य कुसुमैः पत्रैः सिंधूरपाण्डुरैः॥एभिस्तु योऽर्चयेल्लिंगं गाणपत्यमवाप्यते ॥१३३॥ सुवर्णकुसुमैर्दिव्यैर्मणिविद्रुमचित्रितैः ॥ येऽर्चयन्ति शिवं भक्त्या नरास्ते स्युर्गणेश्वराः ॥१३४॥ अर्चना कालमल्ली च

---

(१२५) कदंब पुष्पांनीं जो शिवलिंगाची पूजा करतो, तो प्राणी देह सोडल्यानंतर आरोग्यकर शैवपदाला जातो. (१२६) ब्रह्मवृक्षाच्या फुलांनीं व गंधोदकाच्या सेचनानें महादेवाची पूजा जे करतात, ते परम श्रेष्ठ पदाला जातात. (१२७) शुचिर्भूत होऊन रुईच्या पांढऱ्या फुलांनीं नियमानें शिवपूजा जो करतो तो मानव ज्ञानी, सर्वज्ञ, सुखी असा होतो. (१२८) गंध मिसळून अर्कपुष्पांनीं शिवलिंगपूजा जो करतो तो स्वेच्छारूप घेणारा गण होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (१२९) गंधोदकमिश्र मंदार पुष्पांनीं जो पूजा करतो, तो एका गणाचा स्वामी होऊन शिवलोकांत शिवासह सुख भोगतो. (१३०) गंधोदकानें प्रोक्षण करून सुगंध बकपुष्पांनीं जो पूजा करतो, तो गणाधीश होऊन रुद्रलोकांत पूज्य होतो. (१३१) सलक्षण सिंधुवाराच्या फुलांनीं दूर्वांनीं, ब्राह्मीपत्रांनीं जो शिवपूजा करतो तो गणाधीश होतो. (१३२) हे सुंदरी, आटरूषकपुष्पांनीं जो शिवपूजा करतो. तो गणाधीश होऊन सुख भोगतो. (१३३) कांचनाराच्या फुलांनीं, व सिंदूरानें, व पांढऱ्या फुलांनीं ( किंवा सिंदूराच्या रंगाच्या पांढऱ्या रंगाच्या कांचनार फुलांनीं ) जो शिवपूजा करतो, तो गणाधीश होतो. (१३४) दिव्य सुवर्णपुष्पांनीं दिव्य मण्यांनीं, पोवळ्यांनीं जो भक्तिपूर्वक शिवपूजा करतो, तो गणेश्वर होतो. (१३५) अर्चना, कालमल्ली, सुरभि, मंजरी यांच्यावर गंधोदक प्रोक्षण करून जो

सुरभिश्चैव मंजरी ॥ एभिस्तु योऽर्चयेल्लिंगं गन्धचंदनवारिणा ॥१३५॥ स गणत्वमवाप्यैव कामरूपगणो भवेत् ॥ सुगन्धिमालतीपुष्पैर्यस्तु लिंगं प्रपूजयेत् ॥१३६॥ गणो महाबलो नाम शिवलोके महीयते ॥ बंधूकपुष्पैः सौरभ्यैर्यस्तु देवं प्रपूजयेत् ॥१३७॥ महाबलो गणो नाम मोदते शिवसन्निधौ ॥ चंपकैर्वाजिपुष्पैस्तु यो लिंगं सकृदर्चयेत् ॥१३८॥ स गणश्चंपको नाम शिवलोके महीयते ॥ अतिमुक्तैस्तु यो लिंगं पूजयित्वा विधानतः ॥१३९॥ अतिमुक्तगणो नाम रमते स यथेच्छया ॥ यूथिकाभिर्जपापुष्पैर्यस्तु लिंगं प्रपूजयेत् ॥१४०॥ गाणपत्यमवाप्यैव यूथिकः स गणो भवेत् ॥ कुंदजैर्योऽर्चयेद्देवं दर्भपुष्पैः सपत्रकैः ॥१४१॥ हेमकूटगणो नाम मोदते दिवि रुद्रवत् ॥ तिलकैर्बकुलैश्चैव यस्तु लिंगं प्रपूजयेत् ॥१४२॥ बकुलो वै गणो भूत्वा रुद्रस्यानुचरो भवेत् ॥ सर्वपुष्पैः समभ्यर्च्य यत्फलं लभते शिवम् ॥१४३॥ तत्फलं लभते मर्त्यः कर्णिकारस्य पूजने॥जातिपुष्पैः प्रदोषे तु रात्रौ शंभुं प्रपूजयेत् ॥१४४॥ कनकानि कदंबानि रात्रौ देयानि शंकरे ॥ दिवाऽशेषाणि पुष्पाणि ह्यर्ध-

---

शिवलिंगपूजा करतो, (१३६) तो गणाधीश होऊन स्वेच्छारूपानें जगांत फिरतो. सुगंध मालतीपुष्पांनीं जो शिवलिंगपूजा करतो, (१३७) तो महाबल नांवाचा गण होऊन शिवलोकांत पूज्य होतो. सुगंध बंधूकपुष्पांनीं जो देवाची पूजा करतो (१३८) तो महाबल नांवाचा गण होऊन शिवाजवळ आनंदानें राहतो. चंपकपुष्पांनीं ( चांफा ) घोडपुष्पांनीं जो एकवार शिवलिंगपूजा करतो, (१३९) तो चंपकनांवाचा गण होऊन शिवलोकांत पूज्य होतो. अतिमुक्तपुष्पांनीं विधानपूर्वक जो शिवलिंगपूजा करतो, (१४०) तो अतिमुक्तनांवाचा गण होऊन यथेच्छ क्रीडा करतो, यूथिका पुष्पांनीं व जपापुष्पांनीं जो शिवलिंगपूजा करतो. (१४१) तो मानव एका गणावरचा अधिकारी होऊन यूथिक नांवाचा गण होतो. कुंदाच्या फुलांनीं, दर्भांनीं, पत्रांनीं ( पानांनीं ) जो देवाची पूजा करतो, (१४२) तो स्वर्गामध्यें हेमकूट नांवाचा गण होऊन सुख भोगतो. तिलकपुष्पांनीं शिवलिंगपूजा जो करतो; (१४३) तो बकुल नांवाचा गण होऊन स्वर्गांत रुद्राचा अनुचर होऊन राहतो. सर्व पुष्पांनीं पूजा केली असतां जें फल मिळतें, (१४४) तें फल कर्णिकारांनीं पूजा केली असतां मिळतें. जातीच्या पुष्पांनीं प्रदोषकालीं किंवा रात्रीच्या वेळेस शिवाची पूजा करावी. (१४५) कनकपुष्प व कदंबपुष्प रात्रीच्या वेळेस शंकरावर वाहावें दिवसा बाकीचीं फुलें वाहावींत.

रात्रौ च मल्लिका ॥१४५॥प्रहरं तिष्ठते जातिः करवीरमहर्निशम् ॥ स्वयमुत्पाद्य पुष्पाणि यः शिवं पूजयेत्सकृत् ॥१४६॥ तानि साक्षात्प्रगृण्हाति देवदेवो महेश्वरः ॥ यानि यानि च पुष्पाणि स्थलजान्यौदकानि च ॥१४७॥ अर्पयन्ति च ये लिंगे प्रीतो भवति शंकरः ॥ तानि भावेन देयानि सर्वाणि कुसुमानि च ॥१४८॥ गृण्हामि शिरसा देवि योऽपि कश्चिन्निवेदयेत् ॥ एवमेव क्रमेणैव यो नरः पूजयेत्सदा ॥१४९॥ विमुक्तः सर्वपापेभ्यो रुद्रलोकं स गच्छति॥१५०॥ स्कांदे ॥ एकैकस्य तु पुष्पस्य यत्फलं परिकीर्तितम्॥तत्फलस्यानुसारेण ग्रथितैर्द्विगुणं फलम् ॥१५१॥ नीलोत्पलसहस्रेण यो मालां संप्रयच्छति ॥ शिवाय विधिवद्भक्त्या तस्य पुण्यफलं श्रुणु ॥१५२॥ कल्पकोटिसहस्राणि कल्पकोटिशतानि च ॥ वसेच्छिवपुरे श्रीमांच्छिवतुल्यपराक्रमः ॥१५३॥ नीलोत्पलसहस्रेण साष्टकेन शतेन वा ॥ यः पूजां कुरुते भक्त्या स शिवो नात्र संशयः ॥१५४॥ अर्कपुष्पसहस्रेण मालां यः कुरुते शिवे ॥ स तु चार्कस-

---

अर्ध्या रात्रीच्या वेळेस मल्लिका वाहावी. (१४६) जाईचें फूल एक प्रहर ताजें राहतें व करवीर अहोरात्र राहतें. स्वतः फुलें काढून शिवपूजा एकवार जो करतो, (१४७) तीं फुलें साक्षात देवाधिदेव शंकर स्वतः घेतो. जमिनीवर उत्पन्न झालेलीं असो, पाण्यांत उत्पन्न झालेलीं असो, तीं तीं फुलें (१४८) जे लोक शिवास अर्पण करतात, त्यांच्यावर शिवाचें प्रेम वाढतें. कोणतींही फुलें असोत, तीं सर्व फुलें देवावर भाव ठेवून वाहावींत. (१४९) हे देवि, कोणत्याही मनुष्यानें भाव ठेवून फूल वाहिलें तर तें मी आनंदानें घेतों. या क्रमानें जो प्राणी सर्वदा पूजा करतो, (१५०) तो प्राणी सर्व पापांपासून मुक्त होऊन रुद्रलोकाला जातो. (१५१) स्कंदपुराणांत सांगितलें कीं, एका एका फुलाचें जें फल सांगितलें आहे, त्या त्या फुलाला अनुसरून द्विगुण द्विगुण फल मिळतें. (१५२) नीलोत्पल हजार फुलें घेऊन त्यांची माळ करून जो मला ( शिवाला ) भक्तीनें विधिपूर्वक अर्पण करतो, त्याचें पुण्यफल सांगतों, ऐक. (१५३) हजारो कोटिकल्पेंपर्यंत व शेंकडो कोटिकल्पेंपर्यंत शिवपुरांत शिवाच्या बरोबरीनें पराक्रमी होऊन सुखसंपत्ति भोगतो. (१५४) हजार नीलोत्पलांची माळ किंवा एकशेंआठ नीलोत्पलांची माळ करून जो भक्तीनें शिवपूजा करतो, तो शिवच आहे, यांत संशय नाहीं. (१५५) हजार रुईच्या फुलांची माळ शिवाला जो अर्पण करतो, तो सूर्याप्रमाणें तेजस्वी

मो भूत्वा शिवलोकं हि गच्छति ॥१५५॥करवीरकमालाश्च शिवे दत्वा ततः फलम् ॥ कांचनाभः सदा योगी शिवस्य सदनं व्रजेत् ॥१५६॥ धत्तूरकसहस्रेण पूजयेद्यो महेश्वरम् ॥ सदाशिवपुरं प्राप्य नरः स न निवर्तते ॥१५७॥ कुन्दपुष्पसहस्रेण यः पूजयति शंकरम् ॥ इह चामुष्मिके श्रीमान् रुद्रलोके महीयते ॥१५८॥ कमलैश्च सहस्रेण सार्धं सर्वेश्वरं शिवम् ॥ अर्चयेन्नामसाहस्रैर्लभते शांकरं पदम् ॥१५९॥ जातिपुष्पसहस्रेण तथा चाष्टशतेन च ॥ रुद्रं संपूजयेद्भक्त्या रुद्रलोके महीयते ॥१६०॥शिवधर्मे॥अनेकाकारविन्यासैः सुगंधिकुसुमैः सह ॥ शिवस्योपरि यः कुर्यात्सघनं पुष्पमण्डपम् ॥१६१॥ अत्याश्चर्यमहायानैर्दिव्यपुष्पोपशोभितैः ॥ सर्वैः परिवृतः श्रीमान् गच्छेच्छिवपुरं सुखी॥१६२॥ पूजासद्भक्तिविन्यासरचनादिषु सर्वतः ॥ फलमेवं समासेन ज्ञेयं वित्तानुसारतः ॥१६३॥ क्रियासारे ॥ यान्यबध्दानि पुष्पाणि पत्राण्यपि तथैव च ॥ तानि देयानि मन्त्रेण बध्वा शोभार्थमर्चयेत् ॥१६४॥ पट्टदेवांगचीनानां सूत्रं वा तदलाभतः ॥ कार्पासं पुष्पसंदर्भे स्यान्मोचाव-

---

होऊन शिवलोकांत राहतो. ( १५६ ) करवीरांची माळ शिवाला अर्पण केली असतां सोन्यासारखा तेजस्वी होऊन शिवमंदिराला जातो. (१५७) हजार धोतऱ्याचीं फुलें शिवावर जो वाहतो, तो सदाशिवाच्या राजधानीला जाऊन पुनः परत फिरत नाहीं. (१५८) हजार कुंदाच्या फुलांनीं जो शंकराची पूजा करतो, तो यालोकीं व रुद्रलोकीं श्रीमान होऊन पूज्य होतो. (१५९) अर्धनारीनरेश्वर शिवावर भक्तीनें नामसहस्रांनीं हजार कमलें जो वाहतो, तो शंकराच्या पदवीला जातो. (१६०) हजार किंवा एकशेंआठ जाईचीं फुलें घेऊन रुद्राची पूजा भक्तीनें जो करतो, तो रुद्रलोकांत पूज्य होतो. (१६१) शिवधर्मांत सांगितलें कीं,– सुगंध सुगंध फुलें घेऊन अनेक तऱ्हेच्या आकारांनीं दाट पुष्पमंडप शिवावर जो करतो, (१६२) तो प्राणी अत्याश्चर्यकर, व नानातऱ्हेच्या फुलांनीं सुशोभित अशा विमानांत बसून शिवपुराला जातो, तेथें श्रीमान होऊन सुखानें राहतो. (१६३) सर्वत्र भक्तीचा प्रकार व पूजेचा प्रकार असाच असून द्रव्यानुसार संक्षेपानें फल सांगितलें आहे. (१६४) क्रियासारांत सांगितलें कीं, कोठेंही न बांधलेलीं फुलें असोत, पानें असोत, तीं मंत्रानें बांधून शोभेकरितां देवाला अर्पण करून पूजा करावी. (१६५) पट्ट, देवांग, चीन यांचे तंतु हे न मिळाले तर कापूस, किंवा मोचा, अथवा वल्कल हे फुलांच्या ऐवजीं देवावर

ल्कलं तु वा ॥१६५॥ स्कांदे॥आत्मारामोद्भवैर्वापि गिर्यरण्यादिसंभवैः॥ पुष्पैरेतैरथान्यैश्च यथा प्राप्तैर्यजेच्छिवम् ॥१६६॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णये पुष्पलक्षणतत्प्रशंसा नाम सप्तपंचाशोऽध्यायः ॥

---

वाहावें (१६६) स्कंदपुराणांत सांगितलें कीं,– आपल्या खास बागेंत उत्पन्न झालेलीं असोत, किंवा पर्वत अरण्य यांतील आणलेलीं असोत यां फुलांनीं व इतर फुलांनीं शिवाची पूजा करावी.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयांतील पुष्पलक्षण तत्प्रशंसा नांवाचा सत्तावन्नावा अध्याय संपला.



## ॥ अथ अष्टपंचाशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ विल्वापामार्गकौ-चूतो दमनो मरुवोऽर्जुकः ॥दूर्वातुलसिकांकोलो गौरी सुरभिका शमी ॥१॥ मुण्डी कान्तारदवनो भृंगारः पारिभद्रकः ॥ जंवूः कुशाग्रमित्येते प्रशस्ताः पत्रसंग्रहे ॥२॥ ग्रंथान्तरे ॥ विल्वपत्रं तपस्वी च सदाभद्री च धातकी ॥ अपामार्ग कुशा दूर्वा पंचविल्वं शमी तथा ॥३॥ तुलसी च नृपं चैव जंवुकानाह्वंदिका ॥ एकचित्रारविंदं च विष्णुक्रान्ता त-थैव च ॥४॥ सहकारस्तथा कृष्णतुलसी गन्धपत्रिका ॥ एवमादीनि पत्राणि पुत्रवृद्धिकराणि च ॥५॥ उशीरमुख्यऱ्हीवेरीमूलानि शुभदा-नि हि ॥६॥ मार्कण्डेयपुराणे ॥ कपित्थं करमर्दं च शंखिनी गिरिचू-तकम् ॥ सिंधुवारं च पंचैते पंचविल्वाः प्रकीर्तिताः ॥७॥

महालिंगपुराणे ॥ ईश्वर उवाच ॥ प्रथमं विल्वपत्रं स्याच्छमी भृं-गारकं तथा ॥ तुलसी कालतुलसी अरण्यतुलसी तथा॥८॥अपामार्ग-स्तथा दर्भा दूर्वा वै श्यामसी तुला ॥ सहदेवी नागकर्णी द्रोणं वै शंख-पुष्पिका ॥९॥ एताभिः पत्रिकाभिस्तु भक्त्या संपूजितो जनैः ॥ परि-तुष्टः प्रयच्छामि कामानात्मेप्सितांच्छुभान् ॥१०॥ आदित्यपुराणे ॥

---

श्रीशिवास नमस्कार असो क्रियासारांत ईश्वरानें ह्मटलें कीं,--(१) विल्व, अघाडा, चूत (आंबा), दवना, मरवा, अर्जुक, दूर्वा, तुलसी, कांकोल, गौरी, सुरभि, शमी, (२) मुंडी, रानदवना, भृंगार, निंबाचीं फुलें, जंबु, कुशाग्र वगैरे पत्रें प्रशस्त मानिलीं आहेत. (३) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,--बिल्वपत्र, तपस्वी, सदाभद्री, धातकी, अपामार्ग, कुश, दूर्वा, पंचबिल्व, शमी, (४) तुलसी, नृप, जंबुक, वांदिका, एकचित्रा, अरविंद, विष्णुक्रांता, (५) सहकार, कृष्णतुलसी गंधपत्रिका, वगैरे पत्रें पुत्रवृद्धिकर (संततिदायक) आहेत. (६) वाळा, ऱ्हीबेरी, यांच्या मुळ्या शुभदायक आहेत. (७) मार्केडेयपुराणांत सांगितलें कीं,--कपित्थ, (कवठ) करमर्द, शंखिनी, गिरिचूत, सिंधुवार, हीं पंचबिल्वें होत.

(८) महालिंगपुराणांत ईश्वरानें ह्मटलें कीं,--ईश्वर बोलले—मुख्य बिल्वपत्र होय. शमी, भृंगारक, तुलसी, कालतुलसी, रानतुळस, (९) अपामार्ग, दर्भ, दूर्वा, शामसीतुला, सहदेवी, नागकर्णी, द्रोण, शंखपुष्प, (१०) यां, पत्रांनीं भक्तिपूर्वक श्रीशिवाची पूजा करावी, ह्मणजे मी तुष्ट होऊन शुभ असे सर्व मनोरथ पूर्ण करतों. (११) आदित्यपुराणांत सांगितलें कीं, हे नारदा, वाळलेलीं, शिळीं

शुष्कैः पर्युषितैः पत्रैरपि विल्वस्य नारद ॥ पूजयेद्गिरिजानाथं मुच्यते सर्वपातकैः ॥११॥ विल्वपत्रैरखण्डैस्तु पूजयेदिंदुशेखरम् ॥ कृष्णाष्टम्यां संयतात्मा ब्रह्महत्या व्यपोहति ॥१२॥ मातृहा पितृहा वापि युक्तो वा सर्वपातकैः ॥ माघे कृष्णचतुर्दश्यां पूजयेदिंदुशेखरम् ॥१३॥ भक्त्या विल्वदलैर्मौनी हरनाम जपेन्निशि ॥ सर्वपापविनिर्मुक्तो याति शैवं परं पदम् ॥१४॥ स्कान्दे ॥ विल्वपत्रसहस्रैर्यः पूजयेच्छिवमव्ययम् ॥ स रुद्रलोकमाप्नोति शिवेन सह मोदते ॥१५॥ मार्कण्डेयपुराणे ॥ विल्वपत्रैरखण्डैस्तु सकृत्पूजयते शिवम् ॥ सर्वपापविनिर्मुक्तो रुद्रलोके वसेच्चिरम् ॥१६॥ पंचाक्षरेण मंत्रेण विल्वपत्रैः शिवार्चनम् ॥ करोति श्रद्धया यस्तु स गच्छेदैश्वरं पदम् ॥१७॥ विल्वपत्रं तु संगृह्य गंधपुष्पसमन्वितम् ॥ एकेन चार्चयेल्लिंगं विशेषं कथयामि ते ॥१८॥ विल्वपत्रैः सगन्धैश्च पुष्पसंमिश्रितैरपि ॥ अर्चयेद्यो नरो लिंगं स गच्छेत्परमां गतिम् ॥१९॥ रमते च वरस्त्रीणां सहस्रपरिवारितः ॥ स्त्रियोपि गणतां यान्ति व्रतमेतद्धितं परम् ॥२०॥ विल्वपत्रैस्तु सायान्हे शंकरं

---

झालेलीं, अशीं विल्वाचीं जरी पानें आहेत, तरी त्यांनीं शिवपूजा करावी, ह्मणजे सर्व पातकांपासून मुक्त होतो. (१२) मन स्वाधीन ठेवून अखंड बिल्वपत्रांनीं चंद्रशेखराची पूजा कृष्णाष्टमीच्या दिवशीं केली असतां ब्रह्महत्येचें पातक देखील दूर होतें, (१३) मातृघातकी, पितृघातकी, सर्व पातकी जरी आहे, तरी त्यानें माघवद्यचतुर्दशीच्या दिवशीं चंद्रशेखराची पूजा करावी, ह्मणजे तो मुक्त होतो. (१४) मौनपणें भक्तीनें शिवनामाचे जप करीत रात्रींचे वेळेस जो बिल्व शिवास अर्पण करतो तो रुद्रलोकाला जाऊन शिवासह आनंदानें राहतो. (१५) स्कंदपुराणांत सांगितलें कीं, हजार बिल्वपत्रांनीं अव्यय शिवाची पूजा जो करतो तो रुद्रलोकाला जाऊन शिवाबरोबर सुख भोगतो. (१६) मार्कंडेय पुराणांत सांगितलें कीं,—अखंड विल्वपत्रांनीं एकवार शिवपूजा जो करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन रुद्रलोकांत चिरकाल राहतो. (१७) विल्वपत्रांनीं पंचाक्षरमंत्रपूर्वक शिवपूजा जो श्रद्धापूर्वक करतो, तो शैवपदाला जातो. (१८) गंधपुष्पांसह बिल्वपत्र घेऊन एकवार इष्टलिंगपूजा जो करतो, त्याचें विशेष फल सांगतों. (१९) गंध व फूल यांसह विल्वपत्रांनीं जो इष्टलिंग पूजा करतो, तो सद्गतीला जातो, (२०) तेथें हजारो सुंदर सुंदर स्त्रियांशीं सुख भोगतो. स्त्रियांनीं हें व्रत केलें तर त्याही गणांमध्यें मिसळतात (गण पद मिळतें.) (२१) बिल्वपत्रांनीं सायंकालीं एक-

पूजयेत्सकृत् ॥ ऐश्वर्यवान्भवेत्ज्ञानी शिवलोकं स गच्छति॥ २१॥ दूर्वादलैर्महादेवं प्रातःकाले प्रपूजयेत् ॥ सर्वपापविनिर्मुक्तो निर्मलांगो भवेच्चिरम् ॥२२॥ दूर्वाकाण्डैर्महादेवं क्षीरेण स्नाप्य पूजयेत् ॥ सुगंधदेहस्तेजस्वी सद्यः सर्वज्ञतां व्रजेत् ॥२३॥ श्वेतदूर्वादलैः स्निग्धैर्गंधलिप्तैर्मनोहरैः ॥ शंकरं पूजयेद्भक्त्या नंदितुल्यो भवेत्सुधीः ॥२४॥ वृत्तम्॥ दूर्वांकुरैः कुंकुमगंधयुक्तैः संपूजयेच्छ्रीगिरिजापतिं यः ॥निरामयो मृत्युवशं न याति ह्यैश्वर्ययुक्तः शिवलोकमेति ॥२५॥ शतपत्रैः सुगन्धैश्च पूजयेत्पार्वतीपतिम् ॥ तेजस्वी जायते मर्त्यः शिवलोके महीयते ॥२६॥ सूर्योदये महादेवं शतपत्रैः सचंदनैः ॥ अर्चयेद्योगसंयुक्तो गाणपत्यमवाप्नुयात् ॥२७॥ मार्कण्डीकोमलदलैर्यः करोति शिवार्चनम् ॥ राजसूयाश्वमेधाभ्यां यत्फलं तदवाप्नुयात् ॥२८॥ निर्गुण्डीपत्रकैः शंभुं गंधधूपसमन्वितैः ॥ अर्चयेन्मासमेकं तु रुद्रलोके महीयते ॥२९॥ तुलसीदलमात्रेण यः करोति शिवार्चनम् ॥ कुलैकविंशमुध्दृत्य शिवलोके महीयते ॥३०॥ रुद्रं भृंगदलैः स्निग्धैः पूजयेद्विधिवन्नरः ॥ सर्वपापवि-

---

वार शंकराची पूजा जो करतो, तो या लोकांत अनेक ऐश्वर्य भोगून ज्ञान संपादन करून शेवटीं शिवलोकाला जातो. (२२) दूर्वांनीं प्रातःकालीं महादेवाची पूजा जो करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन चिरकाल निर्मल शरीराचा होऊन राहतो. (२३) महादेवाला दूर्वांनीं क्षीराभिषेक घालून जो पूजा करतो, तो प्राणी सुगंध शरीराचा होऊन तात्काळ सर्वज्ञ होतो. (२४) गंधमिश्र मनोहर, श्वेतदूर्वादलांनीं शंकराची पूजा भक्तीनें जो करतो तो बुद्धिमान प्राणी नंदीसमान होतो. (२५) कुंकुमगंधयुक्त दूर्वांकुरांनीं जो पार्वतीवल्लभाची पूजा करतो, तो निरोगी होऊन मृत्यूच्या ताब्यांत जात नाहीं, शेवटीं ऐश्वर्ययुक्त होऊन शिवलोकाला जातो. (२६) सुगंध शतपत्रांनीं ( शंभर दळाच्या कमलांनीं ) पार्वतीपतीची पूजा जो करतो, तो मानव तेजस्वी होऊन शिवलोकांत पूज्य होतो (२७) सूर्योदयाच्या वेळेस चंदनसहित शतपत्रांनीं महादेवाची पूजा जो करतो, तो योगी होऊन गणाधीश होतो. (२८) मार्कंडीच्या कोंवळ्या दळांनीं जो शिवपूजा करतो, तो राजसूय अश्वमेधयज्ञाचें फल पावतो. (२९) गंधधूपासह निर्गुंडीपत्रांनीं एक महिन्यापर्यंत जो पूजा करतो, तो रुद्रलोकांत पूज्य होतो. (३०) तुलसीदलांनीं जो शिवपूजा करतो, तो आपल्या एकवीस कुलांचा उद्धार करून शिवलोकांत पूज्य होतो. (३१) स्निग्ध भृंगदलांनीं विधिपूर्वक रुद्रपूजा

निर्मुक्तः शिवलोके महीयते॥३१॥अपामार्गदलैश्चैव गंधधूपसमन्वितैः॥ गाणपत्यमवाप्नोति शिवेन सह मोदते ॥३२॥ गिरिचूतदलैः स्निग्धैर्वसंते रुद्रमर्चयेत् ॥ रुद्रलोकमवाप्नोति रुद्रस्यानुचरो भवेत् ॥३३॥ शमीपत्रैस्तु यो लिंगं गन्धधूपसमन्वितम् ॥ अर्चयेन्मासमेकं तु गणो भवति शूलधृत् ॥३४॥ दमनेनैव यो लिंगं पूजयेद्भक्तिभावितः ॥ गणो दमनको नाम रमते सुरपूजितः ॥३५॥ मरुकेनैव यो लिंगं पूजयेद्भक्तिभावितः ॥ मरुद्गणो महावीर्यः पूज्यतेऽमरसंचयैः ॥३६॥ मात्सीदलैर्मनोज्ञैश्च पूजयेच्छिवमव्ययम् ॥ महदैश्वर्यमाप्नोति शिवसायुज्यतां व्रजेत् ॥३७॥ अलाभे च तु पुष्पाणां पत्राण्यपि निवेदयेत् ॥ पत्राणामप्यलाभे तु फलान्यपि निवेदयेत् ॥३८॥ फलानामप्यलाभे तु तृणगुल्मौषधीरपि ॥ औषधीनामलाभे तु मूलेनैव प्रपूजयेत् ॥३९॥ मूलानामप्यलाभे तु भक्त्या भवति पूजितः ॥४०॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णये पत्रलक्षणतन्माहात्म्यं नामाष्टपंचाशोऽध्यायः ॥

---

जो करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (३२) गंधधूपासह अपामार्ग दलांनीं जो पूजा करतो, तो गणाधीश होऊन शिवाबरोबर सुख भोगतो. (३३) वसंतकालांत स्निग्ध गिरिचूत (रान आंब्याच्या) दलांनीं रुद्रपूजा जो करतो, तो रुद्रलोकाला जाऊन रुद्राचा अनुचर होऊन राहतो. (३४) गंधधूपासह शमीपत्रांनीं एक महिन्यापर्यंत जो लिंगपूजा करतो, तो शूलधारी गणाधीश होतो. (३५) भक्तीनें दवनानें इष्टलिंगपूजा जो करतो, तो दमनक नांवाचा गण होऊन देवांनीं पूजित होऊन सुख भोगतो. (३६) भक्तीनें मरव्यानें पूजा जो करतो, तो महापराक्रमी मरुद्गण होऊन देवादिकांनीं पूज्य होतो. (३७) सुंदर मात्सीदलांनीं अव्यय शिवाची पूजा जो करतो, तो मोठें ऐश्वर्य भोगून शिवसायुज्याला पावतो. (३८) फुलें सांपडलीं नाहीं तर पत्रांनीं शिवपूजा करावी. पत्रांच्या अभावीं फल नैवेद्याला ठेवावें. (३९) फलें मिळालीं नाहीं तर औषधी समर्पण कराव्या. औषधी सांपडल्या नाहीं तर मुळ्यांनीं पूजा करावी(४०) मुळ्या सांपडल्या नाहीं तर केवळ भक्तीनें शिवपूजा करावी.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचार निरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयांतील पत्रलक्षण तन्माहात्म्य कथननांवाचा अठ्ठावन्नावा अध्याय संपला.

## ॥ अथ एकोनषष्ठितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ हेम्ना रौप्येण ताम्रेण रीत्या लोहेन वापि च ॥ धूपप्रदीपपात्रे द्वे कारयेत्सह लक्षणैः ॥१॥ धूपपात्रोन्नतं सर्वं सार्धाष्टांगुलकं स्मृतम् ॥ पात्रं डमरुकाकारं सपिधानं सनालकम् ॥२॥ पादमात्रमुखव्यासं समानं चतुरंगुलम् ॥ द्व्यंगुलं तयोस्तुंगं तन्मध्यग्रीवमंगुलम् ॥३॥ एवं डमरुकाकारं ग्रीवे नालं प्रकल्पयेत् ॥ नालायतं नालमात्रं मणिशेखरभूषितम् ॥४॥ ऋजु वा कुटिलं वापि यथा शोभं तु कारयेत् ॥व्यासोन्नतं पिधानस्य पात्रवत्परिकल्पयेत्॥५॥पादांगुलं तदूर्ध्वं तु शेषं च शिखरं घनम् ॥पात्रपादं पिधानं च सर्वं चषकवत् स्मृतम्॥६॥घनं तस्य समस्तस्य यवमात्रं प्रकीर्तितम् ॥ पिधाने धूमनिर्गत्यै रंध्राणि विदधीत षट् ॥७॥ लक्षणं धूपपात्रस्य समाख्यातं चतुर्मुख ॥ सार्धं तु त्र्यंगुलं व्यासं पात्रस्य द्व्यंगुलोन्नतम् ॥८॥ तस्यांघ्रिविस्तरोत्सेधं तद्वदेकांगुलं गलम् ॥ पिधानं

---

श्रीशिवास नमस्कार असो–क्रियासारांत सांगितलें कीं, ईश्वर बोलले-(१) सोनें, रुपें, तांबें, रीति (पितळ), लोह, या धातूंचीं सलक्षण धूपदीपपात्रें करावीं. (२) धूपपात्र उंच केलेलें असावें, त्याचें प्रमाण साडेआठ बोटें असावें. तें पात्र डमरूच्या आकाराचें केलेलें असून झाकणासह नाळासह केलेलें असावें. (३) एकचतुर्थांश त्याच्या मुखाचा व्यास केलेला असून सरळ चार बोटें केलेलें असावें. त्या दोहोंची उंची दोन बोटांची असून त्याच्यामध्यें गळा एक बोटाचा असावा. (४) याप्रमाणें डमरूच्या आकाराचें करून त्याच्या गळ्यांत नाळ करावा. नालाचा विस्तार नालप्रमाणें करून त्याच्या भोंवती चांगले चांगले मणि लावलेले असावेत. (५) सरळ किंवा वांकडे जसें सुशोभित दिसेल तसें करावें. पात्राच्या उंचीच्या व्यासाप्रमाणेंच झाकणाचा व्यास केलेला असावा. (६) त्याच्यावर एकचतुर्थांशप्रमाणानें शिखर करून तें जाड केलेलें असावें. पात्राचे पाय व झांकण चाषाप्रमाणें करावें. (७) त्याची जाडी एका यवाएवढी केलेली असावी. धूर निघून जाण्याकरितां झाकणावर सहा छिद्रें केलेलीं असावींत. (८) हे ब्रह्मदेवा, धूपपात्राचें लक्षण तुला सांगितलें. पात्राचा साडेतीन बोट व्यास करून दोन बोट उंच करावें. (९) त्याच्या पायाची उंची त्याप्रमाणेंच करून एक बोट प्रमाण गळा करावा. झाकण, शिखर, नाळ, जाडी, छिद्रें पूर्वीप्रमाणेंच करा.

शिखरं नालं घनं रंध्राणि पूर्ववत् ॥९॥ एवं वा कारयेद्भक्त्या धूपपात्रं ह्युत्तमम् ॥ पात्रस्यैवं पिधानं स्यादलाभे मृण्मयं तु वा ॥१०॥ कालागरोर्गंधसारो गुग्गुलश्च सितागरुः ॥ लाक्षाबिल्वफलं सर्पिर्मधु सर्जरसं शशी ॥११॥ साधनानि दशैतानि धूपस्य चतुरानन ॥१२॥ वीरतन्त्रे ॥ धूपं दद्यात्तु विप्रेंद्र धूपपात्रे विशेषतः ॥ सितारं वाथ निक्षिप्य यथा वित्तानुसारतः ॥१३॥ शिवधर्मे ॥ वियुक्तगंधमशुभं दुर्गंधं जन्तुसंयुतम् ॥ दहेन्न नाश्यनिर्यासं ममाग्रे वृक्षजं क्वचित् ॥१४॥ क्रियासारे॥ चंदनागरुकोष्ठं च नखं सर्जं कचोरकः ॥ एतद्गुडसमानेन धूपो भवति चोत्तमः ॥१५॥ शर्करा नखगंधं च जटामांसि लघुः समम् ॥ क्षौद्रेण सह संमिश्रं धूपो भवति चोत्तमः॥१६॥वृत्तम् ॥ अगरुतगरुकोष्ठं शैलजं शर्करा स्यादभयघनपुरं यच्चंदनैलाः सलाक्षाः ॥त्वचनखरमुशीरं मांसिकर्पूरधारा सरलजलकचोरं जातियुक् धूपराजः॥१७॥ वीरतंत्रे ॥ एकभागं तु कर्पूरं लोहं भागचतुष्टयम् ॥ चंदनं चैव षड्भागं वानरं सप्तभागकम् ॥१८॥ मधुना सेचयेत्तत्र धूपपात्रे विनिक्षिपेत् ॥ देवदारुं नमेरुं च

---

वींत. (१०) याप्रमाणें तरी पाहण्यालायक धूपपात्र भक्तीनें करावें. पात्राचें पिधान (झाकण) असें केलेलें असावें अशा पात्राच्या अभावपक्षीं मातीचें तरी करावें. (११) कालागरु, चंदनाची भुकटी, गुग्गुळ, श्वेतागरु, लाक्षा, विल्वफल, तूप, मध, सर्जरस, शशी (१२) अशीं दहा साधनें धूपाचीं होत. हे ब्रह्मदेवा, असें धूपपात्राचें लक्षण होय. (१३) हे ब्राह्मणश्रेष्ठा, विशेषेंकरून धूपपात्रांत धूप घालून धूपार्ति करावी. द्रव्यानुसार सितार (पांढऱ्या रुईचें चीक ) ठेवून धूप दाखवावा. (१४) शिवधर्मांत सांगितलें की, गंध नसलेलें, अशुभ, दुर्गंध, किडे असलेलें असें वृक्षाचें चीक माझ्यापुढें केव्हांही जाळूं नये. (१५) क्रियासारांत सांगितलें कीं,--चंदन अगरु, कोष्ठ, नख, सर्ज, कचोरा या पदार्थांत गूळ घालून उत्तम धूप तयार करावा. (१६) साखर, नखगंध, जटामांसी, लघु, (कृष्णागरु) यामध्यें मध घातला असतां उत्तम धूप तयार होतो. (१७) अगरु, तगर, कोष्ठ, शैलज, (शिलाजित) साखर, अभया (वेखंड), चंदन, वेलची, लाक्षा, त्वचा, नख, वाळा, जटामांसी, कापूर, कचोरा यांमध्यें जाई मिसळून तयार केला असतां श्रेष्ठ धूप होतो. (१८) वीरतंत्रांत सांगितलें कीं,--एक भाग कापूर, चार भाग लोह, चंदन सहा भाग, नर (कस्तूरी मरवा) सात भाग, (१९) असे पदार्थ मिसळून त्यांत मध घालून धूपाच्या पात्रांत धूप घालावा. देवदारु, नमेरु (सुरूचाडिक)

सर्जः श्रीवासकुंदुरम् ॥१९॥ श्रीफलं चाज्यसंमिश्रं धूपं दद्याच्छिवस्य तु ॥२०॥ पारमेश्वरतंत्रे ॥ चंदनागरुकर्पूरकोष्ठं गुग्गुलचूर्णकैः॥ घृतेन मधुना चैव सिद्धो धूपः प्रशस्यते ॥२१॥ वृत्तम्॥ मांसी गुग्गुलदेवधूपविजयास्तुल्याश्चतुर्भिर्घनं भागैर्द्वादशभिर्गुडं समुदितं कोष्ठं तदर्धं भवेत् ॥ शैलेयं द्विगुणं द्विभागमुदिता लाक्षा नखं पंचभिस्सर्वैः संमिलितं वदंति विबुधा धूपं दशांगाह्वयम् ॥२२॥ पंचांगधूपमथवापि दशांगधूपं दत्वा घृताक्तमथ गुग्गुलमीश्वराग्रे ॥ सर्वामिमां वसुमतीं धनधान्यपूर्णां दत्वा फलं भवति यत्तदवाप्यमाहुः ॥२३॥ लैंग्ये ॥ कृष्णागरुसमुद्भूतं सर्वपापनिकृंतनम् ॥ गुग्गुलप्रभृतीनां च धूपानां च निवेदने॥२४॥ सर्वरोगक्षयश्चैव चंदनं सर्वसिद्धिदम् ॥ सौगंधिकं तथा धूपं सर्वकामार्थसाधकम् ॥२५॥ श्वेतागरूद्भवश्चैव तथा कृष्णागरूद्भवः ॥ सौम्यः सितारधूपश्च साक्षान्निर्वाणसिद्धिदः ॥२६॥ कृष्णागरुर्मुक्तिदो हि श्वेतः पुष्टिविवर्धनः ॥ चंदनं सर्वदं विद्धि कर्पूरेण समन्वितम् ॥२७॥ सौगंधिकं मुने धूपं सर्वकामार्थसाधकम् ॥ अन्येऽपि च सुगंधा ये श्रीख-

---

सर्ज, श्रीवास (चंदन) कुंदुर, (ग्रंथिकद्रव्य) (२०) श्रीफल, (वेलफल) यांत तूप घालून शिवाला धूपार्ति करावी. (२१) पारमेश्वरतंत्रांत सांगितलें कीं,--चंदन अगरु, कापूर, कोष्ठ, गुग्गुळ, यांमध्यें गायीचें तूप मध घालून तयार केला असतां उत्तम धूप होतो. (२२) जटामांसी, गुग्गुळ, देव धूप, (सर्जरस) विजया (हिरडा) हे प्रत्येकीं चार चार भाग घालून बाराभाग गूळ घालून त्याच्या निम्यानें कोष्ठ घालावें. दुप्पट शैलेय (शिलाजित) घालून दोन भाग लाख घालून नख पांच भाग घालून सर्व पदार्थ मिसळावे, याला पंडित लोक दशांग धूप ह्मणतात. (२३) पंचांग किंवा दशांग धूप घृतमिश्र व गुग्गुळमिश्र करून ईश्वराला दाखवावा. धनधान्यपूर्ण सर्व पृथ्वीचें दान केलें तर काय पुण्य मिळावें तें या धूपानें मिळतें, असें सांगतात. (२४) लिंगपुराणांत सांगितलें कीं,--कृष्णागरूचा धूप सर्व पापांचा क्षय करतो. गुग्गुळ वगैरेचे धूप दाखविले तर (२५) सर्व रोगांचा क्षय होतो. चंदनानें सर्व सिद्धि मिळतात. सौगंधिक धूपानें सर्व मनोरथ पूर्ण होतात. (२६) श्वेतागरूचा, कृष्णागरूचा, सिताराचा हे धूप प्रत्यक्ष मोक्षसिद्धि देणारे आहेत. (२७) कृष्णागरूपासून मुक्ति मिळते, श्वेतागरूपासून पुष्टि मिळते, चंदन कापुरापासून सर्व मनोरथ पूर्ण होतात, व सर्व सिद्धि मिळतात. (२८) हे मुने, सौगंधिक धूपापासून सर्व मनोरथ पूर्ण होतात. इतर श्रीखंड वगैरे सुगंध धूप

ण्डागरुसंज्ञिताः ॥२८॥ धूपाः सशर्करा देया मां वशीकर्तुमिच्छता ॥२९॥ शिवधर्मे ॥ अगरुं देवदारुं च सर्जं श्रीवासकुंदुरुम् ॥ श्रीफलं चाज्यसंमिश्रं दग्ध्वाऽऽप्नोति परां श्रियम् ॥३०॥ एभ्यः सौगंधिकं धूपं षट्सहस्रगुणोत्तरम् ॥ अगरुर्दशसाहस्रं द्विगुणं चासितागरुः ॥३१॥ गुग्गुलुर्दशसाहस्रं साज्यं तद्द्विगुणं भवेत् ॥ प्रियश्च गुग्गुलुर्नित्यमाज्ययुक्तो विशेषतः ॥३२॥ द्वे सहस्रे फलानां तु महिषाक्षस्य गुग्गुलोः ॥ दग्ध्वाऽब्दमाज्यसंमिश्रं शिवतुल्यः प्रजायते ॥३३॥ गुग्गुलुं घृतसंयुक्तं साक्षाद्गृण्हाति शंकरः ॥ मासार्धमात्रदानेन शिवलोके महीयते ॥३४॥ कृष्णपक्षे चतुर्दश्यां यः पूज्यं गुग्गुलुं दहेत् ॥ अपराधसहस्रैकमिहामुत्र कृतं क्षमेत् ॥३५॥ लैंग्ये ॥ धूपानां गुग्गुलुः श्रेष्ठः सद्यो भवति दुर्लभः ॥ प्रीत्यर्थं देवि तस्मान्मे सघृतं गुग्गुलुं दहेत् ॥३६॥ एकपादपुराणे ॥ गुग्गुलुं घृतसंयुक्तं लिंगमभ्यर्च्य यो दहेत् ॥ वर्षकोटिसहस्रं तु रुद्रलोके महीयते ॥३७॥ महिषाक्षं घृतयुतं लिंगमभ्यर्च्य यो दहेत् ॥ स-

---

(२९) शर्करामिश्रित द्यावेत. ह्मणजे मी त्यांना वश होतों. (३०) शिवधर्मांत सांगितलें कीं,--अगरु, देवदार, सर्ज, श्रीवास (चंदन) कुंदुर, (ग्रंथिक द्रव्य) श्रीफल यांत तूप घालून देवापुढें जाळिलें असतां सर्व संपत्ति मिळते. (३१) या सौगंधिक पदार्थांच्या धूपानें सहाहजार पटीनें गुण मिळतात. अगरूपासून दहा हजार पटीनें गुण मिळतात. कृष्णागरूपासून त्याच्या दुपटीनें गुण मिळतात. (३२) गुग्गुळापासून दहाहजार पटीनें गुण मिळतात. त्यांत तूप घालून जाळिलें असतां दुपटीनें फल मिळतें. गुग्गुळ नेहमीं देवाच्या आवडीचें आहे, त्यांत तूप घातलेस विशेष फलदायक होईल. (३३) महिषाक्ष नांवाच्या गुग्गुळापासून दोन हजारपट फल मिळतें. असें एक वर्ष जाळिलें तर तो शिवाच्या योग्यतेचा होतो. (३४) घृतमिश्र गुग्गुळ साक्षात (प्रत्यक्ष) होऊन शिव घेतो. एक पंधरवड्यापर्यंत जाळिलें तर शिवलोकांत मान मिळतो, (३५) कृष्णपक्ष चतुर्दशीच्या दिवशीं जो श्रेष्ठ गुग्गुळ जाळतो, त्याचे अपराध इहलोकींचे हजारो असले तरी शिव त्याच्या वर क्षमा करतो. (३६) लिंगपुराणांत सांगितलें कीं,--धूपांमध्यें गुग्गुळ श्रेष्ठ असून तात्काळ दुर्लभ फल देतें. हे देवि, माझ्या प्रीतीकरितां घृतसहित गुग्गुळ जाळावें. (३७) एकपादपुराणांत सांगितलें कीं,--इष्टलिंगपूजा करून तुपासहित गुग्गुळ जो देवापुढें जाळतो, तो हजारकोटि वर्षपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (३८) शिवलिंगपूजा करून महिषाक्ष गुग्गुळ तुपासह जो जाळतो,

गणः शिवलोके तु गणकोटिभिरावृतः ॥३८॥ बैल्वं तु घृतसंयुक्तं धूपं दद्यान्महेश्वरे ॥ पूजिते च महादेवि शृणु तस्यापि यत्फलम् ॥३९॥ गवां कोटिप्रदानस्य दत्तस्य लभते फलम् ॥४०॥ आदित्यपुराणे ॥ सघृतं सर्जिधूपं च लिंगमभ्यर्च्य यो दहेत् ॥ सप्तजन्मकृतं पापं भस्मीभवति तत्क्षणात् ॥४१॥ अगरुं घृतसंयुक्तं लिंगमभ्यर्च्य यो दहेत् ॥ सगणः शिवलोके तु पूज्यते गणकोटिभिः ॥४२॥ शिवधर्मे ॥ अगरुं घृतसंयुक्तं दद्याद्बैल्वमथापि वा ॥ अग्निष्टोमस्य यज्ञस्य फलं प्राप्नोति मानवः ॥४३॥

शैवे धर्मसंहितायाम् ॥ सनत्कुमार उवाच ॥ श्रुतमेतत्त्वया ख्यातं भगवन्नंदिकेश्वर ॥ पुष्पैः संपूज्य पुण्यं च वद धूपनिवेदनात् ॥४४॥

श्रीनंदिकेश्वर उवाच ॥ कृष्णागरूद्भवं धूपं दत्वा रुद्राय पिंगलः ॥ गाणपत्यं दृढं प्राप्तो वाराणस्यां महामुने ॥४५॥

सनत्कुमार उवाच॥कः पिंगलः कस्य सुतः किं फलं लब्धवान्प्रभो॥ कृष्णागरूद्भवं धूपं दत्वा रुद्राय मे वद ॥४६॥

---

तो कोट्यावधि गणांनीं युक्त होऊन शिवलोकांत गण होऊन फिरतो. (३९) घृतयुक्त बिल्व देवापुढें जाळावें. महादेवि, असें पूजिलें असतां त्याचें फल काय प्राप्त होतें, तें सांगतों, ऐक. (४०) कोटगायी दिल्या तर काय पुण्य मिळावें, तें पुण्य मिळतें. (४१) आदित्यपुराणांत सांगितलें की,--लिंगपूजा करून घृतसहित सर्जधूप जो जाळतो, त्याचें सातजन्मीचें पातक तात्काळ जळून जातें. (४२) लिंगपूजा करून घृतयुक्त अगरु जो जाळतो, त्याची पूजा शिवलोकांत कोट्यावधि गण करतात. (४३) शिवधर्मांत सांगितलें कीं,--घृतयुक्त बिल्व जो जाळतो, व अगरु जाळतो, त्या मानवाला अग्निष्टोमयज्ञाचें फल मिळतें.

(४४) शैवपुराणांतील धर्म संहितेंत सांगितलें की,--सनत्कुमार बोलला--हे नंदिकेश्वरा, तूं सांगितलेलें सर्व ऐकिलें, फुलांनीं देवाची पूजा करून धूप निवेदन केलें असतां काय पुण्य मिळतें ? हें सांगा.

(४५) नंदिकेश्वर बोलले--रुद्राला कृष्णागरु धूप निवेदन करून वाराणसी क्षेत्रांत पिंगल नांवाचा मानव गणाधीश झाला.

(४६) सनत्कुमार बोलला—पिंगल कोण ? कोणाचा मुलगा ? त्याला फल काय मिळालें ? कृष्णागरु धूप निवेदन त्यानें कसें केलें, त्यापासून फल कसें मिळालें ? हें सर्व सांगा.

श्रीनंदिकेश्वर उवाच ॥ पूर्णभद्रसुतो यक्षः पिंगलः पीतलोचनः ॥ जन्मप्रभृति देवेशं पूजयामास शंकरम् ॥४७॥ गन्धैः पुष्पैस्तथा धूपैर्विविधैः पायसादिभिः ॥अर्घ्यैरन्यैर्यथान्यायं मनसा कर्मणा गिरा ॥४८॥ पितरं वंचयित्वा तु ध्यानेन च धनेन च ॥ पूर्णभद्रोऽपि यक्षेंद्रो दृष्ट्वा पुत्रमुपस्थितम् ॥४९॥ प्रोवाच प्रदहन्नेव नेत्राभ्यामिव पापधीः ॥ ब्रह्मणा विहितं कर्म नैतद्वृत्तं सतामिदम् ॥५०॥ विहितं दुर्जनानां वै यक्षाणामीदृशं शुभम् ॥ कुर्वन् त्यक्त्वा स्वकं कर्म विप्राणां पुरुषाधमः ॥५१॥ जन्तुर्नरकगामी स्याद्धनहानिमवाप्य च ॥ तस्मान्नार्हसि यक्षाणां कुरु वृत्तं महामते ॥५२॥ विप्राणामीदृशं वृत्तं कर्तुं पिंगललोचन ॥ यदि मद्वचनं वाच्यं कृतं चेदीदृशं त्वया ॥५३॥ वृत्तिं वृत्तिमतां श्रेष्ठ त्यक्त्वा मां गंतुमर्हसि ॥ अन्यत्र पिंगलाद्यत्वं गंतुमर्हसि सांप्रतम् ॥५४॥

श्रीनंदिकेश्वर उवाच ॥ श्रुत्वा पितुस्तथा वाक्यं पिंगलः परमार्थवित् ॥ प्रोवाच पितरं प्रेक्ष्य गमिष्यामीति दुर्मतिम् ॥५५॥ वाराणस्यां

---

(४७) श्रीनंदिकेश्वर बोलले—पूर्णभद्र नांवाच्या यक्षाचा तो मुलगा असून त्याचे डोळे पिवळे होते. त्याचें नांव पिंगल असें होतें. त्यानें जन्मापासून श्रीशिवाची पूजा केली होती. (४८) गंध, पुष्प, धूप, विविध पायस समर्पण, अर्घ्य समर्पण, वगैरे साधनांनीं काया वाचा मनेंकरून विधिपूर्वक त्यानें पूजा केली होती. (४९) पित्याला न सांगतां शिवाचें ध्यान करावें, धन द्यावें असें कर्म तो करीत होता. पूर्णभद्र यक्षानें आपल्या मुलाला पाहून (५०) करड्या नजरेनें पाहत त्या पाप्यानें ह्मटलें कीं, ब्रह्मदेवानें सांगितलेलें हें कर्म सज्जनांचें नव्हे. (५१) दुर्जनयक्षांकरितां त्यानें हें केलें आहे. ब्राह्मणांचें हें शुभकर्म असून नीच माणसा प्रमाणें आपलें कर्म सोडून (५२) हें कर्म केलें तर प्राणी निर्धन होऊन शेवटीं नरकाला जातो. याकरितां तूं हें कर्म करूं नकोस. हे महामते, यक्षांना उचित असें कर्म कर. (५३) हे पिंगलनेत्रा, असलें हें ब्राह्मणाचें कर्म करावयास प्रवृत्त झालास, जर माझें सांगणें तुला ऐकावयाचें नसेल तर आणि असेंच करावयाचें असेल तर, (५४) हे पिंगला, ही यक्षवृत्ति सोडून व मला सोडून वाटेल तिकडे तूं जा. सांप्रत माझ्याजवळ न राहतां दुसऱ्या ठिकाणीं कोठेंतरी जा.

(५५) श्रीनंदिकेश्वर बोलले—परमार्थ जाणणाऱ्या पिंगलानें आपल्या बापाचें वाक्य ऐकून पित्याकडे पाहून ह्मटलें कीं, हे ताता येथून निघून दुसरीकडे जातो. (५६) असें ह्मणून वाराणसी क्षेत्राला जाऊन तेथें तो तापसी संचार करूं लागला.

पिंगलो वै विचचार तपोधनः ॥ पिंगलोऽपि महादेवं प्रतिष्ठाप्य यथाविधि ॥५६॥ संपूजयन् ददौ धूपं मुने कृष्णागरूद्भवम् ॥ मासार्द्धमात्रं विधिना मधुकर्पूरसंयुतम् ॥५७॥ कृष्णागरूद्भवेनैव धूपेन परमेश्वरः॥ सोमः सनंदी भगवान् ददौ दर्शनमीश्वरः ॥५८॥ पिंगलोऽपि तदा दृष्ट्वा सोमं सगणमीश्वरम् ॥प्रणम्य शिरसा भूमौ तुष्टाव च कृतांजलिः॥५९॥ नमः सर्वात्मने तुभ्यं सर्वज्ञाय महात्मने ॥ सर्वगाय शरण्याय शर्वाय शिवमूर्तये ॥६०॥ शांताय शांतिरूपाय शांतानां शांतिदायिने ॥ शांतानामपि शान्ताय शान्तस्थानाय ते नमः ॥६१॥ क्रुद्धाय क्रुद्धरूपाय क्रुद्धैश्चैव वृताय ते ॥ शूलिने नीलकण्ठाय निर्मलाय नमो नमः ॥६२॥ कालाग्निमृत्यवे साक्षात्कालकामांगहारिणे ॥ कांतार्धरूढदेहाय पंचवक्त्राय ते नमः ॥६३॥ भानुकंपाय सोमांगपेषकाय पिनाकिने ॥ ब्रह्मणश्च शिरोहर्त्रे यज्ञस्य च महात्मनः ॥६४॥ शक्रस्य च भुजस्तंभहेतवे परमेष्ठिने ॥ पुरुषाय पुराणाय अव्यक्ताय नमो नमः ॥६५॥ षड्विंशाय नमस्तुभ्यं षड्भेदागमकारिणे ॥ तत्तच्छास्त्रोक्तमार्गेण तस्मिन् तस्मिस्स्तुताय ते ॥६६॥ पंचमंत्रशरीराय पंचमस्यापि हेतवे ॥ पंचाशद्वर्णदे-

---

तेथें पिंगलानें विधानपूर्वक महादेवाची प्रतिष्ठापना केली. (५७) हे मुने, कृष्णागरूचा धूप देवालां देऊं लागला. एक पक्षपर्यंत मध कापरासह विधिपूर्वक देऊं लागला. (५८) कृष्णागरूच्या धूपाच्या योगानें उमासहित नंदीसह श्रीशंकरानें त्या पिंगलाला दर्शन दिलें. (५९) गणसहित उमासाहित परमेश्वराला पाहून शिरसा भूमीवर नमस्कार करून हात जोडून त्यानें परमेश्वराची स्तुति केली. (६०) सर्वात्मन्, महात्म्या, सर्वगा, शरण्या, शर्वा, शिवमूर्ते, तुला मी नमस्कार करितों. (६१) शांता, शांतिरूपा, शांत लोकांना शांतिदायका, शांत लोकांत शांतरूपा, शांतस्थाना, तुला नमस्कार करतों. (६२) क्रुद्धा, क्रुद्धरूपा, क्रुद्धलोकांनी युक्ता, शूलिन्, नीलकंठा, निर्मला, तुला वारंवार नमस्कार असो. (६३) कालाग्निमृत्यो, काला, कामसंहारा, अर्धनारीनटेश्वरा, पंचवक्त्रा, तुला नमन असो, (६४) भानुकंपा, सोमांगपेषका, पिनाकिन्, ब्रह्मशिरसंहारा, यज्ञध्वंसका, महात्म्या, तुला नमन असो. (६५) शक्रभुजबंधना, परमेष्ठिन्, पुरुषा, पुराणा, अव्यक्ता, तुला नमन असो. (६६) षड्विंशा, तुला नमन असो. षट्भेदागमकारिन्, त्या त्या शास्त्रांत सांगितलेल्या मार्गानें त्या त्या ठिकाणीं स्तुत झालेल्या देवा, तुला नमन असो. (६७) पंचमंत्रशरीरा, पंचमहेतो, पंचाशद्वर्णदेहा, कलान्यासा, तुला, नमन

हाय कलाभिर्विततताय ते ॥६७॥ जनकाय विरिंचस्य विष्णोर्देव्यास्त-थैव च ॥ कुमारस्य गजास्यस्य कौशिक्याः सकलस्य च ॥६८॥ स्थूलाय चैव सूक्ष्माय सर्वस्मै परमात्मने ॥ रक्षार्थमागतायाद्य मम भाग्यानुरूपतः ॥६९॥

श्रीनंदिकेश्वर उवाच ॥ य इदं कीर्तयेत्स्तोत्रं दत्वा कृष्णागरूद्भवम्॥ धूपं यत्फलमाप्नोति मासमेकं शिवाय तत् ॥७०॥ वृत्तम् ॥ अथ भवोऽप्यभवाय तव श्रमो भवभयं न हि भृत्यजनस्य नः ॥ इति तमाह हसन्परमेश्वरो भगवतीं च गणांश्च मुनींस्तदा ॥७१॥ एवमुक्त्वा ददौ तस्मै गाणपत्यं पिनाकधृत् ॥ उवाच च गणाध्यक्षं पिंगलं पिंगलोचनम् ॥७२॥ पिंगलेदं मया दत्तं गाणपत्यं तवानघ ॥ भद्रमस्तु महाभाग नंदीश्वरसमो भव ॥७३॥ वृत्तम् ॥ दत्वैवमासाद्य वृषेंद्रपृष्ठं वृषेंद्रकेतुर्विषदाभकण्ठः ॥ सोमः सनंदी सगणो महेशः स पिंगलः शैलमथो जगाम ॥७४॥

नंदिकेश्वर उवाच ॥ वृत्तम् ॥ शिवाय दत्वागरुधूपमग्र्यं शिवं गतो भद्रसुतोऽप्ययत्नात् ॥ महाफलं यत्तव कीर्तितं च शिवाय भ-

---

असो. (६८) विरिंचजनका, विष्णुजनका, देवीजनका, कुमारजनका, गजाननजनका, कौशिकीजनका, सकलोत्पादका तुला नमन असो. (६९) स्थूला, सूक्ष्मा, सर्वा, परमात्म्या, माझ्या भाग्याला अनुसरून रक्षणाकरितां आलेल्या देवा, तुला नमन असो.

(७०) श्रीनंदिकेश्वर बोलले–कृष्णागरूचा धूप देऊन हें स्तोत्र जो करतो, एक महिन्यापर्यंत धूप दिला असतां जें फल मिळावें, तें फल त्याला मिळतें.

(७१) नंतर श्रीशिव बोलले–हे वत्सा, तुझा श्रम मोक्षाला कारण झाला आहे. तुला भवभीति नाहीं. याप्रमाणें हंसत हंसत त्या पिंगलाला, देवीला, गणांला देवानें ह्मटलें. (७२) असें बोलून पिनाकधारी देवानें त्याला गाणपत्य दिलें. पिंगलनेत्र, गणाध्यक्ष पिंगलाला देवानें ह्मटलें कीं,–(७३) हे पिंगला, अनघा, तुला हें गाणपत्य दिलें आहे. हे महाभागा, तुझें कल्याण होवो, तूं नंदीश्वरासमान हो. (७४) याप्रमाणें त्याला वर देऊन वृषेंद्रावर त्याला बसवून वृषेंद्रकेतु नीलकंठ शिव हे नंदीसह गणासह पिंगलासह कैलासाला आले. (७५) भद्रसुत हा विशेष श्रम न घेतां शिवाला श्रेष्ठ कृष्णागरूचा धूप दिला, शिवाजवळ गेला, अगरु धूपदाना

कृष्णाऽगरुधूपदानात् ॥७५॥ तस्माच्छिवाय दत्वा तु धूपं कृष्णागरूद्भवम् ॥ गाणपत्यमवाप्नोति नात्र कार्या विचारणा ॥७६॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णये धूपलक्षणतन्माहात्म्यं नामैकोनषष्ठितमोऽध्यायः ॥

---

पासून जें महाफल मिळतें, तें तुला सांगितलें. (७६) कृष्णागरूधूप दिला असतां गाणपत्य मिळतें, यांत विचार करावयास नको.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयांतील धूपलक्षण तन्माहात्म्यकथन नांवाचा एकोणसाठावा अध्याय संपला.



## ॥ अथ षष्ठितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ उन्नतं दीपपात्रस्य समस्तं स्यात्षडंगुलम् ॥ सार्द्धांगुलोन्नतं पीठं नालं सार्धांगुलिद्वयम् ॥१॥ शिखरं द्व्यंगुलं चैव क्रमादुच्चं षडंगुलम् ॥ तत्पादपीठविस्तारमुदितं चतुरंगुलम् ॥२॥ स्निग्धं वा मणिमालं वा नालनाहं त्रियंगुलम् ॥ पात्रं पंचांगुलं व्यासं तद्घनं यवमात्रकम् ॥३॥ पात्रान्तः परितो दीपस्थानान्यष्टौ प्रकल्पयेत् ॥ शिखरेऽपि तथैवैकं दीपस्थानं प्रकल्पयेत् ॥४॥ पीठनालान्तरे दण्डं धूपपात्रे यथात्र तु ॥ इहोदितप्रमाणेऽस्मिन् कारयेन्नेत्रवल्लभम् ॥५॥ पूर्वोदितप्रमाणेन पात्रं सर्वं समाप्य च ॥ शृंगे पात्रे चतुर्दिक्षु दीपस्थानानि कल्पयेत् ॥६॥ दीपपंचकपात्रं स्यादिदमन्यदिहोदितम् ॥ चतुरंगुलमुत्सेधं नाहं सार्द्धांगुलं स्मृतम् ॥७॥ दंडस्योर्ध्वाधरे पात्रं पादं तद्व्यासमंगुलम् ॥ स्वर्णादिषु यथा लब्धे पात्रेऽमीषामलाभतः ॥८॥ व्रीहिपिष्टास्थितान्दी-

---

श्रीशिवास नमस्कार असो, क्रियासारांत सांगितलें कीं, ईश्वर बोलले— (१) दीपपात्राची उंची सर्व सहा बोटांची असावी. दीडबोट उंचीचें त्याचें पीठ केलेलें असून त्याचा नाळही अडीच बोटांचा करावा. (२) त्याचें शिखर दोन बोटें प्रमाणाचें केलेलें असून क्रमानें सहा अंगुल उंच करावें. त्याच्या पादपीठाचा विस्तार चार बोटांचा करावा. (३) स्निग्ध मणिमाला करून नाळाचा विस्तार तीन बोटें असावा. पंचांगुलव्यासाचें पात्र करून त्याची जाडी यवाऐवढी केलेली असावी. (४) पात्राच्या आंत चोहोंकडे आठ दीपस्थानें केलेलीं असावींत. शिखराच्या ठिकाणीं एक दीपस्थान केलेलें असावें. (५) पूर्वी सांगितलेल्या प्रमाणानें पात्र सर्व समाप्त करून शृंगाच्या ठिकाणीं चारी दिशेला दीपस्थान करावें. (६) धूपपात्रावर जसें असतें, त्याप्रमाणें पीठनाळाच्या मध्यभागीं दंड करावा. यांत सांगितल्याप्रमाणें दीपपात्र मनोहर करावें. पूर्वी सांगितलेल्या प्रमाणानें पात्र सर्व समाप्त करून शृंगावर, पात्रावर, चारी दिशेला दीपस्थान करावें. (७) दीपपंचकपात्र ( पंचार्ती ) हें दुसरेंच येथें सांगितलें. चार अंगुलें त्याची उंची असून नाळ दीड बोट उंचीचा असावा. (८) दंडाच्या खालींवर पाय करावेत, त्याचा विस्तार एक बोटाचा असावा. सुवर्णादि धातु आपल्या शक्तीला अनुसरून जसे मिळतील तसे घेऊन त्याचें दीपपात्र करावें. हे जर नाहींच मिळाले तर (९) साळीच्या पिटाचें पात्र करून त्यांत दीप लावून

पानपि वा संप्रदर्शयेत् ॥ एवं यथावत्कथितं दीपपात्रस्य लक्षणम् ॥९॥ कर्पूरो घृतवर्तिश्च द्वितीयं दीपसाधनम् ॥१०॥ आदित्यपुराणे॥ ज्ञानदं पट्टवर्तिः स्यात्कार्पासं सर्वसिद्धिदं ॥ कर्पूरफलसंयुक्तः कपिलाज्येन संयुतः ॥११॥ दीपः कोटिगुणो ज्ञेय इतरस्मान्न संशयः ॥ कपिलासंभवेनैव घृतेनापि सुगंधिना ॥१२॥ नित्यं प्रदीपिता दीपाः शस्ताः कर्पूरवर्तिना ॥१३॥ शिवधर्मे ॥ घृतदीपप्रदानेन फलं श्रुणु वदामि ते ॥ कपिलाया घृतेनाथ दीपः सात्विक उच्यते ॥१४॥ राजसस्तिलतैलेन मिश्र आज्येन तामसः ॥ तामसस्तु भवेद्दीपो माहिषाज्यादिसर्पिषा ॥१५॥ वृक्षबीजोद्भवस्नेहैर्दीपः पैशाच उच्यते ॥ तामसस्तु पिशाचात्तु दीपो योग्यतरः स्मृतः ॥१६॥ एकादिशतपर्यन्तदीपाः स्युरधमाधमाः ॥ शताद्याः स्युः सहस्रान्ता अयुता लक्षसीमगाः ॥१७॥ प्रयुताः कोटिसंख्याता अर्बुदान्यर्बुदान्तकाः ॥ दीपाः स्युरेवं संख्याया रात्रौ तद्विगुणं भवेत् ॥१८॥ एवं संध्याप्रदीपादौ संख्यैषा परिकीर्तिता ॥ एकं-

---

देवाला आर्ती करावी. याप्रमाणें दीपपात्राचें लक्षण विधिपूर्वक सांगितलें. (१०) कापूर, किंवा फुलवात, दीपाचें दुसरें साधन होय. (११) आदित्य पुराणांत सांगितलें कीं,—पट्टवातीच्या योगानें ज्ञान मिळतें. कापसाच्या वातीनें सर्व सिद्धि मिळतात. त्यांत कापराचे तुकडे ठेवून कपिला गायीच्या तुपांत भिजविलेल्या वाती घालून (१२) देवाला आरती करावी, ही इतरापेक्षां कोटपटीनें पुण्यकर आहे, यांत संशय नाहीं. कपिला गायीच्या सुगंध तुपांत (१३) भिजविलेल्या वाती व कापूर लावून केलेली आर्ती प्रशस्त अशी मानली आहे. (१४) शिवधर्मांत सांगितलें कीं, घृतदीपदानाचें फल तुला सांगतों ऐक. कपिला गायीच्या घृताचा दीप सात्विक असा मानिला आहे. (१५) तिळांच्या तेलाचा दिवा राजस असा मानिला आहे. तुपांनें मिसळलेल्या तेलाचा दिवा तामस असा मानिला आहे, व म्हशीच्या तुपाचा दिवाही तामस असा मानिला आहे. (१६) झाडाच्या बियांच्या काढलेल्या तेलाच्या दिव्याला पैशाचदीप म्हणतात. त्यांत तामस दीप पैशाचापेक्षां योग्य आहे, असें मानिलें आहे. (१७) एकापासून शंभरापर्यंत अधम ( कनिष्ठ ) असें म्हणतात, शंभरापासून हजार, दहाहजार, लाख या मर्यादेपर्यंत दीप लावावेत. (१८) आणि प्रयुत, कोटि, अर्बुद, न्यर्बुदपर्यंत संख्येचे दीप रात्रीं लाविले असतां दुप्पट फल मिळतें. (१९) याप्रमाणें संध्येच्या

द्वित्र्यंगुलज्वालाः कन्यसामध्यमोत्तमाः ॥१९॥ यः कुर्यात्कार्तिके मासे शोभनां दीपमालिकाम् ॥ घृतेन च चतुर्दश्यां पौर्णमास्यामथापि वा ॥२०॥ सूर्यायुतप्रतीकाशस्तेजसा भासयन् दिशः ॥ तेजोराशिर्विमानस्थः कुलमुध्दृत्य सर्वतः ॥२१॥ यावत्प्रदीपसंस्थानं घृतेनापूर्य बोधितम् ॥ तावद्युगसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥२२॥ शिरसा धारयेद्दीपं शिवरात्रौ शिवाग्रतः॥ललाटे वाथ हस्ताभ्यां समुद्युक्तस्तथोरसि॥२३॥ सूर्यायुतप्रतीकाशैर्विमानैः सार्वकामिकैः ॥ कल्पायुतशतं दिव्यं शिवलोके महीयते ॥२४॥ घृतदीपप्रदानेन शिवाय शतयोजनम् ॥ लंघयित्वा ततो याति विमानैः सूर्यसन्निभैः ॥२५॥ निमिषं निमिषार्धं वा घृतदीपप्रदो नरः ॥ वर्षकोटिशतं दिव्यं रुद्रलोके महीयते॥२६॥स्कान्दे॥ यो दद्याद्घृतदीपं तु तिलतैलेन वा विभोः ॥ सतां गतिमवाप्नोति दुर्लभामात्मवेदिनाम् ॥२७॥ शिवधर्मे ॥ मधूकबीजतैलेन दीपं दद्यात्सकृन्नरः ॥ महापातकसंभूतैर्दोषैः सद्यः प्रमुच्यते ॥२८॥

---

वेळच्या दीपांची संख्या सांगितली. एक दोन, तीन या संख्येच्या बोटा एवढ्या ज्वाळा अनुक्रमें कनिष्ठ, मध्यम, उत्तम अशा मानिल्या आहेत. (२०) कार्तिक महिन्यांत मंगलकर तुपाच्या दीपांची माळ जो लावतो, त्यांत विशेषेंकरून चतुर्दशी पौर्णिमेला जो लावतो, (२१) तो प्राणी हजार सूर्यांप्रमाणें तेजस्वी होऊन दाहीदिशा प्रज्वलित करीत विमानांत बसून आपल्या कुलाचा उद्धार करून तो तेजस्वी प्राणी परलोकाला जातो. (२२) तूप घालून जितके दिवे लाविलेले असतील, तितक्या हजार वर्षांपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (२३) शिवरात्रीच्या दिवशीं शिवापुढें आपल्या डोकीवर, कपाळावर, हातावर उरावर, दिवा घेऊन जो जागरण करतो, (२४) तो मानव हजार सूर्यांच्या तेजाप्रमाणें तेजस्वी असलेल्या व मनोरथ पूर्ण करणाऱ्या विमानांत बसून परलोकाला जाऊन लक्ष कल्पांपर्यंत शिवलोकांत पूज्य होतो. (२५) शिवाला घृतदीपदान केल्यानें शंभर योजन उल्लंघन करून सूर्यासारख्या तेजस्वी विमानांत बसून शिवलोकाला जातो. (२६) निमिष किंवा अर्धनिमिष जो मानव देवापुढें तुपाचा दिवा लावतो, तो देवमानाच्या कोटिशत वर्षांपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (२७) स्कंदपुराणांत सांगितलें कीं,--जो प्राणी घृतदीप किंवा तैलदीप शिवापुढें लावतो, त्याला आत्मतत्व जाणणाऱ्या सज्जनांची गति प्राप्त होते. (२८) शिवधर्मात सांगितलें कीं,--मधूक मोहाच्या

**इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्य विरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णये दीपलक्षणतन्माहात्म्यं नाम षष्ठितमोऽध्यायः ॥**

---

बीजाच्या तेलाचे दिवे एकवार देवापुढें जो लावतो, तो महापातकी असला तरी त्या दोषांपासून मुक्त होतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयांतील दीपलक्षणतन्माहात्म्यकथन नांवाचा साठावा अध्याय संपला.



## ॥ अथ एकषष्ठितमोऽध्यायः॥

श्रीशिवाय नमः ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ दण्डाग्रस्थितशूला च धत्तूरकुसुमोज्वला ॥ या सा सौराष्ट्रकमयी घण्टान्तःकोणसंयुता ॥१॥ आयतं घण्टिकायास्तु प्रोक्तमंगुलपंचकम् ॥ तद्वन्मुष्टिप्रमाणं स्यात्कटकद्वयसंपुटम् ॥२॥ तदूर्ध्वं त्र्यंगुलमितं विदधीत त्रिशूलकम् ॥ तस्या वदनविस्तारं षडंगुलमिति स्मृतम् ॥३॥ घण्टायाः सकलं दैर्घ्यमंगुलानां त्रयोदश ॥ एवं नेत्रप्रियां घण्टामस्मिन्माने तु कारयेत् ॥४॥ शिवधर्मे ॥ यः शृंखलसमायुक्तां महाघण्टां महास्वनाम् ॥ कांस्यहेममयीं वापि निवध्नीयाच्छिवालये ॥५॥ घण्टाकर्णगणः श्रीमान् शिवस्यातीव वल्लभः ॥ शिवतुल्यवलो भूत्वा शिवलोके महीयते॥६॥ शैवे॥ पुरा घंटाप्रदानेन घण्टाकर्णो महावलः ॥ लब्धवानाधिपत्यं च घण्टाकर्णजनस्य च ॥७॥ क्रियासारे ॥ काहलः पटहः शंखो भेरी च जयघंटिका ॥ एते पंचमहाशब्दा मंगलध्वनयः स्मृताः ॥८॥ सौवर्णरौप्य

---

श्रीशिवाला नमस्कार असो--क्रियासारांत सांगितलें कीं,--श्रीशिव बोलले (१) दंडाच्या अग्रावर शूलाची रचना केलेली असून धोतऱ्याच्या फुलासारखी उजळ केलेली असावी अशी कांशाची घांट करावी. घांटेच्या आंत लोळी केलेली असावी. (२) घांटेचा विस्तार पांच बोटांचा केलेला असावा त्याच प्रमाणें मुठीचें प्रमाण केलेलें असावें व घांटेच्यावर व खालीं कंकणें केलेलीं असावींत. (३) त्याच्यावर तीन बोटें प्रमाण शूलाचा आकार करावा. तिच्या मुखाचा विस्तार सहा बोटें प्रमाणाचा केलेला असावा. (४) घांटेची सर्व लांबी सोळा बोटें प्रमाणाची केलेली असून नेत्रमनोहर (पाहण्यालायक) केलेली असावी. याप्रमाणानें घांट केलेली असावी. (५) शिवधर्मांत सांगितलें कीं,--साखळीसह मोठ्या अवाजाचा घंटा (मोठा) कांशाचा किंवा सोन्याचा करून शिवालयांत जो बांधतो, (६) तो श्रीमान असा घंटाकर्णनांवाचा गण होतो, व शिवाच्या प्रेमांतला होऊन राहतो, शिवाय शिवासारखा बलिष्ठ होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (७) शिवपुराणांत सांगितलें कीं,--पूर्वी घंटा दान करून महाबलिष्ठ घंटाकर्ण हा घंटाकर्णगणांचा राजा झाला. (त्यांचा प्रभु होऊन त्यांचें पालन करूं लागला.) (८) क्रियासारांत सांगितलें कीं,--काहल, पटह (नगारा), शंख, भेरी (नौवत), जयघंटा हीं अशीं पांच वाद्यें मंगलवाद्यांत गणिलीं गेलीं आहेत. (९) सोनें, चांदी, तांबें यां पैकीं कोणता धातु मिळेल त्याची घांट करावी. किंचित

ताम्रेषु यथालब्धं च निर्मितः ॥ स्तोकमौनसुधत्तूरपुष्पवत्काहलाह्वयः ॥९॥ स द्व्यंगुलं चतुस्तालमायतं काहलस्य तु ॥ चतुरंगुलविस्तारं स्यात्तदाननवर्तुलम्॥१०॥त्र्यंगुलं दण्डमानं स्यादनुस्थूलं तथोदितः॥ तथैव विस्तरं तस्य यथाशोभं तु कारयेत् ॥११॥ क्रियासारे ॥ पंचांगुलं द्वितालं च दीर्घं चिन्हाह्वयस्य तु ॥ सार्द्धं द्व्यंगुलविस्तारं तस्यास्यादस्य वर्तुलम् ॥१२॥ अन्यत्सर्वं यथापूर्वं विवरं तालनाहकम्॥एवं लक्षणमाख्यातं सम्यक्काहलचिन्हयोः ॥१३॥ शैवे ॥ काहलानि च रम्याणि नानानादकराणि च ॥ सुवर्णनिर्मितान्येव मौक्तिकालंकृतानि च ॥१४॥ पापध्वान्तविघाताय काहलानि समर्पयेत् ॥ शिवस्य शिवलोकेषु वसेत्कल्पायुतं नरः ॥१५॥ क्रियासारे ॥ आसनः खदिरः श्रेष्ठावपि वा रक्तचंदनः ॥ त्रयोऽमी पटहस्योक्तास्तरवो वाद्यवेदिभिः ॥१६॥ पंचतालसमाख्यातमायतं पटहस्य तु ॥ द्वितालं मध्यमः स्थूलं ताल-

---

उमललेल्या धोतऱ्याच्या फुलासारखा काहला करावा, असें सांगितलें आहे. (१०) दोन बोट चारताल ( ४ टीचभर ) परिमित काहला करावा, असें सांगतात. वर्तुलाकृतीनें (वाटोळे) चार बोटांचा विस्तार त्याच्या तोंडाचा करावा, असें ह्मटलें आहे. (११) त्याच्या दांडीचा मान तीन बोटांचा असून त्याची जाडीही तितक्याच वेताची करावी. त्याप्रमाणेंच त्याचा विस्तार करून शोभेल त्याप्रमाणें काहला (कर्णा) करावा. (१२) क्रियासारांत सांगितलें कीं,--पांच बोटें किंवा दोन ताल परिमित लांबीचें चिन्ह (या नांवाचें एक वाद्य ) करावें. त्याचें तोंड वाटोळें केलेलें असून एकूण दीड बोट विस्ताराचें केलेलें असावें. (१३) बाकीचें सर्व पूर्वी प्रमाणें करावें. त्याचें विवर (छिद्र) एकताल विस्ताराचें (टीचभर) असावें. याप्रमाणें काहलाचिन्हाचें लक्षण सांगितलें. ( १४) शैवपुराणांत सांगितलें कीं,--अनेक तऱ्हेच्या अवाज निघणारे, सुंदर, सोन्याचे केलेले, मोत्यांनीं सुशोभित केलेले काहले देवाजवळ ठेवावेत. (१५) त्यायोगानें पापाचा संहार होतो. याकरितां शिवाला काहले समर्पण करावेत, ह्मणजे तो प्राणी शिवलोकामध्यें दहा हजार कल्पपर्यंत सुखानें राहतो. (१६) क्रियासारांत सांगितलें कीं,--आसन (सर्जक झाडाचें नांव) खैर, रक्तचंदन याचें लांकूड पटहाला (ढोलका) योग्य आहे, असें वाद्य जाणणारे पंडित ह्मणतात. (१७) पटहाचा विस्तार पांच ताल (पांच टीचभर) प्रमाणाचा असावा. दोन ताल प्रमाणाचा मध्यभाग असून

मात्रं मुखद्वयम् ॥१७॥ सच्चर्मणा समाच्छाद्य मुखयुग्मं यथादृढम् ॥ कोणोत्पाटहिकस्तज्ज्ञस्तत्तत्कालेषु ताडयेत् ॥१८॥ क्रियासारे ॥ गोक्षीरधवलः स्निग्धो दीर्घनालो बृहत्तमः॥वृत्तो यो दक्षिणावर्तः सोऽब्धिजः शंखसंज्ञकः ॥१९॥ पूर्वोक्तलक्षणोपेतो वामावर्तोऽथ वाऽब्धिजः॥शंखोऽयं सोऽतिसुलभः पूर्वोक्तोऽतीव दुर्लभः॥२०॥शंखस्य नाहं यावत्स्यात्तावत्तस्यायतं स्मृतम् ॥ तस्यार्धं नासिका यस्य स शंखः श्रेष्ठ उच्यते ॥२१॥ तदर्धनासिको योऽसौ शंखो भवति मध्यमः ॥ शंखो य इतरो लब्धः स कनिष्ठः प्रकीर्तितः ॥२२॥ भिन्नः क्रिमिहतो रक्तः सरन्ध्रः कल्मषच्छविः ॥ ऱ्हस्वनालः स शंखो यो न योग्यो नादकर्मणि ॥२३॥ शिवधर्मे ॥ महामेघस्वनं दत्वा शंखयुग्मं शिवालये ॥२४॥ युगकोटिशतं साग्रं शिवलोके महीयते ॥२५॥ क्रियासारे ॥ दुंदुभिर्द्विविधः प्रोक्तः स्थावरो जंगमोपि च ॥ न भार्यस्थावरैकेन या भार्या जंगमा स्मृ-

---

जाडी तितकीच असावी. दोहोंकडचीं तोंडें ताल ( टीचभर ) प्रमाण असावींत. (१८) दोन्ही तोडांला चांगलें चामडें मजबूत बांधून तयार करून पटह वाजविणाऱ्या बुद्धिमानानें त्या त्या योग्य वेळेस वाजवावें. (१९) क्रियासारांत सांगितलें कीं,--गायीच्या दुधाप्रमाणें शुभ्र असून स्निग्ध असावा, नाळ लांब असून प्रमाणानें मोठा असावा वर्तुलाकृतीचा असून उजव्या मोडीचा असावा, व समुद्रांत उत्पन्न झालेला असा शंख देवाला अर्पण करावा. (२०) पूर्वी सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त समुद्रांत उत्पन्न झालेला डाव्यामोडीचा शंख फार सुलभ रीतीनें मिळतो, परंतु उजव्यामोडीचा दुर्लभ आहे. (२१) शंखाचा नाह (रुंदी) जितका असेल, तितकाच विस्तार ( लांबी ) असावा, असें सांगतात. त्याच्या (लांबीच्या ) निम्यानें त्याचें नाक असेल तर असा शंख श्रेष्ठ आहे, असें ह्मणतात. (२२) त्याच्या निम्यानें ज्याचें नाक असेल तो शंख मध्यम आहे, असें ह्मणतात. यावांचून इतर शंख मिळाला असतां तो कनिष्ठ असें सांगतात. (२३) फुटलेला, किडे लागलेला, तांबडा, छिद्र असलेला, मळकट कांतीचा, आखूड नाळ असलेला असा शंख वाजवावयाला योग्य नाहीं, असें ह्मणतात. (२४) शिवधर्मांत सांगितलें कीं,--मोठ्या मेघाच्या अवाजा प्रमाणें अवाज असलेले दोन शंख शिवालयांत जो ठेवतो, (२५) तो साग्र शंभर कोटि युगपर्यंत शिवलोकांत पूज्य होतो. (२६) क्रियासारांत सांगितलें कीं,--दुंदुभींत स्थावर जंगम असे दोन प्रकार आहेत. न उचलणारा नगारा स्थावर असें ह्मणवून घेतो व उच-

ता ॥२६॥ खदिरः पीतसारश्च शिरीषो रक्तचंदनः॥ मधूकोऽरिष्टकश्चेति षट्वृक्षा दुंदुभेः स्मृताः ॥२७॥ आयामः सप्ततालं स्यात्पंचतालं तु विस्तरं॥ मुखं त्रितालविस्तारं मुखस्य घनमंगुलम् ॥२८॥ शेषं तद्व्यंगुलघनमन्यत्सर्वं बिलं बहिः॥सुवृत्तं लोहपट्टेन मुखमध्यानि वेष्टयेत् ॥२९॥ षट्तालमथवायामं तालाष्टांशात्रियंशकैः ॥ चतुस्तालं तु विस्तारं मुखं सार्धद्वितालकम् ॥३०॥ बिलं घनं यथा पूर्वं वृत्तं च चतुरानन ॥ एतदेकविधं प्रोक्तं लक्षणं स्थिरदुंदुभेः ॥३१॥ आसने निर्मिते स्थाप्य गोपुरे सारदारुभिः ॥ विमानस्याथ वा स्थाने दक्षिणे वा सुरोत्तम ॥३२॥ चतुःपादचतुःशृंगमध्यं प्रोक्तं तथासनम् ॥ भूमिश्चतुष्पदां स्थानं शृंगमध्यं तु दुंदुभेः ॥३३॥ चतुस्तालप्रमाणोच्चं तन्नाहं तालपंचकम्॥ वदनद्वयविस्तारं समानं द्वादशांगुलम् ॥३४॥ सुवर्तुलं समंताच्च घनमर्द्धांगुलं स्मृतम् ॥ अस्य स्थानं स्थलं नान्यदंगं दौंदुभिकस्य तु॥३५॥

---

लून घेऊन वाजवावयाच्या नगाऱ्याला जंगम ह्मणतात. (२७) खैर, पीतसार, (झाडाचें नांव) शिरीष, रक्तचंदन, मधूक (मोहाचें झाड), अरिष्टक (निंबाचें झाड), या सहा झाडांचें लांकूड दुंदुभीला योग्य आहे, असें सांगतात. (२८) सात तालाचा (सात टीचभर) आयाम (विस्तार) असून पांच तालांचा विस्तार असावा. तोंड तीन तालांच्या विस्ताराचें असून मुखाची जाडी एक बोट असावी (२९) बाकीची जाडी दोन बोटांची असून दुसरें बाहेरचें सर्व बिल चांगलें वाटोळें असून लोखंडाच्या पट्टीनें मधलीं तोंडें बांधावींत. (३०) सहा ताल विस्तार करावा, किंवा तालाच्या अष्टांशाचा किंवा एकतृतीयांशाचा करावा. चार ताल परिमित मुख करून अडीच ताल प्रमाणाचें (३१) बिळ करावें जाडी पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावी. व वर्तुलही तसेंच असावें. हे ब्रह्मदेवा, स्थिर दुंदुभीच्या लक्षणाचा एक प्रकार सांगितला. (३२) मजबूत लांकडाचें आसन करून त्यावर दुंदुभि ठेवून गोपुरावर (माडीवर), विमानांत उजव्या बाजूला त्याची स्थापना करावी. (तेथें दुंदुभि ठेवावा.) (३३) चार पायाचें चार शिंगांचें आसन करावें, असें सांगितलें आहे असें तें आसन (घडवंची) नगारा ठेवण्याचें स्थान होय. (३४) चार ताल प्रमाण उंची करून त्याचा परिघ पांच ताल प्रमाण करावा. दोन्ही तोंडांचा विस्तार सरळ बारा बोटांचा करावा. (३५) वर्तुळ करून त्याची जाडी चोहेंकडे अर्ध्या बोटाची असावी. याचें स्थान (जागा)

धृत्वा दौंदुभिकः स्वांगे वादयेद्दुंदुभिं तथा॥ईदृक्दुंदुभिनिर्घोषः शंभोः प्रीतिकरः सदा ॥३६॥ क्रियासारे ॥ स्थूलोन्नताभ्यां सदृशा महावृक्ष-विनिर्मिता ॥ त्वग्बद्धोभयपार्श्वासौ भेरी स्याद्दुंदुभिध्वनिः ॥३७॥ क्रियासारे ॥ शुद्धसौराष्ट्रिककृता चंद्रमण्डलवद्दृढा॥ द्वितालविस्तरा या-सा जयघण्टाव्हया मता ॥३८॥ क्रियासारे ॥ द्वौ शंखौ काहलौ च द्वौ चतस्रो जयघंटिकाः ॥ एकैकपटहो भेरी संख्यैषामेवमीरिता॥३९॥ केचिदेतान्महाशब्दान्ब्रुवते पंच सूरयः ॥ गीतातोद्यान्कांश्यतालशंख-काहलनिःस्वनान् ॥४०॥ अत्रोक्तसंख्याधिकता वाद्यानामुत्तमोत्तमा ॥ स्यादलाभे यथालब्धसंख्या वा विभवप्रदा ॥४१॥ स्नानेधूपे प्रदीपे च नैवेद्योषः प्रबोधयोः ॥ घण्टापंचमहाशब्दान् प्रयुंजीतोत्सवेषु च ॥४२॥ ग्रंथान्तरे ॥ स्नानकाले त्रिसंध्यं च यः कुर्याद्भेरिवादनम् ॥ नाट्यं वा मुखवाद्यं वा तस्य पुण्यफलं श्रुणु ॥४३॥ यावन्त्यहानि कुरुते यस्तु-

---

दुसरें कोणतें नसून दुंदुभि वाजविणाराचें अंगच स्थान होय. (३६) वाजविणा-रानें आपल्या अंगावर घेऊन दुंदुभि वाजवावा अशा तऱ्हेच्या दुंदुभीचा अवाज श्रीशंभूच्या आवडीचा आहे. (३७) क्रियासारांत सांगितलें कीं,--जाडी उंचीमध्यें बरोबर असून मोठ्या झाडाच्या लांकडाची केलेली असावी. दोन्ही तोंडाला मजवूत चामडें वांधलेलें असून तिचा अवाज दुंदुभी प्रमाणें असावा, अशी एक भेरी करून देवाला द्यावी. (३८) क्रियासारांत सांगितलें कीं,--शुद्ध सौराष्ट्राची (कांशाची) केलेली असून चंद्रमंडलाप्रमाणें (वाटोळें) केलेली असून मजवूत असावी. दोन ताल विस्ताराची जी घांट असेल, तिला "जयघंटा" असें ह्मणतात. (३९) क्रियासारांत सांगितलें कीं,--दोन शंख, दोन काहले, चार जय-घंटा, एकेक पटह, एक भेरी याप्रमाणें संख्या सांगितली आहे. (४०) कांहीं विद्वान लोक मोठ्या अवाजाचीं पांच वाद्यें ठेवावींत, असें सांगतात. गायन, आतो-द्य (तंतुवाद्य), कांशाचे टाळ, शंख, काहला अशीं पंचवाद्यें सांगतात. (४१) यांत सांगितलेल्या संख्येपेक्षां अधिक संख्येचीं वाद्यें ठेविलीं असतां उत्तरोत्तर श्रेय-स्कर आहेत, असें समजावें. मिळालीं नाहींत तर जशीं मिळतील तशीं ठेवावींत या योगानें ऐश्वर्य मिळतें. (४२) स्नान, धूप, दीप, नैवेद्य या वेळेस व काकडा-तींच्या वेळेस घंटासहित पांच वाद्यांचा घोष करावा. व उत्सवाच्या वेळेस वाज-वावें. (४३) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,--स्नानाच्या तीन्ही वेळेस जो भेरी वाज-वतो, नर्तन करतो, मुखवाद्य करतो, त्याच्या पुण्याचें फल सांगतों, ऐक. (४४)जि-

नृत्तादिवादनम् ॥ तावद्युगसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥४४॥ शिवधर्मे ॥ ततं तंत्रीसमुद्भूतमानद्धं मुरजादिकम् ॥ वंशादिकं तु सुषिरं कांस्यं तालादिकं घनम् ॥४५॥ चतुर्विधमिदं वाद्यं वादित्रातोद्यनामकम् ॥ वीणावेणुमृदंगाश्च मुरजा मर्दलास्तथा ॥४६॥ गमकाहालतिमिलाः सुतालाः सुलयाः स्मृताः ॥ भेरीमृदंगमुरजातिमिलापटहादिकम् ॥४७॥ वंशकांस्यादिवादित्रं यः शिवाय निवेदयेत् ॥ स विमानैर्महायानैर्वंशवीणाकृतस्वनैः ॥४८॥ युगकोटिशतं दिव्यं शिवलोके महीयते ॥४९॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्य विरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णयेघण्टाशंखपंचमहाशब्दादिलक्षणतन्माहात्म्यं नामैकषष्ठितमोऽध्यायः॥

---

तके दिवस नाचतो, व वाद्य वाजवितो, तितक्या हजार युगांपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (४५) शिवधर्मांत सांगितलें कीं,--तंत्रीवाद्य (तंबोरा वगैरे), मुरजवगैरे (तबला वगैरे), वेळूचें केलेलें वाद्य (किनरी वगैरे), कांशाचे जाड टाळ, (४६) वगैरे चार तऱ्हेच्या वाद्यांला "आतोद्य" असें ह्मणतात. वीणा, वेणु, मृदंग मुरज, मर्दल, (४७) गम, काहला (शिंग), तिमिल, सुताल, भेरी, मृदंग, मुरज, तिमिल, पटह, (४८) वेळूचें व कांशाचें वाद्य वगैरे वाद्यें शिवाला जो अर्पण करतो, तो मानव मोठ्या विमानांत बसून वाद्यवैभवासह (४९) शिवलोकाला जाऊन तेथें देवमानानें शंभर कोटियुगपर्यंत पूज्य होतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाश्वेराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यानिर्णयांतील घंटाशंखपंचमहाशब्दादिलक्षणतन्माहात्म्यकथननांवाचा एकसष्टावा अध्याय संपला.



## ॥ अथ द्विषष्ठितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ वीरतंत्रे ॥ पितामह उवाच ॥ भगवन् देवदेवेश लोकनाथ जगत्पते ॥ नैवेद्यस्य विधानं किं ब्रूहि मे परमेश्वर॥१॥ ईश्वर उवाच ॥ साधु साधु महाप्राज्ञ यत्त्वया परिचोदितम् ॥ तत्सर्वमखिलं वक्ष्ये श्रुणुष्व कमलासन॥२॥श्वेतशालि महाशालि रक्तशालि तथैव च ॥ कृष्णशालि च नीवारं वेणुगोधूममेव च ॥३॥ यवप्रियंगू विप्रेन्द्र नवधा चोच्यते मया ॥ तुषानपोह्य शूर्पेण कणकंबु विवर्जयेत् ॥४॥ निर्दोषांस्तण्डुलान्गृह्य निर्वापं तु समाचरेत् ॥५॥ शिवधर्मोत्तरे ॥ षाष्ठिकोदननैवेद्यं सहस्रगुणितं फलम्॥ सुगंधिशालिनैवेद्यं विज्ञेयमयुताधिकम् ॥६॥ रक्तशाल्यन्ननैवेद्यं फलं स्यान्नियुताधिकम् ॥ कलमाशालिनैवेद्यं दशलक्षाधिकं भवेत् ॥७॥ एवं शालिविशेषेण फलं स्यादुत्तरोत्तरम् ।॥८॥ क्रियासारे ॥ नीवारतण्डुलाः श्रेष्ठास्तथैव व्रीहि-

---

श्रीशिवास नमस्कार असो. (१) वीरतंत्रांत सांगितलें कीं,--पितामह बोलला--हे भगवन्, देवादिदेवा, लोकनाथा, जगत्प्रभो, परमेश्वरा, नैवेद्याचें विधान काय आहे? हें सांगा.

(२) ईश्वर बोलले--हे बुद्धिमाना, ब्रह्मदेवा, तूं काय विचारिलेंस तें फार चांगलें आहे, फार चांगलें आहे. हे कमलासना, तें सर्व तुला सांगतों, ऐक. (३) पांढरी साळ, मोठी साळ, तांबडी साळ, काळी साळ, नीवार (गवताचें धान्य (वेणु, ) वेळूचे तांदूळ, गहुं, (४) यव, (जव) राळे, असे नऊ प्रकारचें धान्य मी सांगतों. या पैकीं धान्य सुपांत घालून पाखडून वरचा कोंडा सर्व काढून टाकावा. कण्या काढाव्या. (५) निर्दोष (खडे वगैरे नसलेले) तांदूळ घेऊन स्वयपाक करावा. (६) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं,--षाष्ठिक (तुरीची खिचडी) अन्नाचा नैवेद्य दाखविला असतां हजार पटीनें फल मिळतें. सुगंधसाळीच्या भाताचा नैवेद्य दाखविला असतां दहाहजार पटीनें अधिक फल मिळेल. (७) तांबड्या साळीच्या भाताचा नैवेद्य दाखविला असतां वीसहजार पटीनें जास्त पुण्य मिळतें. कलमासाळीच्या भाताचा नैवेद्य दाखविला तर दहा लाखांपेक्षां अधिक फल मिळतें. (८) याप्रमाणें साळीच्या मानानें उत्तरोत्तर अधिक फल मिळतें. (९) क्रियासारांत सांगितलें कीं, सर्व तांदुळांमध्यें नीवाराचे तांदूळ (वऱ्याचे तांदूळ) व्रीही तांदूळ हे श्रेष्ठ होत. होमाला सांगितलेल्या धान्याचे तांदूळ मध्यम

तंडुलाः ॥ होमोक्तधान्यजातीयास्तण्डुला मध्यमाः स्मृताः ॥९॥ म्लानान् भिन्नान् कणान् रक्तान् दुर्गंधान् कठिनाशनान् ॥ पाचितव्रीहिजांश्चैतान् तण्डुलान्सप्तवर्जयेत् ॥१०॥ अभिन्ना धवला स्निग्धाः विशुद्धा नूतनाः शुभाः ॥ तण्डुलाः स्युरमी श्रेष्ठा निवेद्यपरिकल्पने ॥११॥ केन निष्पीड्य निष्पीड्य षोढांस्तान् क्षालयेद्बुधः ॥ विस्फुलिंगकृताः काष्ठाः सकेशाः प्राणिसंयुताः ॥१२॥ एतान् विनेतरैः काष्ठैः पचने दीपयेच्छुचीन् ॥ केवलान्नमिति प्रोक्तमिदमन्नं सुपाचितम् ॥१३॥ परमान्नं हरिद्रान्नं दध्यन्नं कृशरोदनम् ॥ गुडोदनं च मुद्गान्नमित्यन्नं षड्विधं स्मृतम् ॥१४॥ तण्डुलत्रिगुणं दुग्धं दुग्धार्धं जीवनीयकम् ॥ तदर्धं मुद्गभिन्नं तु परमान्नमिदं स्मृतम् ॥१५॥ तण्डुलार्धं मुद्गचूर्णं वारिणा सह संपचेत् ॥ ईषद्धरिद्रया युक्तं सुजीरकमरीचकैः ॥१६॥ एतदुक्तं हरिद्रान्नं सुपक्वं पाचितं तथा ॥ मधुराम्लेन गोदध्ना प्रत्यग्रान्नं विमिश्रितम् ॥१७॥ तण्डुलाद्द्विगुणेनैव मरीचक्षोदसंयुतम् ॥ लवणार्द्रकसंयुक्तमेतद्दध्योदनं स्मृतम् ॥१८॥ तण्डुलार्धं मुद्गभिन्नं वारिणा

---

होत. (१०) म्लान (पुष्कळ दिवसांचे), फुटलेले, कण असलेले, तांबडे, दुर्गंध, कठिण असलेले, शिजविलेल्या व्रीहींचे (साळीचे) असे सात तांदूळ वर्ज्य आहेत. (११) न फुटलेले, पांढरे, स्निग्ध(तेलकट) शुद्ध, नवीन, शुभ, असे तांदूळ नैवेद्याला श्रेष्ठ होत. (१२) तांदूळ पाण्यांत घालून सहा वेळ घासून घासून स्वच्छ करावेत. नंतर जळकीं, केस असलेलीं किडे असलेलीं लांकडें (१३) सोडून चांगलीं शुद्ध लांकडें चुलींत घालून पेटवावीत, या रीतीनें तयार केलेल्या अन्नाला केवलान्न असें ह्मणत असून सुपाचित (चांगलें शिजविलेलें) अन्न असें ह्मणतात. (१४) परमान्न, हरिद्रान्न, दध्यन्न, कृशरोदन, गुडोदन, मुद्गान्न असे अन्नांत सहा प्रकार आहेत. (१५) तांदुळाचे तिप्पट दूध, दुधाच्या निम्यानें पाणी, त्याच्या निम्यानें मुगाची डाळ असे पदार्थ घालून शिजवून तयार केलेल्या अन्नाला परमान्न असें ह्मणतात. (१६) तांदुळाच्या निम्यानें मुगाची डाळ घालून पाणी घालून शिजवावें. त्यांत थोडी हळद, मिरे, जिरे हे पदार्थ घालावेत. (१७) याला हरिद्रान्न असें ह्मणतात. परंतु चांगलें पक्व व शिजविलेलें असावें. ताज्या भातांत गोड मधुर असें दहीं मिसळून (१८) तांदुळाच्या दुपटीनें दहीं घालून त्यांत मिऱ्यांचें चूर्ण घालून मीठ व अलें मिसळून तयार केलेल्या अन्नाला दध्योदन ह्मणतात. (१९) तांदुळाच्या निम्यानें मुगाची डाळ घालून पाणी घालून शिजवावें. शिजल्या

सह संपचेत् ॥ पक्के मरीचिचूर्णेन तिलचूर्णं विनिक्षिपेत् ॥१९॥ इदं कृसरनामान्नमित्याख्यातं सुरेश्वर ॥ पूर्वोक्तपायसैर्युंज्याद्दुग्धार्धं गुडखण्डकम् ॥२०॥ तदर्धमाज्यं मोचायाः फलमेतद्गुडोदनम् ॥ तण्डुलस्य त्रिभागैकमुद्गखण्डविमिश्रितम् ॥२१॥ पक्वं यदेतन्मुद्गान्नमाख्यातं तच्चतुर्मुख ॥ विना शुद्धान्नमन्येषां प्रदद्याल्लवणं बुधः ॥२२॥ क्लिन्नाहारं तुषाहारं तण्डुलाहारभिःसटम् ॥ पुराणभाण्डाहारं च प्रयत्नेन विवर्जयेत् ॥२३॥ विशुद्धभाण्डसंशुद्धं प्रयतं स्निग्धमुज्वलम् ॥ अशनं यत्तदुत्कृष्टं नैवेद्यपरिकल्पने ॥२४॥ चत्वारि शिंविधान्यानि गृण्हीयात्सूपकर्मणि ॥ मुद्गाढककलायाख्यमाषाश्चान्यानि वर्जयेत्॥२५॥तत्रापि निस्त्वचः श्रेष्ठाः सत्वचो मध्यमाः स्मृताः ॥ प्राक्तनान् क्रिमिसंयुक्तान्मानान् हीनरसांस्त्यजेत् ॥२६॥ पनसः कदली चूतो लिकुचो नालिकेरकः ॥ नारंगो मातुलुंगश्च फलान्येषां वराणि च ॥२७॥ सूरणः सूक्ष्मकंदश्च पिंडालः शृंगिवेरकः ॥ चत्वारोऽमी प्रशस्ताश्च कंदाः स्युः पक्व-

---

नंतर थोडें मिऱ्यांचें व तिळांचें चूर्ण त्यांत टाकावें. (२०) हे सुरेश्वरा, याला कृसरान्न असें ह्मणतात. पूर्वी सांगितलेल्या परमान्नांत दुधाच्या निम्यानें गूळ घालून. (२१) त्याच्या निम्यानें गायीचें तूप घालावें, व केळीं घालावीं त्याला गुडोदन असें ह्मणतात. तांदुळाच्या एकतृतीयांशानें मुगाची डाळ घालून शिजविलेल्या (२२) अन्नाला हे ब्रह्मदेवा, मुद्गान्न (खिचडी) असें ह्मणतात. बुद्धिमानानें शुद्धान्नाशिवाय बाकीच्या अन्नांत मीठ टाकावें. (२३) क्लिन्नाहार (पाणचट अन्न), तुषाहार (कोंड्याची भाकर वगैरे), तांदुळांचा आहार (कच्चें अन्न), भिःसट (निःसत्व अन्न), जुन्या गळक्या पात्रांत शिजविलेलें अन्न वगैरे प्रयत्नपूर्वक वर्ज्य करावें. (२४) चांगल्या स्वच्छ पात्रांत शुद्धपणें तयार केलेलें, स्निग्ध, निर्मल असें अन्न नैवेद्याला श्रेष्ठ असें मानिलें आहे. (२५) वरणाकरितां चार प्रकारच्या धान्याच्या डाळी घ्याव्यात. मूग, तूर, कलाय (हरभरा), उडीद हे चार होत. बाकीचे सोडावेत. (२६) त्यांतही त्वचारहित डाळींचें वरण (आंधळें वरण) उत्तम मानिलें आहे, डोळे असलेलें वरण मध्यम मानिलें आहे. जुनाट, किडे लागलेल्या, निःसत्व अशा डाळी घेऊं नये. (२७) फणस, केळीं, आंबा, लिंबू, नारळ, नारिंग, माहळुंग, वगैरे फळें नैवेद्याला श्रेष्ठ होत. (२८) सूरण, सूक्ष्मकंद, पिंडाल, शृंगवेर हे चार कंद भाजीला चांगले आहेत, असें ह्मटलें आहे

कर्मणि ॥२८॥ कूष्मांडी कारवल्ली च पटोली बृहती वला ॥ अलाबुसू-क्ष्मबृहती तथा कोशातकीद्वयम् ॥२९॥ उर्वारुश्चेत्यमी तासां फलानि प्रवराणि च ॥ स्वादूनि चाविरुद्धानि फलान्यन्यानि वा बुधः ॥३०॥ मरीचजाजिकासर्पिर्लवणाम्लकसर्षपैः ॥ उपदंशान्यथायोग्यं पचेदपि च हिंगुना ॥३१॥ पत्रोपदंशा ये सर्वे तान्विविध्य विवर्जयेत् ॥ उत्तमं कपिलासर्पिर्मध्यमं शुभ्रगोघृतम् ॥३२॥ अन्यगोसर्पिरधममिति त्रिविधमीरितम् ॥ सद्यः पक्वं सुगंधाढ्यं विशुद्धं नयनप्रियम् ॥३३॥ शुद्धभांडस्थितं श्रेष्ठं शुद्धं सर्पिः शुभं स्मृतम् ॥ सकेशकल्कपुलकं स-दुर्गन्धं पुरातनम् ॥३४॥ अस्पृश्यपाणिभिः स्पृष्टं दुर्भाण्डस्थं घृतं त्यजे-त् ॥चंडालः पतितो रोगी पापीयान्देवलोऽन्त्यजः॥३५॥गणिका सूतको-दक्यौ व्रतभ्रष्टश्च कुक्कुरः॥ विट्सूकरः खरः काकः षंढो वाभक्ष्यभक्ष-कः ॥३६॥ स्वाध्यायविक्रयीत्येतेऽस्पृश्याश्चान्यत्र निंदिताः॥ एवं ज्ञात्वा दधिक्षीरे गृहीते स्नानकर्मणि ॥३७॥ नैवेद्ये च प्रयोक्तव्ये

---

(२९) भोपळा, कार्ली, पडवळ, लहान वांगीं वला (वांगीं), अलावु (राम-भोपळा), सूक्ष्मबृहती, दोन तऱ्हेची कोशातकी (दोनी तऱ्हेची दोडकी), (३०) वाळूक, वगैरे फलें भाजीला चांगलीं, असें ह्मणतात. गोड, निषिद्ध नसलेलीं, इतर फलें देखील भाजीकरितां घ्यावींत असें सांगतात. (३१) मिरे, जाजिका ( जिरे ) तूप, मीठ, चिंच, मोहऱ्या, हिंग हे पदार्थ घालून लेह्य करावें असें, सांगतात. (३२) पाल्याचें लेह्य जें असेल तें नैवेद्याला ठेवूं नये, असें ह्मणतात. कपिलागायीचें तूप उत्तम असून पांढऱ्या गायीचें तूप मध्यम आहे. (३३) आणि इतर गायीचें तूप अर्थात अधम असें ठरलें याप्रमाणें तुपांत तीन प्रकार आहेत. ताजें कढविलेलें, सुगंध, शुद्ध, नेत्र मनोहर, (३४) चांगल्या पात्रांत ठेवलेलें, श्रेष्ठ, शुद्ध, असें तूप शुभकर असें ह्मणतात. केस, गाळ, रोम असलेलें तूप, दुर्गंध व जुनें तूप, (३५) वाईट हातानें शिवलेलें, वाईट भांड्यांत ठेवलेलें असें तूप वर्ज्य करावें. चांडाल, पतित, रोगी, पातकी, देवल, अंत्यज, (३६) वेश्या, सूतकी, औदकी, ( जननाशौच असलेला ) व्रतभ्रष्ट, कुकुर, गांव-डुकर, गाढव, कावळे, नपुंसक, अभक्ष्य भक्षण करणारा, (३७) स्वाध्याय विक-णारा (पैसे घेऊन शिकविणारा), या लोकांचा स्पर्श करूं नये, व हे लोक निंद्य आहेत, असें जाणून अभिषेकाकरितां दूध दहीं घ्यावें. (३८) हे दोनी पदार्थ मिळाले असतां देवाला निवेदन करावयाचें असल्यास प्रशस्त असें पाहून देवाच्या

शस्ते द्वे चाभिसंभवे ॥ श्रेष्ठं स्यादक्षताष्टांशं घृतं मध्यं तदर्धकं ॥३८॥ कनीयसं तु तदर्धं यथालब्धमलाभतः॥अत्रप्रोक्तान्नपानानां व्यंजनानाम-भावतः ॥३९॥ दरिद्रश्चेत्स्वभोज्यं यत्तदीशाय निवेदयेत् ॥ मनःपूतं तु नैवेद्यं नयनानंदपूरितं ॥४०॥भविदृष्टितिरोधानात्पटेनाच्छादयेत्सदा ॥ अभक्तजनसंस्पृष्टपदार्थानिह वर्जयेत् ॥४१॥ अभक्तालोकितं सर्वं वर्ज-येदोदनादिकं॥ असंस्कारिकृतः पाको न निवेद्यः शिवस्य तु॥४२॥लैंग्ये॥ नैवेद्यं सघृतं शुद्धं शुक्लं शाल्योदनं शुभम् ॥ सगुडं शुभपात्रस्थं प्रदेयं हिमसन्निभं ॥४३॥ पायसं कृसरं मौद्गं संयावं शुभमेव हि ॥ व्यंजना-नि च शुभ्राणि पात्रेषु विनियोजयेत् ॥४४॥ पक्वांश्च मोदकांश्चैव घृत-पूरांश्च शोभकान् ॥ पुरिकाशोभवर्तिश्च माक्षिकांश्च सुशोभनान् ॥४५॥ अन्यानपि च गोधूमगुडखण्डघृतप्लुतान् ॥ निष्पन्नानि विचित्राणि भक्ष्याणि विनिवेदयेत् ॥४६॥ व्यंजनानि विचित्राणि षड्रसानि शुभानि

---

कार्याच्या उपयोगांत आणावें. अक्षताच्या आठव्या अंशाला (तितक्या तुपाला), श्रेष्ठ असें ह्मणतात. त्याच्या निम्या तुपाला मध्यम ह्मणतात (३९) त्याच्या निम्या तुपाला कनिष्ठ ह्मणतात. मिळत नसेल तर जितकें मिळेल, तितकेंच आणावें. यांत सांगितलेलें अन्न, पान, व्यंजन हे पदार्थ मिळत नसतील तर, (४०) शिवाय स्वतः दरिद्री असेल तर आपण जें खातो, तेंच अन्न शिवाला निवेदन करावें. परंतु तें अन्न आपल्या मनानें पवित्र झालेलें व डोळ्यास आनंद देणारें असें अन्न नैवेद्याला ठेवावें. (४१) भविलोकांच्या नजरेस पडूं नये ह्मणून नेहमीं वर वस्त्रा-च्छादन घालावें. अभक्त लोकांनीं स्पर्श केलेल्या पदार्थांचा त्याग करावा. (४२) अभक्त लोकांनीं पाहिलेलें अन्न वगैरे वर्ज्य करावें. शिवमंत्राचा संस्कार न झालेल्या लोकांनीं केलेला स्वयपाक शिवाला नैवेद्याकरितां ठेवूं नये. (४३) लिंगपुराणांत सांगितलें कीं, शुभ्र, व हिमासारखा तांदुळांचा भात तुपासहित, गुळासह चांगल्या पात्रांत ठेवून देवाला नैवेद्याकरितां ठेवावा. (४४) पायस, कृसरान्न, मुद्गान्न, संयाव हे पदार्थ शुभ होत. तसेंच शुभ्र व्यंजन पदार्थ चांगल्या पात्रांत ठेवून नैवेद्याला द्यावेत. (४५) पक्व झालेले, तुपांत तळलेले मोदक, शोभक (अनारसे), पुरी, शोभवर्ति, (करंज्या) चांगले माक्षिक, (४६) इतर गहुं गूळ तूप मिसळून तयार केलेले पदार्थ अनेक तऱ्हेचे भक्ष्य पदार्थ देवाला नैवेद्या करितां ठेवावेत. (४७)चित्रविचित्र व्यंजन पदार्थ, शुभकर षड्रस पदार्थ, सुंदर पान पदार्थ, हे मला

च ॥ पानानि च मनोज्ञानि देयानि मम सुंदरि ॥४७॥ ललितागमे ॥ मातुलुंगफलादीनि सुपक्वानि निवेदयेत् ॥ इक्षुरंभाफलादीनि सखण्डानि निवेदयेत् ॥४८॥ द्राक्षाखर्जूरचूतादीन्यखण्डानि निवेदयेत् ॥४९॥ शैवे ॥ हविश्च षड्विधं ज्ञेयं शुद्धं मुद्गान्नमेव च ॥ पायसं दधिसंमिश्रं गौडं च मधुना प्लुतं ॥५०॥ भक्ष्यैर्भोज्यैर्लेह्यचोष्यैः पेयैः खादनकैस्तथा ॥ एतेष्वेकमनेकं वा शिवाय विनिवेदयेत् ॥५१॥ सगुडं मथितं चापि कर्पूरसुरभीकृतं ॥ देयं शर्वाय भक्त्या तु पुष्पैर्वा वासितं शुभं ॥५२॥ गौडं वै ग्रीष्मकाले तु कोटिकोटिगुणं भवेत् ॥ उदस्विद्धा मुने ज्ञेयं भक्त्या चाल्पधनैर्नरैः ॥५३॥ तक्रं दत्वा ह्युदस्वित्तु द्विगुणं पुण्यमाप्नुयात्॥उदस्वित्वं च तक्रं च गौडं मथितमेव च॥५४॥मुने चाप्युषितं देयं दर्शनीय सुवासितं॥ दत्वा रात्रौ महेशाय गुडखण्डसमन्वितं ॥५५॥ क्षीरं क्षीरार्णवे भोगाल्लभते विष्णुनार्चितः ॥ हेमपात्रे तु निक्षिप्य दध्योदनमनुत्तमम्॥५६॥ गुडखण्डैरलंकृत्य भक्ष्याद्यैश्च सुगंधितैः॥

---

अर्पण करावेत. (४८) ललितागमांत सांगितलें कीं,--माहलुंग वगैरे फळें पिकलेलीं देवाच्या नैवेद्याला ठेवावींत ऊंस केळीं वगैरे पदार्थ तुकडे करून नैवेद्याला ठेवावेत. (४९) द्राक्ष, खजूर, आंबा हे अखंड ठेवावेत. (५०) शैवपुराणांत सांगितलें कीं,--हविष्य सहा प्रकारचें आहे, असें सांगतात. शुद्ध अन्न, मुद्गान्न, पायस, दध्योदन, गुडोदन, माक्षिकान्न असे सहा प्रकार होत. (५१) भक्ष्य, भोज्य, लेह्य, चोष्य, पेय, खादनक यामध्यें अनेक किंवा एक जसें सांपडेल त्याप्रमाणें शिवापुढें नैवेद्याला ठेवावें. (५२) चांगल्या प्रकारें घुसळून तयार करून त्यांत गूळ, कापूर, फूल यांनीं सुवासित व मधुर केलेलें ताक देवाला अर्पण करावें. (५३) उन्हाळ्यांत गूळ घातलेलें ताक देवाला दिलें असतां कोटि कोटिपटीनें पुण्य मिळतें. हे मुने, साधारण दरिद्री मनुष्यानें पाणी घालून तयार केलेलें ताक नैवेद्याला भक्तीनें ठेवावें. (५४) पाणी घालून घुसळलेलें ताक भक्तीनें दिलें असतां दुप्पट पुण्य मिळतें. गूळ घालून घुसळलेलें असो, किंवा नुसतें पाणी घालून घुसळलेलें असो. (५५) ताजें, पाहण्यालायक, सुवासित असें ताक द्यावें. गुळाचा खडा टाकलेलें तक्र (ताक) रात्रीच्या वेळेस शिवाला दिलें असतां (५६) क्षीरसमुद्रामध्यें विष्णु त्याची पूजा करून प्यावयास दूध देतो. व तेथें तो अनेक भोगांचा उपभोग घेतो. सोन्याच्या पात्रांत श्रेष्ठ दध्योदन ठेवून (५७) त्यांत गुळाचा खडा टाकून नैवेद्याला जो ठेवतो, व सुगंध अनेक भक्ष्य पदार्थ, व अनेक

आर्द्रोपदंशैश्च तथा सितवस्त्रेण वेष्ट्य च ॥५७॥ दद्याद्यो निशि वै भक्त्या शिवतुल्यः प्रजायते ॥ दत्वा चाचमनीयं च करोद्वर्तनमेव च ॥५८॥ सकर्पूरं सतांबूलं कुर्यान्नीराजनं ततः ॥ नैवेद्यस्य फलं वक्ष्ये सांप्रतं शृणु सुव्रत ॥५९॥ हारिद्रं कृसरं शुक्लं पायसं वापि यावकं ॥ निवेद्य भक्त्या शर्वाय शाश्वतीं गतिमाप्नुयात् ॥६०॥ भक्त्या वित्तानु-सारेण दत्वाल्पं यदि वा वहु ॥ नैवेद्यं रुद्रलोकादिलोकेष्वेवं प्रमोदते ॥६१॥वीरतंत्रे ॥ शुद्धोदनसहस्रेभ्यः पायसं च विशिष्यते ॥ पायसानां सहस्रेभ्यः कृसरान्नं विशिष्यते ॥६२॥ कृसरान्नसहस्रेभ्यो गौडान्नं च विशिष्यते॥गौडान्नस्य सहस्रेभ्यो मुद्गान्नं च विशिष्यते॥६३॥एवमेव क्रमेणैव सहस्रगुणितं फलम् ॥ यावन्तस्तण्डुलास्तस्मिन्नैवेद्ये परिसंख्यया ॥ तावद्युगसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥६४॥ शैवे ॥ सिद्धमन्नं शिवायाथ दत्वा भक्त्या सकृन्मुने ॥ घृतसिक्तं शिवे लोके कल्पमेकं तु मोदते ॥६५॥ सव्यंजनं च द्विगुणं सघृतं तच्छताधिकम् ॥ अन्नात्कोटिगुणं पुण्यं दत्वा भक्ष्यं शिवाय तु ॥६६॥

---

घालून तयार केलेले व्यंजन पदार्थ पात्रांत ठेवून त्यावर शुभ्र वस्त्राचें आच्छादन घालून (५८) रात्रीं जो शिवाला नैवेद्य दाखवतो, तो शिवासमान होतो नैवेद्या-नंतर आचमन व करोद्वर्तन द्यावें. (५९) मग तांबूल देऊन कापराचें नीराजन करावें. हें सुव्रता, आतां नैवेद्याचें फल सांगतों ऐक. (६०) हरिद्रान्न, कृसरान्न, शुद्धान्न, पायस, यावक (अंबिल), हे पदार्थ शिवाला नैवेद्या करितां जो ठेवतो त्याला शाश्वत गति मिळते. (६१) आपल्या द्रव्याला अनुसरून (शक्त्यनुसार) थोडें किंवा पुष्कळ नैवेद्याला जो ठेवतो, तो रुद्र लोक वगैरे शाश्वत लोकांमध्यें आनंदानें राहतो. (६२) वीरतंत्रांत सांगितलें कीं,--हजारो शुद्धोदनांपेक्षां (पांढऱ्या अन्नांपेक्षां) पायस श्रेष्ठ होय. हजारो परमान्नांपेक्षां कृसरान्न श्रेष्ठ होय. (६३) हजारों कृसरान्नांपेक्षां गुडोदन श्रेष्ठ होय. हजारो गुडोदनांपेक्षां मुद्गान्न श्रेष्ठ होय. (६४) या क्रमानें उत्तरोत्तर हजार हजार पटीनें फल जास्त मिळतें. नैवेद्याला ठेवलेल्या अन्नांमध्यें तांदुळाचे दाणे जितके असतील, इतर पदार्थांत दाणे जितके असतील तितक्या हजार युगपर्यंत रुद्र लोकांत पूज्य होतो. (६५) शैव-पुराणांत सांगितलें कीं,- हे मुने, तयार केलेलें व तूप घातलेलें अन्न भक्तीनें शिवाला जो अर्पण करितो, तो एक कल्पपर्यंत शिवलोकांत पूज्य होतो. (६६) व्यंजन सहित नैवेद्याला ठेविलें असतां दुप्पट पुण्य मिळतें, तुपासह ठेविलें असतां शंभरपटीनें जास्त मिळतें. अन्नापेक्षां भक्ष्य दिलें असतां कोटिपटीनें पुण्य जास्त

कामिकागमे ॥ गुडखण्डकृतानां च भक्ष्याणां च निवेदने ॥ घृतेन पाचितानां स्यात्तत्तत्कोटिगुणं फलम् ॥६७॥ क्षीरमण्डककासारमोदकाशोकवर्तिनां ॥ निवेदने कुरुक्षेत्रे हेमकोटिद्पुण्यभाक् ॥६८॥ मज्जिकापानखाद्यानां भक्ष्यार्धं फलमाप्यते ॥ तदर्धं सलिलस्यापि वासितस्य निवेदने ॥६९॥ सर्वयज्ञोपवासेषु सर्वतीर्थेषु यत्फलं ॥ स्तुतिजप्योपहारेषु तिले तत्फलमाप्नुयात् ॥७०॥ शैवे ॥ येन केनापि वा भक्त्या शिवायान्नं सकृन्मुने ॥ दत्वा मुंचति संसारं सक्तचित्तो लभेत्सुखम् ॥७१॥ लैंग्ये ॥ अदत्वा तु यदश्नाति गृहे गृहपतिः स्वयं ॥ पच्यते रौरवे घोरे नरके कालमक्षयम् ॥७२॥ वीरतंत्रे ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन नैवेद्यं चैव कारयेत् ॥ एवं यः कुरुते मर्त्यः सर्वपापैः प्रमुच्यते ॥७३॥ कुलैकविंशमुत्तार्य शिवलोके महीयते ॥७४॥ अजितागमे ॥ लवंगत्रुटिजातिर्भूचूर्णं तक्कोलजं तथा ॥ कर्पूरेण समायुक्तं पंच सौगंधिकं स्मृतं ॥७५॥ मुखवासं तु तच्छ्रे-

---

मिळतें. (६७) कामिकागमांत सांगितलें कीं,--गुळाचा खडा टाकून तयार केलेल्या भक्ष्यांचें निवेदन केल्या पेक्षां तुपांत तळलेल्या पदार्थांचें निवेदन केलें तर कोटिपटीनें जास्त पुण्य मिळतें. (६८) दूध मांडे, कासार ( राळ्याचा भात ), मोदक अशोक वर्ति ( करंज्या ) वगैरे पदार्थ शिवाला अर्पण केले असतां कुरुक्षेत्रांत कोट्यावधि सुवर्णदान केल्याचें श्रेय येतें. (६९) मज्जिका ( ताक ), पान, खाद्य हे पदार्थ नैवेद्याला ठेविलें असतां भक्ष्याच्या निम्यानें फल मिळतें. सुवासिक पाणी ठेविलें तर त्याच्या निम्यानें फल मिळतें. (७०) सर्व यज्ञ, सर्व उपवास, सर्व तीर्थ यांना जें फल सांगितलें आहे, तें फल स्तुति, जप, उपहार, तीळ यांच्या योगानें मिळतें. (७१) शैवपुराणांत सांगितलें कीं,--हे मुने, कोणत्याही कारणानें असो, परंतु भक्तीनें शिवाला अन्न समर्पण एकवार केलें असतां प्राणी संसारापासून मुक्त होतो. देवाच्या ठिकाणीं मन आसक्त करून सुखी होतो. (७२) लिंगपुराणांत सांगितलें कीं, जो गृहस्थ आपल्या घरांत अन्न शिजवून देवाला नैवेद्य न दाखवितां स्वतः खातो, तो प्राणी अक्षयकालपर्यंत भयंकर रौरव नरकांत पडून संकटें भोगतो. (७३) वीरतंत्रांत सांगितलें कीं, ह्मणूनच सर्व प्रयत्नांनीं शिवाला नैवेद्य दाखवावा. याप्रमाणें जो करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो, (७४) शिवाय एकवीस कुलांचा उद्धार करून स्वतः शिवलोकांत पूज्य होतो. (७५) अजितागमांत सांगितलें कीं,--लवंग, त्रुटि, जायफळ भू, तक्कोल यांचें चूर्ण करून त्यांत कापूर मिसळून देवाला द्यावें, याला पंचसौगंधिक ह्मणतात. (७६) सौगंधिक मुखवास हा श्रेष्ठ आहे, व नुसता कापूर मध्यम, नुसती

र्धं कर्पूरेणैव मध्यमम्॥लवंगेनाधमं प्रोक्तं देवसौगंधिकं स्मृतम् ॥७६॥
ललितागमे ॥ लवंगतैलकर्पूरफलपत्रसमन्वितम्॥चूर्णं कृत्वा महादेवि
चंदनैश्च समन्वितम् ॥७७॥ मुखवासमिदं प्रोक्तं दापयेद्धृदयेन तु॥७८॥
अजितागमे ॥ हेमादिनिर्मिते पात्रे प्रोक्षितव्यस्तशोधिते ॥ यथालाभं
ततश्चापि तांबूलं विनिवेदयेत् ॥७९॥ क्रियासारे ॥ तांबूलिकायाः प-
त्राणि क्रमुकस्य फलानि च ॥ युक्तक्षारं सकर्पूरं तांबूलमिति कीर्तितम्
॥८०॥ पंचसौगंधिकोपेतं यस्तांबूलं निवेदयेत् ॥ शिवाय गुरवे चैव
तस्य पुण्यफलं श्रुणु॥८१॥सुगन्धदेहस्तेजस्वी सर्वावयवसुंदरः॥युगको-
टिं महाभोगैः शिवलोके महीयते ॥८२॥ ॥ शैवे ॥ एवं सौगंधिकोपेतं
तांबूलं भरुडः पुरा ॥ दत्वा रुद्राय सांबाय लब्धवान्परमं पदम् ॥८३॥
तस्मात्सौगंधिकोपेतं तांबूलं यो निवेदयेत् ॥ शिवाय मुनिशार्दूल सो-
माय गणराड्भवेत् ॥८४॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वरा-
चारसंग्रहे सदाचारनिरूपणपूजासाधनद्रव्यनिर्णयनैवेद्यमुखवासता-
म्बूललक्षणतन्माहात्म्यं नाम द्विषष्ठितमोध्यायः

---

लवंग अधम (कनिष्ठ) होय याप्रमाणें देवाचे सौगंधिक पदार्थ आहेत. (७७)
ललितागमांत सांगितलें कीं, लवंग, सुवासिक तेल, कापूर, जायफळ, जायपत्री,
यांचें चूर्ण करून त्यांत चंदन मिसळून देवाला द्यावें. (७८) याला मुखवास असें
ह्मणतात. हा पदार्थ देवाला मनःपूर्वक अर्पण करावा. (७९) अजितागमांत सांगि-
तलें कीं,--सोनें वगैरे धातूंचें पात्र प्रोक्षण करून, शुद्ध करून जितके मिळतील
तितक्या पदार्थांचें तांबूल देवाला निवेदन करावें. (८०) क्रियासारांत सांगितलें
कीं,--विड्याचीं पानें, सुपारी, क्षार, कापूर, वगैरे मिसळून तयार केलेल्या पदा-
र्थाला तांबूल असें ह्मणतात. (८१) पंचसौगंधिकांनीं युक्त तांबूल देवाला द्यावें.
असें तांबूल देवाला व गुरूला जो अर्पण करतो, त्याचें पुण्यफल सांगतों, ऐक.
(८२) त्याचें शरीर सर्व सुगंधमय होऊन तो सर्व अवयवांनीं सुंदर होतो. कोटि-
युगपर्यंत उत्तम भोग भोगीत शिवलोकांत पूज्य होतो. (८३) शैवपुराणांत सांगि-
तलें कीं,--याप्रमाणें सौगंधिक तांबूल भरुडानें शिवाला देऊन श्रेष्ठ पद मिळविलें.
(८४)सौगंधिक तांबूल उमासहितशिवाला जो देतो, तो एका गणाचा राजा होतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार
संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यानिर्णयांतील नैवेद्यमुखवास
तांबूललक्षण तन्माहात्म्य नांवाचा बासष्टावा अध्याय संपला.

## ॥ अथ त्रिषष्ठितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ शैवे ॥ धर्मसंहितायाम् ॥ सनत्कुमार उवाच ॥ नीराजनविधिं वक्तुमिहार्हसि गणेश्वर ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा सर्वभूतगणाग्रणीः ॥१॥ नीराजनविधिं वक्तुं मतिं चक्रे महामतिः॥२॥ नंदिकेश्वर उवाच ॥ अतीवरुद्रभक्तस्त्वं ब्रह्मपुत्र महामते ॥ शृणु वक्ष्यामि संक्षेपान्नीराजनविधिक्रमम् ॥३॥ सर्वपापहरं पुण्यं सर्वव्याधिविनाशनम् ॥ सर्वैरनुष्ठितं पूर्वं सर्वसिध्यर्थमुत्तमम् ॥४॥ विशेषज्ञानदं चैव सर्वशांतिकरं परम् ॥ हेम्ना कृत्वा मुने पात्रसप्तकं चैकमेव वा ॥५॥ रजतेनापि वा विद्वान् ताम्रलोहेन वा पुनः ॥ मध्ये पद्मसमायुक्तं शिवशास्त्रोक्तलक्षणैः ॥६॥ क्षाल्य शुद्धांबुना पात्रसप्तकं तेषु कारयेत् ॥ त्रिशूलं शंखयुग्मं च वज्रं कमलमेव च ॥७॥ श्रीवत्सं स्वस्तिकं विप्र दर्पणं च यथाक्रमम् ॥ पिष्टेन वा मुने तत्र गोमयेनापि वा पुनः ॥८॥ चतुरंगुलमानेन शूलाद्यं दर्पणान्तकम् ॥ नानावर्णसमायुक्तैरक्षतैस्तिलतण्डुलैः ॥९॥ सिद्धार्थैर्दधिसंमिश्रैश्चूताश्व-

---

श्रीशिवास नमस्कार असो. शैवपुराणांत धर्मसंहितेंत ह्मटलें कीं,--सनत्कुमार बोलला-(१) हे गणेश्वरा, आतां नीराजनाचें विधान सांगा. असें त्याचें वचन ऐकून सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ (२) अशा बुद्धिमान नंदिकेश्वरानें नीराजनविधि सांगण्याचा विचार केला.

(३) नंदिकेश्वर बोलले—हे बुद्धिमाना सनत्कुमारा, तूं अत्यंत रुद्रभक्त आहेस. नीराजन विधीचा क्रम संक्षेपानें सांगतों, ऐक. (४) हा क्रम सर्व पापनाशक असून सर्व रोगाला निवारण करणारा आहे. सर्वसिद्धि मिळविण्याकरितां पूर्वी सर्वांनीं नीराजनाचा उत्तम क्रम स्वीकारला होता. (५) हें विधान विशेषेंकरून ज्ञान देणारें असून सर्वशांति देणारें आहे, व परम श्रेष्ठ आहे. हे मुने, सोन्याचीं सात पात्रें किंवा एक पात्र करावें. (६) चांदीचें किंवा तांब्याचें व लोहाचें तरी करावें. शिवशास्त्रांत सांगितलेल्या लक्षणांला अनुसरून पात्राच्या मध्यभागीं पद्म काढावें. (७) स्वच्छ पाण्यानें सातहीं पात्रें धुवून त्यांमध्यें त्रिशूल, दोन शंख, वज्र, कमल, (८) श्रीवत्स, स्वस्तिक, दर्पण (आरसा) वगैरे चित्रें पिठानें किंवा गायीच्या शेणानें क्रमानें काढावींत. (९) त्रिशूलापासून दर्पणापर्यंत चार बोटांच्या प्रमाणानें प्रत्येक चित्र लिहावें. त्यावर अनेक तऱ्हेचे रंग असून अक्षता, तीळ तांदूळ हे पदार्थ टाकलेले असावेत. (१०) दहीं मिसळलेल्या अक्षता, आंब्याचीं, पिंपळाचीं

स्थादिपल्लवैः ॥ औषधीभ्यश्च मेध्याभिः सर्वबीजैर्यवांकुरैः ॥१०॥ अलंकृत्य यथान्यायं नवदीपांश्च कारयेत् ॥ पाद्यमाचमनं चार्घ्यं गंधं पुष्पं च दापयेत् ॥११॥ मुने नमः शिवायेति भसितं च प्रदापयेत् ॥ ततः शिवं च मतिमान्कुर्यान्नीराजनं शिवे ॥१२॥ शिवधर्मे ॥ अष्टम्यादिषु पर्वसु दिवसेषूत्सवेषु च ॥ सर्वकालेषु पुण्येषुपुष्यपौर्णिमपर्वणि ॥१३॥ शंखभेर्यादिनिर्घोषैर्महद्भिर्गेयसंचयैः ॥ कुर्यान्नीराजनं लिंगे शिवमुद्दिश्य मंगलैः ॥१४॥ यावद्वर्षाणि विधिवत्कुर्यान्नीराजनं शिवे ॥ तावद्वर्षसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥१५॥ शैवे ॥ धर्मसंहितायाम् ॥ दधीचोऽथ महेशाय दत्वा नीराजनं पुरा ॥ लब्धवान्परमैश्वर्यमवध्यत्वं च शत्रुभिः ॥१६॥ अकामतः शिवे भक्त्या दत्वा नीराजनं शुभम् ॥ शिवलोकमवाप्नोति नात्र कार्या विचारणा ॥१७॥ एतत्ते कथितं सर्वं नीराजनविधिक्रमम् ॥१८॥ शैवे ॥ दर्पणं चापि सुस्निग्धं दिव्यगंधानुलेपितम् ॥ समंताद्रत्नसंछन्नं स्रग्वरैश्चोपशोभितम् ॥१९॥ शिवस्य पुरतश्चारुदर्पणं चंद्रनिर्मलम् ॥ यो वा निवेदयेद्भक्त्या स याति परमं

---

पानें, पवित्र औषधी, सर्व बीज, यवाचे अंकुर (११) यांनीं अलंकृत करून विध्यनुसार नऊ दीप करावेत पाद्य, आचमन, अर्घ्य, गंध, पुष्प, वगैरे पदार्थ समर्पण करावेत. (१२) हे मुने, "नमःशिवाय" या मंत्रानें देवाला भस्म समर्पण करावें. नंतर बुद्धिमानानें शिवाला मंगल नीराजन (आर्ती) करावें. (१३) शिवधर्मांत सांगितलें कीं,--अष्टमी वगैरे पर्वकालीं, उत्सवाच्या दिवशीं सर्व पुण्यकालीं, पौर्णिमेच्या दिवशीं, (१४) शंख, भेरी, वगैरे घोषांसह मोठमोठ्या गायनांसह शिवाला मंगल नीराजन करावें. (१५) जितके वर्षे शिवाला असें विधिपूर्वक नीराजन केलें असेल, तितके हजार वर्षपर्यंत रुद्रलोकांत तो प्राणी पूज्य होतो. (१६ ) शैवपुराणांतील धर्मसंहितेंत सांगितलें कीं,--पूर्वी याप्रमाणें दधीचमहर्षीनें असें नीराजन शिवाला केलें होतें, ह्मणून त्याला अत्युत्कृष्ट ऐश्वर्य व शंभुकडून अवध्यत्व (न मरणें) मिळालें. (१७) निष्कामभक्तीनें शिवाला जो मंगल नीराजन करतो, तो शिवलोकाला जातो, यांत विचार करावयास नको आहे. (१८) नीराजन विधीचा हा सर्व क्रम तुला सांगितला. (१९) शैवपुराणांत सांगितलें कीं,--चंदनाची चौकट घातलेला किंवा गंध लावलेला, सभोंवतीं रत्नांनीं सुशोभित केलेला, माळांनीं अलंकृत केलेला जाड आरसा (२०) शिवापुढें जो ठेवतो, व शिवाला चंद्राप्रमाणें निर्मळ असलेला आरसा जो भक्तीनें अर्पण करतो,

पदम् ॥२०॥ दर्पणं देवदेवाय पूजान्ते भक्तिपूर्वकम् ॥ दर्शयित्वा सकृ- द्याति शिवलोकं न संशयः ॥२१॥ शिवधर्मोत्तरे ॥ नालिकेराणि शु- द्धानि फलानि विविधानि च ॥ नित्यं देयानि मद्भक्तैर्लोके माहेश्वरे- जनैः ॥२२॥ शिवधर्मे ॥ शरच्चंद्रांशुविमलं मुक्तादामोपशोभितम् ॥ म- णिदण्डमयं छत्रं यो दद्यात्कांचनावृतम् ॥२३॥ छत्रेणातिविचित्रेण धार्यमाणेन शोभिना ॥ विमानशतसंभोगे चिरं शिवपुरे वसेत् ॥२४॥ शैवे ॥ धर्मसंहितायाम् ॥ शुद्धमुक्ताफलमयं हेमदण्डं सुशोभनम् ॥ छत्रं दत्वा परार्द्धं हि नंदीश्वरसमो भवेत् ॥२५॥ क्रियासारे ॥ मयूर- पक्षदण्डानां वल्कलैरपि पांडुरैः ॥ सौवर्णे राजते दण्डे रत्नजालवि- भूषिते ॥२६॥ हस्तमात्रप्रमाणे तु निर्मितं नेत्रशोभितम् ॥ चामरं च तदाख्यातं युगमेवं प्रयोजयेत् ॥२७॥ शिवधर्मे ॥ शिवाय चामरं दत्वा मणिरत्नविभूषितम् ॥ हेमरौप्यादिदण्डं वा तस्य पुण्यफलं शृणु ॥२८॥ चामरासक्तहस्ताग्रदिव्यस्त्रीपरिवारितः॥महाभोगविमानस्थश्चिरं शि-

---

तो श्रेष्ठ पदाला जातो. (२१) पूजा संपल्यानंतर देवादिदेव शिवाला भक्तीनें एकवार जो आरसा दाखवितो, तो शिवलोकाला जातो, यांत संशय नाहीं. (२२) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं,--नारळ, शुद्ध अनेक तऱ्हेचीं फळें निरंतर माझे भक्त अशा माहेश्वरलोकांनीं मला अर्पण करावींत. (२३) शिवधर्मांत सांगि- तलें कीं,--शरत्कालच्या चंद्राप्रमाणें निर्मल असलेलें मोत्यांच्या माळांनीं सुशोभित केलेलें, रत्नाची काठी असलेलें, सोन्यानें मढविलेलें श्वेतच्छत्र जो शिवाला देतो, (२४) त्याच्या डोक्यावर चित्रविचित्र सुशोभित छत्र धरून शेंकडो विमानांत बसवून शिवपुराला त्याला नेतात. तेथें तो चिरकाल सुख भोगतो. (२५) शिव- पुराणांत धर्मसंहितेंत सांगितलें कीं,--चांगले मोती लावलेलें, सोन्याची काठी असलेलें, चांगलें छत्र शिवाला जो देतो, तो परार्ध कालपर्यंत नंदीश्वराप्रमाणें शिवलोकांत सुख भोगतो. (२६) क्रियासारांत सांगितलें कीं, मोराचे पिसारे लावलेलें, शुभ्र वल्कलांनीं सुशोभित केलेलें, असे सोन्याचे किंवा चांदीचें दंड (काठी) असून त्या भोंवतीं रत्नांनीं भूषित करून (२७) एक हात प्रमाणानें केलेलें, पाहण्यालायक केलेलें चामर जो शिवाला देतो, तो एक युगपर्यंत शिव- लोकांत सुख भोगतो. (२८) शिवधर्मांत सांगितलें कीं,--मणिरत्नांनीं भूषित, सोन्याची किंवा चांदीची काठी असलेलें चामर दिलें असतां काय पुण्य मिळतें तें सांगतों, ऐक. (२९) चामर हातांत धरलेल्या दिव्य स्त्रियांनीं युक्त होऊन

पुरे वसेत् ॥२९॥ यावत्तद्रोमसंख्यातं चामरेऽतीवशोभने ॥ तावत्कल्पायुतं दिव्यं शिवलोके व्यवस्थितः ॥३०॥ क्रियासारे ॥ वृत्तं द्वितालविस्तारं पूर्वोक्तं शुकनिर्मितम् ॥ पूर्वोक्तदण्डे संप्रोतं चतुस्तालायते शुभे ॥३१॥ तालवृंतमिति ख्यातं चित्रैरन्यैर्विभूषितम् ॥ एतदप्यर्पयेद्युग्मं सद्भक्त्याथ विचक्षणः ॥३२॥ शिवधर्मे ॥ भक्त्या निवेद्य रुद्राय तालवृंतं सुशोभनम् ॥ दशवर्षसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥३३॥ मयूरव्यजनं दत्वा शिवायातीव शोभनम् ॥ वर्षकोटिशतं पूर्णं रुद्रलोके महीयते ॥३४॥ क्रियासारे ॥ द्रव्याण्येवं समालोक्य सदोषाणि विवर्जयेत् ॥ निर्दोषाणि च सौम्यानि संगृण्हीयाद्यथाविधि ॥३५॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यनिर्णये नीराजनदर्पणफलछत्रचामरव्यजनलक्षणतन्माहात्म्यं नाम त्रिषष्ठितमोऽध्यायः ॥

---

मोठमोठ्या भोगांनीं युक्त असलेल्या विमानांत बसून चिरकाल शिवपुरांत सुख भोगतो (३०) सुंदर चामराचे रोम किती असतील, तितक्या दहाहजार कल्पांपर्यंत शिवलोकांत सुखानें राहतो. (३१) क्रियासारांत सांगितलें कीं,--वर्तुलाकृतीचे दोन ताल परिमित विस्ताराचे, (टीचभर) मध्यें पोपट काढलेले, पूर्वी सांगितलेल्या दंडांत गोवलेले, चारताल प्रमाण असलेले, शुभकर (३२) असे ताडाचे दोन पंखे इतर चित्रांनीं सुशोभित करून उत्तम शक्तीनें बुद्धिमानानें शिवाला समर्पण करावेत. (३३) शिवधर्मात सांगितलें कीं,--मंगलकर ताडाचे पंखे रुद्राला भक्तीनें जो देतो, तो दहा हजार वर्षपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (३४) अत्यंत सुंदर असे मोराच्या पिसाऱ्याचे पंखे शिवाला जो देतो, तो पूर्ण शंभर कोटि वर्षपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (३५) क्रियासारांत सांगितलें कीं,--याप्रमाणें द्रव्य पाहून दोषी असतील ते वर्ज्य करून निर्दोष सौम्य असे पदार्थ विधीला अनुसरून संग्रह करावें.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधनद्रव्यनिर्णयांतील नीराजनदर्पण फलछत्र चामर व्यजन लक्षण तन्माहात्म्य कथननांवाचा त्रेसष्टावा अध्याय संपला.

## ॥ अथ चतुःषष्ठितमोऽध्यायः॥

श्रीशिवाय नमः ॥ ग्रंथान्तरे ॥ ईश्वर उवाच ॥ वक्ष्येऽथ नृत्यसंगीते शृणु पार्वति यत्नतः ॥ नाहं वसामि कैलासे न मेरौ न च मंदरे॥१॥ मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि पार्वति ॥ न घृते तादृशी तृप्तिर्न क्षीरे न च गुग्गुलौ ॥२॥ यादृशी चैव गांधर्वे मम तृप्तिर्वरानने ॥ नोदकेन न बिल्वेन न तु पद्मैः सुगंधिभिः ॥३॥ गांधर्वे देवि तुष्यामिताललक्षणसंयुते ॥ चित्तलौल्येन यो देवि गायत्येव मम प्रिये ॥४॥ सोऽपि वर्षसहस्राणि ममाग्रे जायते गणः॥ योऽपि गायति शाठ्येन परार्थेन शिवालये ॥५॥ सोऽपि क्रतुसहस्रस्य फलं प्राप्नोति मानवः॥ शुद्धं वा स्वरहीनं वा यो गायति शिवालये ॥६॥ सप्तक्रतुशतं पुण्यं गायको लभते फलम् ॥७॥ ग्रंथान्तरे ॥ अर्चयित्वा तु यो लिंगं मुखवाद्यं तु कारयेत् ॥ पूज्यते गणकोटीभिर्देवदेवस्य चाग्रतः ॥८॥ भूदानस्य च यत्पुण्यं कन्यादानस्य यत्फलम् ॥ मुखवाद्येन तत्पुण्यमुभयं लभते नरः ॥९॥ स्त्रीसंगीतकदानेन वाद्येनैव विशेषतः ॥ यथेष्टमैश्वरे लोके मोदते कालमक्षयम् ॥१०॥ पूजाकाले त्रिसंध्यं वा यः कुर्याद्गेय-

---

श्रीशिवास नमस्कार असो. ग्रंथांतरांत सांगितलें कीं,--श्रीशिव बोलले-(१) हे पार्वति, आतां नर्तन गायन सांगतों, ऐक. कैलास, मेरु, मंदर याठिकाणीं मी राहत नसून (२) माझे भक्त कोठें गात असतील त्याठिकाणीं राहतों. तूप, दूध, गुग्गुळ यांनीं तशी कांहीं माझी तृप्ति होत नाहीं. (३) हे सुंदरि, गायनानें माझी तृप्ति जशी होते, तशी तृप्ति उदकानें, बिल्वानें, सुगंध पद्मांनीं देखील होत नाहीं. (४) हे देवि,ताललययुक्त गायनानें मी तृप्त होतों. हे प्रिये, चंचल मनानें जो माझ्यापुढें गातो, (५) तो प्राणी माझ्या समोर हजार वर्षपर्यंत गण होऊन राहतो. शठपणानें दुसऱ्याकरितां शिवालयांत जो गातो, (६) त्यालाही हजार यज्ञ केल्याचें फल मिळतें. शुद्ध किंवा अपस्वर गायन शिवालयांत जो करतो, (७) त्याला सातशें यज्ञ केल्याचें पुण्य मिळतें. (८) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,--इष्टलिंगपूजा करून मुखवाद्य जो करतो, तो साक्षात् शिवासमक्ष हजारो गणांनीं पूजित होतो. (९) भूदानाचें जें फल असेल, कन्यादानाचें जें फल असेल, तें फल मुखवाद्यानें मानवाला मिळतें. (१०) मृदंग वगैरे वाद्यांसह स्त्रियांचें गायन जो शिवालयांत करवितो, तो शिवलोकांत अक्षय कालपर्यंत यथेच्छ सुख भोगतो. (११) तीन्ही वेळ पूजा करितानां गायन, वादन, नर्तन, मुखवाद्य जो करतो,

वादनम् ॥ नृत्तं वा मुखवाद्यं वा सोऽपीश्वरपदं लभेत् ॥११॥ कामिकागमे ॥ वादकानां चतुर्विंशत्सर्ववाद्यसमन्वितम् ॥ गणिकानां च तत्रिंशत्त्रयोविंशच्च वा दश ॥१२॥ रूपयौवनयुक्तानां त्रिकालं नृत्तमाचरेत् ॥१३॥ शैवे ॥ धर्मसंहितायाम् ॥ नृत्तापयति यः कश्चिन्नाटकं वा शिवालये ॥ शतं कुलं समुध्दृत्य रुद्रलोकं स गच्छति॥१४॥अर्चयित्वा तु यो लिंगं नृत्तारंभं च कारयेत् ॥ शिवगीतं शिवस्याग्रे स गच्छेत्परमां गतिम् ॥१५॥ नृत्तं गीतं च वाद्यं च तस्मिन्काले करोति यः ॥ तुष्यत्येवाचिरं तस्य देवदेवो महेश्वरः ॥१६॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन शिवस्य परमात्मनः ॥ अवश्यमपि कर्तव्यं नृत्तगीतादिकं तथा॥१७॥

नंदिकेश्वर उवाच ॥ जैगीषव्य इति ख्यातः सर्वशास्त्रार्थपारगः ॥ पुत्रः शतशलाकस्य भस्मदिग्धतनूरुहः ॥१८॥ भस्मशायी पुरा रुद्रं नृत्तगीतैरतोषयत् ॥ प्रतिष्ठाप्य पुरा लिंगं गंधाद्यैरर्चयन् द्विजः॥१९॥ नृत्तगेयप्रियो रुद्रः सगणस्तस्य धीमतः ॥ आरुह्य वृषमीशानो गत्वा तत्र महामुने ॥ उवाच मुनिशार्दूलं देवश्रेष्ठो जगत्पतिः ॥२०॥ तुष्टोऽस्मि तव भद्रं ते कामं किं करवाणि वै ॥ जैगीषव्य महाभाग वरा-

---

किंवा करवितो, तो शिवपदाला जातो.(१२, १३)कामिकागमांत सांगितलें कीं,—वाजविणारांच्या चोवीस वाद्यांसह तीस, तेवीस, दहा अशा सुंदर तरुण गणिकांचें नर्तन त्रिकाल देवापुढें करवावें. (१४) शैवपुराणांतील धर्म संहितेंत सांगितलें कीं,—शिवालयांत नाच, बैठक, नाटक जो करवितो, त्याचीं शंभर कुलें उत्धृत होतात, व स्वतः तो रुद्रलोकाला जातो. (१५) शिवलिंगपूजा करून जो नाच करिवतो, किंवा शिवापुढें शिवगीत जो करिवतो, तो श्रेष्ठ गतीला जातो. (१६) नर्तन, गायन, वाद्य पूजेच्या वेळेस जो करतो, त्याला साक्षात महेश्वर लौकरच प्रसन्न होतो. (१७) याकरितां सर्व प्रयत्न करून परमात्म्या शिवापुढें आवश्य नर्तन गायन वगैरे करवावें.

(१८) नंदिकेश्वर बोलले—सर्व शास्त्रार्थामध्यें पारंगत जैगीषव्य नांवाचा मुनि होता, तो शतशलाक नांवाच्या ऋषीचा मुलगा असून सर्वांगाला भस्म लावीत असे. (१९) नेहमीं भस्मांतच निजत असून त्यानें एकदां नर्तनगायनानें शिवाला प्रसन्न करून घेतलें. शिवलिंगाची प्रातिष्ठा करून गंधादिकांनीं त्याची पूजा करीत होता. (२०) अशा त्या मुनीजंवळ नर्तनगायनप्रिय शिव हा वृषारूढ होऊनं गणांसह येऊन त्याला बोलला कीं, (२१) हे महा गां, उत्तम व्रत

न्वरय सुव्रत ॥२१॥ सोऽपि श्रुत्वा महेशस्य वाक्यं तमभिवंद्य च॥तुष्टाव वाग्भिरिष्टाभिः कृत्तिवाससमीश्वरम् ॥२२॥ ततस्तुष्टो महादेवः प्रददौ ज्ञानमात्मनः ॥ योगं च योगिने योगी वाराणस्यां महामुने॥२३॥ सानंदं प्राह योगी च ईप्सितं किं वदेति तम् ॥ आनंदात्क्लिन्नसर्वांगो जैगीषव्यः पुनः पुनः॥२४॥सोमं सोमपतिं प्राह प्रणम्य हर्षिताननः॥२५॥

जैगीषव्य उवाच ॥ नेच्छामि चान्यं भगवन् योगाद्योगेश्वरेश्वर ॥ सा च लब्धा किमन्यैर्मे त्वयि भक्तिं च देहि मे ॥२६॥ तथापि शृणु देवेश वदामि वरदेश्वर ॥ प्रसीद भक्तिमंबायाः पादपद्मेषु संस्थिताम् ॥२७॥ विज्ञप्तिं तस्य भगवान्जैगीषव्यस्य स प्रभुः ॥ निशम्याह प्रसीदेति दत्वा भक्तिमुमां त्वयि ॥२८॥ हसन्ती सा ददौ तस्मै जैगीषव्याय पार्वती ॥ निजपादे तथा भक्तिं देवदेवस्य पादयोः ॥२९॥ तस्मा-

---

करणाऱ्या जैगीषव्या, मी तुला प्रसन्न झालों आहें, तुझे मनोरथ कोणते परिपूर्ण करावयाचे आहेत; ते सांग. वाटेल ते वर माझ्याकडून मागून घे. (२२) या प्रमाणें महेशाचें तें वाक्य ऐकून त्याला नमस्कार करून चर्म परिधान केलेल्या (कातडें पांघरलेल्या) ईश्वराची स्तुति चांगल्या वाणीनें त्या मुनीनें केली. (२३) हे महामुने, त्यानंतर तुष्ट झालेल्या महादेवानें त्या ऋषीला आपलें ज्ञान दिलें आणि वाराणशीक्षेत्रांत त्या योग्याला शिवयोगही दिला. (२४) आणि पुनः योगी ईश्वरानें आनंदानें ह्मटलें कीं, हे मुने, तुझें ईप्सित काय आहे? तें सांग. आनंदानें थबथबलेल्या शरीराच्या जैगीषव्यानें पुनःपुनः (२५) सोमपति सोमाला (ईश्वराला) नमस्कार करून आनंदमुद्रेनें ह्मटलें कीं,

(२६) जैगीषव्य बोलला—योगेश्वरांच्या ईश्वरा, भगवन् शिवयोगाशिवाय मी दुसरें कांहीं इच्छित नाहीं. आणि तुझ्या ठिकाणीं भक्ति जर मिळाली, तर मला दुसरे पदार्थ घेऊन काय करावयाचे आहेत? याकरितां तुझ्याठिकाणीं मला भक्ति दे. (२७) तथापि हे देवाधिदेवा, वरदा, ईश्वरा, मी सांगतों ऐक, परमेश्वरा, अंबेच्या पदकमलाचे ठिकाणीं भक्ति असावी, अशी विनंति करतों. मजवर तूं प्रसन्न हो. (२८) जैगीषव्याची विज्ञप्ति प्रभूनें ऐकून पार्वतीला ह्मटलें कीं, अंबे, या मुनीवर प्रसन्न होऊन तुझ्या चरणीं त्याला उत्तम भक्ति दे. (२९) असें शिवाचें वाक्य ऐकून हंसत हंसत अंबा जैगीषव्याला ह्मणाली कीं, हे मुने, श्रीशिवाच्या पदकमलावर व माझ्याठिकाणीं तुझी भक्ति परिपूर्ण असूं दे, असा आशीर्वाद तुला मी देतें. (३०) याकरितां नर्तनगायनांनीं जो प्राणी ईश्वराला

द्यो देवदेवेशं नृत्तगीतैस्तु तोषयेत् ॥ योगैश्वर्येण भक्त्या च जैगी- षव्यसमो भवेत् ॥३०॥ ग्रंथान्तरे ॥ श्रावयेद्यः पुराणानि देवदेवं त्रि- लोचनम् ॥ सर्वपापविनिर्मुक्तो वसेच्छिवपुरे कृती ॥३१॥ स्कान्दे ॥ भक्त्या तोष्यंति ये देवि लिंगं त्रिभुवनेश्वरम् ॥ तेऽपीश्वरप्रसादेन गाणपत्यमवाप्नुयुः ॥३२॥ स्कान्दे ॥ सर्वेषामुपचाराणां प्रणामोऽत्यन्त उत्तमः ॥ तं विनाऽन्योपचारा ये कृतास्ते निष्फला यदि ॥३३॥ तस्मा- त्प्रणामं कुर्वीत सततं गुरुदेवयोः ॥३४॥ शैवे ॥ प्रातः प्रणम्य देवेशम- ग्निष्टोमफलं लभेत् ॥ मध्यान्हे त्वश्वमेधस्य सौत्रामण्यां निशासु च ॥३५॥ शिवधर्मोत्तरे ॥ ये नमंति विरूपाक्षमीशानं कृत्तिवाससम् ॥ प्र- सन्नचेतसो रुद्रं ते यांति परमं पदम् ॥३६॥ सर्वावस्थां गतो वापि यु- क्तो वा सर्वपातकैः ॥ शिवमिष्ट्वा नमस्कृत्वा सोऽपि याति परां गतिम् ॥३७॥ महाभारते उमामहेश्वरसंवादे ॥ इष्टं दत्तमधीतं च यज्ञाश्च ब-

---

संतोष देईल, तो प्राणी योगैश्वर्यानें व भक्तीनें जैगीषव्याच्या बरोबरीचा होईल. (३१) ग्रंथांतरांत ह्मटलें कीं,—देवादिदेव त्रिलोचनापुढें जो पुराण सांगतो, तो पुण्यवान सर्वपापापासून मुक्त होऊन शेवटीं शिवपुराला जातो. (३२) स्कंद- पुराणांत सांगितलें कीं,--हे देवि, त्रिभुवनेश्वर लिंगाला भक्तीनें जे संतोष देतात, (प्रसन्न करून घेतात), ते लोक ईश्वराच्या प्रसादानें गणाधीश होतात. (३३) स्कांदपुराणांत ह्मटलें कीं,--सर्व उपचारांमध्यें प्रणामरूपी उपचार (नमस्कार) उत्तम होय. त्याशिवाय बाकीचे उपचार सर्व व्यर्थ होय. (३४) ह्मणूनच गुरूला व देवाला नेहमीं नमस्कार करावेत. (३५) शैवपुराणांत सांगितलें कीं,--प्रातः काळीं उठून देवाला नमस्कार केला असतां अग्निष्टोम याग केल्याचें फल मिळतें. माध्यान्हाच्या वेळेस नमस्कार केला तर अश्वमेधाचें फल मिळतें. रात्रीं नमस्कार केला तर सौत्रामणीचें (यागाचें) फल मिळतें. (३६) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं, चर्म परिधान केलेल्या विरूपाक्ष शिवाला जे नमन करतात, ते लोक प्रसन्न अंतः करणाचे होऊन श्रेष्ठ रुद्रपदाला जातात. (३७) मोठ्या संकटामध्यें असला तरी सर्व पातकें करणारा असला तरी शिवाची पूजा करून त्यानें नमस्कार केला असतां तो उत्तम गतीला जातो. (३८) महाभारतांत ह्मटलें कीं,--उमामहेश्वर संवादांतील कथा अशी आहे कीं,--याग करो, दान करो, अध्ययन करो, पुष्कळ दक्षिणेचे यज्ञ करो, परंतु हे सर्व शिवलिंगप्रणामाच्या सोळाव्या हिश्याच्या योग्य-

हुदक्षिणाः ॥ शिवलिंगप्रणामस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ॥३८॥ शिव-धर्मोत्तरे ॥ ये कुर्वन्ति नमस्कारमीश्वराय क्वचित्क्वचित् ॥ संपर्कात्के-तुकाल्लोभात्ताद्विमानं लभंति ते ॥३९॥ अनादरेण शाठ्येन परिहासेन मायया ॥ नमस्कारे कृते लिंगे सर्वपापक्षयो भवेत् ॥४०॥ प्रमादेनापि यैः क्वापि प्रणामः शूलिने कृतः ॥ कल्पान्तेषु भवग्रंथिर्न तेषां जायते पुनः ॥४१॥ शाठ्येनापि नमस्कारः प्रयुक्तः शूलपाणये ॥ संसारपाशब-द्धानामुच्छेदनकरो हि सः ॥४२॥ एवंविधे कलियुगे दोषाणामेकशोध-नम् ॥ महादेवनमस्कारो ध्यानं ज्ञानमिति श्रुतिः ॥४३॥ सर्वयज्ञात्पर-शुद्धो नमस्कारो महामखः ॥ नमस्काराख्ययज्ञेन तस्मात्संपूजयेच्छि-वम् ॥४४॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वरा-चारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजांगनिर्णये गीतवाद्यनृत्यपुराणपठन-स्तोत्रनमस्कारलक्षणतन्माहात्म्यं नाम चतुःषष्टितमोऽध्यायः ॥

---

तेला पोहोंचत नाहींत. (३९) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं,--जे लोक कोठें ईश्वराला केव्हांतरी नमस्कार करतात, ते लोक शिवसंपर्कापासून उत्कंठापूर्वक विमानांत बसून श्रेष्ठगतीला जातात. (४०) अनादरानें, उर्मटपणानें, थट्टेनें नमस्कार केला तरी सर्व पापांचा क्षय होतो. (४१) शूलधारी शिवाला चुकून नमस्कार केला तरी ते लोक पुनः कल्पांतीं देखील संसारपाशांत पडत नाहींत. (४२) शिवाला उर्मटपणानें नमस्कार केला तरी संसारपाशांत सांपडलेल्या लोकां-चीं बंधनें आपोआप तुटून पडतात. (४३) अशा भयंकर कलियुगांत पाप धुवून घेण्याचें मुख्य साधन महादेवास नमस्कार करणें, त्याचें ध्यान करणें; त्याचें ज्ञान करून घेणें हेंच आहे, असें श्रुति सांगते. (४४) सर्व यज्ञांमध्यें नमस्कार हा मोठा याग होय याकरितां नमस्कारयज्ञानें शिवाची पूजा करावी.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार-संग्रहांतील सदाचार निरूपणांतील पूजांगनिर्णयांतील गीतवाद्यनृत्यपुराणपठन-स्तोत्र नमस्कार लक्षण व यांचें माहात्म्य कथन नांवाचा चौसष्टावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ पंचषष्टितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ आदित्यपुराणे ॥ सूत उवाच ॥ कर्मयोगाः समाख्याता एतैः पूज्यो महेश्वरः ॥ यं यं काममभिध्यायेत्तदर्पितमनाः शिवम् ॥१॥ संपूज्य तं तमाप्नोति साविन्याह यथा पुरा ॥२॥

ऋषय ऊचुः ॥ पतिव्रता महाभागा सावित्री वरवर्णिनी ॥ यदाह तद्वदस्माकं सूत वाक्यविशारद ॥३॥स्वर्गतां शोभनां दृष्ट्वा गुणैः सर्वैरलंकृताम् ॥ अरुंधत्युत्तमा स्त्रीणां पर्यपृच्छच्छुचिस्मिता ॥४॥

अरुंधत्युवाच ॥ शतशः संति सावित्रि देवाः स्वर्गनिवासिनः ॥ देवपत्न्यस्तथा चैताः सिद्धाः सिद्धांगनास्तथा ॥५॥ न तेषामीदृशो गन्धो न कान्तिर्न सुरूपता॥नान्येषां विद्यते शोभा यथा ते पतिना सह ॥६॥ न चैवाकल्पजातानि भ्राजन्ते सुरयोषिताम् ॥ यथा तव तथा तासां भ्राजन्ते वरवर्णिनि ॥७॥ नास्ति कान्तिर्विमानानां शक्रादीनां दिवौकसाम् ॥ विमानस्यापि ते कान्तिस्तरुणार्कसमद्युतिः ॥८॥ तपः-

---

श्रीशिवास नमस्कार असो. आदित्यपुराणांत ह्मटलें कीं,--सूत बोलले--(१) आतांपर्यंत सर्व कर्मयोग सांगितले यां कर्मयोगांनीं महेश्वराची पूजा करावी. शिवाच्या ठिकाणीं मन अर्पण करून जें जें ध्यान करील, (२) व शिवाची पूजा जो करील, तें तें त्याला मिळतें, असें सावित्रीनें सांगितलें आहे.

ऋषि बोलले--(३)वाक्यविशारदा सूता, महाभाग्यशाली सुंदरी पतिव्रता सावित्रीनें जें कांहीं सांगितलें असेल, तें आह्मांला सांगा. (४) स्वर्गलोकाला गेलेली, सुंदर, सर्व गुणांनीं अलंकृत असलेली, सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ मानिली गेलेली अशा सावित्रीला आश्चर्यानें युक्त असलेली, महाभाग्यशाली अरुंधतीनें प्रश्न केला कीं, (५)

अरुंधती बोलली---सावित्रि, स्वर्गामध्यें हजारो शेंकडो देव आहेत, व त्यांच्या बायका आहेत, तसेंच सिद्धही पुष्कळ आहेत, त्यांच्या बायका पुष्कळ आहेत. (६) परंतु त्यांच्यामध्यें इतकें सौगंध्य, कांति, सुरूपता कांहीं नाहीं. पतीसह तुझ्याठिकाणीं जी शोभा आहे; ती शोभा दुसऱ्या कोणाजवळही नाहीं.(७) हे सुंदरि, स्वाभाविक शोभा तुझी कशी आहे, त्याप्रमाणें देवांगनांमध्यें कोणाचीही नाहीं. (८) तुझ्या विमानाची शोभा जशी तरुण सूर्याप्रमाणें आहे, तशी शोभा देवांच्या एका विमानालाही नाहीं. (९) तर हें सुंदरि, अशी शोभा येण्याला तुह्मीं

प्रभावो दानं वा कर्म वात्र तु संज्ञितम् ॥ युवयोस्तन्ममाचक्ष्व यथा-
द्भरवर्णिनि ॥९॥

सावित्र्युवाच ॥ शृणु त्वं तन्महाभागे यत्कृतं पूर्वजन्मनि ॥ संमार्ज-
नादिभिः शंभुरावाभ्यां परितोषितः ॥१०॥ स्वर्गप्राप्तिरियं तस्य क-
र्मणः फलमुत्तमम् ॥ सरूपतां मनःप्रीतिं पश्यतां चारुवेषताम् ॥११॥
यत्पश्यसि महाभागे तदप्येषा वदामि ते ॥ तीर्थोदकैः सुगंधैश्च स्ना-
पितोऽयमुमापतिः ॥१२॥ तेन कान्तिरतीवैषा देहेऽभूत्त्रिदशेश्वरात्।
आल्हादं परमं स्वास्थ्यमारोग्यं चारुवेषताम् ॥१३॥ प्राप्तिश्चाशेष-
कामानां दधिक्षीरफलं शुभे ॥ मनःप्रसादः सौम्यत्वं शरीरे या च
निर्वृतिः ॥१४॥ यत्प्रियत्वं च सर्वस्य तद्घृतस्नानजं फलम् ॥ यान्य-
भीष्टानि वासांसि रत्नान्याभरणानि च ॥१५॥ ये धूपा यानि माल्या-
नि प्रदीपाद्यनुलेपनम् ॥ तान्यक्षयानि सर्वाणि सर्वज्ञे पार्वतीपतौ॥१६॥
दत्तानि तत्समुत्थोऽयं गंधधूपात्मको गुणः ॥ आहारा दयिता ये च

दोघांनीं कोणतें कर्म केलें, त्याचें नांव काय आहे ? हें मला यथास्थित सांग.

(१०) सावित्री बोलली—हे महाभागे अरुंधति, पूर्वजन्मीं काय कर्म केलें तें मी सांगतें, ऐक. आह्मीं दोघांनीं (नवरा बायकोनें) श्रीशिवमंदिरांत सडासंमार्जन वगैरे कर्में केलीं त्या कर्मांनीं शिवाला प्रसन्न करून घेतलें. (११) त्या कर्मांचें उत्तम फल स्वर्गप्राप्ति हें होय. आणि सुरूपता, मनःप्रसाद, सुंदर वेष अशीं फळें मि-ळालीं. (१२) हे महाभागे, अरुंधति, जें जें तूं पाहिलेंस, तें तें सर्व सांगतें ऐक. पुण्यकर तीर्थांचें पाणी आणून तें सुगंध करून श्रीशिवाला त्या पाण्यानें अभिषेक घातला. (१३) त्यामुळें श्रीशिवापासून शरीराला अत्यंत उत्तम कांति मिळाली. चांगला आल्हाद, मनाला स्वास्थ, आरोग्य, चारुवेषता सुंदर वेषपणा (१४) सर्व मनोरथांची प्राप्ति, दहीं, दूध यांनीं अभिषेक घातला ह्मणून हीं फळें मिळालीं. मनःप्रसाद ( मन नेहमीं संतुष्ट असणें ) शरीराच्या ठिकाणीं सौम्यपणा, मनाला व शरीराला सुख, (१५) लोकप्रियता, वगैरे फळें घृताचा अभिषेक घातला ह्मणून मिळालीं. आणि मनासारखें होणें, उत्तमोत्तम वस्त्रें रत्नें, दागिने वगैरे मिळणें वगैरे फळें त्यापासूनच मिळालीं. (१६) शिवाला जे धूप दिले असतील, ज्या माळा घातल्या असतील, जे दिवे लावून ठेविले असतील, जीं अनुलेपन द्रव्यें दिलीं असतील, तीं सर्व कर्में सर्वज्ञ पार्वतीपतीच्या ठिकाणीं अक्षय फल देणारीं होऊन राहतात. (१७) माझ्या अंगाला सौगंध्य काय मिळालें आहे तें सुगंध धूप दि-

पवित्राश्च निवेदिताः ॥१७॥ भक्त्या भर्द्वेऽविकाभर्तुस्तृप्तिस्तद्गुणसंभ- वा ॥ गीतैर्नृत्यैस्तथा जाप्यैर्नियमैश्च पृथग्विधैः ॥१८॥ तोषितो भगवा- नीशस्तस्यैवं पुष्टिरुत्तमा ॥ स्वर्गेप्सुना सत्यवता मया च शुभदर्शने ॥१९॥ कृतमेतदतो न स्यादावयोर्भोगसंक्षयः ॥ ये निष्कामा नराः स- म्यक् पूजयन्ति महेश्वरम् ॥२०॥ तेषां ददाति विश्वेशो देवो मुक्ति सुदुर्लभाम् ॥२१॥

सूत उवाच ॥ सैवमुक्ता तु सावित्र्या मुनींद्रा हृष्टमानसाः ॥ ब्रह्म- स्नुषा शिवेशानौ प्रणिपत्येदमब्रवीत् ॥२२॥

अरुंधत्युवाच ॥ सा पूज्या सा नमस्कार्या सा साध्वी सा पतिव्र- ता ॥ या पूजयति सावित्री सदा हैमवतीप्रियम् ॥२३॥ यमाराध्या- दितिः पुत्रांल्लेभे शक्रपुरोगमान् ॥ दितिश्च दैत्यान्विविधान्विनता ग- रुडारुणौ ॥२४॥ शच्युर्वशीमुखाश्चान्याः संपूज्योमापतिं पुरा ॥ प्रापु- श्चाभिमतान्कामान्कस्तमीशं न पूजयेत् ॥२५॥

---

त्याचें फळ आहे भक्तिपूर्वक शिवाला जे पवित्र व आवडते आहार समर्पण केले आ- हेत, (१८) भक्तीनें शिवाला अर्पण केल्यामुळें आमच्या ठिकाणीं तृप्तिरूप गुण आला आहे. गायनांनीं नर्तनांनीं, जपांनीं निरनिराळ्या नियमांनीं (१९) भगवान ईशाला प्रसन्न करून घेतलें ह्मणून ही उत्तम पुष्टि मिळाली. हे शुभदर्शने अरुं- धति, स्वर्ग प्राप्तीच्या इच्छेनें सत्यपणें मीं हीं कर्में केलीं. (२०) ह्मणूनच आम- च्या भोगाला क्षति नाहीं. जे लोक निष्कामपणें चांगल्या रीतीनें महेश्वराची पूजा करतात, (२१) त्यांना विश्वेश शिव दुर्लभ मुक्ति देतो.

(२२) सूत बोलले—सावित्रीनें असें सांगितल्याबरोबर सर्व मुनि आनंदयुक्त झाले. ब्रह्मदेवाच्या सुनेनें शिवपार्वतीला नमन करून पुनः ह्मटलें कीं,—

(२३) अरुंधती बोलली—ज्या सावित्रीनें पार्वतीपतीची सेवा केली, व निरं- तर जी त्यांची पूजा करत्ये, ती सावित्री नमस्कार करावयास योग्य आहे, तीच पतिव्रता खरी साध्वी होय. (२४) त्या परमेश्वराची पूजा अदितीनें केली ह्मणून इंद्र वगैरे देव तिच्या पोटीं आले दितीनें सेवा केली ह्मणून तिच्या पोटीं दैत्य जन्मले. विनतेनें सेवा केली ह्मणून तिच्या पोटीं गरुड आणि अरुण जन्माला आले. (२५) शची उर्वशी वगैरे स्त्रियांनीं शिवाची आराधना केली ह्मणून त्यांना इच्छित फळ मिळालें असें असल्यावर त्या शिवाची पूजा जगांत कोण करणार नाहीं बरें ?

सूत उवाच ॥ अभिवंद्याथ तां चैनां वसिष्ठार्धशरीरिणी ॥ जगाम स्वाश्रमं साध्वी सर्वदेवगणार्चिता ॥२६॥ एवमभ्यर्च्य गौरीशं श्रद्धया नस्तु योषितः ॥ लभन्तेऽभिमतान्कामान् सावित्र्याह यथा द्विजाः ॥२७॥ धर्मार्थकाममोक्षाणां लिंगार्चा हेतुरुच्यते ॥ भक्त्या भवं यजेद्यस्तु महापातकजोऽपि वा ॥२८॥ सोऽपि याति परं स्थानं त्रिसप्तपुरुषान्वितः ॥ आराधयध्वं विप्रेंद्राः सर्वदं विश्वतोमुखम् ॥२९॥ क्षिप्रं यास्यथ तेनैव सायुज्यं नात्र संशयः ॥३०॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पूजासाधनद्रव्यपूजांगप्रशंसायां सावित्र्यरुंधतीसंवादो नाम पंचषष्टितमोऽध्यायः ॥

---

(२६) सूत बोलले—ब्राह्मणहो, नंतर त्या अरुंधतीनें ह्या सावित्रीला नमस्कार करून सर्व देवगणांनीं पूजित अशा आपल्या आश्रमाला गमन केलें. (२७) ब्राह्मणहो, सावित्रीनें ह्मटल्याप्रमाणें सर्व स्त्रियांनीं भक्तीनें गौरीपतीची पूजा केली तर त्यांचे सर्व मनोरथ परिपूर्ण होतील. असें स्पष्ट सावित्रीनें सांगितलें आहे. (२८) धर्म, अर्थ, काम मोक्ष या चार पुरुषार्थांला मुख्य कारण शिवपूजा आहे. भक्तीनें जो शिवपूजा करितो, तो महापातकी असला तरी (२९) तो देखील आपल्या एकवीस कुळांसह श्रेष्ठ स्थानाला जातो. ब्राह्मणश्रेष्ठहो, सर्व अभीष्ट देणाऱ्या विश्वतोमुख शिवाची आराधना करा. (३०) ह्मणजे लौकर तुह्मांला सायुज्य पदवी मिळेल, यांत संशय नाहीं.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पूजासाधन द्रव्य पूजांगप्रशंसेंतील सावित्र्यरुंधतीसंवाद नांवाचा पासष्ठावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ षट्षष्टितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ शंकरसंहितायाम् ॥ ऋषय ऊचुः ॥ कथितो भवता लिंगधारणक्रम उत्तमः ॥ पूजाविधिमिदानीं नो दिनाचारान्वितं वद ॥१॥

सूत उवाच ॥ वक्ष्ये लोकोपकाराय लिंगपूजाविधिं द्विजाः ॥ यथा शिवेन कथितं स्कंदायामिततेजसे ॥२॥

स्कंद उवाच ॥ दिनाचारयुतं देव लिंगार्चनविधिं मम ॥ वक्तुमर्हसि देवेश कृपया भक्तवत्सल ॥३॥

श्रीशंकर उवाच ॥ वदामि संग्रहेणाहं पृच्छतस्तव षण्मुख ॥ संसारदुःखपाशघ्नं वत्स मोक्षैकसाधनम् ॥४॥ ब्राम्हे मुहूर्ते चोत्थाय चिंतयेच्छंकरं शुचिः ॥ उमां धर्मं धनं दोषवर्जितं दिनकर्म च ॥५॥ धनाद्धर्मप्रवृत्तिः स्यान्नराणां धर्मकारिणाम् ॥ धर्मात्प्रसीदति शिवश्चिन्तयेत्तद्धनागमम् ॥६॥ ततो गृहाद्विनिर्गत्य बहिर्गच्छेदतंद्रितः ॥ वाग्यतः पृथिवीभागमिषुविक्षेपमात्रकम् ॥७॥ तत्रास्तीर्य तृणैर्भूमिं म-

---

श्रीशिवास नमस्कार असो. कान्द पुराणांत-शंकरसंहितेंत ह्मटलें आहे कीं,—ऋषि बोलले—(१)आपण उत्तम असा लिंगधारणाचा क्रम सांगितला. प्रस्तुत प्रतिदिवशीं श्रीशिवाची पूजा कशी काय करावयाची? तिचें विधान सांगा.

(२) सूत बोलले--ब्राह्मणहो, लोकोपकाराकरितां इष्टलिंगपूजेचें विधान सांगतों. तें विधान साक्षात श्रीशिवानें अमिततेजस्वी स्कंदाला सांगितलें आहे.

(३) स्कंद बोलला—भक्तवत्सला देवा, दर दिवसाच्या आचारानें युक्त असें इष्टलिंगपूजेचें विधान मजवर कृपा करून सांगा.

(४) श्रीशंकर बोलले--हे षण्मुखा, प्रश्न करणाऱ्या तुला पूजेचें विधान संक्षेपानें सांगतों ऐक. तें विधान संसारदुःखपाशाला नाश करणारें असून मोक्षाचें मुख्य साधन आहे. (५) प्रातःकाळीं दोन घटका रात्र असतां उठून शुद्ध होऊन श्रीशिवाचें स्मरण करावें; आणि पार्वतीचें स्मरण करावें. नंतर धर्माला स्मरून निर्दोष धन मिळवावें, तसेंच नित्यकर्मही निर्दोष करावें. (६) धर्म करणाऱ्यांनीं धन मिळविलें तरच त्यांच्या हातून धर्म होतो, कारण धर्माची प्रवृत्ति धनापासून आहे. धर्मानें श्रीशिव प्रसन्न होतो, ह्मणून धन मिळविण्यासाठीं विचार करावा. (७) नंतर आळस सोडून घराबाहेर निघून वाणी नियमित ठेवून एका बाणाच्या प्रमाणाची जागा पाहून, (८) त्या जमिनीवर गवत आंथरून मलमूत्र विसर्जन

लमूत्रे समुत्सृजेत् ॥ निष्ठीवेद्विसृजेद्वाचं वस्त्रप्रावृतमस्तकः ॥८॥ प्रक्षालयेद्गुदं शिश्नं मृद्भिरभ्युध्दतैर्जलैः ॥ गंधलेपनिवृत्त्यर्थं कुर्याच्छौचमतंद्रितः ॥९॥ यावन्मात्रात्मनः शुद्धिस्तावच्छौचं समाचरेत् ॥ आचम्य विधिवद्वत्स कृत्वा मंत्रेण मार्जनम् ॥१०॥ श्रीमत्पंचाक्षरेणैव गायत्र्या शैवया ततः॥स्नायाद्विशुद्धभावेन नरः संकल्पपूर्वकम्॥११॥ नद्यां तटाके वाप्यां वा गिरिप्रस्रवणे ऱ्हदे ॥ उध्दतैरुदकैः कूपे दक्षः स्नायात्समाहितः ॥१२॥ अशक्तः कंठमात्रं वा कटिमात्रमथापि वा॥ प्रातःस्नानेऽप्यशक्तश्चेन्मध्यान्हे स्नानमाचरेत् ॥१३॥ ततः शिवार्चनागारं शुद्धान्तःकरणः पुमान् ॥ प्रविश्योपविशेत्तत्रस्वासने चोत्तराननः ॥१४॥ भस्मपात्रं विनिक्षिप्य जलपात्रं षडानन ॥ ध्यायेच्छिवं जलाध्यक्षमोमापः सर्वमित्यपि ॥१५॥ शंकरं भस्मनि तथा श्रीमत्पंचाक्षरेण च ॥ भस्मस्नानं ततः कुर्याज्जन्मकर्मनिवृत्तये ॥१६॥ अग्निरित्यादिभिर्मंत्रैः सद्योजातादिमंत्रतः ॥ सर्वांगोद्धूलनं कुर्यादापादतल-

---

करावें. डोक्याला वस्त्र गुंडाळून मलविसर्जन करावें. (९) नंतर दुर्गंधनिवारणा करितां बिनआळसानें मृत्तिकाशौच करावें. उचलून घेतलेल्या (शेंदून घेतलेल्या) पाण्यानें गुदप्रक्षालन व शिश्नप्रक्षालन करावें. (१०) जोंपर्यंत आपल्या मनास शुद्धता झाली असें वाटेल, तोंपर्यंत शुद्धता करून घ्यावी. हे वत्सा, नंतर विधिपूर्वक आचमन करून मंत्रानें मार्जन करून घ्यावें. (११) नंतर श्रीमत्पंचाक्षरमंत्रानें व शैवगायत्रीमंत्रानें स्नान करावें, स्नान करीत असतां भाव चांगला ठेवावा, व संकल्प करावा. (१२) नदी, तळें, विहीर, झरे, डोह अशा ठिकाणीं किंवा आडांतून पाणी वर घेऊन समाधानमनानें स्नान करावें. (१३) स्नान करावयास अशक्त असल्यास कंठस्नान किंवा कमरेपर्यंत स्नान करावें. प्रातःकाळीं स्नान करावयास अशक्त असेल तर माध्यान्हीं स्नान करावें. (१४) नंतर शुद्ध अंतःकरण ठेवून मनुष्यानें शिवपूजेच्या मंदिरांत प्रवेश करून तेथें उत्तराभिमुख होऊन आसनावर बसावें. (१५) भस्मपात्र व जलपात्र ठेवून हे षण्मुखा, जलाध्यक्ष शिवाचें ध्यान "ॐ आपःसर्वे" यामंत्रानें करावें. (१६) नंतर श्रीमत्पंचाक्षरमंत्रानें भस्माच्या ठिकाणीं शिवाचें ध्यान करावें. मग जन्मकर्मांच्या निवृत्तीकरितां भस्मस्नान करावें (१७) "अग्निरिति" वगैरे मंत्रांनीं व सद्योजातादि मंत्रांनीं पायापासून मस्तकापर्यंत सर्वांगावर भस्म उधळून घ्यावें.

मस्तकम् ॥१७॥ मलनिर्मोचकं त्वेतज्जलस्नानं षडानन ॥ भस्मस्नानं तु संसारतापविध्वंसकारणम् ॥१८॥ भर्त्सनात्सर्वपापानां स्मरणात्परमात्मनः ॥ भस्मेति गीयते सद्भिर्वेदांतेष्वागमेषु च ॥१९॥ यो ऽन्यथा मन्यते भस्म स पापीयान्न संशयः ॥ स यथा मन्यते वत्स मातरं व्यभिचारिणीम्॥२०॥मद्भक्ते भस्मरुद्राक्षधारणे मयि सर्वदा॥ महापापवतां द्वेषः स्वभावादेव जायते ॥२१॥ यस्येदं जन्म पाश्चात्यं तस्यानंदोऽभिजायते ॥ स्वभावान्मयि मद्भक्ते भस्मरुद्राक्षधारणे ॥२२॥ त्रिपुंड्रं धारयेत्पश्चाद्भस्मना सजलेन च ॥ त्रिपुण्ड्रधारणं कृत्वा ततो रुद्राक्षधारणम् ॥२३॥ कुर्यादुक्तप्रकारेण तत्तत्स्थाने समाहितः॥शिखायामेकरुद्राक्षं षट्त्रिंशदथ मस्तके॥२४॥द्वात्रिंशद्धारयेत्कण्ठे बाह्वोः षोडश षोडश ॥ कर्णयोः षट्प्रकोष्ठे च द्वादश द्वादशानघ ॥२५॥ धारयेदुपवीतं तदष्टोत्तरशतान्वितम् ॥ अक्षमालां च बिभृयात्सप्तविंशतिसंयुताम् ॥२६॥ एवं देहमलंकृत्य नरो रुद्राक्षमालया ॥ रुद्र-

---

(१८)हे षडानना, हें जलस्नान मलमोचक आहे. भस्मस्नान हें संसारतापाच्या नाशाला कारण झालेलें आहे.(१९)श्रीशिवाच्या स्मरणानें भस्म लावून घेतलें असतां सर्व पापांचा नाश होतो ह्मणून याला भस्म असें सज्जनांनीं ह्मटलें आहे.वेदांतामध्यें व आगमांमध्यें देखील असेंच सांगितलें आहे.(२०)याच्या विपरीत जो मानतो, तो पापी आहे; यांत संशय नाहीं. फार काय तो आपल्या मातोश्रीला"व्यभिचारिणी"असें नांव ठेवणारा आहे, असें समजावें.(२१)माझ्या भक्तांवर, भस्मरुद्राक्षधारणावर, व माझ्यावर महापातकी लोक साहजिकच द्वेष करतात. (२२)ज्याचा जन्म चांगल्या कुळांत झाला असेल, जो पुण्यवान असेल, तो मला, भक्ताला, भस्मरुद्राक्षाला पाहून साहजिक आनंद मानतो. (२३) नंतर जलसहित भस्माचें त्रिपुंड्र लावावें. त्रिपुंड्र धारण करून मग रुद्राक्षधारण करावें. (२४) यांत सांगितल्या प्रकारानें समाधानमनानें त्या त्या स्थानांवर त्रिपुंड्र धारण करावें. शेंडीवर एक रुद्राक्ष धारण करावें मस्तकावर छत्तीस रुद्राक्ष धारण करावेत. (२५) गळ्यांत बत्तीस रुद्राक्षांची माळ घालावी, दोन्ही बाहूला सोळा सोळा रुद्राक्षांची माळ बांधावी, कानांत सहा रुद्राक्षांचें कर्णकुंडल करून घालावें. कोपराला बारा बारा रुद्राक्षांची माळ बांधावी. (२६) गळ्यांत एकशेंआठ रुद्राक्षांची माळ उपवीतीच्या आकारानें घालावी. सत्तावीस रुद्राक्षांची माळही धारण करावी. (२७) याप्रमाणें रुद्राक्षमालेनें शरीर अलंकृत करावें. श्रीरुद्राच्या नेत्रोदकापासून झालेले रुद्राक्ष जो

नेत्रांबुजातानि रुद्राक्षाणि नरोत्तमः ॥२७॥ यो धत्ते भस्म सततं स रुद्रो नात्र संशयः॥जलपुष्पाक्षतादीनि पूजाद्रव्याणि शोधयेत्॥२८॥ शिवार्हाण्यतिरम्याणि पवित्राणि षडानन ॥ ततो रुद्रमयीं कुर्यात्तनुं रुद्रार्चनापरः ॥२९॥ अरुद्रः पूजयेद्रुद्रं न पूजाफलभाग्भवेत् ॥ रुद्रो भूत्वा यजेद्रुद्रं नारुद्रो रुद्रमर्चयेत् ॥३०॥ प्राणलिंगांगसंबंधी स रुद्रो नात्र संशयः ॥ शरीरे वत्स करणान्यधितिष्ठंति देवताः ॥३१॥ आभ्यंतराणि बाह्यानि दर्शनाद्युपभोगतः ॥ अर्पितानि भवंत्येव द्रव्याणि शिखिवाहन ॥३२॥ अर्पितान्यर्पयेद्यः स रौरवं नरकं व्रजेत् ॥ तद्दोषपरिहाराय शरीरं देवतामयम् ॥३३॥ भूतेंद्रियादिसंयुक्तं ध्यायेद्रुद्रात्मकं नरः ॥ ततः समाहितमनाः शंकरध्यानतत्परः ॥३४॥ पूर्वोक्तेन प्रकारेण कुर्याल्लिंगार्चनं नरः ॥ पाद्यार्घ्याचमनस्नानं पुनराचमनं गुह ॥३५॥ वस्त्रं यज्ञोपवीतं च मंडलं गंधमक्षतान् ॥ पुष्पाणि शिवयोग्यानि पत्राणि विविधानि च ॥३६॥ धूपं दीपं घृतयुतमुपहारं षडानन ॥ भक्ष्य-

---

धारण करितो, (२८) व नेहमीं जो धारण करतो, तो रुद्रच आहे, यांत संशय नाहीं. नंतर पाणी, फुलें, अक्षता, पूजाद्रव्य यांची शुद्धता करावी, (२९) हे षडानना, ते पदार्थ ( पूजाद्रव्य ) श्रीशिवाला योग्य असून सुंदर व पवित्र असावेत. शिवपूजा करणाऱ्यानें आपलें शरीर शिवमय करून सोडावें ( शिवाशिवाय दुसरीकडे मन ठेवूं नये असें तात्पर्य ). (३०) रुद्रमय न होतां पूजा करूं नये, केलीच तर त्या पूजेचें फल मिळत नाहीं. रुद्र होऊन रुद्राची पूजा करावी. अरुद्रानें रुद्रपूजा करूं नये. (३१) प्राणलिंगाचा व अंगाचा संबंध करणाराच रुद्र असा ह्मणवून घेतो. यांत संशय नाहीं. हे वत्सा, शरीरामध्यें सर्व देवता साधनभूत होऊन राहिल्या आहेत. (३२) हे षण्मुखा, आभ्यंतर व बाह्य पदार्थ अनुक्रमानें दर्शनानें व उपभोगानें अर्पण केल्याप्रमाणें होतात. (३३) अर्पण केलेले पदार्थ पुनः जो अर्पण करील, तो रौरव नरकाला जातो, त्या दोषाच्या परिहाराकरितां सर्व देवतामय व (३४) भूतांनीं व इंद्रियांनीं युक्त असलेलें आपलें शरीर रुद्रस्वरूप आहे, असें ध्यान करावें. नंतर मन स्थिर करून श्रीशिवाचें ध्यान करून (३५) पूर्वीं सांगितल्याप्रमाणें इष्टलिंगपूजा करावी. हे गुहा, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, पुनराचमन, (३६) वस्त्र, यज्ञोपवीत, मंडल, गंध, अक्षता, शिवास योग्य अशीं फुलें, विविध पानें, (३७) धूप, तुपाचे--दीप, उप-

भोज्यान्नशाखादिप्रशस्तद्रव्यसंयुतम् ॥३७॥ दद्याच्छिवाय तांबूलं कर्पूराद्युपदंशकम् ॥ घृताक्तवर्तियुक्तानि शालिपिष्टकृतानि च ॥३८॥ नीराजनानि रम्याणि दद्यादेकाग्रमानसः ॥ श्रीमत्पंचाक्षरेणैव मंत्रेण शिखिवाहन ॥३९॥ पुष्पांजलिं ततो दद्याद्वेदमंत्रैस्त्रिशूलिने ॥ लौकिकैर्वैदिकैस्स्तोत्रैः शिवं स्तूयेत शक्तितः ॥४०॥ नेक्षेत पूजावेलायां नरं वत्स बहिष्कृतम् ॥ शिवद्रोहिणमाचारनिंदकं न हृदि स्मरेत् ॥४१॥ शिवे शिवागमे शैवे धर्मे शिवपरिग्रहे ॥ जंगमे प्राणलिंगैक्ये शिवलिंगार्चने गुह ॥४२॥ शिवस्थानेषु सर्वेषु वाराणस्यादिकेषु च ॥ विपरीता भवेद्बुद्धिर्यस्य स्यात्स बहिर्नरः॥४३॥दधीचिना गौतमेन ये शप्ता ब्राह्मणाधमाः ॥ कलावतरिष्यंति निंदकास्ते बहिर्नराः॥४४॥राक्षसाः क्रूरकर्माणः पापाचारसमन्विताः ॥ कलाववतरिष्यन्ति निंदकास्ते बहिर्नराः॥४५॥ ब्रह्महत्यासुरापानस्वर्णस्तेयकृतः पुरा ॥ बहिर्नरा भविष्यन्ति कलावीश्वरनिंदकाः॥४६॥ न तैश्च सह भाषेत न सहासीत चासने ॥ तेषां पंक्तौ

---

हार, भक्ष्य, भोज्य, अन्न, भाजा, वगैरे प्रशस्त द्रव्यांनीं युक्त असलेला नैवेद्य शिवास दाखवावा. (३८) कापूर वगैरे सुवासिक पदार्थांनीं युक्त तांबूल करून शिवास अर्पण करावें. साळीच्या पिठाच्या आरती (पात्र) करून त्यांमध्यें तुपाच्या फुलवाती ठेवून (३९) एकाग्र मनानें सुंदर आरती देवाला करावी. त्यावेळेस श्रीमत्पंचाक्षरमंत्राचा उच्चार करावा. (४०) नंतर त्रिशूलधारी शिवास वेदमंत्रांनीं मंत्रपुष्प समर्पण करावें. नंतर लौकिक वैदिकमंत्रांनीं शक्त्यनुसार शिवाची स्तुति करावी, (४१) हे वत्सा, पूजेच्या वेळेस बहिष्कृत (अलिंगी) प्राण्याचें दर्शन घेऊं नये. शिवद्रोही व आचाराची निंदा करणारा अशा प्राण्याचें स्मरण देखील करूं नये. (४२) हे गुहा, शिव, शिवागम, शैवधर्म, शिवाचा परिवार, जंगम, प्राणलिंगैक्य, शिवलिंगपूजा, (४३) सर्व शिवस्थानें, वाराणसी वगैरे क्षेत्रें यांठिकाणीं ज्याची बुद्धि विपरीत होईल तो प्राणी बहिष्कृत समजावा. (४४) दधीचि व गौतम यांच्या शापानें दग्ध होऊन अधम ब्राह्मण कलियुगामध्यें शिवनिंदा करणारे असे होतात. त्यांना बहिष्कृत असें समजावें(४५) क्रूरकर्म करणारे, पापकर्म करणारे राक्षस शिवनिंदक होऊन कलियुगामध्यें अवतरतात. तेच बहिष्कृत होत. (४६) ब्रह्महत्या, सुरापान, सुवर्णस्तेय (सोनें चोरणें) करणारे लोक कलियुगामध्यें ईश्वरनिंदक होऊन येतात, हेच बहिष्कृत होत. (४७) त्यांच्याशीं भाषण करूं नये, त्यांबरोबर आसनावर बसूं नये त्यांच्या पंक्तीला बसून

न भुंजीत न तैः कुर्वीत बंधुताम् ॥४७॥ प्रमादादर्चनाकाले पश्येद्यदि बहिर्नरम् ॥ प्रायश्चित्तेन महता शुद्धिमाप्नोति मानवः ॥४८॥ एतेषां दर्शने प्रायश्चित्तमष्टोत्तरं शतम् ॥ श्रीमत्पंचाक्षरं मंत्रं जपेद्ध्यात्वा शिवं नरः ॥४९॥ स्पृष्ट्वा बहिर्नरं स्नात्वा सचेलं शिवनिंदकम् ॥ कृत्वा तु भस्मतांबूले मद्भक्तानां च भोजयेत् ॥५०॥ दूषकानर्चनाकाले सर्वथा न विलोकयेत् ॥ एवमेकाग्रचित्तेन प्राणलिंगांगसंगिनः ॥५१॥ क्रियते येन मे पूजा तस्मै दास्याम्यभीप्सितम् ॥ सेवकान्पाचकांश्चोपकरणद्रव्यसाधकान् ॥५२॥ शिवभक्तांश्च कुर्वीत भस्मरुद्राक्षधारिणः ॥ एवं लिंगार्चनं कृत्वा प्रातःकाले विशुद्धधीः ॥५३॥ वृत्यर्थमार्जयेदर्थं सर्वदोषविवर्जितम् ॥ ततो मध्यान्हसमये कुर्वीतैवं शिवार्चनम् ॥५४॥ अध्यापदि दुरंतायां यावज्जीवमिदं व्रतम् ॥ न त्यजेद्यः पुमान्वत्स स जीवन्मुक्त उच्यते ॥५५॥ ब्रह्महत्यासहस्राणि भ्रूणहत्यायुतानि च ॥ कुर्वन्नपि न लिप्येत प्राणलिंगार्चनापरः ॥५६॥ वृत्तम् ॥ ततो गृहद्वारमुपेत्य मर्त्यः कांक्षेत गोदोहनमात्रमत्र ॥ देशान्तरादागतमन्नकामं लिंगार्च-

---

भोजन करूं नये. त्यांच्याशीं आप्तपणा करूं नये. (४८) चुकून जर पूजेच्या वेळेस या लोकांचें दर्शन झालें तर मोठ्या प्रायश्चित्तानें मनुष्य शुद्ध होतो (४९) यांचें दर्शन घडलें असतां एकशेंआठ वेळ पंचाक्षरमंत्राचा जप करावा, व शिवाचें ध्यान करावें. (५०) शिवनिंदक बहिष्कृत मनुष्याचा स्पर्श घडला असतां सचैल स्नान करावें. मग भस्मलेपन करून माझ्या भक्तांना भोजन घालून तांबूल समर्पण करावें. (५१) पूजेच्या वेळेस दोषी प्राण्यांना कधींही पाहूं नये. याप्रमाणें एकाग्र मन करून प्राणलिंगाचा व अंगाचा संबंध करून (५२) जो प्राणी माझी पूजा करतो, त्याला मी इच्छित पदार्थ देतों. सेवक, स्वयपाकी, उपकरणे स्वच्छ करणारे (५३) हे सर्व शिवभक्त असावेत. आणि भस्म रुद्राक्ष धारण करणारे असावेत, याप्रमाणें प्रातःकालीं शुद्ध मनानें शिवलिंगपूजा करावी. (५४) नंतर सर्व दोषरहित असें धन उपजीविकेकरितां मिळविण्यास बाहेर जावें. मग पुनः माध्यान्हसमयीं याचप्रमाणें शिवपूजा करावी. (५५) भयंकर संकटें जरी आलीं तथापि त्यांना न जुमानतां आयुष्य असेंपर्यंत जो प्राणी हें व्रत करतो, तो जीवन्मुक्त असा ह्मणवितो. (५६) हजारो ब्रह्महत्या करणारा आहे, कोट्यावधि भ्रूणहत्या करणारा आहे तथापि त्यानें शिवपूजा केली तर त्याला तीं पातकें शिवत नाहींत. (५७) नंतर आपल्या घराच्या दारांत उभा राहून गायीच्या धारा

कं चातिथिमीश्वरस्य ॥५७॥ समागतं पुण्यबलात्तदातिथिं समर्चयेदीश्वरचेतसा नरः ॥ जलासनाद्यंघ्रवनेजनादिभिस्तथान्नपानैः प्रियवाग्भिरादरात् ॥५८॥ ततः शिवाराधनतत्परान् जनान् विभूतिरुद्राक्षविभूषितांगिनः ॥ विशुद्धभावान्वरवीरशांभवान् संभोजयेद्भक्तिपुरःसरं नरः ॥५९॥ विना माहेश्वरैरेको यस्तु भुंक्ते षडानन ॥ स पापीयानघं भुंक्ते स श्रीकण्ठापराधकृत् ॥६०॥ वृत्तम् ॥ माहेश्वरा यस्य गृहे न कुर्युर्लिंगार्चनं प्राणशिवैक्यभाजः ॥ भुंजीयुरन्नं नहि तस्य जन्म व्यर्थं पशूनामिव जीवितं तत् ॥६१॥ अतो माहेश्वरांच्छुद्धान् भोजयित्वा विधानतः ॥ पश्चाद्भुंजीत साकं वै पुत्रबंधुजनैर्नरः ॥६२॥ भक्ष्यमूलफलादीनि शिवायानर्पितानि यत् ॥ भुंजीयात्तत्प्रमादेन छिंद्याज्जिव्हां स्वयं नरः ॥६३॥ पथ्यं शिवार्पितं चान्नं भक्ष्यमूलफलाचितं ॥ भुंजीयादप्रमादेन द्वात्रिंशद्ग्राससंमितम् ॥६४॥ ततो हस्तांघ्रिवक्त्राणि

---

काढावयास जितका वेळ लागतो, तितक्या वेळपर्यंत अतिथींचें मार्गनिरीक्षण करावें. तितक्यांत देशांतराहून अन्नार्थी होऊन आला तर त्यांतून तो शिवपूजक असेल तर त्याला ईश्वराचाच अतिथि असा समजावा. (५८) आपल्या पुण्योदयानें घरीं आलेल्या अतिथीची पूजा ईश्वरबुद्धीनें करावी. पाणी, आसन, पादप्रक्षालन, अन्न, पान, आदरपूर्वक प्रियवाणी इत्यादिकांनीं त्याची पूजा करावी. (५९) नंतर शिवाराधनेंत तत्पर असलेले, विभूति रुद्राक्ष यांनीं अलंकृत झालेले, शुद्ध भाव असलेले, अशा श्रेष्ठ वीरशैवांना मनुष्यानें भक्तिपूर्वक भोजन घालावें. (६०) हे षण्मुखा, माहेश्वरांशिवाय एकटाच जो जेवतो, तो पापी आपलें पाप खातो, असें समजावें आणि तो शिवाचा अपराधी आहे, असें समजावें. (६१) प्राणलिंगांगसंबंध करणारे माहेश्वर ज्याच्या घरांत इष्टलिंगपूजा करीत नाहींत, व ज्याच्या घरांत भोजन करीत नाहींत, त्यांचा जन्म निरर्थक असून त्यांचें जीवितही निरर्थक आहे, असें समजावें. पशूप्रमाणें त्यांना मानावें. (६२) याकरितां शुद्ध माहेश्वरांना विधिपूर्वक भोजन घालून नंतर मुलांबाळांसह बंधुवर्गासह आपण भोजन करावें. (६३) भक्ष्य, मूल, फल वगैरे शिवाला अर्पण न करितां जो खाईल, व जो चुकून खाईल त्याची जीभ कापून टाकावी. (६४) शिवार्पित अन्न पथ्यकर आहे. व भक्ष्य, मूल, फल वगैरे शिवाला अर्पण केले तर तींही पथ्यकर होतात. न चुकतां बत्तीस घांसपर्यंत भोजन मनुष्यानें करावें. (६५) नंतर हात तोंड पाय धुवून (आंचवून) शुद्ध बुद्धीनें आचमन करावें. हे

प्रक्षाल्याचम्य शुद्धधीः॥वत्स राजवदासीत सुखमासनसंस्थितः॥६५॥ वृत्तम् ॥ पुराणवेदान्तशिवागमेषु विचारयेत्तत्वमनन्तरूपम् ॥ सदाशिवाख्यं विमलं चिदंशं परात्परं सत्यचिदात्मभूतम् ॥६६॥ ततः सायंतने काले एवमेवाचरेन्नरः ॥ दिने दिने महाभाग कुर्यादेवं समाहितः ॥६७॥ वृत्तम् ॥ एवं यस्तु शिवार्चनं प्रतिदिनं कुर्वीत भक्त्या नरः सत्याचारसमन्वितः शिवकथापीयूषवर्षावृतः ॥ संसारांबुनिधिं तरंगतरलं तापत्रयग्राहिणं दुष्पारं प्रतरेत्स गोष्पदमिव त्र्यक्षांघ्रिभक्तिप्लवात् ॥६८॥ लिंगार्चनाविधिरयं कथितो मया ते संसारबंधनविनाशकरः षडास्य ॥ ज्ञानप्रदः सकलवेदपुराणसारः शिष्टादृतः शिवकरो दिनकृत्ययुक्तः ॥६९॥ इदं पवित्रं पापघ्नं सर्ववेदेषु संमतम् ॥ सारात्सारतरं वत्स तव स्नेहान्मयोदितम् ॥७०॥ संग्रहेणोदितो वत्स लिंगार्चनविधिस्तव ॥ एष मोक्षप्रदः सत्यः शेषोऽन्यो ग्रंथविस्तरः ॥७१॥ वृत्तम् ॥ इदमखिलरहस्यं लिंगपूजाविधानं सुजनसुरमुनींद्रैरादृतं भ-

---

वत्सा, नंतर आसनावर एकाद्या राजाप्रमाणें बसावें. (६६) नंतर पुराण, वेद, शिवागम, यांमध्यें अनंतरूप शिवतत्वाचा विचार करावा. त्या तत्वाला सदाशिव असें नांव असून तें निर्मळ व चिद्रूप आहे. व श्रेष्ठाहून श्रेष्ठ असून सत्यज्ञानानंदस्वरूप आहे. (६७) नंतर संध्यासमयीं याचप्रमाणें मनुष्यानें आचरण करावें. हे महाभागा षण्मुखा, दरदिवशीं शांतमनानें याच प्रमाणें करावें. (६८) याप्रमाणें जो प्राणी प्रतिदिवशीं भक्तीनें व सत्याचारानें युक्त होऊन शिवपूजा करतो, व शिवकथामृतपान करतो, तो प्राणी भक्तिरूप नौकेंत बसून संसारसमुद्र तरून जातो. तो समुद्र इतका भयंकर आहे कीं, त्यांत तरंगरूपी ( मनोविकार ) लाटा वरचेवर येतात. तापत्रयरूपी सुसरी त्यामध्यें आहेत. तो दुष्पार आहे असा जरी आहे, तथापि गोपादाप्रमाणें विन आयासानें तरून जातो. (६९) हे षण्मुखा, संसाराचीं बंधनें तोडणारा हा लिंगपूजाविधि तुला सांगितला. हा विधि ज्ञान देणारा असून सकल वेदांचें व पुराणांचें सार आहे. याचा आदर मोठमोठे शिष्ट करीत असून शुभकर आहे ; व रोजच्या कर्मांपैकीं एक कर्म आहे. (७०) हे वत्सा, हें पवित्रकर, पापनाश करणारें, सर्ववेदांस संमत असलेलें, सारांतलें सार ह्मणविणारें व्रत तुझ्या प्रेमामुळें तुला मी सांगितलें. (७१) हे वत्सा, तुला हा विधि संक्षेपानें सांगितला. हा मोक्षदायक असून खरा आहे. बाकी सांगितलें असतां ग्रंथविस्तार होईल ह्मणून इतकेंच पुरें करतों. (७२) हें लिंगपूजाविधान

किमन्धिः ॥ भवभयपरिहारं वेदवेदान्तसारं त्वमपि कथय सर्वं लिंग-पूजारताय ॥७२॥

सूत उवाच ॥ इत्युक्त्वा शंकरस्तूष्णीं बभूव सुरसत्तमाः ॥ वक्तव्याभावमालोक्य शिवास्यन्यस्तलोचनः ॥७३॥ वृत्तम् ॥ श्रुत्वा शंभुमुखांबुजाच्छ्रुतिगतां लिंगार्चनापद्धतिं नत्वा शंकरपादपद्मयुगलं ब्रह्मेन्द्रकृष्णार्चितम् ॥ त्यक्त्वा कर्मकलापमन्यविषयं स्कन्दोऽम्बिकाप्रेमभूरासीच्छंकरलिंगपूजनरतो लिंगांगसंबंधवान् ॥७४॥ यूयं श्रद्धान्विता विप्राः प्राणलिंगांगसंगिनः ॥ स्थापयध्वमिमं मार्गं भुक्तिमुक्तिफलप्रदम् ॥७५॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे लिंगार्चनाविधानं नाम षट्षष्टितमोऽध्यायः ॥

---

सर्वोतलें रहस्य असून सज्जन, देव, मुनि यांनीं भक्तिपूर्वक याचा आदर केला आहे. हा भवभीतीचा परिहार करणारा असून वेद व वेदांतांतला सार आहे. असें हें विधान तूं देखील लिंगपूजातत्पर अशा प्राण्यालाच सांग.

(७३) सूत बोलले--देवश्रेष्ठ श्रीशंकर याप्रमाणें स्कंदाला सांगून उगीच बसले कारण पुढें वक्तव्यांश नसल्यामुळें पार्वतीकडे नजर फेकून शिव स्वस्थ बसले. (७४) वेदोक्त शिवलिंगार्चनाची पद्धत शिवाच्या मुखकमलापासून ऐकून ब्रह्मा विष्णु इंद्र यांनीं नमस्कृत अशा श्रीशंकराच्या पदकमलाला नमस्कार करून इतरविषयक सर्व कर्मकलाप सोडून स्कंद हा अंबिकेच्या प्रेमाचें स्थान झाला. मग तो प्राणलिंगांगसंबंध करणारा होऊन इष्टलिंगपूजेंत रत झाला. (७५) ब्राह्मणहो, तुह्मी श्रद्धायुक्त होऊन प्राणलिंगांगसंबंध करणारे व्हा. आणि भुक्तिमुक्तिरूप फल देणाऱ्या या मार्गाची स्थापना करा.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वरिमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचार निरूपणांतील लिंगार्चनविधाननांवाचा सासष्टावा अध्याय संपला.

## ॥ अथ सप्तषष्टितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ बोधायनोपनिषदि ॥ अथातो महादेवस्य पादोदकविधिं व्याख्यास्यामः ॥ भगवतः पादौ प्रक्षाल्य शंखं प्रपूर्य गन्धपुष्पादिभिरभ्यर्च्य कद्रुद्रायेति मत्वा रुद्रायेति द्वाभ्यां मार्जनं कृत्वा ऋतं सत्यं परब्रह्मेति प्राशयेद्वा एवं कुर्यात्सकुलजान् दशपूर्वान् दशापरानात्मानं च तारयेत् ॥ आदित्यपुराणे ॥ पादौ प्रक्षाल्य देवस्य कराभ्यां कमलेक्षण ॥ अभ्युक्ष्येदात्मनो मूर्ध्नि ह्यतिथेश्च गुरोस्तथा ॥१॥ शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः ॥ गुरुपादोदकं चित्रं संसारद्रुमनाशनम् ॥२॥ शिवरहस्ये ॥ सर्वतीर्थाभिषेके या शुद्धिर्मनसि जायते ॥ गुरोरंघ्रिस्पर्शनजं शिरसा धारयेत्सकृत् ॥३॥ सप्तसागरपर्यन्ततीर्थस्नानकला सदा ॥ गुरोरंघ्रिजले बिंदुसहस्रांशं न पूरयेत् ॥४॥ आदित्यपुराणे ॥ दध्यात्पादोदकं यस्तु लिंगमूर्तेः शिवस्य तु ॥ प्रक्षालयति तत्तोयं ब्रह्महत्यादिपातकम् ॥५॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ शंभोः पादो-

---

श्रीशिवास नमस्कार असो. बोधायनोपनिषदांत ह्मटलें कीं,--आतां आह्मी पादोदकविधान सांगतों. भगवंताचे पाय धुवून शंख भरून गंध फल वगैरेंनीं पूजा करून "कद्रुद्राय" यामंत्रानें मनन करून "रुद्राय" या दोन मंत्रांनीं मार्जन करून "ऋतं सत्यं परब्रह्म" यामंत्रानें प्राशन करावें. याप्रमाणें जो करतो, तो आपल्या मागच्या दहा कुलांना व पुढच्या दहा कुलांना उद्धरून आपण स्वतः उद्धरून जातो. (१) आदित्यपुराणांत ह्मटलें कीं,--दोनी हातांनीं देवाचे पादप्रक्षालन करून आपल्या मस्तकावर, अतिथीच्या मस्तकावर प्रोक्षण करावें. गुरूच्या मस्तकावर (२) गुरुपादोदक हें पापरूपी चिखलाला वाळविणारें असून ज्ञानतेजाला प्रदीपन करणारें आहे. व संसारवृक्षाचा उच्छेद करणारें असून मोठें चित्रविचित्र आहे. (३) शिवरहस्यांत सांगितलें कीं,- सर्व तीर्थांमध्यें स्नान केलें असतां मनाची जी शुद्धि होते, ती शुद्धि एकवार गुरुपादोदकाचा अभिषेक करून घेतल्यानें होते. (४) सप्तसमुद्रांपर्यंत असलेल्या सर्व तीर्थांमध्यें स्नान करून मिळविलेलें पुण्य गुरुपादोदकाच्या हजाराव्या हिश्शाच्या योग्यतेला येत नाहीं. (५) आदित्यपुराणांत ह्मटलें कीं,--लिंगमूर्ति शिवाचें पादोदक जो डोक्यावर धारण करतो, तो त्या पाण्यानें ब्रह्महत्या वगैरे मोठमोठ्या पातकांचा क्षय करून घेतो. (६) ब्रह्मांडपुराणांत असें ह्मटलें कीं,--श्रीशंभूचें पादोदक प्रथम पिऊन नंतर अशुचि

दकं पीत्वा पश्चादशुचिशंकया ॥ य आचमति मोहेन तं विद्याद्ब्रह्मघातकम् ॥६॥ वीरागमे ॥ लिंगोदकं च पादाम्बु प्रसादांब्विति तत्त्रिधा ॥ नमस्कार्यं हि शिरसा धार्यं पेयं शिवार्थिभिः ॥७॥ लिंगाभिषेकतोयेन शुचिर्भूत्वा हरं स्मरन् ॥ मार्जनं मूर्ध्नि गात्रे च निर्मलस्नानमीरितम् ॥८॥ विधिः परमशैवानां निर्मलस्नानमीरितम् ॥ नान्येषामिति कर्तव्यं शंकरेण सुभाषितम् ॥९॥ स्नानानां चैव सर्वेषां रहस्यमतिदुर्लभम् ॥ येन स्नानेन सा गौरी रुद्रं भर्तारमाययौ ॥ १० ॥ काशीखंडे ॥ हिमोदकं महातीर्थं गंगा च यमुना नदी ॥ नर्मदा सरयूः सुप्रा तथा गोदावरी नदी ॥११॥ सदा सन्निहितास्त्वेताः शंभोः पादोदके मुने ॥१२॥ वैद्यशास्त्रे ॥ लिंगाभिषेकं कुर्वीत तल्लिंगोदकमुच्यते ॥ तत्र स्नात्वा च पीत्वा च नाशयत्यखिलामयम् ॥१३॥ अभिषिक्तजलं प्रातः पिबेन्नित्यं दिने दिने ॥ शूलकुष्ठाद्यपस्मारज्वराणां भेषजं प्रिये ॥१४॥ वीरभद्रीये ॥ स्नानोदके भवेत्स्नानं गण्डूषे पानमेव च ॥ लिंग-

---

बुद्धीनें जो मोहानें आचमन करतो, तो ब्रह्मघातकी समजावा. (७) वीरागमांत सांगितलें कीं,--लिंगोदक, पादोदक, प्रसादोदक असे तीन प्रकार यामध्यें आहेत. यातिन्हीला नमस्कार करावा, शिरसा धारण करावें, आणि शुभार्थी प्राण्यांनीं पिऊन टाकावें. (८) लिंगाला अभिषेक केलेल्या उदकानें शुचिर्भूत होऊन श्रीशिवाचें स्मरण करीत मस्तकावर, शरीरावर मार्जन करून घ्यावें. याला निर्मल स्नान असें ह्मणतात. (९) परमशैवांनीं हें निर्मल स्नान केलेंच पाहिजे असा विधि आहे. इतरांना मात्र हें स्नान नाहीं. याप्रमाणें श्रीशिवानें सांगितलें आहे. (१०) सर्व स्नानांमध्यें परमरहस्य व दुर्लभ असें पादोदकस्नानच होय. या स्नानाच्या माहात्म्यानेंच गौरीला श्रीशंकर पति झाले. (११) काशीखंडांत सांगितलें कीं,–हिमोदक महातीर्थ असून गंगा, यमुना, नर्मदा, सरयु, सुप्रा, गोदावरी, (१२) वगैरे महानद्या शंभूच्या पादोदकांत संनिहित असतात. (१३) वैद्यशास्त्रांत सांगितलें कीं,–लिंगाभिषेक केलेल्या उदकाला लिंगोदक असें ह्मणतात. त्यानें स्नान पान केलें असतां सर्व रोग नष्ट होतात. (१४) अभिषेक केलेलें उदक प्रतिदिवशीं प्यावें. हे सुंदरि, त्यानें शूल, कुष्ठ, अपस्मार, ज्वर हे रोग निघून जातात. (१५) वीरभद्रीयांत सांगितलें कीं,–स्नानोदकानें (शिवलिंगास अभिषेक केलेल्या उदकानें) स्नान करावें. गंडूषोदकानें (शिवलिंगास दाखविलेल्या पाण्यानें) पान करावें. इष्ट लिंगास योग्य तें पाणी आपल्या मनासही प्रशस्त समजावें.

ग्राह्यं मनोग्राह्यमन्यग्राह्यं विवर्जयेत् ॥१५॥ लिंगसारे ॥ लिंगाभिषेकजं तोयं यत्तल्लिंगोदकं भवेत्॥तत्पिबेल्लिंगशरणो ह्यन्यच्चेन्मद्यमांसवत्॥१६॥ लिंगस्नातं लिंगतोयं लिंगपीतं तथैव च ॥ तत्पिबेल्लिंगशरणो ह्यन्यन्म-द्यश्वमूत्रवत् ॥१७॥ लिंगावगाहनं चैव लिंगाम्बु शुचि तद्भवेत् ॥ तेन स्नानं च पानं च अन्यच्चण्डालतोयवत् ॥१८॥ लिंगप्रक्षालनं तोयं लिं-गतोयं तथैव च ॥ तत्तोयं सर्वदा ग्राह्यमन्यच्चण्डालतोयवत् ॥१९॥ वीरतंत्रे ॥ सर्वव्याधिहरं पुण्यं शम्भोर्वक्त्राद्विनिर्गतम् ॥ तत्प्रसादो-दकं विद्यात्स्कंदाद्यैरपि सेवितम् ॥२०॥ वैद्यशास्त्रे ॥ निर्माल्यसलिलं प्राश्य देवदेवस्य शूलिनः ॥ क्षयकुष्ठज्वरश्वासैर्मुच्यते किल्बिषैरपि ॥२१॥ प्रसादितं तु सलिलं प्रसादसलिलं भवेत् ॥ गृहीतं पावनं ह्येत-दन्यद्विट्सलिलं भवेत् ॥२२॥ आदित्यपुराणे ॥ यत्प्रसादोदकं पीत्वा पश्चादशुचिशंकया ॥ य आचमति मोहेन तं विद्याद्ब्रह्मघातकम् ॥२३॥

---

दुसऱ्यानें घेतलेलें पाणी आपण घेऊं नये. (१६) लिंगसारांत सांगितलें कीं,-लिंगाला अभिषेक घातलेल्या उदकाला लिंगोदक असें ह्मणतात. इष्टलिंगाला शरण जाणाऱ्या प्राण्यांनीं तेंच पाणी प्यावें दुसरें प्यालें असतां मद्यमांस प्याल्या-प्रमाणें समजावें. (१७) लिंगाला अभिषेक घातलेलें, लिंगाला समर्पण केलेलें, तेंच पाणी लिंगशरणांनीं प्यावें. दुसरें प्यालें असतां मद्य व कुत्र्याचें मूत प्याल्या-प्रमाणें समजावें. (१८) इष्टलिंगाला अभिषेक घातलेल्या उदकाला शुद्ध लिंगोदक असें ह्मणतात. त्या पाण्यानें स्नान करावें, व तेंच प्यावें. दुसरें चंडालाच्या घरच्या पाण्याप्रमाणें समजावें. (१९) इष्टलिंगप्रक्षालन केलेलें पाणी व लिंगोदक सर्वदा स्वीकार करावयास योग्य आहे. दुसरें चांडालाच्या घरच्या पाण्याप्रमाणें समजावें (२०) वीरागमांत सांगितलें कीं,--श्रीशंभूच्या मुखांतून निघालेलें उदक सर्व रोग-नाशकारक असून पुण्यकर आहे. तें प्रसादोदक षण्मुख वगैरे देवांनीं स्वीकारिलें आहे. (२१) वैद्यशास्त्रांत सांगितलें कीं,--देवाधिदेव शूलीचें निर्माल्योदक प्राशन केलें असतां क्षय, कुष्ट, ज्वर, खोकला वगैरे रोग जातात. व पापेंही नष्ट होतात. (२२) ज्या पाण्यावर ईश्वराचा प्रसाद झाला आहे, त्याला प्रसादोदक असें ह्मणतात. हें ग्रहण करावयास योग्य असून पवित्रकर आहे. दुसरें पाणी विष्ठेनें मिसळलेल्या पाण्याप्रमाणें समजावें. (२३) आदित्यपुराणांत सांगितलें कीं,--प्रथम प्रसादोदक पिऊन नंतर अशुचिबुद्धीनें जो आचमन करतो, तो ब्रह्मघातकी आहे,

शिवरहस्ये ॥ मत्प्रसादोदकं पुष्पं सदा धार्यं मदाश्रितैः ॥ त्र्यक्षा दशभुजास्सर्वे मम तुल्यपराक्रमाः ॥२४॥ आदित्यपुराणे ॥ गंगोदकात्पवित्रं तु शिवपादोदकादिकम् ॥ पीतं वा मस्तकस्थं वा नृणां पापहरं भवेत् ॥२५॥

ब्रह्माण्डपुराणे ॥ सनत्कुमार उवाच ॥ माहात्म्यं श्रोतुमिच्छामि शंभोः पादोदकस्य वै ॥ किं फलं कः प्रभावो वा गुणाः के वास्य कीर्तिताः ॥२६॥ तद्धारयति यो नित्यं शिरसा शिवतत्परः ॥ प्राशनं नियमेनैव प्रयत्नेन दिने दिने ॥२७॥ कुरुते यो नरो ब्रह्मन् प्रभावं तस्य मे वद ॥२८॥

ब्रह्मोवाच ॥ साधु साधु त्वया वत्स प्रश्नोऽयं पापनाशनः ॥ कृतः पादोदकस्याद्य शृणु माहात्म्यमुत्तमम्॥२९॥कथयामि हितं वत्स योग्यस्त्वं श्रुतवानसि ॥ पाद्यं दत्वा विभोस्तस्य गृण्हीयात्पादतो जलम् ॥३०॥ शतधारेण मंत्रेण पंचाक्षरयुतेन च ॥ धृत्वा शिरसि पादांबु महत्फलमवाप्नुयात् ॥३१॥ अकालमृत्युमथनं सर्वव्याधिविनाशनम् ॥

---

असें समजावें. (२४) शिवरहस्यांत सांगितलें कीं,--माझें प्रसादोदक व पुष्प नेहमीं माझा आश्रय करणाऱ्यांनीं धारण करावें. ह्मणजे ते सर्व लोक त्र्यक्ष (तीन डोळ्याचे) दहा हाताचे, माझ्या समान पराक्रमी असे होतात. (२५) आदित्यपुराणांत सांगितलें कीं,--गंगोदकापेक्षां शिवपादोदक पवित्र आहे. त्याचें पान केलें असतां किंवा मस्तकावर धारण केलें असतां मानवांचीं सर्व पातकें जळून जातात.

(२६) ब्रह्मांडपुराणांत सांगितलें कीं,--सनत्कुमार बोलले—हे ब्रह्मन्, श्रीशिवाच्या पादोदकाचें माहात्म्य ऐकावें ह्मणून इच्छा करतों. त्याचें फल काय? त्याचा प्रभाव काय? त्याचे गुण काय? हें सर्व सांगा. (२७) शिवतत्पर होऊन निरंतर जो तें उदक शिरसा धारण करतो, व दरदिवशीं प्रयत्नपूर्वक नियमानें जो प्राशन करतो, (२८) हे ब्रह्मन् याप्रमाणें जो मनुष्य करतो, त्याचा (पादोदक) प्रभाव मला सांगा.

(२९) ब्रह्मदेव बोलले--हे वत्सा, हा तुझा प्रश्न पापनाश करणारा आहे. चांगला प्रश्न केलास. त्या पादोदकाचें उत्तम माहात्म्य सांगतों, ऐक. (३०) हे वत्सा, त्याचें माहात्म्य तूं ऐकलेंच आहे. तथापि सांगतों ऐक. श्रीशिवास पाद्य देऊन त्याच्या पायाचें उदक घ्यावें. (३१) पंचाक्षरयुक्त शतधारमंत्रानें तें पादोदक मस्तकावर धारण केलें असतां मोठें फल मिळतें. (३२) श्रीशिवाचें पादोदक

सर्वपापोपशमनं शंभोः पादोदकं शुभम्॥३२॥सद्यःफलप्रदं पुण्यं सर्वपातकनाशनं॥ सर्वमंगलमांगल्यं सर्वपावनपावनम् ॥३३॥दुष्टग्रहोपशमनमिष्टसिद्धिप्रदायकम् ॥ सर्वदुःखप्रशमनं सर्वव्याधिविनाशनं॥३४॥ सर्वोत्पातप्रशमनं सर्वरोगप्रभेदनम् ॥ सर्वकल्याणकृत्तोयं सर्वकामफलप्रदम्॥३५॥सर्वसिद्धिप्रदं सद्यः सर्वेषां मुक्तिदायकम् ॥ पुण्यं पुण्यतमं शैवं सर्वदोषनिवारणम्॥३६॥नारायणशिलां गत्वा तत्पृष्ठे श्राद्धकृन्नरः॥ यदाप्नोति तदाप्नोति मूर्ध्नि पादांबुधारणात्॥३७॥तथैव पितरस्तस्य नृत्यन्ति दिवि हर्षिताः ॥ महानद्यां तु गोदायां वैराजे यामुने ऽपे ॥३८॥ ब्रह्मावर्ते च केदारे तथा कनखलेऽपि च ॥ गंगायां च कुशावर्ते बिल्वके नीलपर्वते ॥३९॥ दशाश्वमेधे यद्दत्वा तथा कूर्मशिलासु च ॥ येषु तीर्थेषु यत्पुण्यं तद्धि पादांबुधारणात् ॥४०॥ प्रयागस्य प्रभासस्य पुष्करस्य च सेवनात् ॥ पृथूदकस्य शुक्लस्य सान्निध्याद्यत्फलं भवेत् ॥४१॥ प्रयागे च मृतिर्येषां वाराणस्यां मृतस्य च ॥ कुरुक्षेत्रे

---

अकालमृत्यूचा परिहार करणारें असून सर्व रोगांचा नाश करणारें आहे. व सर्व पातकांचा नाश करणारें आहे. (३३) तात्काळ फल देणारें असून पुण्यकर आहे, सर्व पातकांचा नाश करणारें आहे. तें सर्व मंगल पदार्थांमध्यें मंगलकर असून सर्व पावन पदार्थांमध्यें पावन आहे. (३४) दुष्ट ग्रहांचा नाश करणारें असून इष्टसिद्धि देणारें आहे. सर्व दुःखांचा नाश करणारें असून सर्व रोगांचा नाश करणारें आहे. (३५) हें पादोदक सर्व उत्पातांचा नाश करणारें असून सर्व रोगांचा नाश करणारें आहे. सर्व कल्याण करणारें असून सर्व मनोरथ परिपूर्ण करणारें आहे. (३६) तात्काळ सर्वसिद्धि देणारें असून सर्वांना मुक्ति देणारें आहे. पुण्यकर व अत्यंत पुण्यकर आहे. सर्व दोषांचें निवारण करणारें आहे. (३७) नारायणशिळेपर्यंत जाऊन तेथें श्राद्ध करणाऱ्या मनुष्याला जें पुण्य मिळतें, तें पुण्य पादोदक मस्तकावर धारण केल्यानें मिळतें. (३८) तसेंच त्याचे पितर स्वर्गामध्यें आनंदानें नाचतात. महानदी गोदेंत, वैराजक्षेत्रांत, यमुनेच्या डोहांत, (३९) ब्रह्मावर्तक्षेत्रांत केदारक्षेत्रांत, कनखलक्षेत्रांत, गंगेंत, कुशावर्तांत, बिल्वकक्षेत्रांत, नीलपर्वतावर, (४०) दशाश्वमेधक्षेत्रांत दान केल्यानें जें पुण्य मिळतें, व कूर्मशिलेवर दान केलें तर काय पुण्य मिळतें, तें पुण्य पादोदक धारणानें मिळतें. (४१) प्रयाग, पुष्कर, प्रभास यांच्या सेवनानें ( या यात्रा केल्यानें ) व पृथूदक, शुक्लक्षेत्र यांमध्यें राहिल्यानें जें पुण्य मिळतें. तें पुण्य यानें मिळतें. (४२) प्रयागांत व

मृतानां च गतिर्भवति या नृणाम् ॥४२॥ सर्वं भवति वै वत्स शिवपादांबुधारणात् ॥ कुरुक्षेत्रे नैमिषे च भूमिभागाश्च ये शुभाः ॥४३॥ सर्वेतीर्थोदकस्यैते कलां नार्हन्ति षोडशीम् ॥ मौनी वा यस्तु गंगायां स्नान धर्मरतो नरः ॥४४॥ तस्य यादृग्भवेत्पुण्यं तादृक्पादांबुधारणात् ॥ नदां नदीं वेदवतीं लिंगिकां च महानदीम् ॥४५॥ नदीमिरावतीं चैव तापिकां वडवामुखीं ॥ गोदावरीं चंद्रभागां तथा वेत्रवतीं सुत ॥४६॥ श्रद्धां सरस्वतीं गत्वा तथा वैतरणीं मुने ॥ यत्प्राप्यते फलं स्नात्वा तद्वै पादांबुधारणात् ॥४७॥ वृत्तम् ॥ गंगापुष्करनर्मदा च यमुना गोदावरी गौतमी गंगाद्वारगयाप्रयागवदरी वाराणसी सैंधवी ॥ कन्यासेतुसरस्वतीप्रभृतयो ब्रह्माण्डमध्येऽखिले तीर्थस्नानसहस्रकोटिफलदं श्रीशंभुपादोदकम् ॥४८॥ श्रवणात्सर्वशास्त्राणां वेदवेदांतधारणात् ॥ सर्वव्रतानां चरणात्तपसा यत्फलं मुने ॥ तत्फलं लभते सद्यो मूर्ध्नि पादांबुधारणात् ॥४९॥ अग्निष्टोमाद्गोसहस्रात्पुण्डरीकान्महामुने ॥ वाजपेयाद्राजसूयान्नरमेधाच्च यत्फलम् ॥५०॥ तथा बहुसुवर्णस्य सर्वमे-

---

काशींत मरण आलें असतां व कुरुक्षेत्रांत मरण आलें तर काय फल मिळतें; ती गति या पादोदकानें मिळतें. (४३) हे वत्सा, शिवपादोदक सेवनानें सर्व कांहीं मिळतें. भूभागावर असलेल्या कुरुक्षेत्र नैमिषारण्य वगैरे क्षेत्रांत जें शुभफल मिळतें, तें पादोदक सेवनानें मिळतें. (४४) हे सर्व शिवपादोदकाच्या सोळाव्या-कलेच्या योग्यतेला येत नाहींत. मौनव्रत धरून जो गंगेचें स्नान करतो, (४५) त्याला जें पुण्य मिळतें; तें पादोदकानें मिळतें. नद, नदी, वेदवती, लिंगिका, महानदी, (४६) इरावती, तापी, वडवामुखी, गोदावरी, चंद्रभागा, तसेंच वेत्र-वती, (४७) श्रद्धा, सरस्वती, वैतरणी, यां मध्यें स्नान केलें असतां जें फल मिळतें; तें फल पादोदक धारणानें मिळतें. (४८) गंगा, पुष्कर, नर्मदा, यमुना, गोदावरी, गोमती, गंगाद्वार, गया, प्रयाग, वदरी, वाराणसी, सैंधवी, कन्या, सेतु, सरस्वती, वगैरे नद्या ब्रह्मांडांत ज्या असतील, अशा हजार कोटि तीर्थ-स्नानांनीं जें फल मिळतें, तें फल श्रीशिवाच्या पादोदकानें मिळतें. (४९) सर्व शास्त्रांच्या श्रवणानें, वेदवेदांताच्या धारणानें, सर्व व्रतांच्या आचरणांनीं, तपश्चर्येनें जें फल मिळतें; तें फल मस्तकावर पादोदक धारण केल्यानें मिळतें. (५०) अग्निष्टोमापासून, सहस्र गोदानापासून, पुंडरीकापासून, वाजपेयापासून, राजसूया-पासून, नरमेधापासून जें फल मिळतें, तें फल (५१) तसेंच पुष्कळ सुवर्णदान

धस्य यत्फलम् ॥ तत्फलं लभते सद्यो मूर्ध्नि पादांबुधारणात् ॥५१॥ गोदानेन च यत्प्रोक्तं कन्यादानेन यद्भवेत् ॥ भूमिदानेन यत्प्रोक्तं सुवर्णमणिभूषणे ॥५२॥ विद्यादानेन यत्प्रोक्तं शरणागतपालनात् ॥ तत्फलं लभते सद्यो मूर्ध्नि पादांबुधारणात् ॥५३॥ गृहे यस्मिन् प्रसूता स्त्री सूतकं नात्र विद्यते ॥ शिवपादांबुसंस्पर्शात्सर्वपापं प्रणश्यति ॥५४॥ दूषितश्चापि पादांबु बिभ्राणः शुद्धिमाप्नुयात् ॥ अंत्यकालेऽपि यश्चैवं भ्रियते पादयोर्जलम् ॥५५॥ सोऽपि सद्गतिमाप्नोति विद्याचारबहिष्कृतः ॥ अगम्यागमनं येषां पापाचाराश्च ये नराः ॥५६॥ तेऽपि पूता भवंत्याशु शंभोः पादांबुधारणात् ॥ दृष्टिपूतं पिबेत्सर्वं शिवस्य परमेष्ठिनः ॥५७॥ तद्वै पापहरं पुत्र किं पुनः पादयोर्जलम् ॥ यथा पादोदकं पुत्र पत्रं पुष्पं सुखावहम् ॥५८॥ तथैव धूपशेषश्च दीपशेषो न संशयः ॥ अहमन्यद्रहस्यं ते कथयामि शृणुष्व तत् ॥५९॥ तत्प्रसादोदकस्पर्शा-

---

केल्यानें, व सर्व यज्ञ केल्यानें जें पुण्य मिळतें. तें मस्तकावर पादोदक धारण केलें असतां मिळतें. (५२) गोदानानें जें पुण्य सांगितलें असेल, कन्यादानानें जें पुण्य सांगितलें असेल, भूदानानें जें पुण्य सांगितलें असेल, सुवर्ण, मणि, भूषण यांच्या दानानें जें पुण्य सांगितलें असेल, तें पादोदक सेवनानें मिळतें. (५३) विद्यादानानें जें पुण्य सांगितलें असेल, शरणागत संरक्षणानें जें पुण्य सांगितलें असेल, तें फल पादोदक सेवनानें तात्काळ मिळतें. (५४) शिवपादोदक ज्या घरीं आहे, त्या घरांत स्त्री बाळंतीण झाली तर तेथें जननाशौच मुळींच नाहीं. कारण शिवपादोदकाच्या स्पर्शानें सर्व अमंगळ नष्ट होतात. (५५) दोषी असून पादोदकाचा स्पर्श केला तर तो मनुष्य. शुद्ध होतो. अंत्यकालीं देखील जो पादोदक धारण करतो, (५६) तो सद्गतीला जातो. विद्येनें आचारानें जो बाहिष्कृत आहे, अगम्यगमन ज्यानें केलें आहे, पापाचारांत जे रत आहेत,(५७) ते देखील श्रीशिवाच्या पादोदकाच्या धारणानें पुनीत होतात. परमेष्ठी शिवाच्या दृष्टीनें पुनीत झालेलें उदक प्यावें. (५८) तें देखील पापनाश करितें, पादोदक नाश करीलच ह्मणून काय सांगावयाचें आहे? पादोदक जसें पवित्र आहे, तसें पत्र पुष्प हे सर्व सुखावह आहे. (५९) तसेंच धूपाचा शेष, आणि दीपाचा शेष सुखकर आहे, यांत संशय नाहीं. मी दुसरें एक रहस्य सांगतों, ऐक. (६०) प्रसादोदकाचा स्पर्श केला असतां जें पुण्य मिळतें, त्यासारखें पुण्य दुसरें कोणतें-

त्पुण्यमन्यन्न विद्यते ॥ भूतप्रेतपिशाचानां डाकिनीनां विनाशनम् ॥६०॥ जराव्याप्तशरीराणां रोगाक्रान्तशरीरिणाम् ॥ रोगैराहतदेहानां विषशस्त्रहतात्मनाम् ॥६१॥ वातपित्तकफोद्भूतसर्वव्याधिविनाशनम् ॥ अग्निचोरभयं पुत्र पुरुषस्य विनश्यति ॥६२॥ अपमृत्युभयं नास्ति सिंहव्याघ्रकृतं तथा ॥ तस्य सर्वभयं नास्ति प्रसादोदकदर्शनात् ॥६३॥ रोगाः सर्वे प्रणश्यंति तेजोवीर्यं च वर्द्धते॥ उत्साहं पौरुषं शौर्यं संततिः सुखमुत्तमम् ॥६४॥ विधीयते कायशुद्धिः पीते वक्त्राद्विनिर्गते ॥ प्रायश्चित्तं यदि प्राप्तं कृच्छ्रं वाप्यघमर्षणम् ॥६५॥ सत्प्रसादोदकं पीत्वा शुद्धिमाप्नोति तत्क्षणात् ॥ अशौचं नैव विद्येत जातकं मृतकं तथा ॥६६॥ तेषां प्रसादजा शुद्धिः प्राशनं ये प्रकुर्वते ॥ एतत्पादोदकस्यादि माहात्म्यं कथितं मया ॥६७॥ धारयस्व सदा मूर्ध्नि प्राशनं कुरु नित्यशः ॥ जन्ममृत्युजरामुक्तो मोक्षं प्राप्स्यसि पुत्रक ॥६८॥ तद्रहस्यं न वक्तव्यं मूर्खाणां च त्वयाऽनघ ॥ कृतघ्नाय न वक्तव्यं नच हिंसारताय च

---

ही नाहीं. भूत, प्रेत, पिशाच, डाकिनी यांचा नाश त्या उदकानें होतो. (६१) जरेनें ज्यांचें शरीर व्याप्त झालें आहे, व रोगांनी ज्यांचें शरीर व्याप्त झालें आहे, रोगांनीं ज्यांच्या शरीरांत घर केलें आहे, विषानें व शस्त्रानें ज्यांचें शरीर नष्ट झालें आहे, (६२) वात, पित्त, कफ, यां दोषांच्या प्राबल्यानें जे रोग वाढले असतील, त्यां सर्वांचा नाश या उदकानें होतो. हे पुत्रा, अग्नीची भीति व चोराची भीति यांपासून नाहींशी होते. (६३) सिंह व्याघ्र यांपासून अपमृत्यु येत नाहीं. प्रसादोदकाचें नुसतें दर्शन घेतलें तर सर्व भीति नाहींशी होते. (६४) रोग सर्व नष्ट होतात, तेज वीर्य वाढतें. उत्साह, पौरुष शौर्य, संतति, उत्तमसुख वगैरे मिळतात. (६५) पान केल्या बरोबर सर्व शरीर शुद्ध होतें. नुसतें तोंडांतून गेलें तरी शरीर शुद्ध होतें. कृच्छ्र अघमर्षण वगैरे प्रायश्चित्त घेण्यापेक्षां (६६) उत्तम प्रसादोदकाचें पान केलें तर तत्क्षणीं मनुष्य शुद्ध होतो. त्याला जाताशौच किंवा मृताशौच कोणतेंही नाहीं. (६७) जे याचें प्राशन करतात, त्यांना प्रसादजन्य शुद्धि मिळते. हें पादोदक इतकें श्रेष्ठ आहे. याचें माहात्म्य तुला सांगितलें. (६८) सर्वदा मस्तकावर धारण कर, आणि निरंतर प्राशन कर. ह्मणजे हे पुत्रा, जन्म, मृत्यु, यांपासून मुक्त होऊन मोक्षाला जाशील. (६९) तें रहस्य मूर्खांना तूं सांगूं नकोस. कृतघ्न लोकांना, हिंसा करणाऱ्यांना, सांगूं नको आणि इतर

॥६९॥ नाभक्ताय त्वरुद्राय न च पाषंडिने सुत ॥ शांताय शुद्धभावाय दांताय शुभचारिणे ॥७०॥ तीर्थस्नानरतायैवं देवधर्मरताय वै ॥ पादोदकादिमाहात्म्यं सततं यः पठेन्नरः ॥७१॥ कीर्तयेच्छ्रावयेद्यस्तु मुच्यते सर्वकिल्बिषैः ॥ श्रुत्वा पापानि संत्यज्य प्राप्नुयाच्च महत्फलम् ॥७२॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे पादोदकादि माहात्म्यं नाम सप्तषष्टितमोऽध्यायः ॥

---

(७०) अभक्त लोकांना रुद्ररहित लोकांना, पाषंडी लोकांना, सांगूं नको. शांत, शुद्ध भावाचा, जितेंद्रिय, शुभकर्म करणारा, (७१) तीर्थ स्नान करणारा, धर्मरत असलेला अशा प्राण्यास दे. पादोदक वगैरेचें माहात्म्याचें जो पठन करतो, (७२) जो कीर्तन करतो, तो सर्व पातकांपासून मुक्त होतो. श्रवण केलें असतां तो पापमुक्त होऊन मोठें फल मिळवितो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील पादोदकादिमाहात्म्य नांवाचा सदसष्टावा अध्याय संपला.



## ॥ अथ अष्टषष्टितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ शैवसंहितायाम् ॥ व्यासं सर्वागमावासं मुनिं मुनिगणावृतम् ॥ कृतपौर्वाण्हिकाचारं कृतासनपरिग्रहम् ॥१॥ प्रसन्नं प्रांजलिः प्राह प्रणम्य किल जैमिनिः ॥२॥

जैमिनिरुवाच ॥ अनर्हं मम नैवेद्यं पादांबुकुसुमं दलम् ॥ इतीश्वरेण कथितमिति केचिन्महर्षयः ॥३॥वदन्ति तत्कथं स्वामिन्यथार्थं कथयस्व मे ॥४॥

व्यास उवाच ॥ देवदेवस्य वचसो विषयोऽयं हि जैमिने ॥ ये वीरभद्रशपिताः शिवभक्तिपराङ्मुखाः ॥५॥ शंभोरन्यत्र देवेषु ये भक्ता ये न दीक्षिताः ॥ येऽशुद्धकर्मिणः शंभोरन्यत्र समबुद्धयः ॥६॥ तेषामनर्हमीशस्य तत्प्रसादचतुष्टयम् ॥ निर्माल्यं निर्मलं शुद्धं निर्मलत्वादनिंदितम् ॥७॥ तस्मादभोज्यं निर्माल्यं प्राकृतैरशिवात्मभिः ॥ जिव्हाचापलसंयुक्तः शिवसंस्कारवर्जितः ॥८॥ शिवनिर्माल्यभोगी च रौरवं नरकं व्रजेत् ॥९॥ ॥

---

श्रीशिवास नमस्कार असो. शैवसंहितेंत सांगितलें कीं,--(१) सर्व आगमांचें घर, मुनिगणांनीं युक्त, मुनि, प्रातःकालचें आन्हिककर्म आटोपलेला, आसनावर बसलेला, (२) प्रसन्न अशा व्यासाला हात जोडून जैमिनीनें ह्मटलें कीं–

(३) जैमिनि बोलला--हे मुने, माझा नैवेद्य, पादोदक, पुष्प, पत्र वगैरे घ्यावयास अयोग्य आहेत, असें ईश्वरानें सांगितलें ह्मणून कांहीं ऋषि (४) सांगतात, तर हे प्रभो, यांत खरा अर्थ काय आहे? तो मला सांगा–

(५) व्यास बोलले--हे जैमिने, देवाधिदेव शिवाच्या ह्मणण्याचा अर्थ निराळा आहे. ज्या लोकांना वीरभद्रानें शाप दिला आहे, जे लोक शिवभक्तीपासून पराङ्मुख आहेत, (६) श्रीशंभूशिवाय इतर देवांवर जे भक्ति करतात, ज्यांनीं दीक्षा घेतली नाहीं, ज्यांचीं कर्में शुद्ध आहेत, शंभूशिवाय दुसऱ्या ठिकाणीं ज्यांची बुद्धि सम आहे, (७) त्या लोकांना ईश्वराचा प्रसादचतुष्टय योग्य नाहीं. निर्माल्य हे निर्मळ असून शुद्ध आहे. निर्मळ असल्यामुळें लोकांत अनिंदित झालें आहे. (८) या करितां अशिवस्वरूपी प्राकृत लोकांनीं निर्माल्याचें सेवन करूं नये. ज्याची जीभ चपल आहे, शिवसंस्कारानें जो हीन आहे, (९) त्यानें निर्माल्याचें सेवन केलें तर रौरव नरक त्याला मिळतें.

शैवे ईश्वर उवाच॥ मल्लिंगधारिणो लोके देशिका मत्परायणाः॥मदे-कशरणास्तेषु योग्यं नैवान्यजंतुषु॥१०॥ कालिकाखण्डे॥ प्रसादं त्रिवि-धं प्रोक्तं शुद्धं सिद्धं प्रसिद्धकम्॥ शुद्धं लिंगमुखात्त्यक्तं सिद्धं चरवि-सर्जितम्॥११॥ प्रसिद्धं गुरुणात्यक्तमित्येतत्त्रिविधं स्मृतम्॥१२॥ स्कान्दे॥ लिंगार्पणं तु सर्वत्र बाह्याभ्यंतरतो भवेत्॥रूपं द्रव्यस्य बाह्यं तु निरूपं चांतरे पुनः॥१३॥ समाघ्रातं परिस्पृष्टं यथादृष्टमनिच्छया॥शि-वाय कल्पितं वस्तु न किंचिदपि दूष्यति॥१४॥ बृहत्कालोत्तरे॥ संयो-गेषु वियोगेषु चाणुमात्रसुखानि च॥ यः कुर्यादिष्टलिंगे तु सोऽवधा-नी निरंतरम्॥१५॥ शैवे॥ शिवस्वामिकमेवान्नं शिवाय विनिवेदयेत्॥ विनियोगोपचारेण संतुष्यति सदाशिवः॥१६॥ ब्रह्माण्डपुराणे॥ सर्व-लोकैकनाथस्य शंभोः कः किं प्रयच्छति॥ उपचारप्रियः शंभुस्तेनैवायं प्रसीदति॥१७॥ ग्रंथान्तरे॥ शिवोपभुक्तसद्गंधमन्नपानादिकं तथा॥

---

(१०) शैवपुराणांत सांगितलें कीं,--ईश्वर बोलला—माझें चिन्ह धारण करणारे, माझे ठिकाणीं असक्त असलेले, मलाच मुख्यत्वेंकरून शरण येणारे अशा देशि-कांना (गुरूंला) प्रसादचतुष्टय योग्य आहे, इतरांना योग्य नाहीं. (११) कालि-काखंडांत सांगितलें कीं,—शुद्ध, सिद्ध, प्रसिद्ध असे तीन प्रकार प्रसादांत आहेत. इष्टलिंगाच्या मुखापासून आलेल्या प्रसादाला शुद्ध ह्मणतात. चरांच्या (जंगमांचे) शे-षाला सिद्ध ह्मणतात. (१२) गुरूच्या उच्छिष्टाला प्रसिद्ध असें ह्मणतात. असे तीन प्रकार आहेत. (१३) स्कांदपुराणांत सांगितलें कीं,—लिंगार्पण हें सर्व ठिकाणीं बाह्य असें ह्मणत असून रूपराहित द्रव्याला (मानसिक) आंतर असें ह्मणतात. (१४) न कळत हुंगलेलें, न कळत स्पर्श केलेलें, व न कळत पाहिलेलें द्रव्य शिवा-साठींच आणिलें तर तें दूषित होत नाहीं. (१५) बृहत्कालोत्तरांत सांगितलें कीं, संयोगवियोगामध्यें अणुमात्र सुख जरी मिळत असेल तरी तें इष्टलिंगाच्या ठिकाणीं जो करतो, तो अवधानी असा ह्मणवितो. (१६) शैवपुराणांत सांगितलें कीं,— अन्नाचा प्रभु शिव असल्यामुळें त्याचें अन्न त्याला अर्पण करून त्या नैवेद्याचा शेष आपण घ्यावा. अशा विनियोगाच्या उपचारांनीं शिव संतुष्ट होतो. (१७) ब्रह्मांडपुराणांत सांगितलें कीं,—सर्व त्रैलोक्याचा राजा अशा शंभूला कोण काय देऊं शकतो? शंभु उपचारप्रिय असल्यामुळें नुसत्या उपचारांनींच संतुष्ट होतो. (१८) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,--शिवानें उपभोग घेतलेला गंध, अन्न, पान वगैरे पदार्थांला नैवेद्य असें ह्मणतात. तो नैवेद्य सर्व पाप हरण करणारा असून

निवेदनमिति प्रोक्तं सर्वपापहरं परम् ॥१८॥ लैंग्ये ॥ खाद्यानि चाद नीयानि पेयान्यन्यानि यानि वै ॥ तानि देयानि शंभोस्तदश्नीयाद्दास-भावतः ॥१९॥ सूतसंहितायाम् ॥ स्वेष्टलिंगाय यद्दत्तं चरुकं तन्न सं-शयः ॥ तत्प्राशयेत्स्वयं प्राज्ञो नान्यस्यैव तु दापयेत् ॥२०॥ न दद्याद्गो-जलादिभ्यो दद्याच्चेन्नरकं व्रजेत् ॥२१॥ क्रियातिलके ॥ शुद्धे शिवप्रसा-दे च शुचित्वं यो न भावयेत् ॥ सोऽपि याति नरो घोरं नरकं काल-मक्षयम् ॥२२॥ सुप्रतिष्ठितलिंगे तु न यथा पूर्वभावना ॥ तथा शिव-प्रसादस्य पूर्वनाम न संस्मरेत् ॥२३॥ लैंग्ये ॥ पत्रं पुष्पं फलं तोयम-न्नपानाद्यमौषधम् ॥ अनिवेद्य न भुंजीत यदाहाराय कल्पितम् ॥२४॥ इक्षुदण्डफलापूपखाद्यानि व्यंजनानि च ॥प्रसादान्येव भोक्तव्यान्यन्य-द्गोमांसविट्समम् ॥२५॥ सर्वं च तृणकाष्ठं च भक्ष्यं चैवानुलेपनम् ॥ गन्धो मृगमदश्चैव कर्पूरं तैलमंजनम् ॥२६॥ रत्नाभरणजातं च वस्त्रं सकलवाहनम् ॥ प्रसादमेव भोक्तव्यमन्यच्चण्डालविट्समम् ॥२७॥ क-

---

श्रेष्ठ आहे. (१९) लिंगपुराणांत सांगितलें कीं, खाद्य, भक्ष्य, पेय वगैरे व इतर पदार्थ श्रीशिवास समर्पण करून नंतर त्यांचा उपभोग आपण घ्यावा. (२०) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, आपल्या इष्टलिंगाला समर्पण केलेलें अन्न "चरु" असें ह्मणवितें, यांत संशय नाहीं. तें आपणच घ्यावें दुसऱ्याला देऊं नये. (२१) तें गायीला किंवा पाण्यांत टाकूं नये. गायीला दिलें किंवा पाण्यांत टाकिलें तर नरकाला जातो. (२२) क्रियातिलकांत ह्मटलें आहे कीं,--शुद्ध अशा शिव प्रसा-दाच्या ठिकाणीं शुद्धता जो मानीत नाहीं, तो अक्षय कालपर्यंत घोर नरकांत राहतो. (२३) चांगल्या प्रकारानें प्रतिष्ठा केलेल्या लिंगाच्या ठिकाणीं जशी पूर्व-भावना नसते, त्याप्रमाणें शिवप्रसादाला पूर्वीचें नांव राहत नाहीं. (२४) लिंग-पुराणांत सांगितलें कीं,--पत्र, पुष्प, फल, उदक, अन्न, पान, औषध कांहीं असो, व आहारासाठीं जें कांहीं केलेलें असो, शिवाला समर्पण केल्याशिवाय त्याचा उपभोग आपण घेऊं नये. (२५) इक्षुदंड (ऊंस), फळें, तळलेले पदार्थ, खाद्य, व्यंजन हे पदार्थ शिवाला समर्पण केल्याशिवाय आपण घेऊं नये. घेतले तर ते गोमांसाप्रमाणें किंवा विष्ठेप्रमाणें समजावेत. (२६) सर्व तृण, काष्ठ, भक्ष्य अनुलेपन, गंध, कस्तूरी, कर्पूर, तेल, अंजन, (२७) रत्नाचीं आभरणें, वस्त्र, सर्व वाहनें, वगैरे समर्पण करूनच आपण उपभोग घ्यावा. बाकीचें चांडालाच्या विष्ठेसमान समजावें. (२८) कर्म, मन, वाणी यां तीन प्रकारांनीं अर्पण करावें.

र्मणा मनसा वाचा त्रिविधं चार्पितं शुभम् ॥ नो चेदनर्पितं भुंक्ते प्रसादं निष्फलं भवेत् ॥२८॥ ग्रंथान्तरे ॥ रूपं समर्प्य द्रव्यस्य रुचिमप्यर्पयेत्ततः ॥ उभयार्पणहीनं चेत्प्रसादो निष्फलं भवेत् ॥२९॥ शैवे। दीपान्तमुपचारः स्यान्नैवेद्यान्तं च पूजनम् ॥ तस्मान्नैवेद्यहीनं चेत्पूजालोपो भवेत्सदा ॥३०॥ तत्तत्प्रसादभोगान्तं नैवेद्यार्पणमुच्यते ॥ प्रसादादानहीनं चेदर्पितं चापि निष्फलम् ॥३१॥ व्रतोपवासनियमैर्येन केनापि हेतुना ॥ पूजाप्रसादलोपश्चेन्नासावाप्नोति तत्फलम् ॥३२॥ उपवाससहस्राणि प्राजापत्यायुतानि च ॥ शिवप्रसादसिक्थस्य कोट्यंशेनापि नो समाः ॥३३॥ निर्माल्यं परमानंदं निर्माल्यं शुद्धशैवदम् ॥ निर्माल्यं परमं ज्ञानं निर्माल्यं परमामृतम् ॥३४॥ निर्मलत्वाच्च निर्माल्यं नृणां नैर्मल्यकारणम् ॥ निर्माल्यधारणं शंभोः प्रसादोदकसेवनम् ॥३५॥ प्रसादभोजनं चेति प्रत्येकं पातकापहम् ॥ शिरसा शिवनिर्माल्यं भक्त्या यो धारयेद्यदि ॥३६॥ अशुचिर्भिन्नमर्यादः सर्वावस्थां गतो

---

तें शुभ होय. अनर्पित पदार्थांचा उपभोग घेतला तर तें सर्व निष्फल होतें. (२९) ग्रंथांतरांत सांगितलें कीं,--देवाला द्रव्यावरचें रूप अर्पण करून त्याची रुचि अर्पण करावी. दोहोंचें अर्पण केल्याशिवाय तो प्रसाद निष्फळ होतो. (३०) शैवपुराणांत सांगितलें कीं,--दीपापर्यंत केलेल्या आचाराला उपचार असें ह्मणतात. नैवेद्यापर्यंत आचाराला पूजा असें ह्मणतात. याकरितां नैवेद्याशिवाय केलेले बाकीचे सर्व उपचार व्यर्थ आहेत. (३१) त्या त्या प्रसादाच्या उपभोगाच्या शेवटीं त्याला नैवेद्यार्पण असें नांव येतें. प्रसादाच्या आदानाशिवाय अर्पित झालेलें निष्फल होतें. (३२) व्रत, उपवास, नियम यांनीं व दुसऱ्या कोणत्याही कारणानें पूजेचा व प्रसादाचा लोप झाला तर बाकीच्या उपचारांचें कोणतेंही फल येत नाहीं. (३३) उपोषणें हजारो केलीं, हजारो प्राजापत्य याग केले तथापि हे सर्व शिवप्रसादाच्या एका शिताच्या कोट अंशाच्या योग्यतेला येत नाहीं. (३४) निर्माल्य हें परम आनंदकारक असून निर्माल्य शुद्ध शुभदायक आहे. (किंवा शैवतत्वदायक आहे.) निर्माल्य हें ज्ञानप्रद असून निर्माल्य श्रेष्ठ अमृताप्रमाणें आहे. (३५) त्यांत कोणताही दोष असत नाहीं ह्मणून त्याला निर्माल्य असें ह्मणतात. निर्माल्याचें धारण केल्यापासून व त्याच्या सेवनापासून मनुष्य दोषरहित होतो. (३६) व प्रसाद भोजन केलें असतां पापें सर्व जळून जातात. मस्तकावर शिवनिर्माल्य धारण जो करील (३७) तो अशुचि असो,

पिऽवा ॥ तस्य पापानि घोराणि नाशयत्येव शंकरः॥३७॥ तिलषोडश-भागं च तृणाग्रांबुकणोपमम् ॥ पादोदकप्रसादान्नं सेवया मोक्षमाप्नु-यात् ॥३८॥ ईशानसंहितायाम् ॥ किं दीक्षया किं तपसा किं ध्यानेन जपेन किम् ॥ शृणु देवि वरारोहे मद्भुक्तं यदि भुज्यते ॥३९॥ शिरसा धारयेद्भक्त्या यो निर्माल्यमलोभतः ॥ अहमेव धृतस्तेन सोमः सोम-कलाधरः ॥४०॥

स्वच्छंदललितभैरवीये ॥ ईश्वर उवाच ॥ निर्माल्यधारणात्पुत्र सा-लोक्यं लभते नरः ॥ पादोदकस्य पानेन सामीप्यं भजते सदा ॥४१॥ मत्प्रसादोपभोगेन सारूप्यं प्रतिपद्यते ॥४२॥ शिवधर्मे ॥ निर्माल्यं धारयेन्मूर्ध्नि नैवेद्यं चापि भक्षयेत् ॥ तत्प्रसादोदकं पीत्वा गाणपत्य-मवाप्नुयात् ॥४३॥

ब्रह्माण्डपुराणे ॥ व्यास उवाच ॥ एवं प्रसादं भुंजानो विरिंचः किल जैमिने ॥ अष्टादशमहाविद्यास्थानवाराशिपारगः ॥४४॥ कण्ठरंगस्थ-

---

मर्यादा सोडलेला असो, सर्व संकटावस्थेमध्यें असो, त्याचीं घोर पापें सर्व श्रीशिव तात्काळ नाश करून टाकतो. (३८) एका तिळाच्या षोडशांश भागा एवढें किंवा एका बारीक काडीच्या अग्राएवढें किंवा उदकाच्या एका बिंदूएवढें पादोदक किंवा प्रसाद सेवन केलें असतां मोक्ष मिळतो. (३९) ईशान संहितेंत सांगितलें कीं,--दीक्षेनें, तपानें, ध्यानानें, जपानें, काय प्रयोजन आहे बरें ? हें सुंदरि माझ्या भोजनाचें उच्छिष्ट कोण खातो, (४०) व निर्लोभपणानें भक्तीनें मस्तकावर जो धारण करितो, त्यानें सोमकला धारण केलेल्या मलाच धारण केलें असें मी समजतों.

(४१) स्वच्छंदललितभैरवीयांत सांगितलें कीं,--ईश्वर बोलले—हे पुत्रा, निर्माल्यधारणानें मनुष्याला सालोक्य मिळतें. पादोदकाच्या पानानें सामीप्य मिळतें (४२) माझ्या प्रसादाच्या उपभोगानें सारूप्य मिळतें, (४३) शिवधर्मांत सांगितलें कीं,—मस्तकावर निर्माल्यधारण करावें, न नैवेद्यभक्षण करावें. तें प्रसादोदक पिऊन प्राणी गणाधीश होतो.

(४४) ब्रह्मांड पुराणांत सांगितलें कीं, व्यास बोलले– हे जैमिने, याप्रमाणें प्रसाद भोजन करून ब्रह्मदेव अठरा विद्यास्थानरूपी मोठ्या समुद्राच्या परती-राला गेला (४५) व कंठरूपी रंगस्थलावर सरस्वती नाचत असल्यामुळें त्याचें तोंड

लीनृत्यद्भारतीभासुराननः ॥ सुरासुरशिरोरत्नविराजितपदांबुजः॥४५॥ सिद्धविद्याधराधीशकरकंचुकितांघ्रिकः ॥ यक्षकिन्नरगंधर्वसंततारा-धनोचितः ॥४६॥ अणिमादिमहासिद्धिजन्मभूमिरुदारधीः ॥ अनुगृ-हीतं सकलं निग्रहीतुं च लीलया ॥४७॥ जगज्जनायितुं शक्तः प्रसादा-नुभवादभूत् ॥ विष्णुः परशुरामोऽपि शिवेन परिदीक्षितौ ॥४८॥ पा-दोदकप्रसादान्ननिर्माल्यानां निषेवकौ ॥ वसिष्ठोऽपि गरिष्ठोऽभूत्प्रसा-दस्य प्रभावतः॥४९॥ प्रसादसेवनाज्जातो विश्वामित्रो महामुनिः॥५०॥ पाणिनिश्च कणादश्च कपिलो गौतमादयः ॥ प्रसादसेवनाध्यानादर्च-नाद्धारणादपि ॥५१॥ जाता दर्शनकर्तारः श्रावयन्ति जगत्त्रयम् ॥ त-स्मात्पादोदकं पेयं प्रसादान्नं च भोजयेत् ॥५२॥ हरिवंशे ॥ पुरुहूत-नारदसंवादे ॥ कदाचिदीशपादांबुनिर्माल्यपरिमीलितः ॥ पवनः पन्न-गेशेन निपीतः पुण्यकारिणा ॥५३॥ तेन विश्वंभराभारधुरीणत्वमवाप्य च ॥ भोगीश्वरत्वमचलमीशभूषणताऽपि च ॥५४॥ सर्वज्ञता च सं-

---

शोभूं लागले. व देव दैत्य यांचीं शिरोरत्नें त्याच्या पायावर लोळूं लागलीं (४६) आणि सिद्ध विद्याधर यांचे हात त्याच्या सेवेंत नेहमीं निमग्न झाले. यक्ष, किन्नर, गंधर्व हे नेहमीं त्याची आराधना करूं लागले. (४७) अणिमादिमहासिद्धींचें वसतिस्थान झाला. त्याची बुद्धि उदार झाली. सर्वांवर अनुग्रह करावयास व निग्रह करावयास (४८) लीलेनें जगाची सृष्टि करावयास समर्थ झाला. हा सर्व प्रताप त्या प्रसादसेवनाचा होय. शिवानें पूर्वीं विष्णूला व परशुरामाला दीक्षा दिली होती. (४९) या दोघांनीं प्रसाद पादोदकाचें सेवन केलें होतें. या प्रसाद पादोदक सेवनानेंच वसिष्ठमुनि जगांत पूज्य झाला. (५०) प्रसाद सेवनाच्या यो-गानेंच विश्वामित्र महामुनि झाला. (५१) पाणिनि, कणाद, कपिल, गौतम, यांनीं प्रसादाचें सेवन, धारण, केलें व शिवाची पूजा केली, (५२) ह्मणून हे सर्व शास्त्र-कर्ते झाले व अद्यापि जगाला आपले ग्रंथ ऐकवतात. या करितां पादोदक प्यावें व प्रसादान्न भोजन करावें. (५३) हरिवंशांत सांगितलें कीं, पुरुहूत (इंद्र) ना-रद यांचा संवाद श्री शिवाच्या पादोदकानें निर्माल्यानें मिसळलेला वारा (या वरून वाहलेला) पुण्यकारी श्री शेषानें आहारासाठीं घेतला ह्मणून (५४) जगाचा भार वाहण्याचें सामर्थ्य मिळालें. व सर्वांवर आधिपत्य मिळालें. व श्रीशिवानें प्रे-मानें भूषणासाठीं आपल्या जवळ त्याला बाळगिलें. (५५) हे इंद्रा, शिवाय तो

जाता देवेंद्र न हि संशयः ॥ साक्षात्प्रसादभोगेन भक्तो यल्लभते फलम् ॥५५॥ तद्वक्तुं न हि मे शक्तिर्न गिरो न गिरां पतेः ॥५६॥ ग्रंथान्तरे ॥ शिवोपभुक्तं निर्माल्यं पवित्रं पापनाशनम् ॥ तस्माद्भुक्त्वा च पीत्वा च शिवेन सह मोदते ॥५७॥ शिवरहस्ये ॥ प्राणप्रसादमव्यक्तं व्यक्तं लिंगप्रसादकम् ॥ लिंगजंगमसंयुक्तप्रसादं चेत्यखंडकम् ॥५८॥ ग्रंथान्तरे ॥ लिंगद्वयप्रसादं च यो भुंक्ते श्रद्धयान्वितः ॥ तदीयोच्छिष्टमासाद्य स वै याति परां गतिम् ॥५९॥ चराचरप्रसादान्नभोक्तुस्तच्छेषधारणात् ॥ चराचराणां भूतानामपि मुक्तिर्भवेत्प्रिये ॥६०॥ सर्वभक्तगणप्रीतिभुक्तशिष्टप्रसादकम् ॥ गणप्रसादी यः सोऽयं भुंजीत सुखलीलया ॥६१॥ सकृल्लिंगार्चकोच्छिष्टं स्वदेहं यस्तु लेपयेत् ॥ वज्रकायः स भवति शिवेन सह मोदते ॥६२॥ महाभारते ॥ दूर्वासोच्छिष्टभुक्तेन पादबाह्यांगलेपनात् ॥ सहसा वज्रकायत्वं प्राप्तवान्विष्णुरव्ययः ॥६३॥ बोधायनस्मृतौ ॥ पादोदकं पाशहरं निर्माल्यं चैहिकप्र-

---

शेष सर्वज्ञ झाला. यांत संशय नाहीं. प्रत्यक्ष प्रसादाच्या सेवनानें भक्ताला जें फल मिळतें, (५६) तें सांगावयास माझ्या वाणीची शक्ति चालत नाहीं. व बृहस्पतीची देखील शक्ति नाहीं. (५७) ग्रंथांतरांत सांगितलें कीं, शिवानें उपभोगिलेलें निर्माल्य पापनाशकर आहे, व पवित्र आहे, ह्मणूनच याचें पान भोजन करून प्राणी शिवाजवळ आनंदानें राहतो. (५८) शिवरहस्यांत सांगितलें कीं- प्राणप्रसाद अव्यक्त (अस्पष्ट) असून लिंगप्रसाद व्यक्त (स्पष्ट) आहे लिंग, जंगमांच्या संयुक्त प्रसादाला अखंडप्रसाद ह्मणतात. (५९) ग्रंथांतरांत सांगितलें कीं लिंगद्वयाचा (लिंग जंगमाचा) प्रसाद श्रद्धा ठेवून जो घेतो, त्याचें उच्छिष्ट जो खातो, तो देखील सद्गतीला जातो. (६०) चराचराचा (लिंग जंगम) प्रसाद स्वीकारणाऱ्या व तच्छेष धारण करणाऱ्या सर्व चराचर जगाला देखील मुक्ति मिळते. (६१) सर्व भक्तगणांनीं प्रीतिपूर्वक भोजन केलें असतां राहिलेला उच्छिष्ट प्रसाद सुखानें व लीलेनें जो भोजन करतो, तो गणप्रसादी होतो (६२) एकवार लिंगपूजा करून उच्छिष्टाचें लेपन जो आपल्या देहाला करतो, तो वज्रशरीरी होऊन शिवाबरोबर आनंदानें उपभोग घेतो. (६३) महाभारतांत सांगितलें कीं, दूर्वासाच्या उच्छिष्ट भोजनानें व त्याचें लेपन पायापासून मस्तकापर्यंत बाह्यशरीरावर केल्यामुळें तात्काळ विष्णु वज्रशरीरी झाला, व अव्यय (नाशरहित) झाला (६४) बोधायन स्मृतींत ह्मटलें कीं, पादोदक मायापाश तोडणारें

दम् ॥ गुरोर्भुक्तं सदाकालमामुष्मिकफलप्रदम् ॥६४॥ ग्रंथान्तरे ॥ लौकिकानां तथान्येषामपि मुक्तिर्न विद्यते ॥ पाषंडिनोऽपि मुच्यन्ते गुरोरेव प्रसादतः ॥६५॥ शिवरहस्ये ॥ गुरुजंगमलिंगानां निर्माल्यं भुक्तशिष्टकम् ॥ सदैवानुभवेद्देवि प्रसादव्रतमुत्तमम् ॥६६॥ आदित्यपुराणे॥ पूजका बहवः संति भक्ताः शतसहस्रशः ॥तत्र प्रसादपात्रं तु द्वौ त्रयो नैव पंच षट् ॥६७॥ प्रसादभोक्तॄन्निन्दन्ति ये जना भक्तिसंयुतान् ॥ ते यान्ति पितृभिः सार्धं नरकं नात्र संशयः ॥६८॥ शिवरहस्ये ॥ प्रसादं श्रुणु कल्याणि ब्रह्मादीनां महात्मनाम् ॥ विष्णुप्रमुखदेवानामप्यगम्यमगोचरम् ॥६९॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ प्रसादानुभवस्यैव माहात्म्यं प्रतिपादितम् ॥ इदं पवित्रं परममखिलागमचोदितम् ॥७०॥ वेदवेदान्ततत्वज्ञैः पवित्रं परिभाषितम् ॥ इतिहासे शिवाचारसारभूतमुदाहृतम् ॥७१॥ नानापुराणवेदेषु रहस्यं परिभाषितम् ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गो-

---

असून निर्माल्य ऐहिक सुख देणारें आहे. गुरूचें उच्छिष्ट सर्वदा पारत्रिक फल देणारें आहे. (६५) ग्रंथांतरांत सांगितलें कीं, इतर लौकिकांना मुक्ति मिळत नाहीं गुरूच्या प्रसादानें पाषंडी देखील मुक्त होतात (६६) शिवरहस्यांत ह्मटलें कीं, गुरु, जंगम, लिंग यांचें निर्माल्य व उच्छिष्ट याचा उपभोग नेहमीं घेत असावा याला प्रसादव्रत ह्मणतात. (६७) आदित्य पुराणांत सांगितलें कीं, पूजा करणारे पुष्कळ आहेत, भक्त हजारो आहेत, त्यामध्यें प्रसादाला योग्य दोघे तिघे निघतील किंवा नाहीं, ही शंका आहे. परंतु पांच सहा तर निघावयाचेच नाहींत (६८) भक्तियुक्त प्रसादभोक्त्यांची निंदा जे करतात. ते लोक आपल्या पितरांसह नरकाला जातात, यांत संशय नाहीं. (६९) शिवरहस्यांत सांगितलें कीं, हे कल्याणि, महात्मे ब्रह्मादिकांना व विष्णुप्रभृति देवांना देखील प्रसाद अगम्य (अलभ्य) असून अगोचर आहे. (७०) ब्रह्मांड पुराणांत सांगितलें कीं, प्रसादानुभवाचें माहात्म्य सांगितलें. हें परम पवित्र असून सर्व आगमांमध्यें याचें वर्णन आहे. (७१) वेद वेदांताचें तत्व जाणणाऱ्यांनीं प्रसाद परम पवित्र आहे, असें सांगितलें आहे. इतिहासांत तर प्रसाद शिवाचाराचें सार ह्मणून सांगितलें आहे. (७२) अनेक पुराणांमध्यें वेदांमध्यें प्रसाद परम रहस्य आहे, असें सांगितलें आहे. या करितां पुष्कळ प्रयत्नांनीं याचें रक्षण तूं केलें पाहिजे.

पनीयमिदं त्वया ॥७२॥ महता लिंगरूपेण महता जंगमेन च ॥ द्विविधेन समुद्भूतप्रसादाय नमो नमः ॥७३॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे त्रिविधप्रसादमाहात्म्यं नामाष्टषष्टितमोऽध्यायः ॥

---

(७३) मोठ्या इष्टलिंग रूपानें व मोठ्या जंगममूर्तीपासून उत्पन्न झालेल्या प्रसादाला नमन असो, नमन असो.

या प्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील त्रिविधप्रसादमाहात्म्यकथन नांवाचा अडसष्टावा अध्याय संपला.



## ॥ अथ एकोनसप्ततितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ शिवरहस्ये ॥ जैमिनिरुवाच ॥ भगवंच्छ्रोतुमिच्छामि जयस्यैवामृतोपमाम् ॥ भूय एव कथां दिव्यां शोकोर्मिभयनाशिनीम् ॥१॥

दूर्वासा उवाच ॥ अष्टादशपुराणेषु धर्मशास्त्रागमेषु च ॥ य एवं कथ्यते देवो जयो भक्तजयप्रदः ॥२॥ कस्तस्य वक्तुं शक्नोति शम्भोर्माहात्म्यमव्ययम् ॥ तथापि किंचित्ते भूयः कथयामि शृणुष्व तत् ॥३॥ यथा विमोचितस्तेन श्वेतो मृत्युवशं गतः ॥ राजर्षिः श्वेतनामासीच्छ्रीमान् परमधार्मिकः ॥४॥ शिवशास्त्रैकसद्भावः शिवभक्तो दृढव्रतः॥ दैवमंत्रप्रभूत्साहशक्तियुक्तो जितेंद्रियः ॥५॥ शान्तो निर्व्यसनो वाग्मी समयाचारपालकः ॥ सकृद्वा विधिवन्नित्यं शिरःस्नानमथांगिकम् ॥६॥ शैवं संपूजयामास नित्यं लिंगमतंद्रितः ॥ स्तुत्वाऽथ च नमस्कृत्य श्रद्दधानोऽच्युतं सदा ॥७॥ तस्य पूजाप्रसक्तस्य कदाचिदथ जैमिने ॥ आजगाम तमुद्दिश्य कालो मृत्युसहायवान् ॥८॥ वृत्तरक्तान्तनयनः सर्प-

---

श्रीशिवास नमस्कार असो. स्कांदपुराणांतील शिवरहस्यामध्यें झटलें कीं,— जैमिनि बोलले--(१) हे भगवन् अमृतसदृश व दिव्य कथा जयाची ( जयदेणाऱ्या शिवाची) ऐकण्याची माझी इच्छा आहे.

(२) दूर्वास बोलले—अष्टादशपुराणांमध्यें व धर्मशास्त्रांत व आगमांत भक्तजयप्रद ( भक्तांस जय देणारा) जय हा प्रसिद्ध आहे. (३) त्या शिवाचें अव्यय (नाशरहित) माहात्म्य सांगावयास कोण समर्थ होईल ? तरी पुनः किंचित तुला सांगतों ऐक. (४) त्या शिवानें मृत्यूच्या जबड्यांत गेलेल्या श्वेताचें मोचन केलें अशी एक कथा आहे, ती कथा सांगतों ऐक. पूर्वी परमधार्मिक श्रीमान असा श्वेत नांवाचा एक राजर्षि होऊन गेला. (५) तो शिवशास्त्रांवर मुख्यत्वेंकरून चांगला भाव ठेवीत असे; व शिवभक्त असून दृढव्रत होता. दैवीशक्ति, मांत्रिकशक्ति, अधिकारशक्ति, उत्साहशक्ति यांनीं युक्त असून जितेंद्रिय होता. (६) शांत असून व्यसन रहित होता. वक्ता असून समयाचाराचें पालन करणारा होता. एकवेळ तरी विधिपूर्वक निरंतर शिरःस्नान किंवा अंगस्नान करून (७) विन आळसानें निरंतर शिवलिंगाची पूजा करीत असे. स्तोत्र नमस्कार करून नेहमीं शिवलिंगावर श्रद्धा ठेवीत असे. (८) जैमिने, एकदा तो पूजेंत निमग्न असतां त्या राजाला न्यावयाकरितां तेथेंच मृत्युसहित यम आला. (९) त्या

वृश्चिकरोमवान् ॥ दंष्ट्राकरालवदनश्चूर्णितांजनसन्निभः ॥९॥ समागम्य च तस्यासौ कालः पाशमनासृजत् ॥ कण्ठार्पितेन पाशेन श्वेतः काल-मथाब्रवीत् ॥१०॥ काल तावत्प्रतीक्षस्व कालं मम महामते ॥ निवर्त-याम्यहं यावद्यज्ञकर्म जगत्पतेः ॥११॥ शिवयज्ञमनिर्वर्त्य कुत्रचिन्न व्र-जाम्यहम् ॥ न स्वपामि न भुंजामीत्येतन्मे व्रतमाहितम् ॥१२॥ एतत्पू-जानमस्कारस्तुतिध्यानपरायणाः ॥ स तेषां क्षीणदोषाणां योगक्षेम-करो हरः ॥१३॥ सफलं हि तपस्तेषां श्रुतं साधुत्वमेव वा ॥ जीवितं च तथैश्वर्यं येऽर्चयंत्यमरेश्वरम् ॥१४॥ तस्मात्तमेवमीशानं श्रेयोऽर्थी पू-जयाम्यहम् ॥ गृहीतनियमो नित्यं काल कल्पद्रुमोपमम् ॥१५॥ न जी-वितं कलत्रं च न राज्यं न तथा सुखम् ॥ प्रियं मम यथातीव लोकेऽ-स्मिंच्छिवपूजनम् ॥१६॥ यथा च नानृतं वाचमहमेतामिहोक्तवान् ॥ सत्येनानेन सततं प्रसीदतु महेश्वरः ॥१७॥ तमब्रवीत्ततः कालः प्रह-सन्निव भूपतिम् ॥१८॥

---

काळाचे डोळे वाटोळे असून तांबडे भडक होते; व त्याच्या अंगावर सर्प व वृश्चिक (विंचू) हे रोमाच्या रूपानें राहिले होते. त्याची दाढ व मुख हीं अतिशय भयंकर होतीं; आणि तो एकाद्या काजळाच्या पर्वताप्रमाणें दिसत होता. (१०) असा तो काल त्या राजाजवळ येऊन त्याच्या अंगावर त्यानें पाश टाकिले. गळ्यांत पाश अडकलेले पाहून श्वेत कालाला बोलला. (११) हे महाबुद्धिमान काला, श्रीशिवाचें यज्ञकर्म संपेपर्यंत जरा दम धर. माझी पूजा संपूं दे. (१२) शिवयज्ञ समाप्त केल्याशिवाय कोठेंही मी जात नाहीं, निजत नाहीं, जेवीत नाहीं, असें माझें व्रत आहे. (१३) शिवपूजा, नमस्कार स्तुति, ध्यान यांत जे तत्पर असतील, त्यांचे दोष सर्व नष्ट होत असल्यामुळें त्यांचा योगक्षेम श्रीशिवच करतो. (१४) त्यांचें तप सफल आहे, त्यांचें श्रवण फार चांगलें आहे. त्यांचें जीवित व ऐश्वर्य सफल होय. कारण ते नेहमीं शिवपूजा करतात. (१५) ह्मणूनच कल्याणेच्छु मी त्याच शिवाची पूजा करतों, निरंतर चांगल्या नियमाचा अंगी-कार करून कल्पवृक्षासमान असलेल्या शिवाची पूजा करतों. (१६) या जगा-मध्यें शिवपूजन जसें मला आवडतें, तसें जीवित, स्त्री पुत्र, राज्य, इतर सुख हीं कांहीं आवडत नाहींत. (१७) हे काला, यांत मी एक अक्षर देखील खोटें बोललों नाहीं. या सत्याच्या योगानें साक्षात ईश्वर नेहमीं मला प्रसन्न होवो. (१८) तेव्हां हंसत हंसत त्या राजाला काल बोलला.—

काल उवाच ॥ ॥ न श्रुतं तु त्वया मन्ये वृद्धानां श्वेत जल्पितम् ॥ पूर्वे वयसि यो धर्मं न करोति विमूढधीः ॥१९॥ स पश्चात्तप्यते सुतो भ्रष्टसार्थ इवाध्वगः ॥ इदं कृतमिदं कार्यमिदमन्यत्कृताकृतम् ॥२०॥ एवमीहासमायुक्तं कालः संहरते नरम् ॥ नाकाले म्रियते जन्तुर्विद्धः शरशतैः सितैः ॥२१॥ कुशाग्रेणापि संस्पृष्टः प्राप्तकालो न जीवति ॥ श्वः कार्यमद्य कुर्वीत पूर्वाण्हे चापराण्हिकम् ॥२२॥ न हि प्रतीक्षते कालः कृतमस्य न वा कृतम् ॥ गर्भे वाप्यथ बाल्ये वा वार्द्धके यौवनेऽपि वा ॥२३॥ आयुष्ये कर्मणि क्षीणे लोकोऽयं न्हियते मया ॥ नौषधानि न मंत्राश्च न होमा न पुनर्जपाः ॥२४॥ त्रायन्ते मृत्युनोपेतं जरयापि च मानवम् ॥ चक्रवर्तिसहस्राणि पुरंदरशतानि च ॥२५॥ मया नीतानि कर्तव्यो नात्र मन्युस्त्वया नघ ॥ तृष्णासूचिविनिर्भिन्नान् सिक्तान् विषयवारिणा ॥२६॥ रागद्वेषानले पक्वान् मृत्युरश्नाति पार्थि-

---

(१९) काल बोलला--हे श्वेता, तुझ्यासारख्या वृद्ध माणसाचें भाषण मी ऐकत नाहीं; अर्थात तूं केलेलें कांहींएक मी जाणीत नाहीं. प्रथमवयांत जो मूर्ख धर्म करीत नाहीं; (२०) तो मनुष्य द्रव्य गमावून घेतलेल्या वाटसराप्रमाणें मागून पश्चात्ताप पावतो. हें केलें, हें करावयाचें राहिलें, हें केलें न केलें दोनी सारखेंच आहे, असें ह्मणतो. (२१) अशा इच्छेनें (ईषणत्रयानें) युक्त असलेल्या प्राण्याला काल कधींही सोडीत नाहीं. त्यांचा संहारच करतो. हजारो बाण एखाद्याच्या आंगावर सोडले तरी तो प्राणी अकालीं कधींही मरत नाहीं. (२२) वेळ आल्याबरोबर एका कुशाच्या अग्रानें मनुष्य मरतो. याकरितां उद्यां करावयाचें कार्य आज करावें, आणि अपराण्हाच्या वेळीं करावयाचें कार्य पूर्वाण्हीं करावें. (२३) यानें कार्य केलें किंवा न केलें हें कांहीं काल पाहत नाहीं. गर्भांत, बाल्यांत, यौवनांत, किंवा वार्द्धक्यांत. (२४) आयुष्य ज्याचें क्षीण झालें असेल, पुण्यकर्म क्षीण झालें ह्मणजे काल नांवाचा मी लोकांचा अपहार करितों काल आला असतां औषध, मंत्र, होम, (२५) जप हे मृत्यूनें ग्रासलेल्या व जरेनें ग्रासलेल्या मनुष्यास सोडवूं शकत नाहींत फार काय शेंकडो चक्रवर्ती हजारो इंद्र. (२६) आज पर्यंत नेले असतील, तर राजा, तूं आज मजवर रागावूं नकोस तृष्णारूपी (आशारूपी) सुईंत जे गोंवले गेले असतील, विषयरूपी पाण्यानें जे भिजले आहेत, (२७) रागद्वेषरूपी अग्नींत जे शिजले आहेत, त्या लोकांना मृत्यु

वान् ॥ येन दैत्या हताः पूर्वमुध्दृतेयं च मेदिनी ॥२७॥ देहन्यासं मया सोऽपि राजर्षे कारितो सकृत् ॥ स्वयं प्रभुर्न चैवाहं कर्मायत्ता मतिर्मम ॥२८॥ कर्मणां हि तथा नाशो नास्ति भूतस्य कस्यचित् ॥ यथा धेनुसहस्रेषु वत्सो विंदति मातरम् ॥२९॥ तथा पूर्वकृतं कर्म कर्तारमनुगच्छति ॥ कर्ममार्गानुसारेण कर्तुश्चाहं प्रचोदितः ॥३०॥ न यामि सर्वमाक्रम्य त्रैलोक्यं सचराचरम् ॥ बाल्य एवाचरेद्धर्ममनित्यं खलु जीवितम् ॥३१॥ को हि जानाति कस्याद्य मृत्युसेना पतिष्यति ॥ युवत्वापेक्षया बालो बालत्वापेक्षया युवा ॥३२॥ मृत्योरुत्संगमारूढः स्थविरः किमपेक्षते ॥ भुवः शैलं समारूढस्ततो वृक्षाग्रमास्थितः ॥३३॥ तत्राप्यविहितत्राणः सर्पाद्भीतस्य का गतिः ॥ मृत्युनाभ्यागतश्चाद्य जरया परिवारितः ॥३४॥ आयुःकर्मच्युतश्च त्वं किं स्वस्थ इव भाषसे ॥ नाभिनंदेत मरणं नाभिनंदेत जीवितम् ॥ ३५ ॥ कालमेव

---

खाल्याशिवाय राहील काय? ज्यानें पूर्वी असंख्य दैत्य मारिले, ज्यानें पूर्वी पृथ्वीचा उद्धार केला, (२८) अशा प्राण्याला देखील एकदम या लोकांतून मीं नेलें. राजर्षे, वास्तविक पाहतां असा स्वतंत्र अधिकार कांहीं मला नाहीं, परंतु माझी बुद्धि कर्माधीन आहे. (२९) जगांत कोणत्याही प्राण्याच्या कर्माचा नाश होत नाहीं जसे हजारो गायींमध्यें वांसरू आपल्या आईलाच शोधून काढितें, (३०) त्या प्रमाणें पूर्वी केलेलें कर्म कर्त्याकडे धांवतें. कर्त्याच्या कर्ममार्गाला अनुसरून प्रेरित होऊन (३१) मी सर्व जीवजडात्मक जगाला आक्रमून नेतो बाळपणींच धर्माचरण करावें. जीवित हें अनित्य आहे (३२) मृत्यूचें लष्कर माझ्यावर तुटून पडते, असें कोण जगांत जाणतो? कारण जगांतील लोक तारुण्यावर भरंसा ठेवून बाल्यावस्थेंतील पोर राहतात आणि तरुण झाल्यानंतर मी अजून लहानच आहे, अशा भरंशावर पुढें काळ घालवितात. (३३) मृत्यूच्या मांडीवर वसलेला म्हातारा काय अपेक्षा करणार? जमिनीवरून उंच पर्वतावर चढला व पर्वतावरून झाडाच्या शेंड्याशीं जाऊन वसला, (३४) तेथेंही जर त्याचें रक्षण होत नसेल तर (कोठेंही गेला तरी काळसर्प सोडीत नाहीं ) अशा काल-सर्पापासून भ्यालेल्या मनुष्याची गति काय होणार? मृत्यूनें ग्रासिलें आहे, जरेनें वेढिलें आहे (३५) आयुष्यापासून व कर्मापासून तूं च्युत झाला आहेस स्वस्थ माणसाप्रमाणें हें काय बोलतोस. याकरितां जीविताला आनंद मानूं नये. मरणाचेंही अभिनंदन करूं नये. (३६) निर्वेश भृतक (नोकर) जसा कालाचें

प्रतीक्षेत निर्वेशभृतको यथा ॥ हा तात हा पुत्र हा कान्ते क्रंदश्चैवं सुदुःखितः ॥३६॥ मण्डूक इव सर्पेण कालेन ग्रस्यते जनः ॥ श्रुत्वेवं वचनं तस्य कालस्यामोघवर्तिनः ॥ श्वेतः पुनरुवाचेदं शिवभक्तिपरायणः ॥३७॥ येऽत्र विघ्नं प्रकुर्वन्ति शिवयज्ञोद्यतात्मनाम् ॥ तेऽचिरेण विनश्यन्ति त्वामतो वारयाम्यहम् ॥३८॥ यथेह राजभृत्यानां शास्ता राजैव नेतरः ॥ तथैव शिवभक्तानां शास्ताऽसौ परमेश्वरः ॥३९॥ न त्वं मृत्युर्न धाता वा न यमो यमदूतकाः ॥ न चान्ये शिवभक्तानां भवंति प्रभविष्णवः ॥४०॥ किं न श्रुतं त्वया काल वाक्यमेतन्महर्षिणां ॥ नृणामीश्वरभक्तानां न भवंत्याधयः क्वचित् ॥४१॥ मूढो जन्तुरनीशोऽयं कर्मणोः शुभपापयोः ॥ ईश्वरप्रेरितो गच्छेत् स्वर्गं वा श्वभ्रमेव वा ॥४२॥ आधयो व्याधयस्तेन राजानः शत्रवो ग्रहाः ॥ ते न पीडयितुं शक्ता नरं हरपरायणं ॥४३॥ शिवभक्तो न पापैश्च लिप्यते नच कर्मभिः ॥ किं जल्पसि वृथा काल बालवज्जनसंसदि ॥४४॥ यस्यैतत्सर्वगं तेजः शैवं मनसि वर्तते ॥ ब्रह्मादयोऽपि तं क्रुद्धा न शक्ता हर्तुमी-

---

( धन्याच्या हुकुमाच्या वेळेचें ) निरीक्षण करतो, तसें आपणही कालाचेंच निरीक्षण करावें. हा ताता, हा पुत्रा, हा कांते, याप्रमाणें आक्रोश करीत व दुःख करीत (३७) सापाच्या तोंडांत मंडूक ( बेडूक ) जसा पडतो, तसा हाही कालाच्या तोंडांत पडतो. याप्रमाणें अमोघ व्यापाराच्या कालाचें वाक्य ऐकून शिवभक्तिपरायण श्वेतराजा पुनः बोलला.– ( ३८ ) हे काला शिवयज्ञ करितां ज्यांचा उद्योग चालला आहे, त्यांना मध्यें विघ्न जे आणतात, ते लौकरच नष्ट होतात, ह्मणून तुला मी निवारण करितों. (३९) नोकरांचा पोषक राजाच जसा ठरलेला आहे, तसेंच शिवभक्तांचा शास्ता परमेश्वर आहे. (४०) तूं मृत्यु, धाता, यम, यमदूत, इतर लोक शिवभक्तांचे शास्ते होत नाहींत (४१)हे काला,महान् महान् ऋषींचें वाक्य तूं ऐकिलें नाहींस काय? शिवभक्तांना रोग कधींही होत नाहींत हें मी सांगतों. (४२) मूढ असमर्थ प्राणी शुभाशुभ कर्मांच्या ताब्यांत जाऊन ईश्वराच्या प्रेरणेनें स्वर्गाला किंवा नरकाला जातो. (४३) आधि, व्याधि, चोर, राजे, शत्रु, ग्रह हे शिवभक्ताला दुःख देऊं शकत नाहींत. (४४) शिवभक्त हा पातकांनीं व कर्मांनीं लिप्त होत नाहीं. हे काला, लोकांच्या समाजांत व्यर्थ हें काय तूं बोलतोस? (४५) सर्वव्यापी हें शैवतेज ज्यांच्या मनांत भरलेलें आहे त्याचा संहार करावयास ब्रह्मादिदेव देखील समर्थ

श्वराः ॥४५॥ स एवं तर्जितस्तेन भगवान्विकृतेक्षणः ॥ कालो भृशं रुषेत्याह ग्रसन्निव जगत्त्रयं ॥४६॥ अहमेवास्य जगतः कर्ता हर्ता पुरातनः ॥ पूज्योऽहमेव सर्वेषां सर्वलोकमहेश्वरः ॥४७॥ दैवपौरुषकर्माणि न फलंति मया विना ॥ न च क्रियाः प्रवर्तन्ते किं वेत्स्येवं न दुर्मते ॥४८॥ कालः सृजति भूतानि कालः संहरति प्रजाः ॥ कालमूलमिदं सर्वं मत्वा किं परिमुह्यसि ॥४९॥ यावन्त्य एव गंगायां सिकताः श्वेत दुर्मते ॥ तावन्त एव ब्रह्माणो मया कालेन संहृताः ॥५०॥ किं वात्र बहुनोक्तेन पश्य मे विक्रमं परम् ॥ स पातु त्वां महादेवो यस्य दासोऽसि सांप्रतम् ॥५१॥

दूर्वासा उवाच ॥ तेनैवं गर्जता तात कालेनासौ महीपतिः ॥ *ग्रस्तुं हठात्समारब्धो राहुणैवं तदा शशी ॥५२॥ विधायाथ महारक्षां सर्वोपद्रवनाशिनीं ॥ शिवशान्तिं जजापाद्यां पार्थिवो विगतव्यथः ॥५३॥ तस्यैवं जपतो ब्रह्मन् तां विद्यां तद्गतात्मनः ॥ विधूमार्चिर्हुतवतस्ततः प्रादुर्बभौ महान् ॥५४॥ लिंगादथ समुत्तस्थौ मूर्तिमान्परमेश्वरः ॥

---

होत नाहींत. (४६) याप्रमाणें तर्जित होऊन भगवान चिद्रूप डोळ्याचा काल जगत्त्रयाला ग्रासतो कीं काय? अशा संतापानें बोलला. (४७) या जगाचा पुरातन कर्ता हर्ता मीच आहें, व सर्व लोकांना मीच पूज्य आहें, व सर्व लोकांचा ईश्वर मीच आहें. (४८) दैविक पौरुष कर्में माझ्याशिवाय फळत नाहींत सर्व क्रिया चालत नाहींत. तर हे दुर्मते, हें तूं जाणत नाहींस काय? (४९) कालच जगाची सृष्टि करतो, कालच पालन करतो, कालच संहार करतो. हें सर्व जग कालमूलक आहे, असें जाणून पुनः मोहांत कां पडतोस? (५०) हे दुर्मते श्वेता गंगेंत जितकी वाळु असेल तितक्या ब्रह्मदेवांचा संहार मीं कालानें केला आहे. (५१) फार काय सांगावें? माझा श्रेष्ठ पराक्रम पहा. ज्याचा तूं दास असशील, तो श्रेष्ठ महादेव आतां तुझें रक्षण करो.

(५२) दूर्वास बोलले--याप्रमाणें गर्जणाऱ्या त्या कालानें राजास बलात्कारानें ग्रासावयास आरंभ केला. त्यावेळीं राहूनें चंद्राला ग्रासल्याप्रमाणें दिसलें. (५३) तेव्हां सर्व उपद्रव नाश करणारी महारक्षा करून दुःखें न जुमानितां आद्य शिवशांतीचे जप करावयास राजानें आरंभ केला. (५४) शिवमनस्क होऊन ती विद्या जपत असतां होमकुंडापासून धूर नसलेल्या ज्वाळा जिकडे तिकडे फाकावयास लागल्या. (५५) शिवलिंगापासून मूर्तिमान परमेश्वर तात्काळ प्रकट झाला.

अनिर्देश्यवयोरूपश्चंद्रार्कज्वलनद्युतिः ॥५५॥ गर्जन्मेघरवोदग्रहुंकृतेन स तत्क्षणात् ॥ चक्रे भस्मावशेषांगं कालं काममिवोद्यतम् ॥५६॥ श्वेतस्य दत्त्वा तद्वाञ्छि गणेशत्वमसौ प्रभुः ॥कृत्वा निर्विग्रहं कालं तत्रैवान्तरधीयत॥५७॥क्रीडत्यद्यापि स श्वेतस्त्रैलोक्येऽस्मिन्यथेच्छया ॥ जितारातिजरामृत्युः प्राप्ताशेषमनोरथः ॥५८॥ भक्तश्रद्धागुणो देवः शरण्यः शरणैषिणाम् ॥ तस्मात्त्वमेकभावेन शंकरं शरणं व्रज ॥५९॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे लिंगार्चनमाहात्म्यकथने श्वेतोपाख्यानं नामैकोनसप्ततितमोऽध्यायः

---

पाहिलें असतां त्याचें वय रूप याचें अनुमान कांहीं काढितां येत नव्हतें. व ती मूर्ति चंद्रासमान सूर्यासमान व अग्नीसमान भासत होती. (५६) मेघाच्या गडगडण्याप्रमाणें हुंकार करून तात्काळ श्रीशिवानें उन्मत्त कामाप्रमाणें त्या कालाचें शरीर जाळून राखरांगोळी करून टाकिलें. (५७) श्वेताला आपल्या लोकांत गणाधिपत्व देऊन काळाला शरीररहित करून शिव तेथेंच अंतर्धान पावले. (५८) तो श्वेत या त्रैलोक्यांत अद्यापि यथेच्छ क्रीडा करतो. त्या राजाचे शत्रु नाहींसे झाले, जरा नाहींशी झाली. मृत्यु नाहींसा झाला. व त्याचे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले. (५९) श्रीशिव भक्ताचा श्रद्धारूपी गुण घेत असून शरण आलेल्या प्राण्यांचें रक्षण करीत असतो. याकरितां एकनिष्ठभावानें साक्षात श्रीशंकराला शरण जा.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारानिरूपणांतील लिंगार्चनमाहात्म्यकथनांतील श्वेतोपाख्यान नांवाचा एकोणसत्तरावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ सप्ततितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ मार्कण्डेयपुराणे ऋषय ऊचुः मार्कण्डेय इति ख्यातो महर्षिः शंसितव्रतः ॥ महादेवप्रसादेन नित्य इति विश्रुतः ॥१॥ जातेनैव शरीरेण मृकंड्वाख्यान्महामुनेः ॥ कथं स लब्धवान्देवान्नित्यत्वं नृषु दुर्लभम् ॥२॥ आश्चर्यमेव तन्नस्त्वं सूत वक्तुमिहार्हसि ॥ त्वं हि साक्षाद्धृषीकेशात्कृष्णद्वैपायनान्मुने ॥३॥ कथाः पौराणिकीः सर्वाः श्रुतवानिति पृच्छ्यते॥इत्येवं ऋषिभिः पृष्टः सूतः पौराणिकोत्तमः ॥४॥ नमस्कृत्वादितो मूर्ध्ना व्यासं सत्यवतीसुतम् ॥ वधं प्रोवाच कालस्य मुनेर्नित्यत्वकारणम् ॥५॥

सूत उवाच ॥ पाद्मसंज्ञस्य कल्पस्याप्यादौ कृतयुगे पुरा ॥ मृकण्डुरिति विख्यातो ब्रह्मणः पंचमो मुनिः ॥६॥ भार्या गुणवती नाम तावपुत्रौ विषादिनौ ॥ पुत्रार्थं तपसा शंभुमाराधयितुमुद्यतौ ॥७॥ समुद्रतीरे कावेर्या नद्या मध्यस्थया युतम् ॥ श्वेतारण्यमिति ख्यातं योज-

---

श्रीशिवास नमस्कार असो. मार्कंडेय पुराणांत सांगितलें कीं (१) ऋषी बोलले, हे सूता, नियमानें व्रत करणारा मार्कंडेय या नांवाचा एक महर्षि प्रख्यात होऊन गेला. तो ऋषि महादेवाच्या प्रसादानें चिरंजीव झाला ह्मणून जगांत प्रसिद्धि झाली. (२) मृकंडु ऋषीच्या शरीरापासून जन्म घेतलेल्या त्या ऋषीनें श्रीशिवापासून चिरंजीवत्व कसें मिळविलें, हें आह्मांस सांगा, कारण चिरंजीवत्व हें मानवांना दुर्लभ आहे (३) हे सूता, हें अतिशय आश्चर्य आह्मांस वाटतें याकरितां सांगा, हे मुने आपण श्री विष्णूचा प्रत्यक्ष अवतार अशा वेदव्यासमुनीकडून (४) सर्व पौराणिक कथा ऐकिल्या आहेत, ह्मणून तुह्माला हा प्रश्न केला आहे. या प्रमाणें ऋषींनीं पौराणिक श्रेष्ठ सूताला प्रश्न केला. (५) नंतर सूतानें प्रथम सत्यवतीसुत व्यासाला नमस्कार करून मग कालाच्या वधाची हकीकत व मुनीच्या चिरंजीवत्वाच्या कारणाची हकीकत सांगावयास आरंभ केला.

(६) सूत बोललें-- पूर्वी पाद्म कल्पाच्या आधीं कृतयुगाच्या वेळेस ब्रह्मदेवाचा पांचवा मुलगा मृकंडु ऋषि या नांवानें प्रख्यात होऊन गेला. (७) त्याला गुणवती या नांवाची भार्या झाली त्यां दोघांमध्यें संततीची एक मोठी उणीव होती यामुळें ते दोघे नेहमीं दुःखी दिसत होते. अर्थात संततीच्या प्राप्तीकरितां त्या दोघांनीं श्रीशिवाची आराधना केली. (८) समुद्रकांठीं व कावेरी नदीच्या मध्यभागीं (समुद्र कावेरीच्या मधोमध) पुष्कळ योजन विस्ताराचें श्वेतारण्य

नायामनिश्चितम् ॥८॥ श्वेतो नाम महाभक्तो भेजेऽस्मिन्परमेश्वरं ॥ ततः श्वेतवनं प्रोक्तं देवसान्निध्यसंयुतम् ॥९॥ तस्यैव दक्षिणो भागस्तापसैः सेवितः सदा ॥ बिल्वारण्यमिति ख्यातं बिल्ववृक्षोपशोभितम् ॥१०॥ तत्र गत्वा मृकण्ड्वाख्यो महता तपसा युतः ॥ पूजयामास विश्वेशं नीलकण्ठं दयापरम् ॥११॥ स्नातः नित्यं च कावेर्यां पर्वणोश्चाब्धिसंगमे ॥ स्नाता पीता धृता दृष्टा प्रेक्षिता सेविता नृणाम् ॥१२॥ सद्यः पुनाति कावेरी पापमामरणांतिकम् ॥ सकृत्स्नातो नरस्तस्यां गोसहस्रफलं लभेत् ॥१३॥ नारी वा यदि वा नीचः स्नात्वा पुण्यं महद्व्रजेत् ॥ एवं स्नातः प्रसन्नात्मा तस्यां नद्यां दिने दिने ॥१४॥ पूजयामास विश्वेशं तपसा कर्शितो भृशम् ॥ ततः प्रीतो महादेवः कृत्वा सान्निध्यमुत्तमम् ॥१५॥ सह पार्श्वस्थया गौर्या स्मयमानोऽब्रवीन्मुनिम् ॥१६॥

ईश्वर उवाच ॥ पुत्रमात्रसहस्रं ते दीर्घायुर्वा ददाम्यहम् ॥ एकं वा

---

नांवाचें अरण्य होतें. (९) या अरण्यामध्येंच श्वेताला परमेश्वराची प्राप्ती झाली. परमेश्वराचें सान्निध्य असलेल्या अरण्याला श्वेतारण्य ह्मणून नांव आलें. (१०) त्याच्या उजव्या बाजूला तापस लोक राहत असत. तेथें बिल्वाचीं झाडें पुष्कळ असल्यामुळें त्याला बिल्वारण्य असें लोक ह्मणत असत. (११) त्या ठिकाणीं जाऊन मृकंडुमुनि तपश्चर्येला बसला. तेथें दयाशील जगत्पति नीलकंठाची पूजा त्यानें केली. (१२) समुद्र संगमाच्या ठिकाणीं कावेरींत स्नान करून तिचें पाणी घ्यावें, तिचें धारण करावें, तिला प्रसन्न करून घ्यावें, तिचें दर्शन घ्यावें तिची सेवा करावी, असें आचरण मानव नेहमीं करीत असत. (१३) असें केलें असतां आयुष्य असेंपर्यंत केलेलीं सर्व पातकें ती कावेरी जाळून टाकीत असे. एकवार स्नान केलें तर सहस्र गोदानाचें फळ मिळतें (१४) स्त्री स्नान करो, किंवा एखादा नीच प्राणी स्नान करो; त्याला पुण्य यावयाचेंच. असो. या प्रमाणें दरदिवशीं त्या नदींत प्रसन्नांतःकरणानें तो मुनि स्नान करीत असे. (१५) आणि श्रीशिवाची पूजा करीत असे. अशा तपानें तो मुनि अत्यंत कृश झाला. त्यामुळें महादेव संतुष्ट होऊन त्याला प्रसन्न झाले. (१६) नेहमीं बाजूला असणाऱ्या गौरीसहित श्रीशिव येऊन हंसत हंसत त्या मुनीला बोलले.

(१७) श्रीशिव बोलले--हे मुने, दीर्घायु अशीं हजार मुलें पाहिजेत? कां

लोकविख्यातं पुत्रमल्पायुषं वद ॥१७॥ इति श्रुत्वा वचः शंभोः संभ्रमाद्व्याकुलेंद्रियः ॥ स्तुत्वा बहुविधैः स्तोत्रैः प्रणम्योवाच तापसः॥१८॥ एकाहमपि सत्पुत्रं पश्येऽहं कुलदीपकम् ॥ स्वामिन्भवत्प्रसादेन भक्तानामिष्टदोऽव्ययः ॥१९॥

नापुत्रस्य हि लोकोऽस्ति नापुत्रस्येह वा सुखम् ॥ ऋणापाकरणं तद्वत्पितॄणां नैव विद्यते ॥२०॥ पुन्नाम्नो नरकात्त्राणात्पुत्र इत्युच्यते बुधैः ॥ आशसंतीह पितरः सुवृष्टिमिव कार्षिकाः ॥२१॥ इति विज्ञापितं श्रुत्वा देवदेवो मृकण्डुना ॥ पुत्रमेकं ददौ तस्मै षोडशाब्दायुषं बुधम् ॥२२॥ शिवभक्तं महात्मानं मार्कण्डेयं च यं विदुः ॥पत्नी गुणवती तस्य सुषुवे सहसैव तम्॥२३॥ जातश्च जातकर्माद्यैः संस्कारैः संस्कृतस्तथा॥ अध्यापितश्च पित्रैव वेदांश्च्छास्त्राणि कृत्स्नशः ॥२४॥ शुश्रूषुश्च दिवारात्रं पित्रोर्हृदयनन्दनः ॥ वर्णाश्रमविधानोक्तं कर्म सर्वं समाचरन् ॥२५॥ शिवपूजापरो नित्यं शिवध्यानपरस्तथा ॥ प्राप्ते तु षोडशे वर्षे पितरौ शोककर्शितौ ॥२६॥ दृष्ट्वा पप्रच्छ तौ पुत्रः शोकोऽयं

---

लोकप्रसिद्ध अल्पायुषी एकच मुलगा पाहिजे ? तें सांग. (१८) असें श्रीशिवाचें वाक्य ऐकून संभ्रमानें त्याचीं इंद्रियें सर्व व्याकुळ झालीं. मग पुष्कळ स्तुतींनीं त्याचें स्तोत्र करून नमन करून ऋषि बोलला.–

(१९) भगवन् आपण भक्तांचे मनोरथ तृप्त करणारे असून अव्यय आहांत, तर कुलदीपकसत्पुत्र एका दिवसाच्या आयुष्याचा असला तरी तोच मला पाहिजे. (२०) अपुत्राला लोक नाहीं, अपुत्राला सुख नाहीं, त्याशिवाय पितरांचें ऋण जात नाहीं. (२१) पुत् या नांवाच्या नरकापासून तारतो, ह्मणून त्याला पुत्र अशी संज्ञा आली आहे. त्यामुळें शेतकरी पावसाला पाहून जसा आनंद मानतात, त्याप्रमाणें पितर पुत्रवानाला पाहून आनंद मानतात. (२२) अशी मुनीची विज्ञापना देवाधिदेवानें ऐकून सोळा वर्षेपर्यंत वाचणाऱ्या एका सत्पुत्राला दिलें. (२३) तोच शिवभक्त महात्मा मार्कंडेय होय. असा मुलगा त्या गुणवतीला झाला. (२४) त्याला जातकर्म वगैरे संस्कार केले. व त्यामुनीला वेदशास्त्र वगैरे सर्व विद्या शिकविल्या. (२५) मातापित्यांची सेवा अहोरात्र करणारा अर्थात मनास आनंद देणारा असा तो मार्कंडेय वर्णाश्रमाचे आचार विधानपूर्वक करूं लागला. (२६) शिवपूजा व शिवध्यान करण्यांत निमग्न झाला. त्याला सोळावें वर्ष लागल्या बरोबर मातापितरांना मोठें दुःख झालें. (२७) अशा उदासीन मातापितरांना

केन हेतुना ॥ मयि संवर्द्धते पुत्रे शुश्रूषामपि कुर्वति ॥२७॥ मयि जीवति चैकस्मिन्सदा युष्मत्प्रियंवदे ॥ अहन्यहनि संतोषो भवेन्मद्दर्शनादिभिः ॥२८॥अपराधोऽस्ति कश्चिन्मे गद्यतां क्षम्यतां च सः॥ महता तपसा भक्त्या महत्या च महेश्वरे ॥२९॥ जातोऽहं तन्मया कार्यं युवयोः प्रियमेव हि ॥ इति ब्रुवाणं तनयं गुणवंतं निरीक्ष्य तौ॥३०॥ आलिंग्याघ्राय मूर्धानमंकमारोप्य दुःखितौ ॥ अज्ञातपूर्ववृत्तस्य तस्यायुःक्षयमूचतुः ॥३१॥ श्रुत्वा पित्रोर्वचस्तथ्यं मार्कण्डेयः प्रसन्नधीः ॥ अनुद्विग्नमनाश्चैव तावुभौ पितरौ सुतः ॥३२॥ जीविष्यामि चिरं दुःखं मा भूद्वामित्यशांतयत् ॥ यद्यस्ति नीलकण्ठोऽयं भक्तानामार्तिनाशनः ॥३३॥ यद्यदिष्टतमं तेषां तत्तद्दातुं व्यवस्थितः॥ धर्ममर्थं च कामं च मोक्षं चाप्यतिदुर्लभम् ॥३४॥ स भक्तेभ्यो ददात्येव सर्वथा नास्ति संकटम् ॥ इत्युक्त्वा तद्भयं सर्वं व्यपोह्य दृढमानसः ॥३५॥ आत्मशुद्धिं पु-

---

पाहून तुह्मी दुःख कां करितां ? असें त्यानें विचारिलें. मी आपला मुलगा वाढत असून आपल्या शुश्रूषेंत तत्पर आहें. मग शोकाचें कारण काय ? (२८) मी जीवंत असून तुमच्याशीं गोड बोलतों. माझ्या दर्शनादिकाच्या योगानें तुह्मांला दरदिवशीं आनंद जास्त जास्त व्हावयास पाहिजे आहे. (२९) असें असून जर कोणता माझा अपराध असला तर तो मला सांगा. आणि तसें असेल तर क्षमा करा श्रीशिवाची आराधना केली ह्मणून व मोठी तपश्चर्या केली ह्मणून (३०) तुमच्या दोघांच्या पोटीं मी जन्मलों. तर मीं काय केलें तर आवडेल, हें सांगा बरें ? याप्रमाणें बोलणाऱ्या गुणवान मुलाला पाहून (३१) त्याला आलिंगन देऊन त्याचें मस्तक हुंगून पुनः दुःखी झाले. पूर्वींची हकीकत न समजलेल्या मुलाला त्याच्या आयुष्यक्षयाची हकीकत सांगितली. (३२) मातापितरांचें खरें खरें वाक्य ऐकून आपल्या मनांत त्याबद्दल काळजी न घेतां मार्कंडेयानें प्रशस्तमनानें त्या दोघांना सांगितलें कीं,-- (३३) मी पुष्कळ दिवस वाचतों, तुह्मी कांहीं काळजी करूं नका, असें त्यांचें सांत्वन केलें. भक्तांचीं दुःखें परिहार करणारा साक्षात शिव जर आहे, तर काळजी करावयाचें कारण काय ? (३४) भक्तांचे मनोरथ जे जे असतील, ते ते द्यावयास तो नेहमीं तयार असतो. धर्म, अर्थ, काम, दुर्लभ मोक्ष वगैरे वाटेल तें तो देतो. (३५) तो भक्त लोकांना देतोच यांत संशयच नाहीं. असें बोलून त्यांचें सर्व भय दृढमनानें त्यामुलानें नाहींसें केलें. (३६) आत्मसंयमन करून शुद्ध होऊन जितेंद्रिय होऊन मृत्यूला

[ता] कृत्वा संयमी विजितेंद्रियः ॥शंभुमाराधयामास मृत्योर्विजयकांक्षया ॥३६॥ पंचाक्षरेण मन्त्रेण सर्वसिद्धिकरेण च ॥ ॐकाराद्येन दिव्येन सब्रह्मांगेन सादरम् ॥३७॥ पूर्णमासीत्ततो वर्षे येनान्हाः षोडशे द्विजाः ॥ तस्मिन् दिनेऽधिकं दीपैः पुष्पैरारग्वधादिभिः॥३८॥मार्कण्डेये महादेवं पूजयत्यागतोऽन्तकः॥दंष्ट्रया सेंदुमेघाभो व्याकुलै रक्तमूर्धजैः ॥३९॥शतह्रदाभिर्वन्हीभिः कालमेघ इवोद्गतः ॥ अंगारविस्फुलिंगाढ्ये लोहिते लोचने मिषन् ॥४०॥ वृत्ते व्याघूर्णिते रौद्रे परुषे कुटिलभ्रुवे ॥ पाशं शूलं च संगृह्य रूक्षस्वरवचो वदन् ॥४१॥ भूतलं पदविन्यासैः कम्पयन् कम्पितप्रजः ॥ कृत्वा चटचटाशब्दं संपरिभ्रामयन् दिशः ॥४२॥ पादचारी ज्वलद्वन्हिरंजनाद्रिरिवापरः ॥ लेलिहानो जगत्सर्वं वहिर्गतरसज्ञया ॥४३॥ म्रीयन्ते कानिचित्सत्वान्याकर्ण्य परुषं स्वनम् ॥ आलोक्य भयरुग्णानि त्यजंत्यन्यानि जीवितम् ॥४४॥ पलायनपराण्यन्यान्यवस्थानं न लेभिरे ॥ अत्रांतरे मुनिः श्रीमान् प्रातः पूजां समाप्य च

---

जिंकण्याकरितां, शंभूची आराधना तो मुनि करूं लागला. (३७) सर्वसिद्धिकर ओंकारपूर्वक पंचाक्षरमंत्रानें सेवा करूं लागला. तो मंत्र दिव्य असून ब्रह्मांगसहित मंत्राचें ग्रहण त्यानें केलें होतें. (३८) ब्रह्मणहो, ज्या दिवशीं पूर्ण सोळावें वर्ष भरलें, त्या दिवशीं अनेकविध दीपांनीं व आरग्वधादि पुष्पांनीं (३९) मार्कंडेय महादेवाची पूजा करूं लागला. तेव्हां यम त्याचे प्राण घ्यावयास तेथें आला. तो अंतक दाढेनें व तांबड्या केसांनीं चंद्रसहित मेघाप्रमाणें दिसत होता. (४०) किंवा शेंकडो विजांनीं युक्त कालमेघाप्रमाणें त्या मुनीवर चालून आला. तेव्हां अग्नीच्या ठिणग्यांनीं युक्त तांबड्या डोळ्यांनीं पाहत व (४१) वर्तुलाकृतीच्या भिवया चढवून तो भयंकर पुरुष पाश शूल घेऊन वेड्यावांकड्या स्वरांनीं आरडाओरडा करीत आला. (४२) त्याच्या पावलाच्या भारानें पृथ्वी कांपावयास लागली, व सर्व लोक थरथर कांपूं लागले दाही दिशांला शूल फिरवीत होता; व चटचट शब्द करूं लागला. (४३) पायानें चालतो आहे, अग्नीप्रमाणें व दुसऱ्या अंजनपर्वताप्रमाणें (काजळाच्या डोंगराप्रमाणें) दिसूं लागला. आणि बाहेर जीभ काढून सर्व जग चाटीत होता. (४४) त्याचा तो भयंकर आराव ऐकून कांहीं प्राणी मरूं लागले. दुसरे प्राणी त्याला पाहून भीतीनें जीवित सोडूं लागले. (४५) आणखी कांहीं प्राण्यांना पळता भुई थोडी होऊन लपावयास जागा नाहींशी झाली. इतक्यांत श्रीमान मुनि येऊन प्रातःकालची शिवपूजा

॥४५॥ कृत्यं माध्यंदिने कर्तुं निर्गतः शंकरांतिकात् ॥ कालं दूरे समायांतं तिष्ठ तिष्ठेति वादिनम् ॥४६॥ तं तादृशं भयाविष्टो दृष्ट्वांतः शीघ्रमाविशत् ॥ वेपितांगः स्खलच्चित्तो मां रक्षेति शिवं ब्रुवन् ॥४७॥ ततः कालोऽपि वेगेन प्राद्रवत् प्रेक्ष्य तं मुनिम् ॥ अन्तः प्रविश्य विश्वेशं मृकण्डुतनयः शुचिः ॥४८॥ शिवलिंगं समालिंग्य तस्थौ तातमिवात्मजः ॥ अथ तस्यामवस्थायां कालोऽपि कलहप्रियः ॥४९॥ कोपेन महता युक्तः प्रभावं विस्मरन् प्रभोः ॥ अन्तिकं प्राप्य देवस्य तमोवद्भास्करांतिकम् ॥५०॥ यथा च पूर्णमृक्षेशं पौर्णमास्यां विधुन्तुदः ॥ पाशमाबध्य तत्कण्ठे चकर्षाभीतवद्बली ॥५१॥ अनादृत्य महादेवं तन्मायामूढचेतनः ॥ गर्वेण महता युक्तो जल्पन् बहुविधं वचः ॥५२॥ ब्रह्मादिस्तंबपर्यन्तं जगत्स्थावरजंगमम् ॥ प्रयाति मद्वशं सर्वं नाहं वै कस्य चिद्वसेत् ॥५३॥ मन्नामश्रवणात्केचिन्मां निरीक्ष्य तथा परे ॥ मन्निबद्धास्तथा चान्ये त्यजन्ति स्वोत्तमानसून् ॥५४॥ पुत्रमित्रकलत्रा-

---

समाप्त करून (४६) माध्यान्हींचें आन्हिक करावयास श्रीशिवाजवळून निघाला. इतक्यांत अरे, उभारहा, उभारहा, असें तोंडानें बोलत दुरून येणाऱ्या कालाला त्यानें पाहिलें. (४७) त्याप्रमाणें भयानें व्याकुळ होऊन त्याला पाहून भीतीनें आंत पुनः प्रवेश केला. तो थरथर कांपत असून मनोभ्रंश होऊन माझें रक्षण कर, रक्षण कर, असें शिवाला बोलूं लागला. (४८) तेव्हां कालानें देखील वेगानें धांवत जाऊन त्या मुनीला पाहिलें नंतर मुनि आंत प्रवेश करून श्रीविश्वेशाची प्रार्थना शुचिर्भूत होऊन करून (४९) मुलानें आपल्या बापास जसें आलिंगन द्यावें, त्याप्रमाणें त्यानें शिवलिंगाला आलिंगन दिलें. अशा वेळीं कलहप्रिय काल देखील (५०) श्रीशिवाचें सामर्थ्य न जाणून सूर्याजवळ अंधकारानें जसें जावें तसें अतिशय रागारागानें देवाजवळ आला. (५१) जसें पूर्णिमाचंद्राला राहूनें ओढावें, त्याप्रमाणें त्याच्या (मुनीच्या) गळ्यांत पाश टाकून बलिष्ठ अंतक निर्भीत होऊन ओढूं लागला. (५२) मूर्खमनाचा तो अंतक महादेवाचा अनादर करून मोठ्या गर्वानें युक्त होऊन वाटेल तसें पुष्कळ बडबडूं लागला. (५३) अरे, ब्रह्मदेवापासून यःकश्चित तृणापर्यंत सर्व-स्थावरजंगम जग माझ्या ताब्यांत येतें. मी मात्र कोणाच्या ताब्यांत राहात नाहीं. (५४) माझें नुसतें नांव ऐकल्याबरोबर कांहीं लोक, व मला पाहून कांहीं लोक, मी होऊन बांधलेले लोक आपले प्राण सोडतात. (५५) पुत्र, मित्र,

दीन् गृहक्षेत्रधनादिकम् ॥ त्यक्त्वात्मभावितं देहमभ्युत्तिष्ठंति मां प्रजाः ॥५५॥ इदं कृतमिदं कार्यमिदमन्यत् कृताकृतम् ॥ इति चिंताकुलं जंतुं नयामि मम सन्निधिम् ॥५६॥ रोगाविष्टे विषैर्दष्टे शत्रुग्रस्ते भयाकुले ॥ अस्ति प्रतिक्रिया जन्तोर्नास्त्येवोपस्थिते मयि ॥५७॥ यदि ते शरणं शंभुरिति भीतिर्न विद्यते॥ स एव मां नियुंक्ते हि सर्वेषामायुषः क्षये ॥५८॥ इत्येवं भाषमाणेऽपि काले निष्ठुरकर्मणि ॥ मार्कण्डेयो महाबुद्धिर्भक्तानामार्तिनाशनम् ॥५९॥ रक्ष रक्षेति देवेशं बभाषे भयविव्हलः ॥ ततः साक्षात्प्रभुर्लिंगात्प्रादुरासीज्जितांबुजः ॥६०॥ कल्याणाभयहस्ताढ्यो मास्म पुत्र विभेरिति ॥ ततो दक्षिणयोः पाण्योस्त्रिशूलं परशुं दधन् ॥६१॥ वामोर्ध्वपाणिना पाशं कालमन्येन तर्जयन् ॥ आविर्भूय स्वयं लिंगात्पालयन् भक्तमादरात् ॥६२ कालं वामेन पादेन वक्षस्याहत्य निष्ठुरं ॥ पातयामास भक्तार्थं सिंहः क्षुद्रमृगं यथा ॥६३॥ कालोऽपि शीर्णसर्वांगो हाहेत्यभिनदन् मुहुः॥ पपात सहसा भूमौ वि-

---

कलत्र, गृह, क्षेत्र, धन वगैरे सर्व सोडून व आत्मभाव सोडून माझ्यापर्यंत सर्व लोक येतात. (५६) हें करावयाचें आहे, हें केलें, हें दुसरें केलें न केलें सारखेंच आहे; अशा चिंतेनें व्याकुळ होऊन राहिलेल्या प्राण्याला मी माझ्याजवळ नेतों. (५७) रोग आले असतां, विषारी प्राण्यांचा दंश झाला असतां, शत्रूंनीं ग्रासिलें असतां, भीतीनें गांगरून गेले तर यांसर्वांवर कांहींतरी उपाय आहेत, परंतु माझ्यावर कांहीं उपाय चालत नाहींत. (५८) जर तुझा संरक्षक श्रीशिव आहे, तर त्याची मला मुळींच भीति नाहीं. कारण सर्वांच्या आयुष्याचा नाश करावयास तोच मला सांगतों. (५९) निष्ठुरकर्म करणारा काल याप्रमाणें भाषण करीत असतांना महाबुद्धिशाली मार्कंडेय दुःखनाश करणाऱ्या (६०) श्रीशिवाला रक्षण-कर, रक्षणकर असें भीतीनें विव्हळ होऊन ह्मणाला.इतक्यांत साक्षात् प्रभु लिंगापासून प्रकट झाला. (६१) आणि कल्याणकर दोनी हात वर उचलून पुत्रा, भिऊं नको; असें ह्मणाला. नंतर उजव्या दोनी हातांत त्रिशूल धरून व परशु धरून (६२) डावा हात वर उचलून पाश धरून दुसऱ्या हातानें कालाला मारावयास लागला. लिंगापासून स्वतः प्रकट होऊन आदरानें भक्ताचें पालन करूं लागला. (६३) कालाच्या उरावर डाव्या पायानें जोरानें मारून श्रीशिवानें त्याला खालीं पाडिलें. त्यावेळेस सिंहानें यःकश्चित क्षुद्र मृगास जसें पाडावें; तसें दिसलें. (६४) कालाचे सर्व अवयव त्यावेळेस फुटून गेले. नंतर वारंवार तो

शीर्ण इव पर्वतः ॥६४॥ विकीर्णकेशं व्यात्तास्यं पतितं गतजीवितम् ॥ कालं मुनिवरो धीमान् दृष्ट्वाश्चर्यमनुत्तमम् ॥६५॥ प्रांजलिश्चान्तिके स्थित्वा पूजयित्वा पुनः पुनः ॥ मार्कण्डेयो महादेवं प्रणिपत्य कृतांजलिः ॥६६॥ तुष्टाव मृत्युविजयस्तोत्रेणानेन शंकरम् ॥६७॥

मार्कंडेय उवाच॥ रुद्रं पशुपतिं स्थाणुं नीलकण्ठमुमापतिम् ॥ नमामि शिरसा देवं किं नो मृत्युः करिष्यति ॥६८॥ अनन्तमव्ययं शान्तमक्षमालाधरं हरम् ॥ नमामि शिरसा देवं किं नो मृत्युः करिष्यति ॥६९॥ कालकण्ठं कलामूर्तिं कालाग्निं कालनाशनम् ॥ नमामि शिरसा देवं किं नो मृत्युः करिष्यति ॥७०॥ नीलकण्ठं विरूपाक्षं निर्मलं निरुपप्लवम् ॥ नमामि शिरसा देवं किं नो मृत्युः करिष्यति ॥७१॥ वामदेवं जगन्नाथं देवेशं वृषभध्वजम् ॥ नमामि शिरसा देवं किं नो मृत्युः करिष्यति॥७२॥ देवदेवं महादेवं लोकनाथं जगद्गुरुम् ॥नमामि शिरसा देवं किं नो मृत्युः करिष्यति ॥७३॥ आनंदं परमं नित्यं कैवल्यपदका-

---

हाहाःकार करूं लागला; आणि पर्वत जसा ढासळून पडावा, त्या प्रमाणें तो काल खालीं पडला. (६५) तेव्हां त्याचे केस सगळे अस्ताव्यस्त पडले होते, व तोंड वासलें होतें; गतजीवित होऊन पडला होता. बुद्धिमान मुनीनें कालाला पाहून अत्याश्चर्यकर श्रेष्ठ शिवाला (६६) हात जोडून जवळ उभा राहून पुनः पुनः श्रीशिवाची पूजा केली. हात जोडून मार्कंडेयानें महादेवाला नमस्कार केला. (६७) मग या मृत्युविजयस्तोत्रानें शंकराची स्तुति केली.—

(६८) मार्कंडेय बोलले– रुद्रा, पशुपते, स्थाणो, नीलकंठा, पार्वतीपते, देवा तुला नमस्कार करतों, मग मला मृत्यु काय करणार आहे? (६९) अनंत अव्यय शांत, जपमाला धारण करणारा अशा हराला शिरसा नमस्कार करतों. मला मृत्यु काय करणार आहे? (७०) कालकंठ, कलामूर्ति, कालाग्नि, कालनाशन, अशा देवाला मी नमस्कार करतों मग मला मृत्यु काय करतो. (७१) नीलकंठ, विरूपाक्ष, निर्मल, निरुपद्रवी, अशा देवाला नमस्कार करतों मग मला मृत्यु काय करणार आहे? (७२) वामदेव, जगन्नाथ, देवाधिपति, वृषभध्वज अशा देवाला मी नमस्कार करितों मला मृत्यु काय करणार आहे? (७३) देवाधिदेव, महादेव, लोकनायक, जगद्गुरु, अशा देवाला नमस्कार करितों, मग मला मृत्यु काय करणार? (७४) आनंद, परम, नित्य, कैवल्यपदाला कारण

रणम् ॥ नमामि शिरसा देवं किं नो मृत्युः करिष्यति ॥७४॥ स्वर्गापवर्गदातारं सृष्टिस्थित्यन्तकारणम् ॥ नमामि शिरसा देवं किं नो मृत्युः करिष्यति ॥७५॥ इत्युदीरितमाकर्ण्य स्तोत्रं स्तुतिकरप्रियः ॥ संस्पृश्य पाणिना भक्तमनुगृह्याब्रवीदिदम् ॥७६॥ मार्कण्डेयकृतं स्तोत्रं यः पठेच्छिवसन्निधौ ॥ तस्य मृत्युभयं नास्ति सत्यमेतदिति प्रभुः ॥७७॥ देवदुंदुभयो नेदुः पुष्पवृष्टिः पपात च ॥ संहृष्टाः प्राणिनोऽस्माकं नास्ति मृत्युभयं त्विति ॥७८॥ आगताः पद्मयोन्याद्या देवाः सर्षिगणास्तदा ॥ दृष्ट्वा कालं हतं सर्वे तुष्टुवुः परमेश्वरम् ॥७९॥

देवा ऊचुः ॥ ॐनमो नीलकण्ठाय सदा भक्तप्रियाय ते॥तत्कालोचितरूपाय कालकालाय ते नमः ॥८०॥ नमस्ते पाशहस्ताय त्रिशूलवरधारिणे ॥ नमः परशुहस्ताय मृत्योरपि च मृत्यवे ॥८१॥ नमस्ते कालरुद्राय सर्वसंहरणाय ते ॥ नमः स्वतंत्रचेष्टाय सर्वस्मादधिकाय ते ॥८२॥ नमः कालविनोदाय भक्तिप्राप्याय ते नमः ॥नमः स्तुत्याय नित्याय भक्तानामार्तिहारिणे ॥८३॥ नमः प्रणतपादाय हरिब्रह्मादिभिः सदा ॥

---

अशा देवाला नमस्कार करतों मग मृत्यु मला काय करणार आहे? (७५) स्वर्ग व अपवर्ग देणारा, सृष्टि, स्थिति, लय यांला कारण अशा देवाला नमस्कार करतों, मग मला मृत्यु काय करणार आहे? (७६) या प्रमाणें केलेलें स्तोत्र स्तुतिप्रिय शिवानें ऐकून हातानें भक्ताला स्पर्श करून अनुग्रह करून हें बोलला (७७) मार्कंडेयानें केलेलें स्तोत्र जो ऐकतो, व जो पठन करितो, त्याला मृत्यूची भीति मुळींच नाहीं; असें खरें खरें श्रीशिव सांगतात. (७८) इतक्यांत देव दुंदुभि वाजवूं लागले, पुष्पवृष्टि पडावयास लागली. आह्मांस मृत्यूची भीति नाहीं, असें संतोषानें लोक ह्मणावयास लागले आहेत. (७९) त्या वेळेस तेथें ब्रह्मदेव वगैरे देव ऋषिगणासह नष्ट झालेल्या कालाला पाहून परमेश्वराची स्तुति करूं लागले.

(८०) देव बोलले— हे नीलकंठा, भक्तप्रिया, तुला नमस्कार असो. त्याच वेळेस तात्काळ योग्यरूप घेणाऱ्या देवा, कालकाला, तुला नमस्कार असो. (८१) पाशहस्ता, त्रिशूलधारिन्, परशुहस्ता, मृत्यूच्या मृत्यो, तुला नमस्कार असो (८२) हे कालरुद्रा, सर्वसंहरणा, स्वतंत्रचेष्टा, सर्वाधिका, तुला नमस्कार असो. (८३) कालविनोदा, भक्तिप्रिय, तुला नमन असो. स्तुत्या, नित्या, भक्तपीडानिवारका, देवा, तुला नमन असो. (८४) हरिहरब्रह्मादिकांनीं प्रणतपादा,

सर्वस्तुत्यस्वरूपाय स्वयमस्तोत्रकारिणे ॥८४॥ नमो विज्ञानगम्याय भक्तिगम्याय ते नमः ॥ नमः स्रष्ट्रेऽखिलस्यास्य पालयित्रे नमो नमः ॥८५॥ नमः सर्वस्य संहर्त्रे परात्परतराय ते ॥ अगतिं ते न जानीमो गतिं नैव प्रभो वयम् ॥८६॥ त्वन्मायामूढचित्तानामस्माकं रक्षणं कुरु ॥ ततः प्रीतो महादेवः कोपमुत्सृज्य दूरतः ॥८७॥ ब्रह्मादीनब्रवीद्देवान् भीतान्गंभीरया गिरा ॥ प्रजापते त्वं विष्णुर्वा शक्रो वाऽन्ये सुरादयः ॥८८॥ अज्ञानादथवा ज्ञानान्मद्भक्तेषु महात्मसु ॥ कुर्युश्चेदपराधं ते दण्ड्या वध्याश्च नित्यशः ॥८९॥मद्भक्तं द्वेष्टि यो मोहादपराध्यति वाऽधमः ॥ न सहे तं दुरात्मानं सहे मय्यपराधिनम् ॥९०॥ मद्भक्तरक्षणायैव मम सर्वं हि चेष्टितं ॥ इति जानीत मद्भक्तान्प्राणेभ्योऽपि गरीयसः ॥९१॥ इति श्रुत्वा वचः शंभोर्ब्रह्माद्याः प्रणतिं गताः ॥ तथास्त्विति ब्रुवन्तोऽन्यत्प्रार्थयामासुरीश्वरम् ॥९२॥

देवा ऊचुः ॥ काले हते प्रभो पश्य भूलोकं प्राणिपूरितम् ॥

---

(नमन करून घेणाऱ्या) स्तोत्र करावयास योग्य स्वरूपाच्या देवा, स्वतः कोणाचें स्तोत्र न करणाऱ्या देवा, तुला नमन असो. (८५) विज्ञानानें मिळणाऱ्या देवा भक्तिगम्या, तुला नमन असो. अखिल जगाची सृष्टि करणाऱ्या देवा, सर्वांचें पालन करणाऱ्या देवा, तुला नमन असो. (८६) सर्व जगाचा संहार करणाऱ्या देवा, परात्परा, गतिरहित तुला आह्मी जाणीत नाहीं. (८७) तुझ्या मायेनें मूढ झालेल्या चित्ताच्या देवा, आमचें रक्षण कर. त्यानंतर कोप दूर सोडून महादेव संतुष्ट झाला. (८८) भीत झालेल्या ब्रह्मादिदेवांना गंभीर वाणीनें श्रीशिव ह्मणाले. हे प्रजापते, हे विष्णो, इंद्रा, इतर देवांनो, (८९) अज्ञानानें होवो, किंवा सज्ञानानें होवो, माहात्मे माझ्या भक्ताविषयीं कोणीं अपराध जर केला; ते निरंतर माझ्या दंडाला व वधाला पात्र आहेत. (९०) मोहामुळें माझ्या भक्ताबरोबर जो द्वेष करतो, व माझ्या भक्तांचा अपराधी जो होतो, त्या दुरात्म्याला कधीं मी सहन करीत नाहीं. तो स्वतः माझा अपराधी आहे. (९१) माझ्या भक्तांच्या रक्षणाकरितां माझ्या या सर्व चेष्टा आहेत; माझ्या भक्तांना प्राणांहीपेक्षां श्रेष्ठ आहेत; असें समजा. (९२) या प्रमाणें श्रीशिवाचें वचन ऐकून ब्रह्मादिदेवांनीं शिवाला नमस्कार केला. मग तथास्तु असें ह्मणून ईश्वराची प्रार्थना करूं लागले.

(९३) देव बोलले— हे प्रभो, काल हा नष्ट होऊन गेल्यानंतर प्राण्यांनीं भर-

विहितं नाचरन्तीमे यदि मृत्योर्न बिभ्यति ॥९३॥ कुर्वतो धर्ममत्यर्थं कालो नयति सद्गतिम् ॥ कुर्वतश्च तथा पापं निरयं काल एव हि ॥९४॥ कालेन भूयतां तस्माच्छुभाशुभफलाप्तये ॥ चतुरभ्यधिकाशीतिर्लक्षाणां योनयः प्रभो ॥९५॥ योनिभेदाश्च संतीह भूस्वर्गनरकालयाः ॥ अष्टविंशातिसंख्याता विमानानां च कोटयः ॥९६॥ स्वर्गे पुण्यकृतां संति पापिनां नरकास्तथा ॥ यदि न म्रियते जन्तुः स्थावरं जंगमं तु वा ॥९७॥ स्वर्गिनारकिणामस्मिन् जननं तत्फलक्षये ॥ एवं चेत्सर्वजन्तूनां नालं वासाय भूरियम् ॥९८॥ शून्याश्च स्वर्गनरका भवेयुः प्राणिवर्जिताः ॥ तस्मात्प्रभो महादेव कालोऽयं जीवतात् पुनः ॥९९॥ अस्मिन्मृतेऽपि भवता सृज्योऽन्यः कालशब्दतः ॥ अयमेव ततो जीवेन्माहात्म्यं भवतः स्मरन् ॥१००॥ भवद्भक्तेषु सर्वेषु नापराधं करिष्यति ॥ इति ब्रह्मादिभिर्देवैरगस्त्याद्यैर्मुनीश्वरैः ॥१०१॥ विज्ञापितो यथातत्त्वं सर्वज्ञोऽनुग्रहान्वितः ॥ कालकालोऽपि कालाय

---

पूर भरलेल्या भूलोकाला पहा. जर मृत्यूपासून भीति याची उडाली; तर हे लोक विहिताचरण कधींही करणार नाहींत (९४) अत्यंत धर्म करणाऱ्या लोकांना काल सद्गतीला नेतो. पाप करणाऱ्या प्राण्याला काल हा नरकाला नेतो. (९५) याकरितां शुभाशुभ फलप्राप्तीकरितां कालाचें अस्तित्व जगांत अवश्य पाहिजे आहे. चौऱ्याऐंशी लक्ष योनि जगांत आहेत. (९६) त्यांत योनींचे अनेक भेद आहेत. भूस्वर्ग व नरकाचीं घरें अठ्ठावीस आहेत. कोट्यावधि विमान आहेत (९७) पुण्यकर्म करणाऱ्या लोकांना स्वर्गामध्यें अनेक विमान आहेत; व पापी लोकांना अनेक नरक आहेत. स्थावर असो; जंगम असो; तो प्राणी जर मेला नाहीं; (९८) व स्वर्गवासी लोकांचा व नरकवासी लोकांचा जन्म कर्मक्षय झाल्यानंतर असाच होत गेला तर सर्व लोकांना राहावयास भूमि पुरावयाची नाहीं. (९९) प्राणी नाहींसे झाल्यामुळें स्वर्ग व नरक शून्य होऊन तसेंच पडतील. हे प्रभो, महादेवा, या करितां कालाला पुनः जीवंत करा. (१००) हा काल मरून जरी पडला आहे, तथापि काल या नांवानें पुनः दुसऱ्याची सृष्टि करा. किंवा आपल्या माहात्म्याचें स्मरण करीत हाच काल पुनः जीवंत होऊं दे. (१०१) तुझ्या भक्तांविषयीं कोणी अपराध करावयाचा नाहीं; याप्रमाणें ब्रह्मादिदेवांनीं व अगस्त्यादि मुनीश्वरांनीं (१०२) यथार्थपणें अनुग्रहांनीं युक्त सर्वज्ञ शिवाची प्रार्थना केली. नंतर कालाचाहीकाल अशा परमेश्वरानें कालाला

तस्मै प्राणं ददौ पुनः ॥१०२॥ मार्कण्डेयोऽपि देवस्य प्रसादात्परमेष्ठिनः ॥ अरोगः कल्पितः स्वास्थ्यो दीर्घमायुरवाप्तवान् ॥१०३॥ इति दत्वा मुनेर्देवो नित्यत्वं नृषु दुर्लभम् ॥ कालं च पूर्ववत्स्वस्थं चकार स्वाधिकारिणम् ॥१०४॥ अस्मिन्काले हतं द्रष्टुं कैलासान्तिकवासिनः॥ मुनयोऽप्याययुः कालं मार्कंडेयं च सत्तमम् ॥१०५॥ प्रणिपत्य महादेवमाभाष्य मुनिपुंगवम् ॥ कालं दृष्ट्वा हतं सर्वे विस्मयोत्फुल्ललोचनाः ॥१०६॥ कालकालं महादेवं तुष्टुवुर्भक्तवत्सलम्॥ ब्रह्मणागस्त्यमुनिना मार्कण्डेयेन चर्षिणा ॥१०७॥ प्रार्थितेन त्रिनेत्रेण नियुक्ता नित्यसेवने ॥ अयं देशो महाभीष्टो माभूद्भक्तैर्विवर्जितः ॥१०८॥ अतो मामत्र सेवध्वं यथा कैलासपर्वते ॥ ततो विसृज्य ब्रह्मादीन् मुनिभिस्तैरुपासितः ॥१०९॥ अंतर्हितो महादेवो लिंगे तस्मिन्स्वविग्रहे ॥ उपास्य देवं वर्तध्वमित्युक्त्वाऽथ प्रजापतिः ॥११०॥ अगस्त्यं च सुराः सर्वे तथा जग्मुर्यथाग-

---

पुनः प्राण दिले. (१०३) परमेष्ठी देवाच्या प्रसादानें मार्कंडेय निरोगी झाला. स्वस्थ झाला; व त्याला दीर्घ आयुष्य मिळालें. (१०४) याप्रमाणें श्रीशिवानें मानवांना दुर्लभ असें नित्यत्व (चिरंजीवित्व) मुनीला देऊन पुनः कालाला अधिकार देऊन स्वस्थ केलें. (१०५) अशा वेळेस कैलासाजवळ राहणारे कांहीं लोक नष्ट झालेल्या कालाला व श्रेष्ठ मार्कंडेयाला पाहावयास आले. (१०६) त्यांनीं श्रीशिवाला नमस्कार केला; व मुनिश्रेष्ठ मार्कंडेयाला संबोधनपूर्वक हाक मारिली. मग तें सर्व नष्ट झालेल्या कालाला पाहून आश्चर्यचकित झाले. (१०७) भक्तवत्सल, कालाचाकाल, भक्तवत्सल महादेवाची स्तुति सर्वांनीं केली. ब्रह्मदेव, अगस्त्यमुनि, मार्कंडेय ऋषि या (१०८) सर्व ऋषींनीं त्रिनेत्राची (शिवाची) प्रार्थना केली. व आपल्या सेवेकरितां त्यांना निरंतर आपल्या जवळ शिवानें ठेविलें. हा देश भक्तांनीं वर्जित कधींही होऊं नये; असा वर दिला. (१०९) आणि सांगितलें कीं, कैलासपर्वतावर माझी सेवा जशी करतां तशी सेवा माझी येथें करा. नंतर ब्रह्मादिकांना सोडून इकडे आल्या नंतर मुनींनीं त्याची उपासना केली. (११०) नंतर स्वशरीर अशा लिंगामध्यें महादेव अंतर्धान पावले. मग देवाच्या उपासनेमध्यें काल घालवा, असें अगस्त्याला सांगून प्रजापति अंतर्धान पावला, (१११) मग सगळे देव जसे आले होते, तसे ते निघून गेले. मृकंडुऋषि आपल्या भार्येसह रम्य शिवपुराला गेला

तम् ॥ ययौ शिवपुरं रम्यं मृकण्डुर्भार्यया सह ॥१११॥ सौवर्णेन विमानेन स्तूयमानो दिविस्थितैः ॥ मार्कण्डेयोऽपि नित्यायुस्त्रैलोक्ये संचचार ह ॥११२॥ कैलासादागतास्ते च मुनयः शंसितव्रताः॥ उपासांचक्रिरे स्वःस्था लिंगस्थं कालहारिणम् ॥११३॥ तत्प्रसादसुसंपर्कास्तदेकशरणास्सदा ॥ विसृज्य मानुषं देहं जग्मुः शिवपुरं शुभम्॥११४॥

सूत उवाच ॥ इत्येष वः समासेन प्रोक्तः कालवधो बुधाः ॥ मार्कण्डेयस्य च मुनेर्नित्यत्वं देवकल्पितम् ॥११५॥ एवं प्रकारा देवस्य प्रसादा भक्तिभाविताः ॥ ज्ञातुं वक्तुं च संख्यातुं न शक्यन्ते पुरातनाः ॥११६॥ य इदं कीर्तयेन्नित्यं शृणुयाद्वा समाहितः ॥ तस्य मृत्युभयं नास्ति शत्रुपीडा च नश्यति ॥११७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे लिंगार्चनामाहात्म्यकथने मार्कण्डेयचरित्रं नाम सप्ततितमोऽध्यायः

---

(११२) सोन्याच्या विमानांत वसून स्वर्गांतल्या देवां कडून स्तुति करून घेत मार्कंडेय ऋषि देखील चिरंजीव होऊन त्रैलोक्यांत संचार करूं लागला.(११३) कैलासाहून आलेले नियामित व्रताचे मुनि स्वर्गस्थ होऊन कालापहारी लिंगस्थ शिवाची उपासना करूं लागले. (११४) त्याच्या प्रसादाच्या संपर्कानें, व मुख्यत्वेंकरून त्यालाच शरण जाऊन मानव देह सोडून शुभकर शिवपुराला गेले.

(११५) सूत बोलले--बुधजनहो, याप्रमाणें कालाचा वध संक्षेपानें तुह्मांला सांगितला. आणि मार्केडेय मुनीला श्रीशिवानें चिरजीवत्व कसें दिलें तेंही सांगितलें. (११६) श्रीशिवाचे अशा प्रकारचे भक्तीनें पुनीत झालेले प्रसाद समजून घ्यावयास, सांगावयास, गणना करावयास पुरातन लोक देखील समर्थ होत नाहींत. (११७) शांत मनानें जो सांगतो, व ऐकतो, त्याला मृत्यूची भीति नाहीं. शत्रूपासून प्राप्त होणारी पीडा नष्ट होते.

याप्रमाणें श्रीमन्नीकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील लिंगार्चनामाहत्म्यकथनांतील मार्कंडेयचरित्र नांवाचा सत्तरावा अध्याय संपला.

## ॥ अथ एकसप्ततितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ईशानसंहितायाम् ॥ ऋषय ऊचुः ॥ श्रुतानि पातकानीह त्वयोक्तानि महामते ॥ यैरन्विताश्च जायन्ते क्रिमयः पक्षिणस्तथा ॥१॥ ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रा वा यतिनोऽपि वा ॥ मूर्खो वा पंडितो वापि श्रीमान् वा निर्धनोऽपि वा ॥२॥ विलोमजाश्च ये केचित्तथा चैवानुलोमजाः ॥ एवंविधानां पापानां राशिं मेरूपमं क्षणात् ॥३॥ के वाऽग्निना च दग्ध्वा तं शिवलोकं व्रजन्ति ते ॥ लघूपायं हि नो ब्रूहि लोकानां हितकाम्यया ॥४॥

सूत उवाच ॥ वक्ष्याम्यहं मुनिश्रेष्ठाः सर्वपातकनाशनम् ॥ उपायं सर्वभूतानामयत्नेन स मुक्तिदम् ॥५॥ पुरा कैलासशिखरे सांबः सानुचरः शिवः ॥ ब्रह्मादिभिः सुरगणैः सेव्यमानः सदैव हि ॥६॥ एकदा तु महादेवी शिवमक्षरमव्ययम् ॥ प्रणम्य पतिमीशानमपृच्छद्वृषभध्वजम् ॥७॥

देव्युवाच ॥ संति पापानि देवेश बहूनि विविधानि च ॥तानि पापानि दग्ध्वा तु त्वत्सायुज्यं कथं व्रजेत् ॥८॥ देव देव महादेव

---

श्रीशिवास नमस्कार असो. स्कांदपुराणांतील ईशानसंहितेंत ह्मटलें कीं,– ऋषि बोलले--(१) हे महामते, तूं सांगितलेलीं पातकें जीं ऐकिलीं, त्यां पातकांनीं युक्त होऊन प्राणी किडे पक्षी यांच्या जन्माला जातात. (२) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, यति, मूर्ख, पंडित, श्रीमान, निर्धन, (३) विलोमज जे कोणी असतील ते, आणि अनुलोमज असल्या मेरूसारख्या पापराशीला एका क्षणांत (४) कोणत्या अग्नीनें जाळून ते शिवलोकाला जातात? लोकांच्या हिताकरितां आह्माला थोडक्यांतला उपाय सांगा.

(५) सूत बोलले--मुनिश्रेष्ठहो, सर्व पातकांचा नाश करणारा उपाय सांगतों, ऐका. त्या उपायानें सर्व प्राणी प्रयत्न न करितां मुक्तीला जातात. (६) पूर्वी कैलासशिखरावर अनुचरसहित सांबाची सेवा सर्वदा ब्रह्मादिदेव करीत होते. (७) एकदा महादेवीनें अक्षर, अव्यय अशा शिवाला नमस्कार करून वृषभध्वज शिवाला प्रश्न केला कीं,–

(८) देवी बोलली–हे देवा, पातकें पुष्कळ अनेक प्रकारचीं आहेत. तीं पातकें सर्व जळून तुझ्या सायुज्याला लोक कसे जातात? (९) हे महादेवा,

वद कारुण्यमस्ति चेत् ॥ उक्तो देव्या महादेवः पार्वतीमभिनंद्य च ॥९॥ शिवरात्रिव्रतं तस्यै प्रोक्तवांच्छंकरः स्वयम् ॥ षण्मुखाय पुरा प्रोक्तं पार्वत्या शिवभाषितम् ॥१०॥ तदेव कथयिष्यामि द्वैपायनमुखाच्छ्रुतम् ॥ शिवरात्रिव्रतं नाम सर्वपापतृणानलम् ॥११॥ आचंडालमनुष्यान्तं भुक्तिमुक्तिप्रदायकम्॥१२॥

ऋषय ऊचुः ॥ कदा प्रसिद्धमभवद्व्रतमेतन्महामते ॥ व्रतस्यैव च माहात्म्यं विधानमखिलं वद ॥१३॥

सूत उवाच ॥ एवमेव मया पृष्टः पुरा द्वैपायनो मुनिः ॥ कारणं चैव माहात्म्यं विधानं प्रोक्तवान्मम ॥१४॥ शृणुध्वं मुनयः सर्वे व्यासोक्तं कथयामि वः ॥ चतुर्युगसहस्रं तु ब्रह्मणो दिनमुच्यते ॥१५॥ तद्वद्युगसहस्रं तु तथा रात्रिरिति श्रुतिः॥ब्रह्मणो रजनीशेषे तोयमग्नामिमां हरिः ॥१६॥ वराहरूपमास्थाय सशैलवनकाननाम् ॥ उद्धृत्य स्थापयामास यथापूर्वं गदाधरः ॥१७॥ सदाऽहं जगतां कर्ता सर्वलोकपितामहः ॥

---

देवाधिदेवा आमच्यावर तुझी करुणा येत असेल तर हें सर्व सांगा. याप्रमाणें देवीनें महादेवास प्रश्न केला. मग पार्वतीचें अभिनंदन करून (१०) श्रीशिवानें स्वतः तिला शिवरात्रीचें अनुष्ठान सांगितलें. हेंच अनुष्ठान पूर्वी एकदा पार्वतीनें षण्मुखाला सांगितलें होतें. (११) सर्व पापरूपी गवताला अग्नीप्रमाणें असणारें हें शिवरात्रीचें व्रत व्यासाच्या मुखानें जसें ऐकिलें, तसें मी सांगतों. (१२) तें व्रत केलें असतां चांडालापासून चांगल्या मनुष्यापर्यंत भुक्ति आणि मुक्ति मिळते.

ऋषि बोलले—हे महामते सूता, हें व्रत केव्हां प्रसिद्ध झालें सांगा. (१३) या व्रताचें माहात्म्य व विधान सर्व सांगा.

(१४) सूत बोलले—याप्रमाणेंच पूर्वी वेदव्यासाला प्रश्न केला; तेव्हां त्यानें या व्रताचें कारण माहात्म्य विधान वगैरे सर्व सांगितलें. (१५) ब्राह्मणहो; व्यासानें सांगितलेलें सर्व कांहीं सांगतों ऐका. चार युगें हजार वेळां फिरलीं ह्मणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. (१६) त्याप्रमाणेंच चार युगें हजारवेळां फिरलीं ह्मणजे एक रात्र होते; असें श्रुति सांगते. ब्रह्मदेवाच्या अवशिष्ट रात्रीच्या वेळेस उदकांत मग्न झालेल्या पृथ्वीला श्रीहरि (१७) वराहरूप घेऊन गदा हातांत घेऊन पर्वतवनांसहित उद्धार करून पूर्वीप्रमाणें स्थापना करतो. (१८) सर्वदां जगाचा कर्ता मी असून सर्व लोकांचा पितामह मी आहें. माझ्या बरोबरीचा

मया समोऽधिको वाऽपि नास्ति लोके सुरोत्तमः ॥१८॥ एवं गर्वान्वितो विष्णुः सुष्वाप क्षीरसागरे ॥ निशासुप्तोत्थितो ब्रह्मा ससर्ज सकलाः प्रजाः ॥१९॥ भूरादिसप्तलोकांश्च तथा पातालसप्तकम् ॥ देवोरगमनुष्यादीन्यथापूर्वमकल्पयत् ॥२०॥ एकदा स्वात्मना सृष्टान् लोकान्द्रष्टुं ययौ विधिः ॥ भूरादिसप्तलोकांस्तु दृष्ट्वा पातालसप्तकम् ॥२१॥ विस्मयेनान्वितो ब्रह्मा उवाचैवात्मनाऽऽत्मनि ॥ एवं विधानां लोकानां सदा कर्ताऽस्मि नापरः ॥२२॥ मया समोऽधिको वाऽपि नास्ति लोके सुरोत्तमः ॥एवं दृष्ट्वा तु लोकांश्च ब्रह्माऽहंकारमागतः ॥२३॥ समुद्रान्सरितो द्रष्टुं क्षीरोदधिमुपागमत् ॥ ब्रह्मा ददर्श तत्रस्थं नागपर्यंकशायिनम् ॥२४॥नारायणमनाद्यन्तं योगनिद्रापरायणम् ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ किं शेषे कस्त्वं कथय मे स्फुटम् ॥२५॥ ततः प्रबोधितो विष्णुरुवाच चतुराननम् ॥ अहमेव जगत्कर्ता तवाऽपि चतुरानन॥२६॥किमर्थमिह संप्राप्तः कस्त्वं कथय मे स्फुटम् ॥ तच्छ्रुत्वाऽमर्षताम्राक्षो

---

सुरश्रेष्ठ दुसरा कोणी नाहीं. (१९) अशा गर्वानें युक्त होऊन विष्णु क्षीरसमुद्रांत निजतो. रात्रीं निजून उठलेला ब्रह्मदेव सर्व प्रजेची सृष्टि करतो. (२०) भू वगैरे सातलोक, तसेंच पाताल वगैरे सातलोक, देव, सर्प, मनुष्य वगैरे यांची पूर्वीप्रमाणें जगांत सृष्टि करून स्थापना करतो. (२१) असें केल्यानंतर एकेवेळेस आपण सृष्टि केलेल्या लोकांना पाहण्याकरितां ब्रह्मदेव आला. (येथें क्रियापद बदललें) मग भूरादिसप्त लोक व पातालादिसप्त लोक पाहून (२२) आश्चर्यानें युक्त होऊन आपणच आपल्या ठिकाणीं बोलला. अशा लोकांची सृष्टि करणारा माझ्या शिवाय दुसरा कोणी नाहीं. (२३) माझ्यासमान जगांत सुरश्रेष्ठ दुसरा कोणी नाहीं. लोकाला पाहून अशा तऱ्हेची सृष्टि माझ्या हातून होते ह्मणून त्याला गर्व चढला. (२४) नंतर तो ब्रह्मदेव समुद्रांना नद्यांना पाहावयास क्षीरसमुद्राला आला. त्याठिकाणीं बसलेल्या शेषशायी विष्णूला त्यानें पाहिलें (२५) आदि अंतरहित, योगनिद्रेंत आसक्त अशा नारायणाला पाहून ह्मणाला कीं, अरे तूं कोण आहेस? ऊठ ऊठ, मला स्पष्ट सांग. (२६) नंतर जागा होऊन ब्रह्मदेवाला विष्णु बोलला. हे ब्रह्मदेवा, जगाचा कर्ता मी असून तुझी सृष्टि देखील मींच केली आहे; असें बोलला. (२७) तूं येथें कां आला आहेस ? हें स्पष्ट मला सांग. असें ऐकून सहन न होऊन डोळे लाल करून ब्रह्मदेव विष्णूला बोलला.

ब्रह्मा प्राह जनार्दनम् ॥२७॥ मयि स्थिते जगन्नाथे भवान् लोकेश्वरः कथम् ॥ मां जित्वा समरे शीघ्रं भवान् लोकेश्वरो भव ॥२८॥ ब्रह्मणो वचनं श्रुत्वा विष्णुः कोपसमन्वितः ॥एहि योधय दुर्बुद्धे शिरश्छेत्स्यामि ते युधि ॥२९॥ इत्युक्त्वाऽसौ हृषीकेशो युद्धोद्योगं चकार च ॥ शार्ङ्गधन्वा हृषीकेशो धनुरारोप्य वेगवान् ॥३०॥ ज्याघोषतलघोषं च चकार मधुहा पुनः ॥ ज्याघोषतलघोषाभ्यां पूरयामास रोदसी ॥३१॥ शरमारोप्य धनुषि विकृष्य सशरं धनुः ॥ ब्रह्मणे प्रेषयामास शराना-शीविषोपमान् ॥३२॥ शीघ्रेण चिच्छिदे बाणांस्तत्र विष्णोश्चतुर्मुखः ॥ ब्रह्मा च शस्त्रवर्षाणि ववर्ष हरिमूर्धनि ॥३३॥ तदस्त्रजालमखिलं विष्णुश्चिच्छेद संयुगे ॥ बाणैराशीविषाकारैः समरे विधिमार्दयत् ॥३४॥ हरिणा प्रेषितान्बाणान्समरे चतुराननः ॥ कुशाग्रेणैव चिच्छेद हरिं समरमूर्धनि ॥३५॥ मुसलैरायसैः शूलैश्छादयामास संयुगे॥ तैरार्दितो हरिः क्रुद्धो ब्रह्मणो वधकांक्षया ॥३६॥ चक्रं मुमोच वेगेन हतोऽसीत्यवदद्धरिः ॥ ज्वालामालावृतं चक्रं दृष्ट्वा तत्र चतुर्मुखः ॥३७॥ अस्त्रं

---

(२८) अरे, जगाचा प्रभु मी असतां लोकेश्वर तूं कसा होतोस ? समरांत मला जिंकून तूं लोकेश्वर हो. (२९) ब्रह्मदेवाचें वाक्य ऐकून विष्णु रागावून ह्मणाला कीं, हे दुर्बुद्धे, ये; माझ्याबरोबर युद्ध कर; तुझें डोकें कापून टाकतों. (३०) असें बोलून विष्णूनें युद्धाचा उद्योग केला. शार्ङ्ग नांवाचें धनुष्य हातांत घेऊन तें चढवून वेगानें पुढें सरसावून (३१) मधुहंता विष्णूनें पुनः प्रत्यंचा ओढिली; व मोठा घोष काढिला. त्यायोगानें पृथ्वी व आकाश भरून गेलें. (३२) धनुष्य आकर्षण करून त्याला बाणसंधान करून सर्पासारखे बाण ब्रह्मदेवाकडे त्यानें पाठवून दिले. (३३) इतक्यांत ब्रह्मदेवानें विष्णूचे बाण तोडून टाकिले. तसेंच ब्रह्मदेवानें श्रीहरीच्या मस्तकावर शस्त्रांचा वर्षाव केला. (३४) तें सर्व अस्त्रजाल समरांत विष्णूनें तात्काळ नाहींसें केलें. नंतर सर्पासारखे असणाऱ्या बाणांनीं समरांत ब्रह्मदेवाला मारिलें. (३५) समरांगणांत श्रीहरीकडून आलेले बाण ब्रह्मदेवानें एका दर्भाच्या अग्रानें मोडून टाकिलें. आणि श्रीहरीला (३६) लोखंडाच्या मुसळांनीं, शूलांनीं मारून आच्छादून टाकिलें. अशा तऱ्हेनें पीडित होऊन रागावून ब्रह्मदेवाला मारण्याच्या कांक्षेनें (३७) वेगानें त्याच्यावर विष्णूनें सुदर्शन सोडिलें; आणि अरे तूं आतां मेलास असें विष्णु बोलला. सभोंवतीं प्रसरलेल्या ज्वाळांनीं युक्त अशा सुदर्शनाला पाहून त्यांत चतुर्मुखानें (३८) ब्रह्मशिर नांवाचें

ब्रह्मशिरो नाम प्रत्यस्त्रमसृजद्विधिः ॥ तदस्त्रतेजसा चक्रं भग्नं दृष्ट्वा गदाधरः ॥३८॥ क्रोधेन महता युक्तो हंतुं ब्रह्माणमाहवे ॥ अस्त्रं पाशुपतं नाम प्रादुश्चक्रे जनार्दनः ॥३९॥ प्रलयानलसंकाशं ज्वालामालाविदीपितम् । दृष्ट्वा तच्छमनार्थं तु प्रत्यस्त्रं चतुराननः ॥४०॥ अस्त्रं पाशुपतं नाम सस्मार भयविह्वलः ॥ अभिमंत्र्य तदस्त्रेण चोत्ससर्ज विधिस्तदा ॥४१॥ तदस्त्रयुद्धमभवद्दिव्याब्दानां शतं पुरा ॥ विष्णुना प्रेषितास्त्रस्य ज्वालाः पेतुः समंततः ॥४२॥ ब्रह्मणा प्रेषितास्त्रस्य ज्वालाः पेतुः समन्ततः ॥ तदस्त्रज्वालया दग्धं त्रैलोक्यमखिलं तदा ॥४३॥ विष्णुना प्रेषितं चास्त्रं ब्रह्माणं हन्तुमागतम् ॥ ब्रह्मणा प्रेषितं चास्त्रं विष्णुं हन्तुमुपागमत् ॥४४॥ ज्वालामालासमाकीर्णौ ब्रह्मविष्णू तदा स्थितौ ॥ पिता यः सर्वलोकानां विधेर्विष्णोश्च यः पिता ॥४५॥ स शिवः सर्वलोकानां दयां चक्रे तयोरपि ॥ तद्युद्धशमनार्थाय तयोः संरक्षणाय च ॥४६॥ माघकृष्णचतुर्दश्यां तयोर्मध्ये महानिशि ॥ आत्मानं दर्शयामास लिंगरूपं महेश्वरः ॥४७॥ कोटिसूर्यप्रतीकाशं मध्ये लिंगं समा-

---

अस्त्र प्रतिउत्तराकरितां पाठिविलें. त्या अस्त्राच्या तेजानें चक्र तुटलें; तें विष्णूनें पाहून (३९) मोठ्या क्रोधानें युक्त होऊन ब्रह्मदेवाला मारण्याकरितां समरांगणांत जनार्दनानें पाशुपत नांवाचें अस्त्र प्रकट केलें. (४०) प्रलयाग्नीप्रमाणें भासणारें ज्वाळांच्या पंक्तींनीं प्रकाशणारें तें अस्त्र पाहून भयानें विव्हल होऊन त्याच्या उपशमाकरितां प्रत्यस्त्र (प्रतिउत्तरादाखल अस्त्र) (४१) पाशुपत नांवाच्या अस्त्राचें स्मरण भिऊन केलें. त्या अस्त्राचें अभिमंत्रण करून ब्रह्मदेवानें पुनः त्यावर सोडिलें (४२) त्या अस्त्रांचें युद्ध देवमानानें शंभर वर्षेंपर्यंत झालें. विष्णूनें पाठविलेल्या अस्त्राच्या ज्वाळा चोहोंकडे पसरल्या. (४३) तसेंच ब्रह्मदेवानें पाठविलेल्या अस्त्रांच्या ज्वाळाही चोहोंकडे पसरल्या. त्या योगानें हें त्रैलोक्य सर्व जळालें. (४४) विष्णूनें पाठिविलेलें अस्त्र ब्रह्मदेवाला मारण्याकरितां धांवलें; व ब्रह्मदेवानें पाठविलेलें अस्त्र विष्णूला मारण्याकरितां धांवलें. (४५) अशा तऱ्हेच्या भयंकर ज्वाळांच्या लोळामध्यें ब्रह्मा आणि विष्णु दोघेही सांपडले. सर्व लोकांचा व विष्णु व ब्रह्मदेव यांचाही जो पिता (जनक) (४६) त्या श्री शिवानें त्या दोघांवर दया केली. त्या युद्धाच्या उपशमाकरितां व त्या दोघांच्या संरक्षणाकरितां (४७) माघकृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं मध्य रात्रीच्या वेळेस त्या दोघांच्या मधोमध महेश्वरानें आपलें लिंगरूप दाखविलें. (४८) तें कोट सूर्य-

स्थितं॥तल्लिंगमध्ये संलीनं तदा चास्त्रद्वयं तयोः॥४८॥तदद्भुततमं दृष्ट्वा ब्रह्मविष्णू परस्परम् ॥ ऊचतुर्विस्मयाविष्टौ द्रष्टुं लिंगं तदा किल॥४९॥ अधोभागमहं यास्ये त्वं चोर्ध्वं चतुरानन ॥ स चोर्ध्वं गतवान् ब्रह्मा हंसरूपी तदा किल॥५०॥वराहरूपमास्थाय द्रष्टुं हरिरधो ययौ॥बहुवर्ष-सहस्राणि गत्वा दृष्ट्वाऽऽगतौ पुनः ॥५१॥ ब्रह्मा स्थितो दक्षिणतो वाम-भागे हरिः स्थितः ॥ स्वात्मनोः कारणं मत्वा शिवं तौ भक्तिसंयुतौ ॥५२॥ कृतांजलिपुटौ भूत्वा शिवं स्तोतुं समुद्यतौ ॥ तयोर्ब्रह्मा पुरा विप्राः स्तोतुं समुपचक्रमे ॥५३॥

ब्रह्मोवाच ॥ नमस्ते सर्वलोकानामादिकर्त्रे महात्मने ॥ पुरुषाय पुराणाय परंज्योतिःस्वरूपिणे ॥५४॥ चक्रभ्रमणकर्ता त्वं सदा शंभो नमोऽस्तु ते ॥ प्रेरकः सर्वजगतामन्तर्यामी हृदि स्थितः ॥५५॥ त्वन्मायाऽपहतप्रज्ञो न जाने त्वां महेश्वर ॥ मम कर्ता त्वमेवेश कर्ता विष्णोस्त्वमेव च ॥५६॥ वाचामगम्यतां यातो विश्वरूपोऽसि सर्वगः ॥

---

प्रमाणें भासत असून मध्यभागीं तें लिंग प्रकट झालें होतें. त्या लिंगाच्या मध्य भागीं दोनी अस्त्रें लपलीं. (४९) अत्याश्चर्यकर तें पाहून परस्पर ब्रह्मा व विष्णु दोघे बोलले व त्यांना तें अत्यंत आश्चर्य वाटलें. अर्थात तें लिंग पाहण्याकरितां आपसांमध्यें असें ठरविलें कीं, (५०) हे ब्रह्मदेवा, या बिलाच्या खालीं मी जातों, व तूं वर जा असें ह्मटल्या बरोबर ब्रह्मदेव हंसाचें रूप घेऊन वर निघून गेला. (५१) नंतर वराहाचें रूप घेऊन खालीं श्रीहरि गेला, पुष्कळ हजार वर्षें पर्यंत जाऊन दोघेही पुनः परत आले. (५२) ब्रह्मदेव उजवीकडे राहिला, व डावीकडे श्रीहरि राहिला. आपणा दोघांना शुभकारण आहे, असें समजून दोघेही भक्तीनें युक्त होऊन (५३) हात जोडून शिवाची स्तुति करीत उभे राहिले. ब्राह्मणहो, आधीं ब्रह्मदेवानें स्तोत्र करावयास आरंभ केला. (५४) सर्व लोकाचा आदिकर्ता, महात्मा, पुरुषा, पुराणा, परंज्योतिःस्वरूपा, तुला नमन असो. (५५) चक्र भ्रमण करणाऱ्या हे शंभो तुला नमन असो. तूं सर्व जगाचा प्रेरक असून सर्वांतर्यामी असून प्रत्येकाच्या हृदयामध्यें राहिला आहेस. (५६) तुझ्या मायेच्या योगानें माझी बुद्धि नष्ट झाल्यामुळें तुला मी जाणत नाहीं. हे ईशा, माझा कर्ता तूंच असून विष्णूचा कर्ताही तूंच आहेस. (५७) तूं वाणीला अगम्य ( न समजणारा) असून विश्वरूप असून सर्वव्यापी आहेस. याकरितां स्तोत्र करावयास मी

अतः स्तोतुं न शक्नोमि योऽसि सोऽसि नमोऽस्तु ते ॥५७॥ एवं स्तुत्वा ब्रह्मयोनिस्तूष्णीमास द्विजोत्तमाः ॥ ततः शिवं प्रभुर्विष्णुः स्तोतुं समुपचक्रमे ॥५८॥

विष्णुरुवाच ॥ सर्गस्थितिविनाशानां कर्ता त्वं सर्वदा शिव ॥ त्वन्मायामोहितो देव न जाने त्वां महेश्वर ॥५९॥ पशवो हि वयं सर्वे सदेवासुरमानवाः ॥ पतिस्त्वमेव सर्वेषां पशूनां परमेश्वर ॥६०॥ हतानि विष्णुवृंदानि गीर्वाणब्रह्मकोटयः ॥ त्वयैकेन सदा शंभो पाहि मां भक्तवत्सल ॥६१॥ असमर्थो यथा द्रष्टुमुलूको रविमण्डलम् ॥ तथैव त्वामहं द्रष्टुमसमर्थो महेश्वर ॥६२॥ विकारषट्करहितनित्योदितवृहद्वपुः ॥ चित्तवर्जितचिद्रूप योऽसि सोऽसि नमोऽस्तु ते ॥६३॥

सूत उवाच ॥ एवं स्तुतस्तदा ताभ्यां कृपया परमेश्वरः ॥ लिंगमध्याद्विनिष्क्रम्य शंकरः स्वात्मनो वपुः ॥६४॥ चकार भगवाञ्छंभुर्महादेवो घृणानिधिः ॥ तथा संदर्शयामास वपुषा चात्मनस्तयोः ॥६५॥ आदिभूतमजं शंभुं ब्रह्मा विष्णुश्च सांप्रतम् ॥ ननंदतुस्तौ तत्रस्थौ दृष्ट्वा सांबं सदाशिवं ॥६६॥ अर्धनारीश्वरं देवं त्रिनेत्रं नीललोहितम् ॥

---

समर्थ नाहीं. जो तूं आहेस, त्या तुला नमस्कार असो. (५८) ब्राह्मणश्रेष्ठहो, ब्रह्मदेव याप्रमाणें स्तुति करून स्वस्थ बसला. नंतर विष्णूनें श्रीशिवाची स्तुति केली.

(५९) विष्णु बोलला—हे शिवा, सृष्टि, स्थिति, लय. यांचा कर्ता तूं आहेस. तुझ्या मायेनें मोहित होऊन मी कांहीं एक जाणत नाहीं. (६०) देव, असुर, मानव हे सर्व आम्ही पशु आहोंत. हे परमेश्वरा, सर्व पशूंचा पति तूं एकटाच आहेस. (६१) हजारो विष्णु, हजारो देव, हजारो ब्रह्मदेव तूं मारिले असतील, तर हे भक्तवत्सला शंभो, माझें रक्षण कर. (६२) घुबड जसा सूर्याला पाहूं शकत नाहीं तसेंच हे महेश्वरा, तुला मी पाहावयास समर्थ होत नाहीं. (६३) षड्विकार रहित असून तूं नित्य आहेस निरंतर तुझें शरीर मोठें असतें. मनरहित असून आनंदस्वरूप आहेस. असा जो तूं असशील, त्या तुला नमन असो.

(६४) सूत बोलले—या प्रमाणें त्या दोघांनीं स्तोत्र केल्यानंतर कृपेनें परमेश्वरानें लिंगाच्या मधून निघून शंकर नांवाचें आपलें शरीर (६५) दाखविलें. कृपानिधि, शंभु, महादेव परमेश्वरानें त्या दोघांना आपलें रूप दाखविलें. (६६) आदिभूत, जन्मरहित, श्रीशंभूला पाहून ब्रह्माविष्णूला आनंद झाला. तेथेंच राहून दोघांनीं सदाशिवसांबाला पाहिलें. (६७) अर्द्धनारीश्वर असून त्याला तीन डोळे

वरदाभयहस्तं च मृगं टंकधरं प्रभुम् ॥६७॥ सर्वाभरणसंयुक्तं गणकोटिसमन्वितम् ॥ कोटिसूर्यप्रतीकाशं बालचंद्रावतंसकम् ॥६८॥ दृष्ट्वा विस्मयमापन्नौ भक्त्या संपूज्य शंकरम्॥नीलरुद्रेण रुद्रेण त्वरितेन महेश्वरम् ॥६९॥शिखयाऽथर्वशिरसा सूक्तैर्बहुविधैरपि ॥ स्तुत्वा बहुविधैः स्तोत्रैः कृतांजलिपुटौ स्थितौ ॥७०॥ ब्रह्मा विष्णुश्च देवेशं सर्वलोकमहेश्वरम्॥हरिकेशस्तदा ताभ्यां भक्त्या परमया स्तुतः ॥७१॥ उवाच वचनं चारु परिपूर्णार्थमीश्वरः ॥७२॥

ईश्वर उवाच ॥ श्रृणु पद्मज मद्वाक्यं त्वं विष्णो गरुडध्वज ॥ अहमेव जगत्कर्ता युवयोः कारणं त्वहम् ॥७३॥ मत्प्रसादात्पदं लब्धं ब्रह्मन् विष्णो त्वयाऽनघ ॥ युवयोरस्त्रतेजोभिर्दग्धं तद्युवयोः पदम् ॥७४॥ शिवरात्रिव्रतं नाम युवाभ्यां सुकृतं त्विदम् ॥ तस्मात्प्रीतः पदं दास्ये युवयोर्लोकपूजितौ ॥७५॥

ब्रह्मविष्णू ऊचतुः ॥ त्वन्मायामोहितधियौ निक्षिप्तौ दुःखसागरे ॥

---

होते. तो नील असून रक्ता सारखा तांबडा होता. हातामध्यें मृग टंक धारण केलेला असून अभयदर्शक एक हात होता, व दुसरा वरदसूचक होता. (६८) अंगावर सर्व डागिने घातले असून कोट्यावधिगणांनीं युक्त तो होता. कोटि सूर्यांप्रमाणें तो भासत असून बालचंद्र त्याच्या डोक्यावर शोभत असे. (६९) असें स्वरूप पाहून दोघेही आश्चर्यचकित झाले. नंतर भक्तीनें शंकराची पूजा करून नीलरुद्रमंत्रानें, रुद्रमंत्रानें, महेश्वराची स्तुति (७०) अथर्वशिखेनें व अथर्वशीर्षानें व पुष्कळ स्तोत्रांनीं स्तोत्र करून हात जोडून उभे राहिले. (७१) सर्व लोकांचा ईश्वर अशा शिवाची स्तुति ब्रह्माविष्णूंनीं केली. परमभक्तीनें केलेलें स्तोत्र पाहून (७२) ईश्वरानें परिपूर्णार्थाचें वचन सांगितलें.

(७३) ईश्वर बोलले—हे ब्रह्मदेवा, व गरुडध्वजा विष्णो, माझें वाक्य ऐका. मीच जगाचा कर्ता असून तुह्मा दोघांना कारण मीच आहें. (७४) हे अनघा विष्णो, माझ्या अनुग्रहानें हें पद तुला मिळालें. तुमच्या दोघांच्या दोन्ही अस्त्रांच्या तेजानें तुमचीं स्थानें जळालीं. (७५) तुह्मीं दोघांनीं हें शिवरात्रिव्रत चांगलें केलें. ह्मणून मी तुमच्यावर संतुष्ट होऊन उत्तम पद देतों, व माझ्या प्रसादानें तुह्मी दोघेही लोकमान्य व्हाल.

(७६) ब्रह्माविष्णु बोलले—हे देवा, तुझ्या मायेनें मोहित होऊन आह्मी दुःख

कथमापन्न भवति त्वत्प्रसादः कथं भवेत् ॥७६॥

ईश्वर उवाच ॥ शिवरात्रिव्रतं नाम सर्वापत्तारणं नृणाम् ॥ सदा मम प्रियकरं मत्सायुज्यफलप्रदम् ॥७७॥

ब्रह्मविष्णू ऊचतुः ॥व्रतस्यास्य विशेषेण तिथिं ब्रूहि महेश्वर॥यस्मिन्कृत्वा व्रतं सम्यक्त्वत्सायुज्यमवाप्नुयात् ॥७८॥

ईश्वर उवाच ॥ युवयोर्वैरशांत्यर्थमस्त्राग्निशमनाय च ॥ माघकृष्णचतुर्दश्यामादिदेवो महानिशि ॥७९॥ अभवल्लिंगरूपेण भक्तानामनुकंपया ॥ लिंगमध्ये समभवन्नर्द्धनारीश्वरो ह्यहम् ॥८०॥ तत्कालव्यापिनी ग्राह्या शिवरात्रिव्रते तिथिः ॥ तत्र कृत्वा महत्पुण्यं भविष्यति न संशयः ॥८१॥ उदयादिः क्वचिद्ग्राह्या क्वचिदस्तमयान्विता ॥ व्रतिभिस्तिथयो यत्नाद्वर्जयित्वा व्रतं त्विदम् ॥८२॥ अर्द्धरात्रादधश्चोर्ध्वं युक्ता यत्र चतुर्दशी ॥ तत्तिथावेव कुर्वीत शिवरात्रिव्रतं व्रती ॥८३॥ अर्द्धरात्रादधश्चोर्ध्वं नास्ति यत्र चतुर्दशी॥नैव तत्र व्रतं कुर्यादायुरैश्व-

---

सागरांत पडलों. आह्मी संकटांतून पार कसें होऊं, व तुझा प्रसाद आमच्यावर कसा होईल बरें ?

(७७) श्रीशिव बोलले–शिवरात्रिव्रत हें मनुष्यांच्या सर्व संकटांचा परिहार करणारें आहे. शिवाय माझ्या आवडीचें असून माझें सायुज्यफल देणारें आहे.

(७८) ब्रह्माविष्णु बोलले–हे महेश्वरा, विशेषेंकरून या व्रताची तिथि कोणती आहे; हें आह्मांस सांगा. ज्या तिथीला हें व्रत केलें असतां तुझें सायुज्य मिळेल, अशी ती तिथि सांगा.

(७९) शिव बोलले–तुह्मा दोघांच्या अस्त्राग्नीच्या शांतीकरितां आणि तुमच्या वैराच्या शांती करितां आदिदेव मी माघकृष्ण चतुर्दशीला महाशिवरात्रीच्या दिवशीं (८०) भक्तावर अनुग्रह करावयाच्या इच्छेनें लिंगस्वरूपानें प्रकट झालों. त्याच लिंगामध्यें अर्धनारीच्या रूपानें ईश्वर मी तुमच्यापुढें प्रकट झालों. (८१) शिवरात्रिव्रताला तात्काल व्यापिनी जी तिथि असेल, तीच तिथि घ्यावी. त्या तिथीला हें व्रत केलें असतां मोठें पुण्य लागेल; यांत संशय नाहीं. (८२) कांहीं व्रतांला उदयापासून तिथि घेत असतात, कांहीं व्रतांला अस्तसमयाला लागलेली तिथि घेतात. शिवरात्रिव्रत करणाऱ्यांनीं प्रयत्नपूर्वक अशी तिथि सोडून. (८३) अर्ध्यारात्रीच्यावर चतुर्दशी लागेल त्याच तिथीच्या दिवशीं व्रत करणाऱ्यानें हें शिवरात्रि व्रत करावें. (८४) अर्ध्यारात्रीच्या खालीं आणि वर चतुर्दशी तिथि

र्महानिदा ॥८४॥ व्याप्यार्द्धरात्रं यस्यां तु लभ्यते या चतुर्दशी ॥ तस्यामेव व्रतं कार्यं मत्प्रसादार्थिभिर्नरैः ॥८५॥ पूर्वेद्युरपरेद्युर्वा महानिशि चतुर्दशी ॥ व्याप्ता सा दृश्यते यस्यां तस्यां कुर्याद्व्रतं नरः ॥८६॥ लिंगाविर्भावकाले तु व्याप्ता ग्राह्या चतुर्दशी ॥ तदूर्ध्वाधोन्विता वापि न ग्राह्या व्रतिभिः सदा ॥८७॥ शिवरात्रिव्रतं कार्यं भूतान्वितमहानिशि ॥ तस्मिन्नेव व्रतं कृत्वा मम सायुज्यमाप्नुयात् ॥८८॥

ब्रह्मविष्णू ऊचतुः ॥ व्रतस्यास्य महादेव विधानं सकलं वद ॥ अत्र पूजाविधिं द्रव्यं विस्तरेण महेश्वर ॥८९॥

ईश्वर उवाच ॥ शृणु ब्रह्मन् व्रतविधिं शृणु विष्णो गदाधर ॥ मम प्रियकरी ह्येषा माघकृष्णचतुर्दशी ॥९०॥ महानिश्यन्विता यत्र तत्र कुर्याद्व्रतं त्विदम् ॥ पूर्वेद्युरेकदाऽश्नीयाद्दन्तधावनपूर्वकम् ॥९१॥ अद्रोहेणान्वितः कुर्याद्ब्रह्मचर्यव्रती व्रतम् ॥ ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय कृतशौचविधिक्रमः ॥९२॥ अभिवाद्य गुरुं भक्त्या तदनुज्ञामवाप्य च ॥ शि-

---

नसेल तर त्या दिवशीं हें शिवरात्रिव्रत करूं नये. केलें तर ऐश्वर्य आयुष्य यांची हानि होते. (८५) अर्धरात्र व्यापून जी तिथि असेल त्या तिथीच्या दिवशींच हें व्रत करावें. म्हणजे त्यांच्यावर माझा अनुग्रह होतो. (८६) आधल्या दिवशीं किंवा दुसऱ्या दिवशीं व महानिशीथाला तिथि व्यापिली असेल तर त्या तिथीच्या दिवशीं हें व्रत मनुष्यानें करावें. (८७) लिंगप्रादुर्भावाची वेळ ती व्याप्त चतुर्दशी घ्यावी लागते. त्याच्यावर किंवा खालीं व्यापिलेली असली तरी व्रतस्थ माणसांनीं व्रत करूं नये. (८८) शिवरात्रि व्रत हें भूतांनीं युक्त महानिशीथालाच (अर्धरात्रीलाच) केलें पाहिजे. तेव्हां व्रत केलें तरच मनुष्याला माझें सायुज्य मिळतें.

(८९) ब्रह्मविष्णु बोलले—हे महादेवा, या व्रताचें सर्व विधान आम्हांस सांगा. हे महेश्वरा, या तिथीच्या दिवशीं पूजा कशी करावी? पूजेचें विधान काय? पूजाद्रव्य कोणतें? हें सर्व विस्तारानें सांगा.—

(९०) शिव बोलले—हे ब्रह्मन्, विष्णो, गदाधरा, व्रताचें विधान सांगतों ऐका ही माघकृष्ण चतुर्दशी माझी मोठी आवडती आहे. (९१)महानिशीथानें युक्त जी तिथि असेल, त्या तिथीच्या दिवशीं हें व्रत करावें. प्रथम दिवशीं दंतधावन करून एकवेळच भोजन करावें. (९२) कोणाचा द्रोह न करितां उत्तम ब्रह्मचर्येनें राहून हें व्रत करावें. ब्राह्ममुहूर्ताला उठून आन्हिक शौचकर्म वगैरे सर्व उरकून घेऊन (९३) गुरूला भक्तीनें अभिवंदन करून त्याची आज्ञा घेऊन शिवाजवळ

वस्य सन्निधिं गत्वा प्रणम्य वृषकेतनम् ॥९३॥ शिवरात्रिव्रतं देव क-रिष्ये तव सन्निधौ ॥ निर्विघ्नं कुरु देवेश भक्तिग्राह्यं महेश्वर ॥९४॥एवं संकल्प्य विधिवच्छान्तो भूतहिते रतः ॥ पूजोपकरणद्रव्यं सर्वं सं-पादयेत्ततः ॥९५॥ मध्यान्हकाले संप्राप्ते नदीं गत्वा समुद्रगाम् ॥ स-रित्कुल्यादिकं गत्वा स्नायादेव विधानतः ॥९६॥ नित्यदेवार्चनं कु-र्याद्गृहमागत्य भक्तितः ॥शिवस्य यजनस्थानमलंकुर्यात्समाहितः॥९७॥ संमार्जनानुलेपाद्यैः शोधयेत्कुड्यमेव च ॥ वितानध्वजमाल्यैश्च फल-पर्णादिलंबितैः ॥९८॥ अलंकुर्याच्चतुर्दिक्षु वस्त्रकांस्यादितोरणैः ॥ पूजो-पकरणद्रव्यमाधाय सुसमाहितः ॥९९॥ पूजागृहं प्रविश्याथ प्रणम्य शिवमीश्वरम् ॥ उपविश्यासने शुद्धे प्राणानायम्य वाग्यतः ॥१००॥ वामहस्ते विनिक्षिप्य भसितं सितमुत्तमम् ॥ शिवं देवीं च संस्मृत्य विमृज्यांगानि संस्पृशेत् ॥१०१॥ पुनर्भस्म समादाय वामपाणौ विनि-क्षिपेत् ॥ त्रियंबकेन वामंत्र्य ततः संमृज्य वारिणा ॥१०२॥ त्रिपुंड्रं धा-रयेत्तेन ललाटादिष्वनुक्रमात् ॥ मणिबंधे शिखास्थाने कण्ठे चैव वि-

---

जाऊन वृषभध्वजाला नमस्कार करून (९४) देवा, तुझ्याजवळ शिवरात्रि व्रत करतों, हे देवेशा, भक्तीनें ग्राह्य असें हें व्रत निर्विघ्नपणें पार पाड, (९५) असा विधिपूर्वक संकल्प करून शांत होऊन सर्व प्राण्यांच्या हिताविषयीं आसक्त होऊन पूजासाधन द्रव्य सर्व संपादन करावें (९६) माध्यान्हाच्या वेळेला समुद्रगामिनी नदीला जाऊन किंवा इतर नद्या, किंवा कालवे या ठिकाणीं जाऊन विधिपूर्वक स्नान करावें. (९७) नंतर घरीं येऊन रोजच्याप्रमाणें नित्यदेवतार्चना करून भक्तिपूर्वक शिवाच्या पूजेचें ठिकाण चांगल्या तऱ्हेनें शांतपणें अलंकृत करावें. (९८) संमार्जन अनुलेपन वगैरेनीं भिंत सारवून छत, ध्वज, माला, फल, पत्रें, (९९) यांनीं तें स्थान सुशोभित करावें. वस्त्र व कांस्यादिकांचीं तोरणें यांनीं चारी दिशेला सुशोभित करावें. पूजासाधनद्रव्य समाधानपणें ठेवून (१००) पूजास्थानाला जाऊन तेथें देवाला नमन करून शुद्ध आसनावर बसून मौनपणें प्राणायाम करून (१०१) डाव्या हातांत उत्तम शुभ्र भस्म घेऊन शिव-पार्वतीचें स्मरण करून तें भस्म मर्दन करून सर्वांगाला लावून घ्यावें. (१०२) पुनः डाव्या हातांत भस्म घेऊन त्रियंबकमंत्रानें अभिमंत्रण करून नंतर उदकानें मर्दन करून (१०३) कपाळ वगैरे ठिकाणीं अनुक्रमानें त्रिपुंड्रधारण करावें.

शेषतः ॥१०३॥ रुद्राक्षं धारयेत्पश्चाद्व्रती नियममास्थितः ॥ मद्भक्तांश्च समाहूय दद्याद्यजनसाधनम् ॥१०४॥ भक्तैः संभूय देवेशं पूजयेच्च समाहितः ॥ स्वगुरूक्तेन मार्गेण यजेद्देवं प्रयत्नतः ॥१०५॥ आसनं पाद्यमर्घ्यं च मधुपर्कादिकं ततः ॥ दत्वाऽथ स्नापयेद्देवं ब्रह्मस्नानेन भक्तितः ॥१०६॥ पंचामृतेन च स्नाप्य स्नापयेच्च फलोदकैः ॥ पुष्पोदकैर्गन्धतोयैः स्नापयेत्कुंकुमादिभिः ॥१०७॥ रत्नोदकैश्च देवेशं तथा कर्पूरवारिभिः ॥ लेपयेद्यवचूर्णैश्च घर्षयेद्बिल्वपत्रकैः ॥१०८॥ उष्णोदकेन संस्नाप्य स्नापयेच्छीतलांबुभिः ॥ वस्त्रं दद्याच्च देवाय सोपवीतं च भक्तितः ॥१०९॥ दद्यादाचमनं भक्त्या पाद्यमर्घ्यादिकं ततः ॥ कर्पूरकुंकुमोपेतं गंधं दद्याच्छिवाय तु ॥११०॥ भूषणैर्भूषयेद्देवं हेमरत्नादिनिर्मितैः ॥ अखण्डबिल्वपत्रैश्च मरुकामलपत्रकैः ॥१११॥ पुष्पैः सम्पूजयेद्देवं कमलोत्पलपूरकैः ॥ मल्लिकामालतीभिश्च चंपकाशतपत्रकैः ॥११२॥ कुंदपुन्नागवकुलशिरीषाशोककिंशुकैः ॥ अर्कद्रोणैरपामार्गैर्बृहतीशमिपूर्वकैः ॥११३॥ अन्यैर्नानाविधैः पुष्पैः पूजयेदंबिकापतिम् ॥

---

मनगटावर, शेंडीवर, विशेषेंकरून गळ्याला त्रिपुंड्र लावावें. (१०४) व्रतस्थ मनुष्यानें नियमानें रुद्राक्षधारण करावें. माझ्या भक्तांना बोलावून पूजासाधन द्रव्य द्यावें. (१०५) भक्तांसहित श्रीशिवाचीपूजा शांतपणें करावी. आपला गुरु सांगेल त्याप्रमाणें प्रयत्नपूर्वक देवाची पूजा करावी. (१०६) आसन, पाद्य, अर्घ्य, मधुपर्क वगैरे देऊन ब्रह्म स्नानानें देवाला भक्तीनें अभिषेक घालावा. (१०७) नंतर पंचामृताचा अभिषेक घालून मग फलोदकांनीं अभिषेक घालावा. नंतर पुष्पोदकानें, गंधोदकानें कुंकुमादिकांनीं स्नान घालावें. (१०८) नंतर रत्नोदकानें श्रीशिवाला अभिषेक घालून कर्पूरोदकानें नंतर अभिषेक घालून मग चूर्ण लेपन करावें. नंतर बिल्वपत्रांनीं घर्षण करावें. (१०९) नंतर उष्णोदकानें स्नान घालून मग थंड पाण्यानें अभिषेक घालावा. नंतर उपवीतासह भक्तिपूर्वक देवाला वस्त्र द्यावें. (११०) नंतर भक्तिपूर्वक आचमन देऊन पाद्य अर्घ्य वगैरे समर्पण करून कापूर कुंकुम यांनीं युक्त गंधाचें लेपन शिवाला द्यावें. (१११) नंतर सोन्याचे रत्नाचे दागिने देवाला घालून अखंड बिल्वपत्रांनीं, मरवा, आंवळ्याचीं पानें, (११२) फुलें, यांनीं देवाची पूजा करावी. कमल, उत्पल, मल्लिका, मालती, चांफा, शतपत्र, (११३) कुंद, पुन्नाग, बकुल शिरीष, अशोक, किंशुक, अर्क, द्रोण, अघाडा, बृहती, शमी, (११४) इतर नानाविध फुलें यांनीं अंबिकापतीची

घृताक्तगुग्गुलं दद्याद्दीपमाज्येन योजितम् ॥११४॥ गोधूमपिष्टरचितं परमान्नादिसंयुतम्॥लेह्यं चोष्यादिसंयुक्तमाज्येनान्वितमादरात्॥११५॥ नानाविधफलोपेतं दद्यान्नैवेद्यमुत्तमम् ॥ सकर्पूरं च कस्तूरीयुक्तं तांबूलमेव च ॥११६॥ ततो नीराजयेद्दीपैर्भक्त्या कर्पूरदीपकैः ॥ चामरं व्यजनं दत्वा दर्पणं चापि दर्शयेत् ॥११७॥ ततो वादित्रघोषैश्च गीत-स्तोत्रादिपाठकैः ॥ पुराणवाचनैश्चैव कुर्याज्जागरणं व्रती ॥११८॥ एवं द्वितीययामेऽपि पूजयेदंबिकापतिम् ॥ एवमेव यजेद्देवमुपचारैर्व्रती निशि ॥११९॥ जागरं चोपवासं च तस्मिन्कुर्याद्व्रती पुमान् ॥ एवमेवाथ वा रात्रिं पूजाजागरणैर्नयेत् ॥१२०॥ पूजान्ते च जपेत्स्तोत्रं नामभिश्चांजलिं क्षिपेत् ॥१२१॥

ऋषय ऊचुः ॥ किं तत्स्तोत्रं महाभाग कानि नामानि सुव्रत ॥ तत्सर्वं कथयास्माकं लोकानां हितकाम्यया ॥१२२॥

सूत उवाच ॥ शृण्वन्तु ऋषयस्सर्वे व्यासेनोक्तं वदाम्यहम्॥यस्य वै पाठमात्रेण व्रतस्यैव फलं लभेत् ॥१२३॥ नमः सकलकल्याणदा-

---

पूजा करावी. तुपांत भिजविलेलें गुग्गुल धुपाकरितां समर्पण करावें. मग तुपाचा दिवा लावून ठेवावा (११५) गव्हाच्या पिठानें केलेलें ( वळवट वगैरे ) परमान्न वगैरे लेह्य चोष्य वगैरे तुपासह आदरपूर्वक देवाला नैवेद्याकरितां ठेवावेत. (११६) अनेक तऱ्हेचीं फळें नैवेद्याकरितां ठेवावींत. कापूर, कस्तूरी यांनीं युक्त तांबूल देवाला समर्पण करावें. (११७) नंतर दीपांनीं नीराजन करावें. कापराच्या दिव्यांनीं ओंवाळावें. चामर, व्यजन, आरसा वगैरे दाखवावें. (११८) नंतर मंगल वाद्यांच्या घोषांनीं गीत, स्तोत्र, पाठ, पठन, पुराणश्रवण यांनीं जागरण करावें. (११९) या प्रमाणेंच द्वितीययामाला पार्वतीपतीची पूजा करावी. या प्रमाणेंच रात्रौ व्रतस्थानें उपचारांनीं पूजा करावी. (१२०) त्यादिवशीं व्रतस्थ पुरुषानें जागर व उपोषण करावें. या प्रमाणेंच पूजा जागरणादिकांनीं व्रतस्थ मनुष्यानें रात्र घालवावी. (१२१) पूजा समाप्त झाल्यानंतर स्तोत्रपाठ करावा, मग नाममंत्रांनीं पुष्पांजली अर्पण करावा.

(१२२) ऋषि बोलले—हे महाभागा, तें स्तोत्र कोणतें ? ते नाममंत्र कोणते हें सर्व लोकांच्या कल्याणाकरितां आह्मांला सांगा.—

(१२३) सूत बोलले— ब्राह्मणहो, व्यासानें जें कांहीं सांगितलें आहे, तें सर्व सांगतों ऐका: ज्याच्या नुसत्या पाठानेंच या व्रताचें फल मिळेल. (१२४) सर्व

यिने शूलपाणये॥ विषयार्णवमग्नानां समुद्धरणहेतवे ॥१२४॥अस्नेहस्नेहरूपाय वार्तातिक्रान्तवर्तिने ।।स्वभावोदारधीराय चिद्रूपाय नमो नमः ॥१२५॥यत्र सर्वं यतः सर्वं सर्वं यत्र न संशयः ॥ लोककल्लोलजनितं वंदे शंभुमहोदधिम्॥१२६॥देशिकेक्षणमारुह्य धीपद्मानि विकासयन्॥उदितो भाति योऽभ्यन्तस्तं वंदे शंभुभास्करम् ॥१२७॥ हृदयाकाशसंक्रान्त तमोमोहाभ्रमालिकाम् ॥शोधयेद्यस्तु तरसा वंदे भर्गमहानिलम्॥१२८॥ वामदक्षिणपार्श्वे तु संजातौ हि विवादिनौ ॥ यस्य वेदस्य तं वंदे सर्व कारणकारणम् ॥१२९॥ भवामयपरिक्रान्तमर्त्यानां स्मृतिमात्रतः ॥ भवं हरति यो नित्यं वंदे भवभिषक्तमम् ॥१३०॥ यस्मिन्सूर्यो न भातीशे चंद्रमा अनलोऽपि वा ॥ यस्य भासा विभातीदं तं वंदे शिवमव्ययम् ॥१३१॥ आत्मारामं महात्मानं सर्वभूतहृदि स्थितम् ॥ देवसेव्यं स्वप-

---

कल्याणदायक शूलपाणे, तुला नमस्कार असो. विषयरूपी समुद्रांत बुडालेल्या लोकांना उद्धार करण्यास कारण असलेल्या ईश्वरा, तुला नमन असो (१२५) स्नेहरहित असून स्नेहरूप घेणाऱ्या ईश्वरा, तुला नमन असो. वार्तेच्या पलीकडे असणाऱ्या देवा, तुला नमन असो. स्वभावानें उत्कृष्ट व धीर अशा हे पुरुषा, तुला नमन असो. चिदानंदस्वरूपा, तुला नमन असो. (१२६) ज्याच्या ठिकाणीं हें सर्व जग आहे, ज्याच्यापासून जगाची उत्पत्ति होते, ज्याच्या ठिकाणीं हें सर्व निःसंशय आहे, अशा ईश्वराला नमस्कार असो. लोकरूपी लाटा ज्यामध्यें उसळतात, अशा शंभुरूपी समुद्राला नमस्कार करतों. (१२७) देशिकाच्या डोळ्याच्या रूपानें वर चढून येऊन बुद्धिरूप कमलाला विकास देऊन अंतर्यामांत जो शंभुरूपी सूर्य उदयाला येतो, त्याला नमन असो. (१२८) हृदयाकाशांत तमरूपी अभ्रांची मालिका चढली असतां त्या सर्व अभ्रांना वाऱ्याप्रमाणें बलात्कारानें सारून नेतो, त्या ईश्वराला नमस्कार असो. (१२९) त्याच्या डाव्या बाजूला व उजव्या बाजूला विवाद करीत जे उत्पन्न झाले, त्या सर्वकारण कारणपरमेश्वरास नमस्कार असो. (१३०) संसाररूपी रोगांनीं व्याप्त शरीर झालेल्या लोकांनीं नुसतें त्याचें स्मरण केलें तर त्यांचा संसाररोग दूर होतो अशा श्रेष्ठ वैद्याला नमस्कार करतों. (१३१) ज्याच्याजवळ सूर्याचा, चंद्राचा अग्नीचा प्रकाश पडत नाहीं, ज्याच्या प्रकाशानें हें सर्व जग प्रकाशतें, त्या अव्यय शिवाला नमस्कार असो. (१३२) आत्माराम असून जो महात्मा आहे,

दं महादेवं नमाम्यहम् ॥१३२॥ एकोऽपि बहुधा भाति प्रतिदेहसमुद्भवम् ॥ हृदि स्थितोऽपि यो दूरस्तं नमस्ये सदाशिवम् ॥१३३॥ ब्रह्मविष्ण्वादिदेवेषु नृपक्षिमृगयोनिषु ॥ योन्तरे निवसत्येकस्तं नमामि सदाशिवम् ॥१३४॥ भक्तानां सुलभोऽतीव विज्ञेयश्च विवेकिनाम्॥ दृश्यो ज्ञानदृशां नित्यं तन्नमामि सदाशिवम् ॥१३५॥ यत्पादपद्मनम्राणामल्पं विष्ण्वादिकं पदम् ॥ त्रसरेणूपमं प्राहुस्तं वंदे शिवमव्ययम् ॥१३६॥ स्रष्टा त्वमेव लोकानां पालको जगतामपि ॥ अन्तकोऽपि त्वमेवेश नमामि त्वां महेश्वर ॥१३७॥ अपराधसहस्राणि क्रियन्तेऽहर्निशं मया ॥ पाहि मामपराधेभ्यः पिता पुत्रमिव प्रियम् ॥१३८॥ एतत्स्तोत्रं पठेद्यस्तु भक्त्या यस्तु शृणोति वा ॥ शिवरात्रिव्रतफलं तयोर्दास्यति शंकरः ॥१३९॥

सूत उवाच ॥ कथयामि मुनिश्रेष्ठा नामानीमानि भक्तितः ॥ व्रतस्य परिपूर्त्यर्थं शिवप्रियकराणि च ॥१४०॥ शिवो रुद्रः पशुपतिर्नीलकण्ठो

---

जो सर्व प्राण्यांच्या हृदयामध्यें राहिला आहे, जो देवांला सेव्य होऊन राहिला आहे, जो आपलें उत्तम पद देतो. त्या महादेवाला मी नमन करतों. (१३३) परमेश्वर एकटा जरी आहे, तथापि तो प्रत्येक देहाच्या रूपानें अनेक प्रकारचा दिसतो. हृदयामध्यें राहिला तरी दूर असल्या प्रमाणें वाटतो. अशा सदाशिवाला नमस्कार करतों. (१३४) ब्रह्मा विष्णु वगैरे देवांमध्यें मनुष्य मृग अशा प्राण्यामध्यें जो अंतरगांत वास करतो, त्या सदाशिवाला नमस्कार करतों.(१३५)जो भक्तांना अत्यंत सुलभ असून विचारवान प्राण्यांना ज्याचें ज्ञान होतें, ज्ञानी मनुष्यांला जो दिसतो, त्या सदाशिवाला नमस्कार करतों. (१३६) ज्याच्या पायीं नम्र झालेल्या प्राण्यांना वैकुंठ वगैरे लोक अल्प आणि त्रसरेणूप्रमाणें वाटतात, त्या अव्यय शिवाला नमस्कार करतों. (१३७) लोकांचा स्रष्टा तूंच असून लोकांचा पालकही तूंच आहेस. हे महेश्वरा, अंतकही तूंच आहेस अशा तुला नमस्कार असो. (१३८) मी रोज हजारो तऱ्हेचे अपराध करतों, त्या अपराधांपासून माझें रक्षण कर. बापानें प्रिय मुलाचें जसें रक्षण करावें, त्याप्रमाणें तूं माझें रक्षण कर. (१३९) या स्तोत्राचा पाठ जो करतो, व जो ऐकतो, त्या दोघांना श्रीशिव शिवरात्रिव्रत केल्याचें फल देतो.

(१४०) सूत बोलले–मुनिश्रेष्ठहो, आतां भक्तिपूर्वक हीं नांवें सांगतों ऐका या नामाच्या योगानें व्रताची परिपूर्ति होत असून शिवाची प्रीति होते. (१४१) शिव,

महेश्वरः ॥ हरिकेशो विरूपाक्षः पिनाकी त्रिपुरान्तकः ॥१४१॥ शंभुः शूली महादेवो नामान्येतान्यनुक्रमात् ॥ चतुर्थ्यन्तं समुच्चार्य दद्यात्पुष्पांजलिं व्रती ॥१४२॥ एवमेवं समुच्चार्य यामे यामे गते निशि ॥ स्तोत्रैः स्तुत्वांजालिं दत्वा नमस्कुर्याच्च नामभिः ॥१४३॥ स्वकृतां शिवपूजां च शिवाय विनिवेदयेत् ॥ प्रभाते समनुप्राप्ते शिवपूजां समाप्य च ॥१४४॥ प्रातःपूजां विहायैवं शिवाय विनिवेदयेत् ॥ यत्कृतं मंत्रो हीनं यच्च भक्त्या विना कृतम् ॥१४५॥ यच्च दक्षिणया हीनं पूर्णं कुरु महेश्वर ॥ एवमेव व्रतं कुर्यात्प्रतिसंवत्सरं व्रती ॥१४६॥ सर्वान्कामानवाप्नोति प्रेत्य चेह च मानवः ॥१४७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे शिवरात्रिप्रादुर्भावतद्व्रतविधानं नामैकसप्ततितमोऽध्यायः

---

रुद्र, पशुपति, नीलकंठ, महेश्वर, हरिकेश, विरूपाक्ष, पिनाकी, त्रिपुरांतक (१४२) शंभु, शूली, महादेव, वगैरे हीं नांवें अनुक्रमानें जाणा. या नांवांच्या पुढें चतुर्थी लावून पुष्पांजलि द्यावा. (१४३) याप्रमाणें प्रत्येक यामाला उच्चार करून रात्र जसजशी जाईल त्या प्रमाणें स्तोत्र करून हात जोडून नाममंत्रांनीं नमस्कार घालावेत. (१४४) आपण केलेली शिवपूजा शिवाला समर्पण करावी. प्रभातकालीं शिवपूजा समाप्त करून (१४५) प्रातःकालची पूजा सोडून याप्रमाणें बाकीची पूजा शिवसमर्पण करावी. जें केलें असेल तें मंत्रानें हीन असो, भक्तीनें हीन असो. (१४६) जें दक्षिणेनें हीन असेल, तें सर्व हे महेश्वरा, परिपूर्ण कर. अशी शिवाची प्रार्थना करावी. याप्रमाणें दरवर्षी हें व्रत करावें. (१४७) ह्मणजे त्या मनुष्याचे सर्व मनोरथ परिपूर्ण होतील. परलोकीं सद्गति मिळेल.

या प्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील शिवरात्रिप्रादुर्भावतद्व्रतविधाननांवाचा एकाहत्तरावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ द्विसप्ततितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ ऋषय ऊचुः ॥ एवमुक्तप्रकारेण शिवरात्रिव्रतं त्विदम् ॥ कृत्वा यत्फलमाप्नोति तन्नो वद महामते ॥१॥
सूत उवाच एवं कृत्वा मुनिश्रेष्ठाः शिवरात्रिव्रतं त्विदम् ॥ विधिनानेन सततं यत्फलं समवाप्यते॥२॥तदहं संप्रवक्ष्यामि शृणुध्वं मुनिसत्तमाः ॥ अश्वमेधसहस्राणां शतं कृत्वा तु यत्फलं ॥३॥शिवरात्रिव्रतं कृत्वा तत्फलं समवाप्यते ॥ राजसूयायुतं कृत्वा यत्फलं लभते नरः ॥४॥शिवरात्रिव्रतं कृत्वा तत्फलं समवाप्नुयात् ॥ कपिलादानकोटीनां कर्ता यल्लभते फलम् ॥५॥ शिवरात्रिव्रतं कृत्वा तत्फलं लभते नरः ॥ सप्तसागरसंयुक्तां महीं दत्वा तु यत्फलम् ॥६॥ शिवरात्रिव्रतं कृत्वा तत्फलं लभते नरः ॥ ब्रह्महत्यायुतं कृत्वा स्तेयानां प्रयुतं तथा ॥७॥ शिवरात्रिव्रतं दृष्ट्वा सद्यो मुच्येत पातकैः ॥ सुरापानसहस्राणि भ्रूणहत्यायुतानि च ॥८॥ वीरहत्यासहस्राणि नश्यन्ति व्रतदर्शनात् ॥ गवां हत्वा सहस्राणि चंडालीगमनायुतम् ॥९॥ शिवरात्रिव्रतं दृष्ट्वा तानि नश्यंति तत्क्षणात् ॥श्रूयते हि पुरा कश्चिद्ब्राह्मणः पापकृत्तमः॥१०॥महा-

---

श्रीशिवास नमस्कार असो ऋषि बोलले—(१) असें सांगितल्याप्रमाणें हें शिवरात्रिव्रत करून काय फल मिळतें ? तें आह्मांस सांगा.

(२)सूत बोलले--मुनिश्रेष्ठहो, असें या विधानानें शिवरात्रिव्रत करून काय फल मिळतें; (३) तें तुह्मांस सांगतों ऐका. हजार अश्वमेध केले तर जें फल मिळावें, (४) तें फल शिवरात्रिव्रत करून मिळतें. दहा हजार राजसूय करून जें फल मिळावें; (५) तें शिवरात्रिव्रत करून मिळतें. कपिला गायी कोटिपर्यंत दान केल्या तर जें फल कर्त्याला मिळतें, (६) तें फल शिवरात्रिव्रत केलें तर मिळतें. सप्तसागरापर्यंत व्यापिलेली पृथ्वी दिली तर जें फल मिळावें, तें फल (७) शिवरात्रिव्रत केलें तर मिळतें. हजारो ब्रह्महत्या केल्या तरी असंख्य चोऱ्या केल्या तरी (८) शिवरात्रिव्रत नुसतें पाहिलें तर तत्क्षणीं प्राणी पातकांपासून मुक्त होतो. हजारोवेळ सुरापान केलें तरी, असंख्य भ्रूणहत्या केल्या तरी, (९) हजारो वीरांना मारिलें तरी व्रतदर्शनापासून तीं सर्व पातकें जळून जातात. हजारो गायी मारिलेल्या असल्या तरी असंख्य चंडालस्त्रीबरोबर सहवास केला असला तरी (१०) शिवरात्रिव्रत पाहून तीं पातकें तत्क्षणीं नष्ट होतात. पूर्वी एक ब्राह्मण अत्यंत पापकर्म करणारा होता; असें आह्मीं ऐकिलें. (११) तो लक्षावधि महापात-

पातकलक्षैश्च ह्युपपातककोटिभिः ॥ शिवरात्रिव्रतं दृष्ट्वा मुक्तः शिवपुरं ययौ ॥११॥

ऋषय ऊचुः ॥ शिवरात्रिव्रतं दृष्ट्वा कथं पातककोटिभिः ॥ मुक्तः शिवपुरं प्राप्तस्तन्नो विस्तरतो वद ॥१२॥

सूत उवाच ॥ अस्त्यस्मिन्वसुधापीठे देशो विपुलकोटरः ॥ विंध्यादुत्तरदिग्भागे नानाजनपदावृतः ॥१३॥ इरावती नाम नदी शतद्रुश्च विपाट्र तथा ॥ सिंधुरित्यपि विख्याता वितस्ता चेति नामतः ॥१४॥ वहंति सरितो यत्र नानाश्चर्यमनोहराः ॥ तासां सिन्धुनदीतीरे नगरं कुब्जकाभिधम् ॥१५॥ तस्मिन्निवसति श्रीमान् राजा परपुरंजयः ॥ कल्पद्रुमसमोऽर्थीनां स्त्रीणां काम इवापरः ॥१६॥ व्यवहारविचारार्थं सर्वशास्त्रविशारदम्॥स्थापयामास भूपालो ब्राह्मणं नयकोविदम्॥१७॥ सुकुमार इति ख्यातो ब्राह्मणस्याभवत्सुतः॥स तु कामकलाशास्त्रं सर्वमभ्यस्य रागवान् ॥१८॥ षिड्गो भूत्वा तु तत्रैव नागराणां प्रियोऽवसत् सर्वा नार्यस्तमाहूय तेनैव सह रेमिरे ॥१९॥ ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्रा-

---

कांनीं युक्त असून कोट्यावधि उपपातकांनीं युक्त तो होता. त्यानें हें शिवरात्रिव्रत पाहिलें मात्र, तत्क्षणीं तो मुक्त होऊन शिवपुराला निघून गेला.

(१२) ऋषि बोलले—शिवरात्रिव्रत पाहून कोट्यावधि पातकांनीं तो मुक्त झाला कसा ? व शिवपुराला गेला कसा तें आह्मांस सविस्तर सांगा—

(१३) सूत बोलले–या पृथ्वीतलावर विपुलकोटर नांवाचा एक मोठा प्रचंड देश आहे. तो विंध्यपर्वताच्या उत्तरभागीं असून अनेक देशांनीं युक्त तो देश असे. (१४) त्या प्रांतांत इरावती, शतद्रु, विपाट, सिंधु, वितस्ता वगैरे नांवाच्या (१५)अत्याश्चर्यकर मनोहर अशा नद्या वहात आहेत, त्यांमध्यें सिंधुनदीच्या कांठीं कुब्जक नांवाचें नगर आहे. (१६) त्या नगरांत शत्रूंचीं राज्यें काबीज करणारा श्रीमान राजा राहत असे. तो याचकांना कल्पवृक्षासमान असून स्त्रियांना दुसऱ्या कामाप्रमाणें भासत होता. (१७) व्यवहाराचा विचार करण्याकरितां सर्व शास्त्रांत पारंगत, नीतिकुशल, अशा ब्राह्मणाची स्थापना त्या राजानें केली होती. (१८) त्या ब्राह्मणाला सुकुमार नांवाचा एक मुलगा होता. त्यानें कामशास्त्राचा अभ्यास केला होता. अर्थात तो रसिक झाला होता. (१९) तो षिड्ग ( जार ) होऊन सर्व नागरिकांना प्रिय होऊन राहिला होता. सर्व स्त्रिया त्यालाच बोलावून त्याच्याबरोबर विलास करीत होत्या (२०) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांच्या स्त्रिया व

दीनां स्त्रियस्तथा ॥ सर्वान्त्यजातिभार्याश्च भर्तृनुत्सृज्य रेमिरे ॥२०॥ ततोऽथ नागरास्सर्वे स्वभार्याणां निवारणे ॥ अशक्ताः सर्व एवाथ राजपार्श्वमुपागमन् ॥२१॥

नागरा ऊचुः ॥ आकर्णय महीपाल वृत्तान्तमयशस्करम् ॥ धर्मस्य यशसश्चैव कश्चिच्छत्रुरिहास्ति नः ॥२२॥ कामशास्त्रकलाभिज्ञः षिद्गः कश्चिन्महीपते ॥ जारो भूत्वा नुतः स्त्रीणां धर्मस्य यशसोऽन्तकः ॥२३॥ चतुर्णां ब्राह्मणादीनां संकराणां तथैव च ॥ सर्वासामन्त्यनारीणां षिद्गो भर्तृत्वमागतः ॥२४॥ न संमता वयं सर्वे नारीणां शिक्षणे नृप ॥ न भर्तृन्प्रतिगच्छन्ति तस्मिन्सति दुरात्मनि ॥२५॥ अन्यायसदृशं दण्डं तस्य शीघ्रं निपातय ॥ नो चेदयशसा युक्तो नरकं चैव गच्छसि ॥२६॥

सूत उवाच ॥ एतच्छ्रुत्वा महीपालस्तमाहूयाथ सत्वरं ॥ वाग्दण्डैर्दण्डयित्वा तं स्वदेशान्निरवासयत् ॥२७॥ राज्ञाऽवमानितः पापी कीरदेशमथागमत् ॥ तस्माद्देशादथाक्रम्य हूणमण्डलमाविशत् ॥२८॥

---

इतर सर्व कमी जातीच्या स्त्रिया आपापल्या नवऱ्यांना सोडून यथेच्छ याच्याबरोबर क्रीडा करीत होत्या. (२१) त्यानंतर सर्व नागरिक आपापल्या स्त्रियांना निवारण करण्याविषयीं असमर्थ होऊन सर्वांनीं राजाकडे फिर्याद नेली.

(२२) नागरिक बोलले— हे राजा, आमची फिर्याद ऐक. आमची बातमी अनिष्ट असून अपकीर्तिकर आहे. आमच्या धर्माला व आमच्या यशाला कोणी एक शत्रु उत्पन्न झाला आहे. (२३) हे राजा, कामशास्त्रकला जाणणारा कोणी एक षिद्ग जारकृत्यांत निमग्न होऊन आमच्या धर्माची यशाची हानि करतो. (२४) ब्राह्मणादि चारी वर्णांला, संकर जातींला, सर्व इतर कमी जातीच्या इतर स्त्रियांना तो षिद्ग भर्ता होऊन बसला आहे. (२५) हे राजा, त्याच्या योगानें आमच्या स्त्रिया आमचें ऐकेनाशा झाल्या आहेत. आह्मी त्यांना शिक्षण देण्यास असमर्थ झालों आहोंत. तो दुरात्मा असल्यामुळें आमच्याजवळ आमच्या स्त्रिया बिलकुल येईनाशा झाल्या आहेत. (२६) याकरितां अन्यायाला योग्य असा दंड तूं त्याला कर. नाहींतर अपकीर्तीनेंयुक्त होऊन घोर नरकाला जाशील.

(२७) सूत बोलले—हें ऐकून राजानें त्याला बोलावून विचारिलें त्याला वाटेल त्या तऱ्हेच्या शिव्या देऊन आपल्या नगराबाहेर घालवून दिलें. (२८) राजानें या तऱ्हेचा अपमान केल्याबरोबर तो कीर देशाला आला. नंतर तो देश सोडून हूण

स कदाचिद्वनोद्देशे विवरे दृष्टवान्सरः ॥ हंसकारण्डकाकीर्णं चक्रवाकोपशोभितम् ॥२९॥ कमलोत्पलकल्हारैः पुष्पैरन्यैः समावृतम् ॥ तस्मिन्नथ जलक्रीडां कर्तुमागत्य संस्थितः ॥३०॥ तस्मिन्नेव तदा काले स्नानार्थं काचिदंगना ॥ चंद्रबिंबाभवदना बिंबोष्ठी च कृशोदरी ॥३१॥ रूपयौवनसंपन्ना चंडाली च रजस्वला ॥ स्नानार्थमागतं षिद्गं रूपयौवनसंयुतम् ॥३२॥ नारीचित्तप्रमथने दक्षं काममिवापरम् ॥ तं दृष्ट्वा कामसंतप्ता तस्य पार्श्वमुपागता ॥३३॥ तां दृष्ट्वा रूपसंपन्नां कामस्य दयितामिव ॥ कामसंतप्तहृदयो गृहीत्वा तां रहो ययौ ॥३४॥ तदा सुरतसंयोगं यथेष्टं कृतवांस्तया ॥ सा तेन सुरतं कृत्वा मनसा तोषमागता ॥३५॥ प्रणयेनाह तं षिद्गं यावद्देहमिदं तव ॥ अहं भार्या भविष्यामि मामेवं भज सुंदर ॥३६॥ एवमुक्तस्तया सोऽथ तथा चक्रे हि पापकृत् ॥ ततः प्रभृति षिद्गोऽसौ चंडाल्या सह संगतः॥३७॥नानावि-

---

देशाला गेला. (२९) त्यानें एकदां एका वनांत एका विवरामध्यें मोठें तळें पाहिलें. त्यामध्यें हंस, कारण्डव, चक्रवाक वगैरे पक्षी असून (३०) कमल, कल्हार, उत्पल वगैरे इतर फुलांनीं तें युक्त होतें. त्या सरोवरांत एकदा जलक्रीडा करावयास येऊन राहिला.(३१) त्याच वेळेला कोणी एक स्त्री स्नान करावयास आली तिचें मुख चंद्रबिंबाप्रमाणें असून ओष्ठ ( ओंठ ) बिंबफलाप्रमाणें होतें. आणि तिचें पोट फार बारीक होतें. (३२) ती रूपानें व तारुण्यानें संपन्न असून जातीनें चांडाल असून त्यांतल्यात्यांत ती रजस्वला ( विटाळशी ) होती. तितक्यांत स्नानाकरितां आलेल्या रूपवान तरुण षिद्गाला तिनें पाहिलें. (३३) बायकांचें मन वळविण्यांत पटाईत असून दुसरा कामच कीं काय? याप्रमाणें तो भासत होता. त्याला पाहून कामानें संतप्त होऊन त्या षिद्गाजवळ ती चांडालस्त्री आली. (३४) कामाच्या रतीप्रमाणें असणाऱ्या त्या रूपवती स्त्रियेला पाहून हाही कामसंतप्त होऊन तिला एकांतांत घेऊन आला. (३५) तेव्हां तिच्याशीं यथेच्छ सुरतसंयोग त्यानें केला. त्याच्याशीं सुरत करून ती स्त्री तृप्त झाली. (३६) नंतर तिनें त्याला प्रेमानें ह्मटलें कीं, हे षिद्गा हें शरीर असेपर्यंत तुझी बायको होऊन मी राहतें, तर हे सुंदरा, माझा स्वीकार कर. (३७) याप्रमाणें तिचें वचन ऐकून त्या पापकर्म्यानें तथास्तु असें तिला ह्मटलें. मग त्या दिवसापासून तो षिद्ग चांडाल स्त्रीशीं रत झाला. (३८) अर्थात तिच्या सहवासानें अनेक तऱ्हेचें मांस खाऊं लागला. अनेक

धानि मांसानि बुभुजे च तया सह ॥ मद्यं नानाविधं चैव पपौ पापात्मा तया सह ॥३८॥ मृगान्नानाविधान् हत्वा पक्षिणोऽथ जलेचरान्॥गवां शतसहस्राणि कपिलानां सहस्रकम् ॥३९॥ तेषां मांसानि पापात्मा बुभुजे च तया सह ॥ स श्वमांसादिकं सर्वं बुभुजे काममोहितः ॥४०॥ वनोद्देशेषु मार्गेषु हत्वा विप्रान् सहस्रशः ॥ तेषां वित्तं समादाय बुभुजे च तया सह ॥४१॥ एवंविधान्यसंख्यानि कुर्वन्पापानि भूरिशः ॥ बुभुजे विषयान्सर्वांश्चंडाल्या सह पापकृत् ॥४२॥ एवं सप्ततिवर्षाणि चंडाल्या सह संगतः ॥ तया सहैव पापानि कृतवान्बहुशः पुरा ॥४३॥ पुत्रानुत्पादयामास पंच पातकसन्निभान् ॥यानि यानीह पापानि शास्त्रेषूक्तानि सूरिभिः ॥४४॥ तानि सर्वाणि कृतवांश्चंडाल्या सह पापकृत् ॥ कन्याद्वयं तथा तस्यां जनयामास पापकृत् ॥४५॥ हता कालेन चंडाली तस्य पापसहायिनी ॥ द्वे कन्ये रूपवत्यौ च चंडाली सुषुवे पुरा ॥४६॥ रेमे ताभ्यां स पापात्मा कामभोगाननेकशः ॥ तत्राप्यु-

---

तऱ्हेचें मद्य तिच्याबरोबर पिऊं लागला. (३९) अनेक तऱ्हेचे पक्षी मारून, अनेक तऱ्हेचे मृग मारून, जलचर प्राण्यांना मारून, कोट्यावधि गायी मारून-कोट्यावधि कपिला गायी मारून (४०) त्यांचें मांस तिच्याबरोबर यथेच्छ खाऊं लागला. पुढें पुढें काममोहित होऊन कुत्र्याचें वगैरे मांसही तिच्याबरोबर खाऊं लागला. (४१) रानांत, वनांत, रस्त्यांत हजारो ब्राह्मणांना मारून त्यांचें द्रव्य लुटून तिच्याबरोबर यथेच्छ सुखोपभोग घेऊं लागला. (४२) अशा तऱ्हेचीं असंख्य पातकें वारंवार त्यानें केलीं. व त्या चांडालीशीं विषयोपभोग घेण्यांत निमग्न होऊन राहिला. (४३) याप्रमाणें चांडाल स्त्रीबरोबर सत्तर वर्षेपर्यंत त्यानें तिचा उपभोग घेतला. तिच्याबरोबर असंख्य पापकर्मे त्यानें केलीं. (४४) तिच्या पोटीं पांच मुलें मूर्तिमंत पातकाच्या रूपानें जन्माला आलीं. बुद्धिमान प्राण्यांनीं शास्त्रांमध्यें जीं जीं पातकें सांगितलीं आहेत, (४५) तीं तीं सर्व पातकें चांडालीबरोबर त्यानें केलीं त्यांतून त्याच्यापासून तिच्या पोटीं दोन मुली झाल्या. (४६) नंतर कालांतरानें त्याच्या पापकर्माला साहाय करणारी ती स्त्री कालवशानें परलोकाला निघून गेली. तिच्या पोटीं दोन रूपवती कन्या झाल्या होत्या. (४७) तिच्या मागून त्या दोन मुलींशीं तो व्यवहार करूं लागला. त्यांच्या बरोबर त्यानें यथेच्छ कामोपभोग घेतला. त्या ठिकाणींही त्यांच्या पासून दोन मुलें झालीं.

त्पादयामास पापी पुत्रद्वयं तदा ॥४७॥ राज्ञः सकाशादादाय विप्रा बहुविधं धनम् ॥ स्वदेशं प्रस्थिता गन्तुं शतं ब्राह्मणपुंगवाः॥४८॥तान् विदित्वा स पापात्मा पुत्रैरन्यैश्च संयुतः ॥ मार्गमारुध्य तान्हत्वा तद्वित्तं हृतवान्बहु ॥४९॥ चोरैश्च निहतान् विप्रांश्छ्रुत्वा तद्देशभूपतिः॥ वधार्थं प्रेषयामास चोराणां स्वबलं महत् ॥५०॥ ज्ञात्वा स पापी वृत्तांतं सर्वान्बंधून्विसृज्य च ॥ पलाय्य गतवांश्छीघ्रं सुतानादाय पातकृत् ॥५१॥ किरातदेशं संप्राप्य स तत्र विचचार ह ॥ वणिक्पदमिति ख्यातं पत्तनं विश्रुतं भुवि ॥५२॥ तत्रस्थाश्च नरास्सर्वे संपन्ना धनदोपमाः ॥ पत्तनस्यातिदूरे तु लिंगं गव्यूतिमात्रतः ॥५३॥ नागेश्वरमिति ख्यातमस्ति त्रैलोक्यपूजितम् ॥ माघकृष्णचतुर्दश्यां सर्वे पत्तनवासिनः ॥५४॥ रात्रौ जागरणं कर्तुं भार्यापुत्रादिसंयुताः॥अलंकृताश्च ते सर्वे नागेश्वरमुपागताः ॥५५॥ सर्वे संपूज्य तल्लिंगं जागरं तत्र चक्रिरे ॥ भुक्त्वा बहुविधं मांसं पपौ पानं मुहुर्मुहुः ॥५६॥ सुरतेन सु-

---

(४८) पुढें एकदां राजाजवळून पुष्कळ द्रव्य घेऊन आपल्या देशाला जाण्याकरितां शंभर ब्राह्मण निघाले होते. (४९) तें याला समजल्याबरोबर आपल्या पुत्रांना व इतर माणसांना बरोबर घेऊन तेथें जाऊन रस्ते सर्व रोंखून त्या ब्राह्मणांना मारून तें पुष्कळ द्रव्य आपल्या घरीं त्यानें आणिलें. (५०) इतक्यांत चोरांनीं ब्राह्मणांला लुटिलें असें वर्तमान राजानें ऐकून त्या चोरांना धरून मारण्या करितां आपलें पुष्कळ सैन्य त्यानें पाठविलें. (५१) हें त्या चोराला समजल्या बरोबर आपल्या सर्व बांधवांना सोडून आपल्या मुलांना घेऊन तो लौकर दूर पळून गेला. (५२) नंतर किरात देशाला येऊन त्या ठिकाणीं तो संचार करूं लागला. त्या देशाला वणिक्पथ असें नांव असून तें शहर जगामध्यें फार प्रख्यात असे. (५३) त्या ठिकाणीं राहणारे सर्व लोक संपन्न असून कुबेराप्रमाणें श्रीमान होते. त्या शहराच्या जवळच दोन कोसांवर एक शिवलिंगाचें स्थान होतें. (५४) त्याचें नांव नागेश्वर असें असून तें त्रैलोक्यांत प्रख्यात झालें होतें. माघकृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं सर्व नगरवासी लोक. (५५) रात्रीं जागर करावयास बायकांमुलांना घेऊन अलंकृत होऊन त्या नागेश्वराला आले होते. (५६) सर्वांनीं त्या नागेश्वराची पूजा करून त्याठिकाणीं जागर केला. नंतर तो विप्र पुष्कळ तऱ्हेचें मांस खाऊन वारंवार मद्यपान करूं लागला. (५७) नंतर

तां रंतुं पुष्पाण्याहर्तुमागतः ॥ गीतवादित्रघोषेण रात्रौ जागरणं तदा ॥५७॥ व्रतिभिः क्रियमाणं तन्महानिशि स दृष्टवान् ॥ दूरदेशात्स्थितः सर्वं महानिशि कृतार्चनम् ॥५८॥ दृष्ट्वाऽभिवंद्य देवेशं गतवांश्चश्वपचालयम् ॥ एवं हि वसतस्तस्य चायुः क्षीणमभूत्तदा ॥५९॥ मृत्युना सहिताः सर्वे यमदूता यमाज्ञया ॥ पाशमुद्गरसन्नद्धाः खड्गतोमरपाणयः ॥६०॥ बध्वा पाशेन तं पापं गृहीत्वा गंतुमुद्यताः ॥ एतस्मिन्नेव काले तु शिवदूताः शिवाज्ञया ॥६१॥ तं नेतुमागताः शीघ्रं शतशोऽथ सहस्रशः ॥ शुद्धस्फटिकसंकाशास्त्रिनेत्राः सुकपर्दिनः ॥६२॥ चतुर्भुजा महाकायाः शूलमुद्गरधारिणः ॥ केचिदंकुशहस्ताश्च गदाहस्तास्तथाऽपरे ॥६३॥ धनुर्धरास्तथा चान्ये शक्तिहस्तास्तथा परे ॥ भिंडिवालधराश्चान्ये केचित्परिघपाणयः ॥६४॥ व्याघ्रचर्मपरीधाना नानाभरणभूषिताः ॥ भस्मोद्धूलितसर्वांगास्त्रिपुंड्रांकितमस्तकाः ॥ ६५ ॥

---

मुलींशीं सुरत करावयास फुलें आणण्याकरितां तेथें आला. गायन, वाद्य इत्यादिकांच्या घोषांनीं (शब्दांनीं) रात्रीं जागरण (५८) ते व्रती व्रत करीत होते, तेव्हां मध्यरात्रीच्या वेळेस त्या धिद्रानें त्यांना पाहिलें. दूर एके ठिकाणीं उभा राहून महानिशीथाच्या वेळेस त्यानें शिवलिंगपूजा पाहिली. (५९) तेथें त्या देवाधिदेव शिवाला नमस्कार करून श्वपचाच्या घरीं गेला. त्याप्रमाणें वास करीत असतां त्या धिद्राचें आयुष्य क्षीण होऊन संपत आलें होतें. (६०) तेव्हां मृत्यूला बरोबर घेऊन यमदूत यमाच्या आज्ञेनें हातांत पाश, मुद्गर, तलवार, तोमर वगैरे घेऊन तेथें आले. (६१) नंतर त्या पाप्याला पाशानें बांधून घेऊन जाण्या करितां ते यमदूत तयारी करूं लागले. इतक्यांतच शिवाच्या आज्ञेनें शिवदूत त्याठिकाणीं शिवाच्या आज्ञेनें (६२) त्याला नेण्याकरितां शेंकडो हजारो आले. ते सर्व शुद्ध स्फटिकाप्रमाणें दिसत असून त्यांना डोळे तीन तीन होते. व सर्वांच्या डोकीवर जटाभार शोभत होता. (६३) सगळ्यांना हात चार असून सर्वांचें शरीर मोठें धिप्पाड होतें. प्रत्येकाच्या हातांत शूल मुद्गर वगैरे आयुधें होतीं, कांहीं लोकांच्या हातांत अंकुश व कांहीं लोकांच्या हातांत गदा अशीं आयुधें होतीं. (६४) कांहीं लोकांच्या हातांत धनुष्य असून कांहीं लोकांच्या हातांत शक्ति होत्या. कांहीं लोकांच्या हातांत भिंडिवाल असून कांहीं लोकांच्या हातांत परिघायुध होतें. (६५) सर्वांच्या आंगावर वाघाचें कातडें असून सर्वांच्या आंगावर अनेक दागिने शोभत होते. सर्वांच्या आंगावर भस्म शोभत असून सर्वांच्या मस्तकांवर

ते समेत्य तदा सर्वे ददृशुर्यमकिंकरान् ॥ बध्वा पाशेन तं पापं गृहीत्वा गंतुमुद्यतान् ॥६६॥

शिवदूता ऊचुः ॥ मुच्यतां मुच्यतामेष महात्मा शिवसंमतः ॥ तपोभिर्विविधैर्यज्ञैः प्रधानैरखिलैरपि॥६७॥यस्य प्रसादमिच्छन्ति सोऽस्य तुष्यति शंकरः ॥६८॥

यमकिंकरा ऊचुः ॥ किमर्थमागता यूयं कस्य दूता महाबलाः ॥ अधुना क्लेशितं दृष्ट्वा कृपया वा समागताः ॥६९॥

शिवदूता ऊचुः ॥ यस्य प्रसादलेशेन ब्रह्मा ब्रह्मत्वमागतः ॥ विष्णुर्विष्णुत्वमापन्नस्तस्य दूता वयं भटाः ॥७०॥

यमकिंकरा ऊचुः ॥ शिवभृत्या भवन्तो हि किमर्थमिह चागताः ॥ ये यजन्ति महादेवमनन्यमनसोऽमलाः ॥७१॥ तेषामानयनार्थाय भवदागमनं यतः ॥ अयं त्वतीव पापिष्ठः सर्वलोकविगर्हितः ॥७२॥ अनेन यातनाः कष्टा भोक्तव्या बहुकालिकाः ॥ यस्याज्ञया वयं प्राप्ताः कर्तुं

---

भस्माचे त्रिपुंड्र शोभत होते. (६६) तेव्हां ते सर्व एके ठिकाणीं जमून यमदूतांना पाहूं लागले. इतक्यांत यमदूत त्याला बांधून घेऊन यमलोकाला जाण्याच्या तयारीला लागले होते.

(६७) शिवदूत बोलले—या महात्म्याला सोडा सोडा; हा श्रीशिवाचा मोठा आवडता आहे. तप, अनेक यज्ञ, मुख्य मुख्य इतर यज्ञयाग वगैरेनीं (६८) त्याचा प्रसाद मिळावा, ह्मणून लोक इच्छा करतात, तो शिव याच्यावर संतुष्ट झालेला आहे.

(६९) यमदूत बोलले—तुह्मी कां आलां? व तुह्मी कोणाचे दूत आहांत? सांप्रत क्लिष्ट झालेल्या या प्राण्याला पाहून दया येऊन तुह्मी आलांत कीं काय? हें सांगा.

(७०) शिव दूत बोलले—लोकहो, ज्याच्या प्रसादानें ब्रह्मदेवाला ब्रह्मत्व मिळालें, व विष्णूला विष्णुत्व मिळालें, त्या शिवाचे दूत असून त्या शिवाचे आह्मी भट आहोंत.

(७१) यम दूत बोलले—शिव दूत हो, तुह्मी येथें कां आलांत? कारण जे लोक अनन्यभावानें निर्मळमनानें महादेवाची पूजा करतात, (७२) त्यांना नेण्याकरितां तुमचें आगमन व्हावें, हें उचित आहे. हा तर अत्यंत पापी असून सर्व लोकांमध्यें हा अति निंद्य झाला होता. (७३) याकरितां यानें पुष्कळ कालपर्यंत

शासनमस्य तु ॥७३॥ वयं ह्येनं न मुंचामो भवन्तो गन्तुमर्हथ ॥७४॥

सूत उवाच ॥ एतच्छ्रुत्वाऽतिवेगेन शिवदूता महाबलाः ॥ ऊचुः कोपान्विताः सर्वे कल्पान्तानलसन्निभाः ॥७५॥

शिवदूता ऊचुः ॥ हरिकेशाज्ञया प्राप्ता नेतुमेनमकल्मषम् ॥ मुंचतैनं महाभागं यदि जीवितुमिच्छथ ॥७६॥

सूत उवाच ॥ गणेश्वरवचः श्रुत्वा भटा दर्पसमन्विताः ॥ बध्वा पाशेन तं पापं गृहीत्वा गंतुमुद्यताः ॥७७॥ गणेश्वरास्तदा क्रुद्धा दृष्ट्वा यमभटांस्तदा ॥ शस्त्रवर्षं प्रमुंचन्तो मार्गमावृत्य तस्थिरे ॥७८॥ गणेशानां भटानां च युद्धमासीत्सुदारुणम् ॥ एतस्मिन्नेव काले तु स्वदूतैराशुगामिभिः ॥७९॥ भटानां कदनं श्रुत्वा यमः क्रोधसमन्वितः ॥ अन्यान्भटान्समाहूय प्रेषयामास सत्वरम् ॥८०॥ उलुंबलं (उदुंबरं) समालोक्य यमो वचनमब्रवीत् ॥८१॥

यम उवाच ॥ गच्छोदुंबर शीघ्रं त्वं तं पापं शीघ्रमानय ॥ तत्र ये

---

अनेक यातना भोगिल्या पाहिजेत. ज्याच्या आज्ञेनें याला नेण्या करितां व शासन करण्याकरितां आह्मी आलों, (७४) तर आह्मी याला सोडूं इच्छित नाहीं. या करितां तुह्मी आलां तसें परत जा.

(७५) सूत बोलले–असें त्यांचें वाक्य ऐकून अतिवेगानें महाबलिष्ठ शिवदूत रागानें लाल होऊन सर्वही प्रळयकालच्या अग्नीप्रमाणें खवळून बोलले.–

(७६) शिव दूत बोलले–यमदूतहो, तुह्माला जीविताची अपेक्षा असेल तर मुकाट्यानें याला तुह्मी सोडा. श्रीशिवाच्या आज्ञेनें आह्मी या महाभाग्यशाली निष्कल्मष पुरुषाला नेण्याकरितां आलों आहोंत.

(७७) सूत बोलले–गणाधिपांचें वाक्य ऐकून ते यमदूत आपल्याच गर्वामध्यें असून त्या पाप्याला बांधून तसेंच पुढें जाऊं लागले. (७८) नंतर गणेश्वर रागावून यम भटांना पाहून शस्त्रांची वृष्टि करीत रस्ते रोंखून उभे राहिले. (७९) तेव्हां अर्थात गणाधीशांचें व यमदूतांचें भयंकर युद्ध जुंपलें. इतक्यांतच जलद पळून जाऊन कांहीं यमदूतांनीं यमाला वर्दी नेऊन पोंचविली. (८०) तेव्हां त्या भटांचें कदन (तंटा) ऐकून यम अतिशय रागावून दुसऱ्या कांहीं भटांना बोलावून तिकडे त्यानें लौकरच पाठविलें. (८१) उदुंबर एका भटाला पाहून यम त्याला बोलला.–

(८२) यम बोलला–हे उदुंबरा, तूं लौकर जा, त्या पाप्याला येथपर्यंत आण.

विघ्नकर्तारस्तान्सर्वान् समरे जहि ॥८२॥ उदुंबरो यमेनाथ प्रेषितः प्रययौ तदा ॥ भटैः परिवृतो वीरैर्व्याधिभिर्मृत्युभिस्तदा ॥८३॥ क्षणेन प्राप्तवान्स्थानं यत्र युद्धमवर्तत ॥ यमेन प्रेषितान्सर्वान्दृष्ट्वा समरमूर्धनि ॥८४॥ गणेशाः समरे सर्वान् बाणैर्निर्बिभिदुर्भटान् ॥ गणेशप्रहितैः शस्त्रैस्सर्वे यमभटास्तदा ॥८५॥ छिन्नबाहूरुचरणाः पेतुः सर्वे गतासवः ॥ हत्वा यमभटान्सर्वान्व्याधीनष्टाधिकं शतम् ॥८६॥ मृत्यूनां च शतं हत्वा गणेशा रणमूर्धनि ॥ कालमृत्युं रणे दृष्ट्वा बाणवर्षैरवाकिरन् ॥८७॥ गणेशप्रहितैर्बाणैः क्षतगात्रो रणाजिरे ॥ न शशाक तदा स्थातुं पलायनपरोऽभवत् ॥८८॥ च्छिन्नांगहस्तहृदयो ययौ मृत्युर्यमान्तिकम् ॥ हत्वा यमबलं सर्वं मृत्युं जित्वा तु संगरे ॥८९॥ छिन्नपाशं तमादाय सुकुमाराभिधं द्विजम् ॥ गणेशा यानमारोप्य ययुः शंकरमंदिरम् ॥९०॥ सुकुमारस्तदा देवं ददर्श वृषभ-

---

मध्यें तुला कोणी विघ्न करतील तर त्या सर्वांना बेलाशक मारून टाक. (८३) याप्रमाणें यमानें त्याला जाण्याविषयीं सांगितल्याबरोबर तो उदुंबर आपल्या बरोबर व्याधि मृत्यु इतर भट यांना घेऊन लौकरच तेथें आला. (८४) एका क्षणांत जेथें युद्ध चाललें होतें त्याठिकाणीं तो आला. त्या समरशिरावर यमानें पाठविलेल्या त्या दूतांना पाहून (८५) गणाधीश्वर अधिकच चवताळून त्यांच्यावर बाणांचा वर्षाव करूं लागले. गणाधीश्वरांनीं टाकलेल्या शस्त्रास्त्रांच्या योगानें सर्व यमदूत (८६) भग्न झाले. कित्येकांचे हात तुटले होते, कित्येकांचे पाय तुटले होते, कित्येकांची मांडी तुटून सर्वही गतप्राण होऊन जमिनीवर पडले. एकशेंआठ व्याधींसह सर्व यमदूत मरून पडले. (८७) नंतर गणाधीश्वरानीं शंभर मृत्यूंचा संहार करून त्या समरमस्तकावर कालमृत्यूवर बाणांचा वर्षाव करावयास आरंभ केला. (८८) त्यासमरांत गणेशांच्या बाणांनीं त्याचें शरीर छिन्न विच्छिन्न झालें. अर्थात तो तेथें न राहतां पळून गेला. (८९) अवयवें तुटलीं होतीं, हात तुटले होते, हृदय तुटलें होतें, अशी स्थिति होऊन तो मृत्यु यमाजवळ आला. या प्रमाणें यमाचें सर्व सैन्य मारून समरांत मृत्यूला जिंकून (९०) पाश सर्व तोडून टाकून सुकुमार नांवाच्या ब्राह्मणाला घेऊन सर्व गणाधीश्वर विमानांत बसून श्रीशिवमंदिराला आले. (९१) सुकुमारानें तेथें वृषभध्वज शिवाला पाहिलें तों देव कोटि सूर्यांप्रमाणें भासत असून दंहिवराप्रमाणें किंवा कुंदपुष्पाप्रमाणें किंवा चंद्रा-

ध्वजम् ॥ कोटिसूर्यप्रतीकाशं हिमकुंदेंदुसन्निभम् ॥९१॥ चतुर्बाहुं त्रयीनेत्रं शंकरं लोकशंकरम् ॥ दक्षिणोत्तरपार्श्वे तु ब्रह्मविष्णुसमन्वितम् ॥९२॥ नानागणेश्वरैर्युक्तं नानादेवगणान्वितम् ॥ सुकुमारस्तदा दृष्ट्वा सर्वलोकमहेश्वरम् ॥९३॥ पपात पादयोर्भक्त्या गणेशैरभिपूजितम् ॥ पादमूले निपतितं सुकुमारं तदा शिवः ॥९४॥ उत्थाप्य कृपया तस्मै विमानं दत्तवान्भवः ॥९५॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे शिवरात्रिव्रतमाहात्म्यकथने सुकुमारस्य गणेशत्वप्रदानं नाम द्विसप्ततितमोऽध्यायः ॥

---

प्रमाणें शोभत होता. (९२) त्याला चार बाहु असून तीन डोळे होते. सुखकर असून सर्व लोकांना सुखकर असा भासत असे त्याच्या उजव्या डाव्या बाजूला ब्रह्मा विष्णु बसले होते. (९३) अनेक गणाधीश्वर त्याच्यापुढें असून देव तेथें बसले होते. सर्व लोकांचा ईश्वर अशा शिवाला तेथें पाहून सुकुमार (९४) भक्तीनें त्या देवाच्या पायावर पडला. त्यावेळेस सर्व गणाधीश्वरांनीं त्याची प्रशंसा केली. पादमूलावर पडलेल्या त्या सुकुमाराला पाहून शिवानें (९५) त्याला उठविलें व कृपा करून शिवानें त्याला एक विमान दिलें.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील शिवरात्रिव्रतमाहात्म्यकथनांतील सुकुमाराला गणाधिपत्वप्रदान कथन नांवाचा बाहत्तरावा अध्याय संपला.



## ॥ अथ त्रिसप्ततितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ सूत उवाच ॥ पराजितो गणेशैस्तु मृत्युर्गत्वा यमान्तिकम् ॥ धर्माय कथयामास पराभवमथात्मनः ॥१॥ तच्छ्रुत्वा धर्मराजोऽपि चित्रगुप्तं समाव्हयत् ॥ विचार्य सुचिरं तेन सुकुमारशुभाशुभम् ॥२॥ मेरुमंदरतुल्यानि सुकुमारकृतानिच ॥ यमो दृष्ट्वा तु पापानि विस्मयं परमं ययौ ॥३॥ विचार्य सुचिरं कालं नापश्यत्पुण्यमण्वपि ॥ एवंविधोऽपि पापात्मा गतः शिवपुरं कथम् ॥४॥ स्वबलं च हतं दृष्ट्वा पापिष्ठस्योत्तमां गतिम् ॥ भीतात्मा विस्मयाविष्टो लोकनाथं दिदृक्षया ॥५॥ चित्रगुप्तादिभिः सार्द्धं शिवलोकं ययौ यमः ॥ त्रयोविंशतिसंख्याकान् स्वर्गलोकानतीत्य च ॥६॥ मुनिमण्डलमाक्रम्य महर्लोकमतीत्य च ॥ सत्यलोकं ददर्शाथ बहाश्चर्यमनोहरम् ॥७॥ तस्मादूर्ध्वमथाक्रम्य विष्णुलोकं ददर्शह ॥ नानाश्चर्यसमायुक्तं पश्यन्नूर्ध्वं ययौ यमः ॥८॥ शिवलोकं ददर्शाथ सर्वलोकोत्तमोत्तमम् ॥ द्वात्रिंशत्कोटिसंख्यानंयोजनैरतिविस्तरम् ॥९॥ जांबूनदविमानैश्च सौवर्णैरप्य-

---

श्रीशिवास नमस्कार असो. (१) सूत बोलले—गणाधिपतींनीं मृत्यूचा पराभव केल्यानंतर मृत्यूनें यमाकडे जाऊन आपल्या पराभवाची सर्व हकीकत यमधर्माला सांगितली. (२) तें ऐकून धर्मराजानें चित्रगुप्ताला हांक मारिली. नंतर सुकुमाराच्या शुभाशुभ कर्मांचा विचार पुष्कळ वेळ चांगल्या तऱ्हेनें केला. (३) मेरूसारखीं, मंदर पर्वतासारखीं अघोर पातकें सुकुमारानें केलेलीं यमानें पाहून यमाला अत्यंत आश्चर्य वाटलें. (४) पुष्कळ कालपर्यंत विचार केला तरी थोडें देखील त्या सुकुमाराचें पुण्य दिसलें नाहीं. अशा तऱ्हेचा सुकुमार शिवपुरास एकाएकीं गेला कसा ? (५) आपलें सर्व सैन्य नष्ट झालें, पाप्याला उत्तम गति मिळाली. असा सर्व विचार करून भयभीत होऊन अत्याश्चर्यानें युक्त होऊन साक्षात श्रीशिवाला पाहण्याकरितां (६) चित्रगुप्त वगैरे सर्वलोकांना बरोबर घेऊन यमधर्म शिवलोकाला आला. तेवीस स्वर्गलोक ओलांडून (७) मुनिमंडल आक्रमून महर्लोकापलीकडे अत्याश्चर्यकर सुंदर सत्यलोकाला त्या यमानें पाहिलें. (८) त्याच्यावर विष्णुलोकाला पाहिलें. तेथेंही अत्याश्चर्य पाहत पाहात त्याच्या वरच्या लोकांपर्यंत यमधर्म गेला. (९) येथें सर्व लोकांत उत्तमोत्तम अशा शिवलोकाला त्यानें पाहिलें. तें स्थान बत्तीस कोटि प्रमाण योजनपर्यंत विस्ताराचें होतें. (१०) सोन्याच्या शेंकडो विमानांनीं तें स्थान अलंकृत

लंकृतम् ॥ मणिरत्नमयैर्यानैर्वज्रैर्वैडूर्यनिर्मितैः ॥१०॥ कल्पवृक्षासनैर्युक्तैरपारजनसंवृतैः ॥ बहाश्चर्यगुणैर्युक्तं सर्वलोकमनुत्तमम् ॥११॥ प्रविश्य च ददर्शाथ शिवस्य महतीं सभाम् ॥ कोटियोजनविस्तीर्णां चतुर्द्वारसमन्विताम् ॥१२॥ चतुस्तोरणसंयुक्तां हेमरत्नोपशोभिताम् ॥ दिव्यरत्नविमानाढ्यां दिव्यछत्रोपशोभिताम् ॥१३॥ हेमरत्नमयैः स्तंभैः स्फाटिकैरुपशोभिताम् ॥ नंदिभृंगीशभूतेशनंदिनाथैश्च संयुताम् ॥१४॥ अनन्ताश्चर्यसंयुक्तां प्रविवेश तदा यमः ॥ ददर्श नंदिनं तत्र पूर्वद्वारस्थितं प्रभुम् ॥१५॥ भस्मोद्धूलितसर्वांगं त्रिपुण्ड्रांकितमस्तकम् ॥ सुयशादयितं कान्तं शूलवेत्रधरं प्रभुम् ॥१६॥ तस्मै प्रणामं कृत्वा तु धर्मः कार्यं व्यजिज्ञपत् ॥१७॥

धर्म उवाच ॥ द्रष्टुमभ्यागतो देवं सर्वलोकमहेश्वरम् ॥ त्वत्प्रसादाच्च द्रक्ष्यामि भृत्यभूतो ह्यहं तव ॥१८॥ धर्मेण भाषितं श्रुत्वा गत्वा चैव शिवांतिकम् ॥ कृत्वा प्रणामं देवस्य कृतांजलिरुवाच ह ॥१९॥

---

झालें होतें. मणिमय, रत्नमय, वज्रमय, वैडूर्यमय अशीं विमानें तेथें शोभत होतीं. (११) अपरंपार लोकसमूहांनीं युक्त अशीं कल्पवृक्षाचीं आसनें शोभत होतीं. अत्याश्चर्यकर गुणांनीं युक्त सर्व लोकांत श्रेष्ठ असें तें श्रेष्ठ स्थान यमानें पाहिलें. (१२) तेथें प्रवेश करून शिवाची मोठी सभा पाहिली. ती कोट्यावधि योजनपर्यंत विस्तीर्ण असून तिला चार दारें होतीं. (१३) चार तोरणांनीं युक्त असून सोन्यारत्नांनीं ती सभा शोभत होती. दिव्य दिव्य रत्नांच्या विमानांनीं ती सभा शोभत होती. दिव्य छत्रांनीं शोभित दिसत होती (१४) सुवर्णमय व स्फाटिकमय विमानांनीं ती सभा शोभत होती. नंदी, भृंगी, भूतेश, नंदिनाथ यांनीं ती सभा शोभत होती. (१५) अपरिमित आश्चर्यांनीं सुशोभित अशा सभेला यम गेला (आंत प्रवेश केला) पूर्वद्वारांत प्रभु नंदी बसला होता, त्याला यमानें पाहिलें. (१६) त्याच्या सर्वांगावर भस्म उधळलेलें असून मस्तकावर त्रिपुंड्राचें चिन्ह शोभत होतें. जो सुयशेचा प्रिय असून मनोहर दिसत होता. त्याच्या हातांत शूल आणि वेत अशीं आयुधें शोभत होतीं. (१७) त्याला नमस्कार करून धर्मानें आपल्या कार्याविषयीं त्याची विनंति केली.

(१८) धर्म बोलला–हे नंदिकेश्वरा, सर्व लोकांचा ईश्वर अशा देवाला तुझ्या प्रसादानें पाहण्याची इच्छा करतों. तुझा मी दास आहें. (१९) धर्माचें तें वाक्य ऐकून शिवाजवळ जाऊन नमस्कार करून हात जोडून बोलला–

नंदिकेश्वर उवाच ॥ प्रसीद मे जगन्नाथ यमस्त्वां द्रष्टुमागतः ॥ चित्रगुप्तादिभिः सार्द्धं किमागच्छतु गच्छतु ॥२०॥ शिवस्येंगितमाज्ञाय नंदीश्वर उपागमत् ॥ यमं प्रवेशयामास चित्रगुप्तादिभिः सह ॥२१॥ देवस्य पूर्वदिग्भागे दिव्यरूपवपुर्धरान् ॥ गणेश्वरान् ददर्शोग्रान् धर्मराजो महाबलान् ॥२२॥ तत्र पाशुपताश्चैव शैवाः केचित्तथापरे ॥ कालामुखास्तथाचान्ये केचिन्माहेश्वरा जनाः ॥२३॥ दिव्याभरणसंयुक्ता दिव्यस्रगनुलेपनाः ॥ चतुर्भुजास्त्रिनेत्राश्च शैवसिद्धान्तकोविदाः ॥२४॥ शुद्धस्फटिकसंकाशा जटाचंद्रार्धधारिणः ॥ अनेककोटिसंख्याताः शिवतुल्यपराक्रमाः ॥२५॥ ब्रह्माण्डमालाभरणान् महादेवपरायणान् ॥ यमो दृष्ट्वातिहृष्टात्मा तदा विस्मयमागतः ॥२६॥ देवस्य दक्षिणे पार्श्वे ये स्थितास्तान् ददर्श ह ॥ चराचरमिदं सर्वं जगज्जातं यदिच्छया ॥२७॥ चतुर्वेदा मुखं यस्य स देवः कमलासनः ॥ अष्टादश प्रभेदेन लोकं व्याप्य तु या स्थिता ॥२८॥ सरस्वत्या तया सार्द्धं

(२०) नंदिकेश्वर बोलला—हे जगन्नायका, माझ्यावर प्रसन्न हो यम तुला पाहण्याकरितां आला आहे. त्याच्याबरोबर चित्रगुप्त वगैरे लोक आहेत. तर त्याला आंत येऊं देऊं कां नको ? तसाच निघून जा ह्मणून सांगूं कीं काय ? (२१) इतक्यांत श्रीशिवाचें इंगित जाणून नंदीश्वर आला, आणि चित्रगुप्त वगैरे मंडळीसह यमाला आंत जावयास त्यानें सांगितलें. (२२) नंतर यम आंत येऊन देवाच्या पूर्वेकडे सुंदररूप धारण करणारे उग्र व महाबल अशा गणेश्वरांना पाहूं लागला. (२३) त्याठिकाणीं कांहीं पाशुपत होते, कांहीं शैव होते, कांहीं कालामुख होते, कांहीं माहेश्वर होते. (२४) सर्वांच्या आंगावर उत्तमोत्तम दागिने असून गळ्यांत उत्तमोत्तम माळा शोभत होत्या. त्या सर्वांना हात चार असून डोळे तीन होते. सर्वही शैवसिद्धांतांत चतुर होते. (२५) शुद्ध स्फटिकाप्रमाणें दिसत असून जटा व अर्द्धचंद्र यांनीं सुशोभित दिसत होते. अनेक कोटि संख्येचे लोक तेथें बसलेले असून सर्वही शिवासमान पराक्रमी होते.(२६)ब्रह्मांडांच्या माळा गळ्यांत आभरणासाठीं घातलेल्या असून महादेवाच्या ठिकाणीं सर्व आसक्त होते. तें पाहून यमाला अत्याश्चर्य व विस्मय वाटला. (२७) देवाच्या दक्षिण बाजूला जे बसले होते, त्यांनाही यमानें पाहिलें. ज्याच्यां इच्छेनें हें सर्व चराचर जग झालें-(२८)ज्याच्या तोंडांत चतुर्वेद आहेत, तो ब्रह्मदेव कमलासन घालून बसला होता. अठरा लोक व्यापून जी राहिली आहे,(२९)त्या सरस्व-

ब्रह्मा दक्षिणमास्थितः ॥ अंगिरा वामदेवश्च वसिष्ठाद्या मुनीश्वराः ॥२९॥ कपिलाद्या महासिद्धाः सनकाद्याश्च योगिनः ॥ एते चान्ये च बहवः शिवदक्षिणतः स्थिताः ॥३०॥ यमस्तानखिलान्दृष्ट्वा पश्चिमां दिशमागतः ॥ तत्र स्थितान् महामायान् शिवतुल्यपराक्रमान् ॥३१॥ भूतेशान् प्रमथाधीशान्बलप्रमथनादिकान् ॥ ब्राम्ह्यादिमातरः सर्वाः कुमारस्यापि मातरः ॥३२॥ सुमालिमालतीमुख्याः पार्वत्या मातरः स्थिताः ॥ कराली विकराली च बलप्रमथनी तथा ॥३३॥ कालरात्रि-प्रचंडाद्या मातरस्तत्र संस्थिताः॥प्रचण्डश्चण्डकोपश्च कालभैरवसंज्ञकः ॥३४॥ चंडावतः प्रचण्डार्चिरस्त्रं पाशुपतं तथा ॥ एते चान्ये च बहवः सिद्धाः संहारकर्मणि ॥३५॥ तान् दृष्ट्वा विस्मितो भूत्वा यमोऽभ्यन्तर-माविशत् ॥ तत्र स्थितान्महाभागान्यमः सर्वान्ददर्श ह ॥३६॥ शंखच-क्रधरं देवं पीतवाससमच्युतम् ॥ चतुर्भुजमुदारांगं कौस्तुभोद्भासितो रसम् ॥३७॥ किरीटकटकोपेतं रत्नमौलिविराजितम् ॥ एकविंशतिभे-देन लोकमापूर्य या स्थिता॥३८॥लक्ष्म्या तया समासीनं ददर्श च हरिं

---

तीला बरोबर घेऊन शिवाच्या उजवीकडे ब्रह्मा बसला होता. अंगिरा, वामदेव, वसिष्ठ वगैरे मुनीश्वर, (३०) कपिल वगैरे महासिद्ध, सनकादि योगीश्वर हे व इतर पुष्कळ लोक शिवाच्या उजवीकडे बसले होते. (३१) त्या सर्वांना पाहून यम पश्चिम दिशेला आला त्या ठिकाणीं शिवासमान पराक्रमी महामायावी अशा लोकांना तेथें यमानें पाहिलें. (३२) भूतेश, प्रमथाधिपति, बलप्रमथन व-गैरे, ब्राह्मयादि मातृगणं, सर्व कुमारांचे मातृगण, (३३) सुमाली, मालती, वगैरे पार्वतीचा मातृगण बसला होता. कराली, विकराली, बलप्रमथनी, (३४) कालरात्रि, प्रचंडा वगैरे मातृगण बसले होते. प्रचंडा, चंडकोप, कालभैरव, (३५) चंडावान् प्रचंडार्चि, पाशुपतअस्त्र हें व दुसरे संहारकर्मांत कुशल अशा लोकांना (३६) पाहून अत्याश्चर्यानें युक्त होऊन यम आंत आला. त्या ठिकाणीं महाभाग्यशाली असें सर्व लोक बसले होते. त्यांना यमानें पाहिलें. (३७) हातांत शंख चक्र असून आंगावर पीतांबर होतें चार हात असून अवयवें त्याचीं उत्कृष्ट होतीं. वक्षस्थलावर कौस्तुभमणि असून (३८) डोक्यावर त्यानें किरीट घातलें होतें. शिखेवर रत्नाचे दागिने सुशोभित दिसत होते. असा विष्णु तेथें बसला होता. एकवीस प्रकारच्या लोकांना व्यापून जी बसली आहे, (३९) अशा लक्ष्मीसहवर्तमान बसलेल्या विष्णूला यमानें पाहिलें. त्या ठिकाणीं

यमः ॥ वसवोऽष्टौ स्थितास्तत्र रुद्रा एकादश स्थिताः ॥३९॥ सर्वे च द्वादशादित्याः सिद्धविद्याधरादयः ॥ गंधर्वाप्सरसो यक्षा भुजंगा गुह्यकास्तथा ॥४०॥ सर्वानेवाथ तान्दृष्ट्वा शिवस्योत्तरतः स्थितान् ॥ हृषितात्मा यमस्तूर्णं शिवपार्श्वमुपागमत् ॥४१॥ तत्र स्थितान्महाभागां-श्छिवसारूप्यमागतान् ॥ वेदोक्तेन विधानेन कृत्वा पाशुपतं शुभम् ॥४२॥ विच्छिन्नपाशान्निर्द्वंद्वान् जितमायानकल्मषान् ॥ परमाद्वैतवि-ज्ञानानात्मारामांश्छिवात्मकान् ॥४३॥ दृष्ट्वा यमः प्रहृष्टात्मा महादेवं ददर्श ह ॥ दिव्यसिंहासनासीनं सर्वदेवैः समर्चितम् ॥४४॥ संसार-सागरं घोरं यया संतार्य मानवाः ॥ कैवल्यं प्रतिपद्यन्ते तया देव्या समन्वितम् ॥४५॥ यया संजायते विश्वं यया च स्थीयते जगत् ॥ यया विश्वमिदं नश्येत्तया देव्या समन्वितम् ॥४६॥ कोटिसूर्यप्रतीकाशं स-र्वाभरणभूषितम् ॥ नीलकण्ठं त्रिनेत्रं च चंद्रार्धकृतशेखरम् ॥४७॥ दृष्ट्वा

---

अष्टवसु असून एकादश रुद्रगण बसले होते. (४०) एकेठिकाणीं बारा सूर्य व-सले असून सिद्ध विद्याधर, वगैरे गंधर्व, अप्सरा, यक्ष, भुजंग, गुह्यक वगैरे व-सले होते. (४१) हे सर्व शिवाच्या उत्तरेकडे बसले होते. त्यांना पाहून आनं-दानें युक्त होऊन यम हा लौकरच शिवाजवळ आला. (४२) त्या ठिकाणीं शिव-सारूप्य पावलेले महाभाग्यशाली लोक बसले होते, त्यांना पाहिलें. त्या सर्वांनीं वेदोक्त विधानानें पाशुपत व्रत केलें होतें. (४३) त्या सर्वांनीं आपले पाश तोडून टाकिले होते, शीतोष्ण वगैरे द्वंद्व सहन केलें होतें. माया जिंकली होती. पाप-नाश करून घेतला होता. श्रेष्ठ अद्वैतज्ञान मिळविलें होतें. ते आपल्या ठिकाणीं रममाण झाले होते. ते सर्व शिवस्वरूप झाले होते. (४४) अशा लोकांना पाहून संतुष्ट होऊन महादेवाला त्यानें पाहिलें उत्तम सिंहासनावर श्रीशिव बसले असून सर्व देव त्यांची पूजा करीत होते. (४५) जिच्या योगानें घोर संसारसमुद्र त-रून लोक मोक्षाला जातात, त्या मायेसहवर्तमान शिव बसले होते. (४६) जिच्या योगानें हें जग उत्पन्न होत असून जिच्या योगानें याचें पालन होतें. व जिच्या योगानें हें जग नष्ट होतें, त्या मायेसहवर्तमान शिव बसले होत (४७) शिवाची कांति कोटि सूर्यांप्रमाणें भासत असून शिवाच्या सर्व आंगावर दागिने होते. ज्याचा गळा नील ( जांभळा ) असून डोळे ज्याला तीन होते. ज्याच्या डोक्यावर अर्द्धचंद्र शोभत आहे, (४८) अशा देवाला पाहून यमानें दंडमुद्रा

यमस्तदा देवं दण्डमुद्रां निवेद्य च ॥ पपात पादयोर्भक्त्या सांबस्य जगतां पतेः ॥४८॥ यमस्ततः समुत्थाय भक्त्या परमया युतः ॥ कराभ्यामंजलिं कृत्वा स्तोतुमेवोपचक्रमे ॥४९॥

यम उवाच ॥ नमः सकललोकानां सर्गस्थित्यन्तहेतवे ॥ सर्वज्ञाय वरेण्याय भक्तिगम्याय शंभवे ॥५०॥ यत्पादं सकृदभ्यर्च्य पापिनोऽपि गतैनसः ॥ शिवलोकं प्रपद्यन्ते तन्नमामि सदाशिवम् ॥५१॥ यत्पादपंकजं नत्वा पापिष्ठा अपि मानवाः ॥ तीर्त्वा ते नरकं घोरं प्रयांति शिवमंदिरम् ॥५२॥ यन्नाम सकृदुच्चार्य महापातकिनो नराः ॥ निष्कल्मषा भविष्यन्ति तं प्रपद्ये महेश्वरम् ॥५३॥यस्य मूर्तिं सकृत् ध्यात्वा ध्वस्तपापा नरोत्तमाः ॥ शिवरूपा भविष्यन्ति तमहं नौमि शंकरम् ॥५४॥ वेदानामागमानां च पुराणानां तथैव च ॥ फलभूतो य एवैकः प्रपद्ये तं महेश्वरम् ॥५५॥ मणिलिंगे यमभ्यर्च्य रोहिण्यां विद्यया सह॥ ब्रह्मत्वं गतवान्ब्रह्मा तं नमामि महेश्वरम् ॥५६॥ इंद्रनीले यमभ्यर्च्य ध्रुवेण श्रुतितारके ॥ विष्णुत्वं प्राप्तवान् विष्णुस्तं नमामि महेश्वरम्

---

त्याला दाखवून भक्तीनें जगत्प्रभु सांबाला साष्टांग नमस्कार केला. (४९) नंतर उठून श्रेष्ट भक्तीनें युक्त होऊन दोनी हात जोडून यमानें त्याचें स्तोत्र केलें.

(५०) यम बोलला— सर्व लोकांची उत्पत्ति, स्थिति, नाश यांला कारण अशा हे ईश्वरा, तुला नमस्कार असो. हे सर्वज्ञा, वरेण्या, भक्तिगम्या, शंभो, तुला नमस्कार असो. (५१) ज्याच्या पायाची पूजा एकवार करून पापी लोक देखील निष्कल्मष होऊन शिवलोकाला येतात, त्या सदाशिवाला नमस्कार असो.(५२) ज्याच्या पादकमलाला नमस्कार करून पापी मानव देखील घोर नरक तरून शिवमंदिराला जातात, (५३) ज्याचें नांव एकवार घेतलें असतां महापातकी लोक निष्कल्मष होऊन महेश्वराला शरण येतात त्या ईश्वराला नमस्कार करतों. (५४) ज्याच्या मूर्तीचें एकवार ध्यान करून लोक निष्पाप होतात, व शिवरूप होतात, त्या शंकराला मी नमस्कार करतों. (५५) वेद आगम, पुराण यां सर्वांना जो एकच फल आहे, त्या महेश्वराला मी नमस्कार करतों. (५६) मणिमय लिंगामध्यें ईश्वराची व रोहिणीच्या ठिकाणीं विद्येसह पूजा करून ब्रह्मदेवानें ब्रह्मत्व मिळविलें, त्या महेश्वराला नमन करतों. (५७) इंद्रनील मण्याच्या लिंगांत ज्याची पूजा करून ध्रुवानें श्रुतितारकांत, पूजा करून विष्णूनें विष्णुत्व मिळविलें त्या

॥५७॥ पद्मरागे यमभ्यर्च्य कृत्तिकायां तु भद्रया ॥ अग्नित्वं प्राप्तवानग्निस्तं नमामि सदाशिवम् ॥५८॥ नीललिंगे यमभ्यर्च्य ज्येष्ठायां वज्रविद्यया ॥ शक्रत्वं प्राप्तवांश्चछक्रस्तं नमामि सदाशिवम् ॥५९॥ मणिलिंगे यमभ्यर्च्य मघायां वसुविद्यया ॥ अहं यमत्वमापन्नस्तं नमामि सदाशिवम् ॥६०॥ यस्य प्रसादलेशेन सर्वेषां प्राणिनामहम् ॥ शास्ता प्रख्यापितो लोके तं नमामि महेश्वरम् ॥६१॥ अयोलिंगे यमभ्यर्च्य दैत्यदानवराक्षसाः ॥ असह्यबलमापन्नास्तं नमामि सदाशिवम् ॥६२॥ कायेन मनसा बुध्या येऽर्चयन्ति महेश्वरम् ॥ धर्मार्थकाममोक्षाख्यान् पुरुषार्थान् लभंति ते ॥६३॥ यस्मिन् स्थितमिदं विश्वं वीचिमाला यथांभसि ॥ सर्वदेवमयं शंभुं प्रणमामि महेश्वरम् ॥६४॥ एकोऽस्ति सर्वभूतेषु तरंगेषु यथा पयः ॥ सर्वात्मकं महादेवं तं सदा प्रणमाम्यहम् ॥६५॥ एक एव हि यो देवः सर्वभूतहृदि स्थितः ॥ आकाशवदमेयात्मा तं नमामि महेश्वरम् ॥६६॥ एकोऽपि बहुधा देवो दृश्यते ज-

---

महेश्वराला नमस्कार असो. (५८) पद्मरागमण्याच्या लिंगांत ईश्वराची व कृत्तिकेच्या ठिकाणीं भद्रेची पूजा करून अग्नीनें अग्नित्व मिळविलें, त्या ईश्वराला नमस्कार करतों. (५९) नीळाच्या लिंगांत ज्याची व ज्येष्टेच्या ठिकाणीं वज्र विद्येसहित पूजा करून इंद्रानें इंद्रत्व मिळविलें, त्या सदाशिवाला नमस्कार असो. (६०) मणिमय लिंगांत ज्याची पूजा मघा नक्षत्राच्या दिवशीं वसुविद्येसहित करून मीं यमत्व मिळविलें, त्या सदाशिवाला नमस्कार असो. (६१) ज्या परमेश्वराच्या अनुग्रहाच्या किंचित भागानें सर्व प्राण्यांना मी शासन करतो, व शास्ता म्हणून प्रसिद्ध झालों, त्या महेश्वराला मी नमस्कार करतों (६२) लोखंडाच्या लिंगांत दैत्य, दानव, राक्षस यांनीं पूजा करून असह्य सामर्थ्य मिळविलें, त्या सदाशिवाला नमस्कार करतों. (६३) काया, वाचा, मनानें, ( शरीरानें, वाणीनें मनानें ) बुद्धीनें महेश्वराची पूजा करून धर्म, अर्थ, काम, मोक्ष असे पुरुषार्थ मिळवितात, त्या देवाला नमन करतों. (६४) समुद्रावर लाटा जशा असाव्यात, त्या प्रमाणें ज्याच्यामध्यें हें जग आहे, त्या सर्व देवमय महेश्वर शंभूला नमन करतों. (६५) लाटांमध्यें जसें पाणी आहे, त्या प्रमाणें सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं जो ईश्वर एकच आहे, त्या सर्वात्मक महादेवाला नमस्कार करतों. (६६) जो एकटाच देव सर्व प्राण्यांच्या हृदयामध्यें राहतो, जो आकाशा प्रमाणें व्यापक व अपरिमित शरीराचा आहे, त्या देवाला नमस्कार करतों. (६७) जो परमेश्वर

लचंद्रवत् ॥ अज्ञानावृतचित्तानां तं नमामि महेश्वरम् ॥६७॥ विज्ञान-वादिनः प्राहुर्विज्ञानमिति यं प्रभुम् ॥ तं नमामि महादेवं सदैवालंघ्य-शासनम् ॥६८॥ यमाहुः पुरुषं सांख्याः सदा तत्त्वार्थचिंतकाः ॥ तं न-मामि महेशानं सर्वलोकैककारणम् ॥६९॥ यमाहुर्ब्रह्मशब्देन सर्वे वे-दांतवादिनः ॥ वेदान्तवेद्यमीशानं तं नमामि महेश्वरम् ॥७०॥ विष्णुं सर्वज्ञमुत्पत्तिस्थितिसंहारकारिणम् ॥ तं नमामि महेशानं सर्वलोकैक-कारणम् ॥७१॥ पुष्कलागमतत्वज्ञा यमाहुश्चतुराननम् ॥ जगत्स्रष्टार-मीशानं तं नमामि सदाशिवम् ॥७२॥ यमेकमग्निरित्याहुः सूर्य इत्यपरे जनाः ॥ अन्ये वायुरिति प्राहुस्तं नमामि महेश्वरम् ॥७३॥ शैवाः शिव इति प्राहुरन्ये प्राहुर्महेश्वरम् ॥ अन्ये पशुपतिं प्राहुस्तमीशं प्रणमाम्य-हम् ॥७४॥ नानाविधघटेष्वन्तरेकं लीनं यथा नभः ॥ भूतेष्वन्तस्तथै-वैकस्तं प्रपद्ये सदाशिवम् ॥७५॥ स्रष्टा त्वमेव जगतां रक्षकस्त्वं महे-

---

एकटाच असून पाण्यांतल्या चंद्राप्रमाणें अनेक तऱ्हेनें अज्ञानी लोकांना दिसतो, त्या महेश्वराला नमस्कार करतों. (६८) विज्ञानवादी लोक ज्या प्रभूला विज्ञाने-श्वर असें ह्मणतात, ज्याची आज्ञा मोडतांच येत नाहीं, त्या महादेवाला नमस्कार करतों. (६९) तत्वार्थचिंतन करणारे सांख्यमतानुयायी लोक ज्याला पुरुष असें ह्मणतात, जो सर्व लोकांला मुख्य कारण आहे, अशा महेशानाला नमस्कार क-रतों. (७०) सर्व वेदांतवादी लोक ब्रह्म या शब्दानें ज्याला हांक मारतात जो वेदांत शास्त्राच्या ज्ञानानें गम्य होतो, त्या महेश्वर ईशानाला नमस्कार करतों. (७१) जो सर्वज्ञ असून उत्पत्ति, स्थिति, लय यांला कारण झाला आहे, जो सर्व लोकांला मुख्य कारण झाला आहे, जो विष्णु या नांवानें प्रसिद्ध झाला आहे, त्या महेशानाला नमन करतों. (७२) पुष्कळ आगमांचें तत्व जाणणारे लोक ज्याला चतुर्मुख ह्मणतात, जो जगाची सृष्टि करतो, त्या सदाशिवाला नमन करतों. (७३) ज्याला कांहीं लोक अग्नि ह्मणत असून सूर्य ह्मणतात, कांहीं लोक त्यालाच वायु ह्मणतात, त्या महेश्वराला मी नमस्कार करतों. (७४) शैव लोक ज्याला शिव ह्मणत असून इतर लोक महेश्वर असें ह्मणतात. आणखी कांहीं लोक पशुपति असें ह्मणतात. त्या ईशाला मी नमस्कार करतों. (७५) अनेक घागरींमध्यें एकच आकाश जसें आहे, तसें सर्व प्राण्यांच्या हृदयांत परमात्मा तो एकच राहतो. अशा सदाशिवाला नमस्कार करतों. (७६) हे महेश्वरा, जगाची सृष्टि करणारा तूं असून संरक्षण करणारा तूंच आहेस. जगाचा संहार

श्वर ॥ संहर्ता जगतां देवस्त्वमेवैको महेश्वर ॥७६॥ शासनार्थं तु पापानां त्वयैवाहं नियोजितः ॥ ततः प्रभृति देवेश सर्वे पापसमन्विताः ॥७७॥ पापानुरूपदण्डेन नरके शिक्षिता मया ॥ त्वदाज्ञयाऽहं देवेश सर्वत्रालंघ्यशासनः ॥७८॥ इदानीं भंजिताज्ञोऽहं सुकुमारकृते प्रभो ॥ किमेतदिति संचिंत्य त्वां द्रष्टुमहमागतः ॥७९॥ अनेन हिंसिता देव प्राणिनो लक्षसंख्यया ॥ हताश्च विप्रा बहवस्सुकुमारेण पापिना ॥८०॥ सहस्रशः कृतं स्तेयमनेनैव करालिना ॥ असेवतासौ चंडालीं समानां षष्टिसंख्यया ॥८१॥ पुत्रा उत्पादिता तस्यां पंच पातकसन्निभाः ॥ स्वात्मजायामसौ पापी जनयामास वै सुतौ ॥८२॥ चंडाल्या पीतशेषां तु तावत्कालं पपौ सुराम् ॥ मेघाच्च्युता यथा धारा न गण्यन्ते हि मानवैः ॥८३॥ गगने तारका यद्वद्गंगायां सिकता यथा ॥ लोके गणयितुं शक्यं न मनुष्यैः सुरासुरैः ॥८४॥ कृतान्यनेन पापानि पापिना कोटिसंख्यया ॥ स्वल्पकाले न तच्छक्यं तथा वक्तुं कथंचन ॥८५॥ एकेन

---

करणारा तूंच एकटा आहेस. (७७) हे महेश्वरा, पापी लोकांना शासन करावयास आपणच मला आज्ञा केली आहे. हे देवेशा, त्या दिवसापासून सर्व पापी लोकांना (७८) त्यांच्या त्यांच्या पापाला अनुसरून नरकवासाची शिक्षा मीं दिली. तुझ्या आज्ञे प्रमाणें माझी आज्ञा सर्व ठिकाणीं निर्धास्त चालते. (७९) हे प्रभो, प्रस्तुत या सुकुमार ब्राह्मणासाठीं मात्र माझी आज्ञा व्यर्थ झाली. हें काय आहे ? तें पाहण्याकरितां मी आपल्या पायांजवळ आलों आहें. (८०) हे देवा, या पापी सुकुमारानें अनेक लक्षावधी प्राण्यांची हिंसा केली आहे. यानें पुष्कळ ब्राह्मण मारिले आहेत. (८१) या भयंकर प्राण्यानें हजारो चोऱ्या केल्या आहेत. साठ वर्षेपर्यंत यानें चांडालस्त्रीचा उपभोग घेतला आहे. (८२) तिच्या-ठिकाणीं पांच पातकेंच कीं काय ? अशीं पांच मुलें त्याच्यापासून झालीं. पुनः यानें आपल्याच कन्येच्या ठिकाणीं दोन मुलें उत्पन्न केलीं. (८३) तोंपर्यंत चांडालस्त्रीनें पान करून राहिलेली सुरा यानें घेतली. मेघापासून निघालेल्या धारांची गणना जशी मानवांच्यानें करवत नाहीं, (८४) व आकाशांतल्या नक्षत्रांची गणना जशी करवत नाहीं, व नदीकांठच्या वाळूची गणना जशी करवत नाहीं, मनुष्य काय ? पण सुरासुरांच्या हातूनही हीं गोष्ट अशक्य आहे. (८५) तितक्या कोटिसंख्येचीं पातकें या पाप्यानें केलीं आहेत. थोड्या कालांत तीं सर्व पातकें सांगणें कधींही शक्य नाहीं. (८६) या एकट्यानें केलेल्या

हि कृतस्यास्य पापस्य परमेश्वर ॥ प्रायश्चित्तं न पश्यंति सर्वशास्त्रेषु सूरयः ॥८६॥ एवंविधोऽसौ पापात्मा कथं प्राप्तस्तवान्तिकम् ॥ योगिनामप्यलभ्यं यत्तत्पापी प्राप्तवान् कथम् ॥८७॥ स्वतंत्रोऽसि महादेव सर्ववेदेषु कीर्तितः ॥ सुकुमारप्रसंगेन स्वतंत्रत्वं प्रकाशितम् ॥८८॥

सूत उवाच ॥ इत्युक्त्वा दण्डमुद्रां तां शिवाय विनिवेद्य च ॥ पपात दण्डवद्भूमौ प्रसीदेति वदन्मुहुः ॥८९॥ तमुवाच महादेवः प्रसन्नः करुणानिधिः ॥ कराभ्यां च समुत्थाप्य पादयोः पतितं यमम् ॥९०॥ आश्चर्यमत्र मा कार्षीः सुकुमारकृते यम ॥ वैषम्यमपि मे नास्ति शृणु वक्ष्यामि कारणम् ॥९१॥ अनेन सुकुमारेण यदेतद्दुष्कृतं कृतम् ॥ संख्यातुमप्यशक्तं यद्व्योम्नि तारकषंडवत् ॥९२॥ न तस्य निष्कृतिर्दृष्टा सर्वशास्त्रेषु चान्तक ॥ तथाविधं महापापं दग्ध्वा सर्वं क्षणेन तु॥९३॥ शिवरात्रिव्रतं दृष्ट्वा मत्समीपमुपागमत् ॥९४॥

यम उवाच ॥ एवंविधोऽसौ पापात्मा शुद्धोऽभूद्व्रतदर्शनात् ॥ तद्व्रतं ब्रूहि देवेश कदा कार्यं मनीषिभिः ॥९५॥

---

पातकांला प्रायश्चित्त सर्व शास्त्रांमध्यें मोठ मोठ्या पंडितांनीं शोधून काढिलें तरी सांपडत नाहीं. (८७) अशा तऱ्हेचा हा पापी तुझ्याजवळ आला कसा? योगी लोकांना देखील जें मिळणें अशक्य आहे, तें पद याला मिळालें कसें? (८८) हे महादेवा, तूं सर्वतंत्रस्वतंत्र आहेस, सर्व वेदांमध्यें असेंच सांगितलें आहे. परंतु या सुकुमाराच्या निमित्तानें तुझें स्वातंत्र्य लोकांत स्पष्ट दिसून आलें.

(८९) सूत बोलले—असें बोलून दंडमुद्रा (शासन करावयाची काठी) शिवापुढें ठेवून जमिनीवर वरचेवर नमस्कार करून देवा मजवर प्रसन्न हो प्रसन्न हो, असें यमानें ह्मटलें. (९०) नंतर करुणानिधि महादेव त्यावर प्रसंन होऊन पायावर पडलेल्या यमाला दोनी हातांनीं उठवून ह्मणाले कीं, (९१) यमा, यांत तूं आश्चर्य मानूं नकोस. थोडें देखील यांत वैषम्य नाहीं, याचें कारण सांगतों, ऐक. (९२) या सुकुमारानें जें दुष्कर्म केलें आहे, त्याची गणना आकाशांतल्या नक्षत्र मंडलाप्रमाणें करावयास जरी अशक्य आहे, (९३) त्या पातकांला कोणत्याही शास्त्रांत प्रायश्चित्त सांगितलें नाहीं, तथापि त्याचीं सर्व पातकें एका क्षणांत नष्ट होऊन गेलीं. (९४) याचें कारण यानें शिवरात्रीचें व्रत पाहिलें हेंच होय. ह्मणूनच हा सुकुमार माझ्याजवळ आला.

(९५) यम बोलला—अशा तऱ्हेचा पातकी व्रतदर्शनानें शुद्ध झाला. हे देवेशा,

ईश्वर उवाच ॥ माघकृष्णचतुर्दश्यां रात्रौ जागरणान्वितम् ॥ व्रतं कार्यं महाप्राज्ञैः प्राजापत्यफलप्रदम् ॥९६॥ वेदसारेण संपूज्य शिवरात्रौ महेश्वरम् ॥ शिवरात्रिव्रतं कृत्वा ब्रह्मा ब्रह्मत्वमागतः ॥९७॥ विद्यासारेण मंत्रेण शिवरात्रौ महेश्वरम् ॥ शिवरात्रिव्रतं कृत्वा विष्णुर्विष्णुत्वमागतः ॥९८॥ शिवरात्रौ शिवं पूज्य मृत्युमोचनविद्यया ॥ कल्पायुरभवत्पूर्वं मार्कण्डेयो महामुनिः ॥९९॥ अष्टौ च वसवः पूर्वं रुद्रा एकादश स्मृताः ॥ वेदसारेण संपूज्य सर्वे देवत्वमागताः॥१००॥ बहुनाऽत्र किमुक्तेन सारभूतं वचः शृणु ॥ आचंडालमनुष्याणां पापसंदहनक्षमम् ॥१०१॥ मेरुमंदरतुल्यश्च राशिः पापस्य कर्मणः॥संचितः सुकुमारेण सर्वलोकस्य पश्यतः ॥१०२॥ माघकृष्णचतुर्दश्यां महानिशि महेश्वरम् ॥ चण्डालीमात्मजां रंतुं पुष्पाण्यादातुमागतः ॥१०३॥ संपूज्यमानं व्रतिभिस्तस्मिन्काले ददर्श सः ॥ नानासुगंधकुसुमैश्चंदनादिविलेपनैः ॥१०४॥ भक्ष्यभोज्यान्नपानैश्च ताम्बूलैश्चंद्रसंयुतैः ॥

---

असें तें व्रत तरी कोणतें? तें सांग. बुद्धिमान प्राण्यांनीं तें व्रत केव्हां करावें? हेंही सांग.

(९६) श्रीशिव बोलले—यमा, माघकृष्णचतुर्दशीच्या दिवशीं रात्रीं जागरसहित हें व्रत मोठ्या बुद्धिमानांनीं करावें. या योगानें प्राजापत्ययाग केल्याचें फल मिळतें (९७) वेदांतलें सार अशा मंत्रांनीं शिवरात्रीच्या दिवशीं महेश्वराची पूजा करून शिवरात्रीचें व्रत करून ब्रह्मदेवानें ब्रह्मत्व मिळविलें. (९८) विद्यासार मंत्रानें शिवरात्रीच्या दिवशीं महेश्वराची पूजा करून शिवरात्रीचें व्रत करून विष्णूनें विष्णुत्व मिळविलें. (९९) शिवरात्रीच्या दिवशीं मृत्युमोचन विद्येनें शिवाची पूजा करून मार्कंडेयमुनि कल्पायुषी झाला. (१००) अष्टवसूंना वसुत्व यानेंच मिळालें एकादश रुद्रांना रुद्रत्व यानेंच मिळालें. वेदसारानें शिवाची पूजा केली ह्मणून देवानां अमरत्व प्राप्त झालें. (१०१) फार सांगण्यांत काय मतलब आहे? मुख्य गोष्ट एक सांगतों ऐक. हें व्रत केलें असतां चांडालापासून चांगल्या मनुष्यापर्यंत कोणी कसलेंही पातक केलें तरी तें तत्क्षणीं जळून जातें. (१०२) मेरू एवढा किंवा मंदरा एवढा पापांचा ढीग सर्व लोकांदेखत त्या सुकुमारानें संग्रह करून ठेवला, तथापि (१०३) माघकृष्णचतुर्दशीला महानिशीथाच्या वेळेस (मध्यरात्रीस) चांडालस्त्रियेशीं विलास करण्याकरितां फुलें आणावयास तेव्हां आला, (१०४) तेव्हां व्रतस्थ लोक महेश्वराची पूजा करीत होते, तें यानें पाहिलें. अनेक सुगंध फुलांनीं, चंदन वगैरे लेपनांनीं, (१०५) भक्ष्य, भोज्य,

गीतवाद्यादिनादैश्च पुराणस्तोत्रपाठनैः ॥१०५॥ संपूज्यमानं व्रतिभिः शिवलिंगं महानिशि ॥ ददर्श सुकुमारोऽसौ युक्तः पातककोटिभिः ॥१०६॥ व्याजेनापि तदा प्राप्तस्तत्क्षणाद्दग्धकिल्बिषः ॥ सर्वयज्ञतपोदानव्रतानामाप्तवान्फलम् ॥१०७॥ सर्वसारेण धर्मेण युक्तोऽसौ सुकुमारकः ॥ ममान्तिकमनुप्राप्य गाणपत्यं च लब्धवान् ॥१०८॥ यदा प्रज्वलितो वन्हिः शुष्कमार्द्रं च निर्दहेत् ॥ ज्ञानाज्ञानकृतं पापं व्रतं दहति दर्शनात् ॥१०९॥ संदेहं मा कृथाः किंचित्सुकुमारकृते यम ॥ महापातकलक्षाणि पातकानि कृतानि च ॥११०॥ शिवरात्रिव्रतं दृष्ट्वा यत्फलं प्राप्तवान् द्विजः ॥ तत्पुण्याग्नौ प्रदग्धाश्च महापातककोटयः ॥१११॥ राजसूयसहस्रस्य चाश्वमेधायुतस्य च ॥ कपिलाकोटिदानस्य भूमेः कृत्स्नस्य यत्फलम् ॥११२॥ दशवर्षसहस्राणि तपस्तप्त्वा तु यत्फलम् ॥ पुण्यक्षेत्रे निवासाच्च सर्वतीर्थावगाहनात् ॥११३॥ एतेषां यत्फलं प्रोक्तं शास्त्रेषु विविधेष्वपि ॥ तत्पुण्यं कोटिगुणितं सुकुमारो हि लब्धवान् ॥११४॥ शिवरात्रिव्रतं दृष्ट्वा पुष्प-

---

अन्न, पान, तांबूल, चंद्रयुक्त गीत, वाद्य, पुराण, स्तोत्र, पाठ, (१०६) यांनीं महानिशीथाच्या वेळेस व्रतस्थ लोक शिवपूजा करीत होते, तें कोट्यावधि पातकें करणाऱ्या या सुकुमारानें पाहिलें. (१०७) त्यानिमित्तानें तत्क्षणीं निष्पाप होऊन सर्व यज्ञ, तप, दान, व्रत यांच्या फलानें (१०८) व सर्वसार धर्मानें युक्त होऊन सुकुमार माझ्याजवळ येऊन गणाधीश झाला. (१०९) प्रज्वलित अग्नीच्या ठिकाणीं ओलें कोरडें कसलें घातलें तरी जळून जातें, त्याप्रमाणें ज्ञानानें किंवा अज्ञानानें केलेलें कसलें पातक असलें तरी तें व्रताच्या दर्शनानें जळून जातें. (११०) हे यमा, या सुकुमाराकरितां बिलकुल संशय मनांत आणूं नकोस लक्षावधि महापातकें व उपपातकें यानें केलेलीं असलीं तरी (१११) त्या ब्राह्मणानें शिवरात्रीचें व्रत पाहिलें ह्मणून जें पुण्य त्याला मिळालें, त्या पुण्यरूपी अग्नींत कोट्यावधि महापातकें तत्क्षणीं जळून गेलीं. (११२) हजारो राजसूयांचें, दहाहजार अश्वमेधाचें, कोट्यावधि कपिलागोदानांचें, सर्व भूदान केल्याचें जें फल असेल, (११३) व दहाहजार वर्षें तप करून जें फल मिळावें, पुण्यक्षेत्रीं वास केल्यानें जें फल मिळावें, सर्व तीर्थांत अवगाहन केल्यानें जें फल मिळावें, (११४) या सर्वांचीं फलें शास्त्रांमध्यें जीं सांगितलीं असतील, त्यांच्या कोटि-पटीनें सुकुमाराला पुण्य मिळालें. (११५) फुलांच्या निमित्तानें येऊन त्यानें

व्याजेन चागतः ॥ तपस्विभ्योऽधिको ह्येष यज्विभ्यो ह्यधिको मतः ॥११५॥ सर्वेभ्यो पुण्यकृद्भ्यश्च सुकुमारोऽधिको मतः ॥ तेन पुण्येन महता गणेश्वरपदं गतः ॥११६॥ भोगान्भुक्त्वा सुविपुलान्कल्पान्तं मम सन्निधौ ॥ ततश्चापि च्युतः कालाद्दधीचाख्यो भविष्यति॥११७॥ तत्र माहेश्वरो भूत्वा ज्ञानं लब्ध्वा मदात्मकम् ॥ महिम्ना विष्णुनाऽज्ञेयो मम सायुज्यमेष्यति ॥११८॥ इतःपरं तु कर्तव्यं त्वया वक्ष्यामि तच्छृणु ॥ मद्भक्तास्तु विशेषेण पूजनीयाः सदा यम ॥११९॥

यम उवाच ॥ त्वद्भक्ताः कीदृशा देव किं निष्ठाः केन लक्षिताः ॥ किं तेषां लक्षणं बाह्यमान्तरं लक्षणं वद ॥१२०॥

ईश्वर उवाच ॥ शृणु धर्म प्रवक्ष्यापि भक्तानां लक्षणं मम ॥ भस्मोद्धूलितसर्वांगास्त्रिपुंड्रांकितमस्तकाः ॥१२१॥ रुद्राक्षमालाभरणाः शिवपूजापरायणाः ॥ बाह्यलक्षणसंयुक्ताः पूज्याः सर्वे त्वया यम ॥१२२॥ प्रणवाभ्यासनिरतास्त्रयीसारपरायणाः ॥ शिवसूत्रजपासक्ताः

---

शिवरात्रीचें व्रत पाहिलें. त्यामुळें या सुकुमाराची योग्यता तपस्वी लोकांहून व यज्ञ करणाऱ्या लोकांहूनही जास्त आहे. (११६) पुण्यकर्म करणाऱ्या सर्व लोकांपेक्षां सुकुमार श्रेष्ठ आहे. त्या मोठ्या पुण्याच्या योगानें हा सुकुमार गणेश्वरपदाला गेला (११७) येथें हा सुकुमार माझ्याजवळ एक कल्पापर्यंत पुष्कळ भोगांचा उपभोग घेऊन कालांतरानें येथून निघून भूलोकांत दधीचि नांवाचा मुनि होणार आहे. (११८) त्याठिकाणीं माहेश्वर होऊन माझें ज्ञान मिळवून विष्णूला माझें माहात्म्य सांगून शेवटीं माझ्या सायुज्याला पावेल. (११९) याच्यानंतर तुझें कर्तव्य काय आहे, तें सांगतों, ऐक माझे जे भक्त असतील, ते मला विशेषेंकरून पूज्य आहेत.

(१२०) यम बोलला—हे देवा, तुझे भक्त कसे आहेत ? कोणावर निष्ठा ठेवतात ? त्यांचीं लक्षणें काय आहेत ? त्यांचीं बाह्य लक्षणें काय आहेत ? व आंतर लक्षणें काय आहेत ? हें सांग.

(१२१) ईश्वर बोलले—हे यमधर्मा, माझ्या भक्तांचीं लक्षणें सांगतों ऐक. त्यांच्या सर्वांगावर भस्माचें त्रिपुंड्र असून भस्म उधळलेलें असतें. व कपाळावर भस्माचे त्रिपुंड्र असतात. (१२२) गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा असून नेहमीं ते शिवपूजेंत रत असतात. अशा बाह्य लक्षणांनीं युक्त असे माझे भक्त सर्व तुला पूज्य आहेत. (१२३) प्रणवाभ्यासांत जे आसक्त असतील त्रयीसारांत जे एकनिष्ठ अस-

शतरुद्रीयपाठकाः ॥१२३॥ आथर्वणीः शिखा ये च पठंति शिरसः श्रुतेः ॥ पौरुषं यः पठेत्सूक्तं पावमानीं च यः पठेत् ॥१२४॥ त्वरितं नीलरुद्रं वा शिवसंकल्पमेव च ॥ महादेवादिनामानि जिव्हाग्रे यस्य संति च ॥१२५॥ मम प्रियतरा ह्येते पूज्याः सर्वे त्वया यम ॥ त्रिकालमेककालं वा ये मां ध्यायंति शंकरम् ॥१२६॥ नृत्यमानं त्रिनेत्रं च चंद्रार्धकृतशेखरम् ॥ उमामहेश्वरं रूपं दक्षिणामूर्तिमेव वा ॥१२७॥मृगटंकधरं देवं नीलकण्ठमथापि वा ॥ पंचाननमयीं मूर्तिं हृदि ध्यायंति ये जनाः॥१२८॥मम पूज्यतमा ह्येते यदि पापान्विता अपि॥ पूजयैनान् सदा भक्त्या मम चेदिच्छसि प्रियम् ॥१२९॥ यथा पृष्टं तथा प्रोक्तं किं भूयः श्रोतुमिच्छसि ॥१३०॥

यम उवाच ॥ श्रुतं देव मया सर्वं कथ्यमानं त्वया शिव ॥ शिवरात्रिव्रतस्यास्य विधिमाहात्म्यमेव च॥१३१॥उद्धूलनस्य माहात्म्यं त्रिपुंड्रस्य श्रुतं मया ॥ रुद्राक्षाणां च माहात्म्यं लिंगपूजाविधेः फलम् ॥१३२॥ त्वद्भक्तानां च माहात्म्यं मंत्राणां च श्रुतं मया ॥ त्व-

---

तील, शिवसूक्ताच्या जपानुष्ठानांत जे निरत असतील, शतरुद्रीयाच्या पाठांत जे निमग्न असतील, (१२४) अथर्वण शिखेचा पाठ व उपनिषदाचा पाठ जे करतात, पुरुषसूक्ताचा पाठ जे करतात, पवमानाचा पाठ जे करतात, (१२५) त्वरित नीलरुद्राचा पाठ जे करतात, शिवसंकल्पाचा पाठ जे करतात, महादेवादि नांवें ज्यांच्या जिव्हाग्रीं आहेत, (१२६) ते सर्व मला अत्यंत प्रिय असून तुला हे सर्व पूज्य आहेत, असें जाण. त्रिकाल किंवा एककाल जे शंकराचें ध्यान करतात, (१२७) नर्तन करणाऱ्या त्रिनेत्राचें ध्यान जे करतात, अर्धचंद्रभूषणाचें ध्यान जे लोक करतात, उमामहेश्वररूपाचें ध्यान जे लोक करतात, दक्षिणामूर्तीचें ध्यान जे लोक करतात, (१२८) मृग व टंक एक आयुध धरलेल्या शंकराचें ध्यान जे लोक करतात, नीलकंठाचें व पंचमुखी परमेश्वराचें ध्यान जे लोक आपल्या मनांत करतात, (१२९) हे लोक पापी जरी आहेत, तरी मला पूज्य आहेत. मला प्रिय व्हावें अशी इच्छा तुझी असली तर या सर्व लोकांची पूजा भक्तीनें तूं कर. (१३०) जसा तुझा प्रश्न होता तसें तुला सांगितलें. आणखी पुनः काय ऐकावयाची इच्छा आहे, तें सांग–

(१३१) यम बोलला—हे देवा, शिवा, तूं सांगितलेलें शिवरात्रिव्रताचें माहात्म्य विधिपूर्वक ऐकिलें. (१३२) भस्मोध्दूलनाचें माहात्म्य, त्रिपुंड्राचें माहात्म्य, रुद्राक्षाचें माहात्म्य, शिवलिंगपूजाविधीचें फल, (१३३) तुझ्या भक्तांचें माहा-

नामकीर्तनात्सद्यः पतितोऽपि विशुध्यति ॥१३३॥ किं पुनर्ये महात्मानस्त्वयि भक्तिसमन्विताः ॥ यज्ञेषु हूयमानोऽग्निः श्मशानस्थोऽपि वा शिखी ॥१३४॥ सर्वैः संपूज्यते विप्रैरनिंद्योहि यथाऽनलः ॥ दुर्वृत्ता वा सुवृत्ता वा श्वपचा वा द्विजा यदि ॥१३५॥ मम पूज्यतमा भक्ता महादेव तवाज्ञया॥सुकुमारप्रसंगेन जिज्ञासार्थमिहागतः ॥१३६॥ सर्वसारतमं धर्मं श्रुतवांस्त्वत्प्रसादतः ॥ इदानीं गतसंदेहः कृतार्थोऽस्मि महेश्वर ॥१३७॥

ईश्वर उवाच ॥ यम संयमनीं गच्छ दण्डमुद्रासमन्वितः ॥ पापिष्ठानां च सर्वेषां शासनं कुरु यत्नतः ॥१३८॥

सूत उवाच ॥ एतच्छ्रुत्वा वचः सत्यं महादेवेन भाषितम् ॥ प्रणिपत्य महादेवं स्तुत्वा च विविधैः स्तवैः ॥१३९॥ दण्डमुद्रां समादाय स्वां पुरीं प्रययौ यमः ॥१४०॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे शिवरात्रिव्रतमाहात्म्यकथने यमशंकरसंवादो नाम त्रिसप्ततितमोऽध्यायः ॥

---

त्म्य, मंत्रांचें माहात्म्य, हें सर्व मीं ऐकिलें तुझ्या नामकीर्तनाच्या योगानें पतित जरी असला तरी तो शुद्ध होतो. (१३४) तुझ्या ठिकाणीं भक्ति करणारे लोक मुक्त होतात ह्मणून काय सांगावयाचें आहे! यज्ञांमध्यें आहुति घेणारा अग्नि किंवा श्मशानांतला अग्नि (१३५) सर्व ब्राह्मणांना पूज्य असून वाऱ्याप्रमाणें अनिंद्य आहे. दुर्व्यापारी असोत, सुशील असोत, श्वपच असोत, ब्राह्मण असोत, (१३६) हे महादेवा, असे तुझे भक्त मला मान्य व पूज्य आहेत. सुकुमाराच्या निमित्तानें विचार करण्याकरितां येथें मी आलों.(१३७) तुझ्या अनुग्रहानें सर्व धर्मांतला सार मीं ऐकिला. हे महेश्वरा आतां माझे संशय सर्व दूर झाले मी कृतार्थ झालों.

(१३८) ईश्वर बोलले—हे यमा, आतां ही तुझी दंडाची काठी घेऊन यमलोकाला निघून जा. आजपासून पापी लोकांना चांगल्या प्रयत्नानें शासन कर.

(१३९) सूत बोलले—याप्रमाणें महादेवाचें सत्य वाक्य ऐकून महादेवाला नमस्कार करून अनेक तऱ्हेचीं स्तोत्रें करून (१४०) दंडाची काठी घेऊन यम आपल्या नगराला गेला.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील शिवरात्रिव्रतमाहात्म्य कथनांतील यमशंकरसंवाद नांवाचा त्र्याहत्तरावा अध्याय संपला.

## ॥ अथ चतुःसप्ततितमोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ सूत उवाच॥ प्रविश्य स्वां पुरीं धर्मः सभायामुपविश्य च ॥ दूतान्सर्वान्समाहूय महादेवं प्रणम्य च ॥१॥ सर्वानाज्ञापयामास शिववाक्यमनुस्मरन् ॥२॥

यम उवाच ॥ उलुंबलादयस्सर्वे श्रुणुध्वं मम भाषितम् ॥ रुद्राक्षधारिणं दृष्ट्वा दूरान्नमत हे भटाः॥३॥ भस्मोध्दूलितसर्वांगान् त्रिपुंड्रांकितमस्तकान् ॥ दृष्ट्वा नमत तान् सर्वान् शिवस्यातीव मे प्रियान् ॥४॥ प्रणवाभ्यासनिरतान्सावित्रीतत्त्वचिंतकान् ॥ शिवसूक्तजपासक्तान् शत रुद्रान् जपंति ये ॥५॥ महादेवादिनामानि ज्ञानतोऽज्ञानतोऽपि वा ॥ ईरयन्ति जना ये च ते सर्वे शिवभाविताः ॥६॥ चिंतयंतीह ये देवं मृगटंकधरं शिवम् ॥ रक्तवर्णं त्रयीनेत्रं सोमं सोमार्धधारिणम् ॥७॥ पंचाननं महादेवं दक्षिणामूर्तिमेव वा ॥ नृत्यमानं महादेवमर्धनारीश्वरं तु वा ॥८॥ अनंता मूर्तयस्तस्य यत्र वा रमते मनः ॥ तामेव चिंतये-

---

श्रीशिवास नमस्कार असो (१) सूत बोलले— आपल्या पुरींत प्रवेश करून सभेमध्यें बसून धर्मानें सर्व दूतांना बोलावून महादेवाला नमन करून (२) शिवाचें वाक्य स्मरून सर्वांना त्या यमानें आज्ञा केली कीं,—

(३) यम बोलला— उलंबलादि सर्व माझे दूतहो, माझें वाक्य ऐका. हे भटहो, रुद्राक्षधारी प्राण्याला दुरून जरी पाहिलें तरी तेथूनच त्याला नमस्कार करा. (४) ज्यांच्या अंगावर भस्माचें उद्धूळन दिसत असेल, ज्यांच्या कपाळावर त्रिपुंड्र दिसेल, ते सर्व शिवाला व मला प्रिय आहेत असें समजून त्यांना नमस्कार करा. (५) प्रणवाचा अभ्यास करण्यांत जे तत्पर असतील, सावित्री तत्वाचें चिंतन करणारे जे असतील शिवसूक्ताचे जप करणारे जे असतील, शतरुद्रीय पाठ जे करीत असतलि, (६) समजून किंवा समजल्याशिवाय महादेवादिनामस्मरण जे करतलि ते सर्व शिवाला व मला प्रिय आहेत असें समजा. (७) मृगव टंक ज्याच्या हातांत असून जो रक्तवर्ण आहे, ज्याला डोळे तीन असून उमासहित असून डोक्यावर चंद्राला ज्यानें धरिलें आहे अशा शिवाचें चिंतन जे करतात, ते मला प्रिय आहेत. (८) पंचानन, महादेव, दक्षिणामूर्ति, नर्तन करणारा महादेव, अर्धनारीश्वर इत्यादि नामांचा जे स्वीकार करतात, ते मला प्रिय आहेत. (९) ज्याच्या मूर्ति अनंत असून त्या ठिकाणींच मन आसक्त ठेवून त्या

धस्तु स याति परमां गतिम् ॥९॥ एककालं द्विकालं वा त्रिकालं ये जना भुवि ॥ चिन्तयन्ति महादेवं ते रुद्रा नात्र संशयः॥१०॥ एतान्दृष्ट्वा महाभागानपि पातकसंयुतान् ॥ कृत्वा प्रदक्षिणं सम्यङ्नमस्कुरुत हे भटाः ॥११॥ सर्वेऽप्येते महापूज्या युष्माभिश्च विशेषतः ॥ तेषां समीपगमने मा कुरुध्वं मनः क्वचित् ॥१२॥ बहुनाऽत्र किमुक्तेन सर्वे शृण्वन्तु मे वचः ॥ मनस्याधाय मद्वाक्यं तथा चरत हे भटाः ॥१३॥ श्रौतं स्मार्तं च तंत्रोक्तं सम्यक्कर्मसमुद्भवम् ॥ दावानलसमुद्भूतं भसितं धारयंति ये ॥१४॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वाप्यंत्यजोऽपि वा ॥ महापातकयुक्तो वा श्वपचो वाथ वा भवेत् ॥१५॥ एककालं द्विकालं वा त्रिकालं नित्यमेव वा ॥ ये धारयंति भसितं ते सर्वे पुण्यकृत्तमाः॥१६॥ प्रमादाद्यदि वाऽज्ञानाद्दर्पादपि च ये भटाः ॥ तेषां समीपगमनं वर्जयध्वं प्रयत्नतः ॥१७॥ अष्टम्यां च चतुर्दश्यां ये नराः शिवपूजकाः ॥ उपवासं हि कुर्वन्ति ते सर्वे पुण्यकृत्तमाः ॥१८॥अपि दुष्कृतकर्माणः पूज्या ह्येते मया भटाः ॥ मम प्रिया हि ते युक्ताः पालयध्वं हि मे वचः ॥१९॥

---

मूर्तीचें चिंतन जो करतो, तो सद्गतीला जातो. (१०) एकवेळ, दोनवेळ, तीनवेळ महादेवाचें स्मरण जे करतात, ते सक्षात रुद्रच आहेत, यांत संशय नाहीं. (११) हे भटहो, महाभाग्यशाली, पातकी जरी आहेत तरी यांना पाहून प्रदक्षिणा घालून नमस्कार करा (१२) हे सर्व तुम्हांला तर विशेषेंकरून पूज्य आहेत. त्यांच्याजवळ जाण्यास तुम्ही आपलें मन करूं नका. (१३) फार सांगण्यांत काय अर्थ आहे ? सर्व माझें वाक्य ऐका. माझें हें वाक्य लक्षांत ठेवून पृथ्वीवर संचार करा. (१४) श्रौत, स्मार्त, तंत्रोक्त, चांगल्या कर्मांनें केलेलें, दावाग्नी पासून उत्पन्न झालेलें भस्म जे लोक लावतात, ते मला पूज्य आहेत (१५) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अंत्यज, महापातकी, श्वपच कोणी असो, (१६) एकवेळ, दोनवेळ, तीनवेळ, किंवा निरंतर जे पुण्यवान लोक भस्मधारण करतात, ते मला मान्य आहेत. (१७) हे भटहो, प्रमादानें, अज्ञानानें, उद्धटपणानें त्यांच्याजवळ जाऊं नका. प्रयत्नपूर्वक त्यांच्याजवळ जावयाचें सोडून द्या. (१८) अष्टमीच्या दिवशीं व चतुर्दशीच्या दिवशीं जे शिवपूजा करून उपवास करतात, ते सर्व पुण्यवान आहेत, असें समजा. (१९) हे लोक जरी पापी असले तरी मला पूज्य आहेत; प्रिय आहेत. हें माझें वचन चांगल्या तऱ्हेनें पाळा

अन्यथा भवतां नाशो ममापि च भवेद्ध्रुवम् ॥२०॥

सूत उवाच ॥ एवमुक्त्वा भटान् सर्वान् सभामध्ये यमः स्वयम् ॥ पुरे संघोषयामास गोपुरे चत्वरेऽपि च ॥२१॥ यो मदाज्ञामतिक्रम्य शिवपूजापरायणान् ॥ आनेतुं यदि वा मोहात्प्रमादाद्वा भटो व्रजेत् ॥२२॥ न चास्मदीयः पापात्मा शूलाग्रे तं क्षिपाम्यहम् ॥ एतच्छ्रुत्वा भटाः सर्वे यमपादं प्रणम्य च ॥२३॥ ऊचुः प्रांजलयः सर्वे सभामध्य इदं वचः ॥२४॥

भटा ऊचुः ॥ त्वदाज्ञाकारिणो नित्यं सर्वे वयमतः परम् ॥ ये त्वया कथिता मर्त्यास्सर्वे पूज्यतमाः शुभाः ॥२५॥ तेषां समीपगमनं संत्य-जाम इतो वयम् ॥ एवमुक्त्वाऽथ ते सर्वे यमं प्रांजलयोऽब्रुवन् ॥२६॥ पापिनो बहवो लोके पापहीनाश्च केचन ॥ शिवप्रियाश्च ते चात्र कथं ज्ञास्यामहे वयम् ॥२७॥

यम उवाच ॥ महापातकयुक्तो वा मुक्तो वा सर्वपातकैः ॥ नायांति मम सामीप्यं ये जनास्तान् ब्रवीमि वः ॥२८॥ शिव शंकर रुद्रेश महा

---

(२०) यांत जर तुह्मी चुकलांत, तर तुमचा व माझा नाश निश्चयानें होईल.

(२१) सूतबोलले– याप्रमाणें सभेमध्यें सर्व भटांना बोलून आपल्या नगरांत, गोपुरांत, राजांगणांत यमानें अशीच दवंडी पिटविली. (२२) जो दूत माझ्या आज्ञेचें उघंल्लन करून शिवपूजक लोकांना आणण्याकारितां मोहानें किंवा प्रमा. दानें जाईल, (२३) तो माझा नव्हे असें समजून त्याला मी सुळावर चढवीन. असें तें वाक्य ऐकून सर्व दूतांनीं यमाला नमस्कार केला. (२४) मग त्या सभे-मध्यें सर्व भट हात जोडून बोलले.—

(२५) भट बोलले– हे धर्मराजा, आजपासून आह्मी सर्व तुझ्या आज्ञेप्रमाणें वागतों. तूं ज्या लोकांविषयीं सांगितलेंस, ते सर्व लोक अत्यंत पूज्य आहेत असें आह्मी मानूं (२६) आजपासून त्या लोकांच्या वाऱ्याला देखील आह्मी उभे रा-हत नाहीं (त्यांच्याजवळ जात नाहीं) असें बोलून सर्व दूत यमाला हात जोडून बोलले. (२७) हे यमा, जगामध्यें पापी लोकही पुष्कळ आहेत, आणि पुण्यवान लोकही कांहीं आहेत. परंतु अमुकच लोक शिवप्रिय आहेत, असें कसें समजावें? तें आह्मांस सांग.–

(२८) यम बोलला– भटहो, महापातकी असो, किंवा सर्व पातकी असो, माझ्याजवळ न येणारे जे लोक आहेत, त्यांचीं लक्षणें सांगतों, ऐका. (२९) शिवा,

देवांबिकापते ॥हरिकेश विरूपाक्ष पाहि मां पापिनं हर॥२९॥प्रसंगादथवा लोभादीरयंतीह ये जनाः॥पापत्राणकरं मंत्रं ते नायांति ममांतिकम् ॥३०॥ ते चैव सर्वलोकेषु पूज्यन्ते शिववल्लभाः ॥ यमवाक्यं भटाः श्रुत्वा सर्वे प्रांजलयोऽब्रुवन् ॥३१॥ त्वया कथितमाकर्ण्य संदेहो नाशमागतः ॥ तवाज्ञामनतिक्रम्य सर्वे वर्तामहे वयम् ॥३२॥ दूतवाक्यं समाकर्ण्य हृष्टः प्रीतोऽभवद्यमः ॥ ततः प्रभृति धर्मात्मा सभामध्ये यमः स्वयम् ॥३३॥ मंत्रमुच्चारयन्नास्ते शिरस्याधाय चांजलिम् ॥ प्रसीद मे महादेव भक्तिलभ्य हृदि स्थित ॥३४॥ विश्वाधिकेश मे देहि भक्तिमग्र्यां त्वयि स्थिराम् ॥ शिवपूजापरो भूत्वा यम आस्ते ततः परम् ॥३५॥ यमदूताश्च ते सर्वे भीताः शिवजनं प्रति ॥३६॥

सूत उवाच ॥ एवमेतद्व्रतं प्राह व्रतानामुत्तमोत्तमम् ॥ महादेवः प्रसंनात्मा पार्वत्यै मंदराचले ॥३७॥ स्कंदाय पार्वती प्राह स चाह ब्रह्मसूनवे ॥ सनत्कुमारयोगीन्द्रः कृष्णद्वैपायनाय च ॥३८॥ प्राह व्या-

---

शंकरा, रुद्रा, ईशा महादेवा, अंबिकापते, हरिकेशा, विरूपाक्षा, हरा, माझें रक्षण कर, (३०) याप्रमाणें प्रसंगानुसार अथवा लोभामुळें जे लोक नामोच्चार करतात, पापांपासून संरक्षण करणाऱ्या मंत्रांचा उच्चार करतात, ते लोक माझ्याजवळ येऊं शकत नाहींत. (३१) तेच सर्व लोक शिवप्रिय असून जगांत पूज्य आहेत, असें समजा. यमाचें वाक्य ऐकून हात जोडून सर्व यमभट बोलले. (३२) यमधर्मा, हें तुझें वाक्य ऐकूत आमचा संशय नष्ट झाला. आह्मी सर्व तुझ्या आज्ञेप्रमाणें वागतों. (३३) दूतांचें वाक्य ऐकून यमाला आनंद झाला. व त्यांवर यम प्रसन्न झाला. त्या दिवसापासून सभेमध्यें धर्मात्मा यम स्वतः (३४) हात जोडून शिवमंत्रांचा उच्चार करीत राहिला. हे महादेवा, सर्वांच्या हृदयांत राहणाऱ्या शिवा, प्रसन्नहो, प्रसन्नहो. (३५) हे विश्वाधिका, ईशा, तुझ्या ठिकाणीं अचल श्रेष्ठ भक्ति दे. असें ह्मणून त्या दिवसापासून यम शिवपूजेंत आसक्त होऊन राहिला. (३६) यमदूत सर्व शिवभक्तांना भिऊन वागूं लागले.

(३७) सूत बोलले— ब्राह्मणहो, याप्रमाणें मंदरपर्वतावर पार्वतीस प्रसन्न मनानें महादेवानें उत्तमोत्तम हें व्रत सांगितलें. (३८) पार्वतीनें षण्मुखास हें व्रत सांगितलें, नंतर षण्मुखानें सनत्कुमारास हें व्रत सांगितलें, योगींद्र सनत्कुमारानें व्यासाला सांगितलें (३९) सर्वज्ञ व्यासानें शिष्य अशा मला हें व्रत सांगितलें.

सोऽपि सर्वज्ञः शिष्यस्य मम चोक्तवान् ॥ मया च कथितं सर्वं युष्माकं व्रतमादितः ॥३९॥ यथा पृष्टं तथा प्रोक्तं व्रतमेतन्मुनीश्वराः ॥ शिवसारूप्यदं नृणां किमन्यत्कथयामि वः ॥४०॥

ऋषय ऊचुः ॥ पापिनामुत्तमानां च सर्वेषां मोक्षसाधनम् ॥ त्वया कथितमस्माभिः श्रुतं श्रुतिरसायनम् ॥४१॥ इदानीं गतसंमोहाः कृतार्थाश्च त्वया कृताः॥श्रोतव्यं नास्ति चास्माकं श्रुतं सर्वमशेषतः ॥४२॥ एवमुक्त्वा तु ते सर्वे शिवं संपूज्य यत्नतः ॥ सूतं संपूजयामासुर्गंधपुष्पफलादिभिः ॥४३॥ शिवरात्रिव्रतस्यास्य माहात्म्यमिदमुत्तमम्॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वाप्यंत्यजोऽपि वा ॥४४॥ महापातकयुक्तो वा युक्तो वा सर्वपातकैः ॥ आद्यं तद्व्रतमाहात्म्यं श्रुणुयाच्छिवसन्निधौ॥४५॥सर्वपापविनिर्मुक्तः स याति शिवमंदिरम् ॥ अष्टम्यां च चतुर्दश्यां प्रतिमासेषु नित्यशः ॥४६॥ शिवरात्रिव्रतस्यास्य माहात्म्यं भक्तिसंयुतः ॥ आद्यन्तं श्रुणुयाद्राजा शिवं संपूज्य भक्तितः ॥४७॥ तस्यारयो विनश्यंति क्षीयन्ते पातकानि च ॥ संपूर्णां महतीं भूमिं

---

मीं प्रथमपासून हें व्रत तुह्मांला सांगितलें (४०) मुनीश्वरहो, जसा तुमचा प्रश्न होता, त्याप्रमाणें मीं हें व्रत सांगितलें. हें व्रत शिवसारूप्य देणारें आहे, असें, समजा. आतां दुसरें तुह्मांला काय सांगू ?

(४१) मुनि बोलले– पापी लोकांना चांगल्या लोकांना व सर्वांना मोक्षाचें साधन व श्रवणेंद्रियाचें रसायन असें व्रत आह्मीं ऐकिलें. (४२) प्रस्तुत वेळेस आमचा सर्व मोह जाऊन आह्मी कृतार्थ झालों. (तुह्मीं आह्मांला कृतार्थ केलें.) आह्मांस आतां ऐकावयाचें कांहीं राहिलें नाहीं. सर्व कांहीं ऐकिलें. (४३) असें बोलून सर्वांनीं प्रयत्नपूर्वक शिवपूजा करून गंध पुष्प, फल यांनीं श्रीसूताची पूजा केली (४४) या शिवरात्रिव्रताचें उत्तम माहात्म्य ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अंत्यज, (४५) महापातकी, सर्वपातकी यांनीं शिवाजवळ श्रेष्ठ हें व्रतमाहात्म्य ऐकावें. (४६) ह्मणजे तो सर्व पातकापासून मुक्त होऊन शेवटीं शिवमंदिराला जातो. अष्टमीच्या दिवशीं चतुर्दशीच्या दिवशीं प्रत्येक महिन्याला निरंतर (४७) या शिवरात्रिव्रताचें माहात्म्य भक्तिपूर्वक पहिल्यापासून शेवटापर्यंत जो राजा ऐकतो, व भक्तिपूर्वक शिवपूजा करतो, (४८) त्याचे सर्व शत्रु नष्ट होतात, पातकें सर्व क्षीण होतात;

लब्ध्वा राज्यं समश्नुते ॥४८॥ यश्चैतच्छृणुयान्नित्यं भक्तियुक्तो जितें-द्रियः ॥ स सर्वपापनिर्मुक्तः शिवलोके महीयते ॥४९॥ भक्त्या पर-मया युक्तो यः शृणोतीह मानवः ॥ सर्वकर्मविनिर्मुक्तः शिवसायुज्य-माप्नुयात् ॥५०॥ अश्वमेधसहस्रेण राजसूयशतेन च ॥ यत्फलं लभते मर्त्यस्तत्फलं श्रवणाल्लभेत् ॥५१॥ शिवरात्रिप्रभावेण सर्वसंपत्समन्वि-तः ॥ आयुरारोग्यमैश्वर्यं महतीं श्रियमश्नुते ॥५२॥ शिवरात्रिव्रताध्या-यपुस्तकं यो लिखेन्नरः ॥ सोऽपि पुण्यतमो भूत्वा शिवरात्रिफलं ल-भेत् ॥५३॥ भूतप्रेतपिशाचाश्च क्षुद्रा वा ब्रह्मराक्षसाः ॥ तन्मंदिरं न सर्पन्ति पुस्तकं यत्र विद्यते ॥५४॥ यश्चैतच्छृणुयान्नित्यं पठेद्वा वीतक-ल्मषः ॥ सर्वान् कामानवाप्नोति शिवसायुज्यमाप्नुयात् ॥५५॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वरा-चारसंग्रहे सदाचारनिरूपणे शिवरात्रिव्रतमाहात्म्यकथने शिवभक्त-प्रशंसा नाम चतुःसप्ततितमोऽध्यायः ॥

---

व सर्व पृथ्वीचा पति एकटाच होऊन तो राजसुख भोगतो. (४९) जो प्राणी जितेंद्रिय होऊन भक्तीनें हें माहात्म्य ऐकतो, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (५०) श्रेष्ठ भक्तीनें युक्त होऊन जो मानव श्रवण क-रतो, तो सर्वकर्मांपासून मुक्त होऊन शिवसायुज्याला पात्रतो. (५१) हजार अश्व-मेधानें जें फल मिळतें, शंभर राजसूयानें जें फल मिळतें, तें फल एकवार या माहात्म्याचें श्रवण केलें असतां मिळतें. (५२) शिवरात्रीच्या प्रभावानें सर्व संप-त्तीनें युक्त होऊन आयुष्मान, आरोग्यवान ऐश्वर्यवान प्राणी होऊन मोठें ऐश्वर्य तो भोगतो. (५३) शिवरात्रिव्रताचा अध्याय जो मनुष्य लिहितो, तोही पुण्यवान होऊन शिवरात्रिव्रताचें फल मिळवितो. (५४) भूत, प्रेत, पिशाच, क्षुद्र, ब्रह्म-राक्षस हे प्राणी शिवरात्रीचें पुस्तक जेथें असेल, तेथें जात नाहींत. (५५) जो प्राणी हें ऐकतो, व पाठ करतो, तो निष्पाप होऊन सर्व मनोरथ परिपूर्ण क-रून घेतो. व शेवटीं शिवसायुज्याला जातो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठ नागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारानिरूपणांतील शिवरात्रिव्रतमाहात्म्य कथनांतील शिवभक्तप्र शंसा कथन नांवाचा चौऱ्याहत्तरावा अध्याय संपला.

---

## अथ पंचसप्ततितमोऽध्यायः

श्रीशिवाय नमः ॥ लैंग्ये ॥ सनत्कुमार उवाच ॥ कथं जघान राजानं क्षुपं पादेन सुव्रत ॥ दधीचः समरे जित्वा देवैर्देवं जनार्दनम्॥१॥ वज्रास्थित्वं कथं प्राप्तं देवदेवान्महेश्वरात् ॥ श्रोतुमिच्छामि तत्सर्वं वक्तुमर्हसि मे प्रभो ॥२॥

नंदिकेश्वर उवाच ॥ ब्रह्मपुत्रो महातेजा राजा क्षुप इति श्रुतः ॥ अभून्मित्रं दधीचस्य मुनींद्रस्य महात्मनः ॥३॥ चिरात्तयोः प्रसंगाद्वै वादः क्षुपदधीचयोः ॥ अभवत्क्षत्रियः श्रेष्ठो विप्र एवेति सुव्रत ॥४॥ अष्टानां लोकपालानां वपुर्धारयते नृपः ॥ तस्मादिंद्रो ह्यहं वन्हिर्यमश्च निर्ऋतिस्तथा ॥५॥ वरुणश्चैव वायुश्च सोमो धनद एव च ॥ ईश्वरोऽहं न संदेहो नावमंतव्य एव च ॥६॥ तस्मात्त्वया महाभाग च्यावने सर्वदा त्वहम् ॥ नावमन्तव्य एवेह पूजनीयश्च सर्वदा॥७॥ श्रुत्वा तु वचनं तस्य क्षुपस्य मुनिसत्तमः ॥ दधीचश्च्यावनिश्चोग्रो गौरवाच्चात्मनो द्विजः ॥८॥ अताडयत्क्षुपं मूर्ध्नि दधीचो वाममुष्टिना ॥ सोऽपि

---

श्रीशिवास नमस्कार असो. लिंगपुराणांत सांगिलें कीं—सनत्कुमार बोलले (१) हे नांदिकेश्वरा, समरांगणामध्यें देवाधिदेव जनार्दनाला जिंकून दधीच मुनीनें क्षुप नांवाच्या राजाला पायानें लाथ कशी मारिली? हें सांग. (२) देवाधिदेव महेश्वरापासून त्या मुनीला वज्रास्थित्व कसें प्राप्त झालें? हें सर्व ऐकावयाची माझी इच्छा आहे.

(३) नंदिकेश्वर बोलले— हे सनत्कुमारा, ब्रह्मदेवाचा मुलगा क्षुप या नांवानें प्रसिद्ध होऊन गेला. तो राजा महात्म्या दधीचऋषीचा मोठा स्नेही होता. (४) पुढें कांहीं कालानें क्षुपदधीचांमध्यें मोठा वाद उत्पन्न झाला. तो राजा क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ असून हा मुनि ब्राह्मणांमध्यें श्रेष्ठ होता. (५) आठ लोकपालांचें शरीर राजा एकटा धारण करतो, ह्मणून हे दधीचा, मीच इंद्र असून अग्नि आहें यम मीच असून निर्ऋति मीच आहें. (६) वरुण मीच असून वायु मीच आहें सोम मीच असून कुबेर मीच आहें. अर्थात सर्वांचा प्रभु मी असल्यामुळें माझा अपमान कोणीही करतां कामां नये. (७) हे महाभागा चवनपुत्रा, नेहमीं तूं माझा अपमान करूं नकोस. सर्वदां तुला मी पूज्य आहें. (८) क्षुपराजाचें हें वचन ऐकून मुनिश्रेष्ठ, चवनपुत्र, उग्र दधीचमुनीनें आपल्या गौरवामुळें (९) क्षुपराज्याच्या डोक्यावर डाव्या हाताच्या मुष्टीनें जोरानें एक प्रहार केला. नंतर त्या-

विच्छेद वज्रेण दधीचं वलवान्क्षुपः ॥९॥ ब्रह्मलोके पुराऽसौ हि ब्रह्मणः क्षुतसंभवः ॥ लब्ध्वा वज्रं स्वकार्यार्थं वज्रिणा चोदितः प्रभुः ॥१०॥ स्वेच्छयैव नरो भूत्वा नरपालो वभूव सः॥ तस्माद्राजा च विप्रेंद्रमजयद्वै महावलः ॥११॥ यथा वज्रधरः श्रीमान् वलवांस्तपसान्वितः ॥ पपात निहतो भूमौ वज्रेण द्विजपुंगवः ॥१२॥ सस्मार च तदा सोऽपि दुःखाद्वै भार्गवं मुनिः ॥ शुक्रोऽपि सहसाऽऽगत्य संधयामास मंत्रतः ॥१३॥ ताडितं कुलिशेनास्य दधीचस्य च विग्रहम् ॥ संधाय पूर्ववद्देहं दधीचस्याह भार्गवः ॥१४॥ भो दधीच महाभाग देवदेवमुमापतिम् ॥ संपूज्य पूज्यं ब्रह्माद्यैर्देवदेवं निरंजनम् ॥१५॥ अवध्यो भव विप्रर्षे प्रसादात्त्र्यंवकस्य तु ॥ मृतसंजीवनं तस्माल्लब्धमेतन्मया द्विज ॥१६॥ नास्ति मृत्युभयं शंभोर्भक्तानामिह सर्वतः ॥ मृतसंजीवनं चापि शैवमद्य वदामि ते ॥१७॥ त्रियंवकं यजामहे त्रैलोक्यपितरं प्रभुं ॥ त्रि-

---

वलवान राजानें देखील दधीचाला वज्रानें मारिलें (१०) ब्रह्मलोकांत पूर्वी ब्रह्मदेवाच्या क्षुतापासून उत्पन्न होऊन स्वकार्य साधण्याकरितां या राजानें वज्र मिळवून ठेविलें होतें इंद्रानें आपल्या कार्यासाठीं याची नेमणूक केली होती. (११) पुढें स्वेच्छेनें हा मनुष्ययोनींत येऊन राजा झाला होता. ह्मणूनच या वलिष्ट राजानें ब्राह्मणाला जिंकिलें. (१२) जसा वज्रधारी श्रीमान इंद्र वलिष्ठ असे, त्याप्रमाणें हाही राजा वलिष्ठ होता. अर्थात तपोवलानें युक्त तो द्विजश्रेष्ठ त्याराजाच्या वज्रप्रहारानें ताडित होऊन जमिनीवर पडला. (१३) तेव्हां दुःखानें दधीचमुनीनें शुक्राचार्यांचें स्मरण केलें, नंतर तत्क्षणीं शुक्राचार्य येऊन त्या ऋषीचें सर्व सांधे मंत्रानें जुळवून त्याला शुक्रानें पुनः जीवंत केलें. (१४) वज्रानें ताडित झालेल्या दधीचाचें शरीर पुनः जुळवून दधीचाला शुक्रानें ह्मटलें कीं, (१५) हे महाभागा दधीचा, ब्रह्मादिदेव देखील ज्या निरंजन शिवाची पूजा करतात. त्या देवाधिदेव उमापतीची पूजा तूं कर. (१६) हे विप्रर्षे, त्र्यंवकाच्या प्रसादानें तूं अवध्य हो. त्याच्या अनुग्रहानेंच मला मृतसंजीवनी विद्या (मेलेल्या लोकांना पुनः जिवंत करण्याची विद्या) मिळाली आहे. (१७) श्रीशिवाच्या भक्तांना कोणीकडूनही मृत्यूची भीति नाहीं. आज तुला मृतसंजीवन सांगतों ऐक. (१८) (संजीवनी विद्येचामंत्र) जो त्रैलोक्याचा पिता असून ज्याला त्रियंवक ह्मणतात, जो सर्वांचा प्रभु असून त्रिमंडलाच्या पिता ह्मणतात, जो

मण्डलस्य पितरं त्रिगुणस्य महेश्वरं ॥१८॥ त्रितत्त्वस्य त्रिवन्हेश्च त्रिधाभूतस्य सर्वतः ॥ त्रिदेवस्य महादेवं सुगंधि पुष्टिवर्द्धनं ॥१९॥ सर्वभूतेषु सर्वत्र त्रिगुणे प्रकृतौ तथा ॥ इंद्रियेषु च सर्वेषु द्रव्येषु च गुणेषु च ॥२०॥पुष्पेषु गंधवत्सूक्ष्मः सुगंधिः परमेश्वरः ॥ पुष्टिश्च प्रकृतेस्तस्याः पुरुषस्य द्विजोत्तम ॥२१॥महदादिविशेषान्तविकल्पस्यापि सुव्रत॥ विष्णोः पितामहस्यापि मुनीनां च महामुने ॥२२॥ इंद्रस्य चैव देवानां तस्माद्वै पुष्टिवर्द्धनः ॥ तं देवममृतं रुद्रं कर्मणा मनसा गिरा ॥२३॥ स्वाध्यायेन जपेनापि ध्यानेनापि यजामहे ॥ सत्येनानेन मुक्षीयं मृत्युपाशाद्भवः स्वयम् ॥२४॥ बंधमोक्षकरो यस्मादुर्वारुकमिव प्रभुः ॥मृतसंजीवनो मंत्रो मया लब्धश्च शंकरात् ॥२५॥ जप्त्वा हुत्वाभिमंत्र्यैव जलं पीत्वा दिवानिशम्॥ लिंगस्य सन्निधौ ध्यात्वा नश्वरत्वं परित्यज ॥२६॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा तपसा प्राप्य शंकरम्॥ वज्रास्थित्वमवध्यत्वमदीनत्वं च लब्धवान् ॥२७॥ एवमाराध्य देवेशं दधीचो मुनिस-

---

त्रिगुणाचा महेश्वर आहे, त्याची पूजा आह्मी करतों. (१९) त्रितत्व, त्रिवन्हि, (सूर्य चंद्र अग्निस्वरूप) त्रिधाभूत (तीन प्रकार झालेला) त्रिदेव, (ब्रह्मा विष्णु महेश) महादेव, सुगंधि व पुष्टि वाढविणारा,(२०)सर्व भूतांच्याठिकाणीं व सर्वत्र व्याप्त होऊन राहिलेला, त्रिगुणाच्या ठिकाणीं व प्रकृतीच्या ठिकाणीं व्यापलेला, सर्व इंद्रियांमध्यें, व सर्व द्रव्यांमध्यें, सर्वगुणांमध्यें व्यापलेला, (२१) फुलांमध्यें सूक्ष्मरूपानें सुंगध या नांवानें तो परमेश्वर राहिला आहे. हे ब्राह्मणश्रेष्ठा, प्रकृतीला व पुरुषाला त्याच्यापासून पुष्टि मिळते. (२२) हे सुव्रता, महत्तत्वापासून विशेषतत्वापर्यंत विकल्पाला, व विष्णूला, पितामहाला, मुनींला, (२३) इंद्राला, व सर्वदेवांला, त्याच्यापासूनच पुष्टि मिळते. अशा अमृतस्वरूपी देवरुद्राची पूजा कर्मानें, मनानें, वाणीनें, (२४) स्वाध्यायानें, जपानें, ध्यानानें आह्मी करतों या सत्यानें स्वतः भव हा अह्मांला मृत्युपाशापासून सोडवो (२५) कारण; तोच प्रभु उर्वारुक फळाप्रमाणें (वाकाप्रळमाणें) बंधमोक्षाला कारण झाला आहे. मृतसंजीवनमंत्र शंकरापासून मला मिळाला आहे. (२६) जप करून होम करून, अभिमंत्रण करून अहोरात्र जलपान करून लिंगाजवळ ध्यान करून नश्वरपणा सोडून टाक. (२७) याप्रमाणें त्याचें वचन ऐकून दधीच मुनीनें तपश्चर्येनें शंकराची प्राप्ति करून घेऊन अवध्यत्व, वज्रास्थित्व, अदीनत्व वगैरे मिळविलें. (२८) याप्रमाणें मुनिश्रेष्ठ दधीचानें साक्षात शिवाची आराधना करून

त्तमः ॥ प्राप्यावध्यत्वमन्यैश्च वज्रास्थित्वं प्रयत्नतः ॥२८॥ अताडयच्च राजेंद्रं पादमूलेन मूर्धनि ॥ क्षुपो दधीचं वज्रेण जघान सदसि प्रभुः ॥२९॥ नाभूद्दुःखाय तद्वज्रं दधीचस्य महात्मनः ॥ प्रभावात्परमेशस्य लब्धवज्रशरीरिणः ॥३०॥ वृत्तम् ॥ दृष्ट्वाप्यवध्यत्वमदीनतां च क्षुपो दधीचस्य तदा प्रभावम् ॥ आराधयामास हरिं मुरारिं मुकुंदमिंद्रानुजमंबुजाक्षम् ॥३१॥

शैलादिरुवाच ॥ पूजया तस्य संतुष्टो भगवान्पुरुषोत्तमः ॥ श्रीभूमिसहितः श्रीमांच्छंखचक्रगदाधरः ॥३२॥ किरीटी पद्महस्तश्च सर्वाभरणभूषितः ॥ पीतांबरश्च भगवान् देवैर्दैत्यैश्च संवृतः ॥३३॥ प्रददौ दर्शनं तस्मै दिव्यं वै गरुडध्वजः ॥ दिव्येन दर्शने नैव दृष्ट्वा देवं जनार्दनम् ॥३४॥ तुष्टाव वाग्भिरिष्टाभिः प्रणम्य गरुडध्वजम् ॥

राजोवाच ॥ प्रसीद जगतां नाथ शरण्य शरणैषिणाम् ॥३५॥ वैकुण्ठ शौरे सर्वज्ञ वासुदेव महाभुज ॥ संकर्षण महाभाग प्रद्युम्न पुरुषोत्तम ॥३६॥ अनिरुद्ध महाविष्णो सदा विष्णो नमोऽस्तु ते ॥ श्रद्धया

---

दुसऱ्याकडून अवध्यत्व व वज्रास्थित्व प्रयत्नपूर्वक मिळविलें. (२९) नंतर पुनः आश्रमाला आल्यानंतर क्षुपराजाच्या मस्तकावर पायानें दधीचमुनीनें लाथ मारिली. नंतर क्षुपराजानें सभेमध्येंच पुनः वज्रानें दधीचाला मारिलें. (३०) तेव्हां माहात्म्या दधीच मुनीला त्या वज्राचें दुःख विलकुल झालें नाहीं. कारण श्रीशिवाच्या अनुग्रहानें त्या मुनीचें शरीर वज्रासमान झालें होतें. (३१) तेव्हां दधीचमुनीचें अवध्यत्व व अदीनता पाहून व दधीचाचा प्रभाव पाहून राजानें कमलाक्ष, इंद्राचा बंधु, मुरासुराचा शत्रु, अशा हरीची आराधना केली.

(३२) शैलादि बोलला—त्या राजाच्या आराधनेनें भगवान पुरुषोत्तम संतुष्ट होऊन श्रीभूसहित हातांत शंखचक्रगदा धारण करून, (३३) किरीट धारण करून पद्म हातांत धरून सर्व दागिने आंगावर घालून पीतांबर नेसून देवदैत्यांनीं युक्त होऊन (३४) भगवान गरुडध्वजानें त्या राजाला दर्शन दिलें. दिव्य दृष्टीनें त्या जनार्दनाला पाहून (३५) प्रिय वाणीनें स्तोत्र करून त्या देवाला नमन करून बोलला.

राजा बोलला—हे जगत्पते, हे शरण्या, शरणागत पालका, प्रसन्न हो. (३६) वैकुंठा, शौरे, वासुदेवा, महाभुजा, संकर्षणा, महाभागा, प्रद्युम्ना, पुरुषोत्तमा, (३७) अनिरुद्धा, महाविष्णो, हे विष्णो तुला नमस्कार असो. श्रद्धेनें जें कांहीं केलें

यत्कृतं सर्वं यद्धुतं यच्च कीर्तितम् ॥३७॥ यदिष्टं तत्क्षमस्वेश नारायण जनार्दन ॥३८॥

नंदिकेश्वर उवाच ॥ वृत्तम् ॥ संपूज्य चैव त्रिदशेश्वराद्यैः स्तुत्वा स्तुतं देवमजेयमीशम् ॥ विज्ञापयामास निरीक्ष्य भक्त्या जनार्दनाय प्रणिपत्य मूर्ध्ना ॥३९॥

राजोवाच ॥ भगवन् ब्राह्मणः कश्चिद्दधीच इति विश्रुतः ॥ दुर्मदेनाविनीतात्मा सखा मम पुराभवत् ॥४०॥ अवध्यः सर्वदा सर्वैः शंकरार्चनतत्परः ॥ सावज्ञं वामपादेन मम मूर्ध्नि सदस्यथ ॥४१॥ ताडयामास वेगेन विष्णो सर्वजगत्पते ॥ उवाच समदाविष्टो न बिभेमीति सर्वतः ॥४२॥ जेतुमिच्छामि तं विप्रं दधीचं जगदीश्वर ॥ यथा हितं तथा कर्तुं त्वमर्हसि जनार्दन ॥४३॥

नंदिकेश्वर उवाच ॥ ज्ञात्वा सोऽपि दधीचस्य ह्यवध्यत्वं महात्मनः ॥ सस्मार च महेशस्य प्रभावमतुलं हरिः ॥४४॥ एवं स्मृत्वा हरिः प्राह ब्रह्मणः क्षुतसंभवम् ॥ विप्राणां नास्ति राजेंद्र भयमित्याह शंकरः ॥४५॥

---

असेल, जे होम केले असतील, जें कीर्तन केलें असेल, (३८) जो याग केला असेल, ते सर्व नारायणा, जनार्दना, ईशा, क्षमा कर.

(३९) नंदिकेश्वर बोलले—देवादिदेवांना पूज्य अशा अजेय, ईश, महाविष्णूची पूजा करून त्या जनार्दनाला मस्तकानें नमस्कार करून त्याला पाहून मग राजानें विनंति केली कीं,—

(४०) राजा बोलला—हे भगवन्, दधीच नांवाचा कोणी एक श्रेष्ठ ब्राह्मण प्रसिद्ध आहे. दुरहंकारानें युक्त तो अशिक्षित ब्राह्मण पूर्वी माझा मित्र होता. (४१) त्यानें शंकराची आराधना करून सर्वदा सर्वांकडून अवध्यत्व मिळविलें आहे. नंतर त्यानें भरसभेंत माझ्या डोक्यावर पायानें (४२) फार जोरानें लाथ मारिली हे विष्णो, जगत्पते, तो गर्वानें फुगून मला ह्मणाला कीं, राजा, मला कोणाचीही भीति नाहीं. (४३) हे जगदीश्वरा, त्याचा पराभव करावा, ह्मणून मी इच्छा करतों. हे जनार्दना, माझें हित जसें होईल, तसें तूं कर.

(४४) नंदिकेश्वर बोलले— त्या विष्णूनें महात्म्या दधीचाचें अवध्यत्व जाणून महेश्वराचें अतुल सामर्थ्यही लक्षांत आणिलें. (४५) असें स्मरण करून श्रीहरीनें क्षुपराजाला ह्मटलें कीं, हे राजा, ब्राह्मणांना कोणापासूनही भय नाहीं, असें श्री-

विशेषाद्रुद्रभक्तानामभयं सर्वदा क्षुप ॥ नीचानामपि सर्वत्र दधीचस्यास्य किं पुनः ॥४६॥ तस्मात्तव महाभाग विजयो नास्ति भूपते ॥ दुःखं करोमि विप्रस्य शापार्थं ससुरस्य मे ॥४७॥ भविता तस्य शापेन दक्षयज्ञे सुरैः समम् ॥ विनाशो मम राजेंद्र पुनरुत्थानमेव च ॥४८॥ तस्मात्तमेत्य राजेंद्र सर्वयत्नेन भूपते॥ साचिव्यं तु करिष्यामि दधीचविजयाय ते ॥४९॥ श्रुत्वा वाक्यं क्षुपः प्राह तथास्त्विति जनार्दनम् ॥ भगवानपि विप्रस्य दधीचस्याश्रमं ययौ ॥५०॥ आस्थाय रूपं विप्रस्य भगवान्भक्तवत्सलः ॥ दधीचमाह विप्रर्षिमभिवंद्य जगद्गुरुम् ॥५१॥

हरिरुवाच ॥ भो भो दधीच ब्रह्मर्षे भवार्चनरताव्यय ॥ वरमेकं वृणे त्वत्तस्तद्भवान्दातुमर्हसि ॥५२ याचितो देवदेवेन दधीचः प्राह विष्णुना ॥५३॥

दधीच उवाच ॥ ज्ञातं तवेप्सितं सर्वं न बिभेमि तवाप्यहम् ॥ भ-

---

शंकरानें सांगितलें आहे. (४६) त्यांतल्यात्यांत विशेषेंकरून रुद्रभक्तांना तर कोणापासूनही भीति मुळींच नाहीं, असें ह्मटलें आहे. शिवभक्त नीच जरी असले तरी त्यांना भय नाहीं, तर त्यांत योग्य अशा दधीचाला भीति कोठून येईल बरें? (४७) हे भूपते, महाभागा, तुला या कामांत जय मिळणार नाहीं. शिवाय कमजास्त केलें तर देवांसहित मला तो मुनि शाप देईल ही भीति वाटते. (४८) हे राजेंद्रा, दक्षाच्या यज्ञांत त्या मुनीच्या शापानें देवांसहित माझा नाश होणार आहे, व पुनः मी जीवंत होणार आहे. (४९) या करितां हे राजा, पुष्कळ प्रयत्न करून दधीचाचा पराभव करावयास तुझें साचिव्य ( मंत्रीपण ) पत्करतों (५०) या प्रमाणें त्याचें वाक्य ऐकून क्षुपानें तथास्तु असें ह्मटलें. इतक्यांत भगवान विष्णु दधीचाच्या आश्रमाला आला. (५१) भक्तवत्सल विष्णूनें ब्राह्मणाचा वेष घेतला, व त्या जगद्गुरूनें ब्राह्मणाला नमस्कार करून ह्मटलें कीं,—

(५२) श्रीहरि बोलला– हे दधीचा, मुने, शिवपूजका, अव्यया, तुझ्यापासून मला एक वर मिळवावयाचा आहे, तर तूं तो वर देण्यास योग्य आहेस. (५३) याप्रमाणें देवश्रेष्ठ विष्णूनें याचना केल्या बरोबर मुनीनें ह्मटले कीं,—

(५४) दधीचमुनि बोलले–अरे,तुझ्या मनांत काय आहे, तें मी समजलों, परंतु मी कांहीं तुला भीत नाहीं. ब्राह्मणाच्या स्वरूपानें साक्षात विष्णु तूं माझ्याकडे

वान्विप्रस्वरूपेण चागतोऽसि जनार्दन ॥५४॥ भूतं भविष्यद्देवेश वर्तमानं जनार्दन ॥ ज्ञातं प्रसादाद्रुद्रस्य द्विजत्वं त्यज सुव्रत ॥५५॥ आराधितोऽसि देवेश क्षुपेन मधुसूदन ॥ जाने तवैतां भगवन् भक्तवत्सलतां हरे ॥५६॥ अस्ति चेद्भगवन्भीतिर्भवार्चनरतस्य मे ॥ वक्तुमर्हसि यत्नेन वरदांबुजलोचन ॥५७॥ वदामि न मृषा तस्माद्बिभेमीति जनार्दन ॥ न बिभेमि जगत्यस्मिन्देवदैत्यादपि क्षणम् ॥५८॥

नंदिकेश्वर उवाच ॥ श्रुत्वा वाक्यं दधीचस्य तदास्थाय जनार्दनः ॥ स्वं रूपं सस्मितः प्राह संत्यज्य द्विजतां क्षणात् ॥५९॥

हरिरुवाच ॥ भयं दधीच सर्वत्र नास्त्यैव तव सुव्रत ॥ भवार्चनरतो यस्माद्भवान्सर्वज्ञ एव हि ॥६०॥ बिभेमीति सकृद्वक्तुं त्वमर्हसि नमस्तव ॥ नियोगान्मम राजेंद्रं क्षुपं प्रति सदस्यथ ॥६१॥ एवं श्रुत्वापि तद्वाक्यं सांत्वं विष्णोर्महामुनिः ॥ न बिभेमीति तं प्राह दधीचो देवसत्तमम् ॥६२॥ ततस्तस्य मुनेः श्रुत्वा वचनं कुपितो हरिः ॥ चक्रं

आला आहेस. (५५) हे देवश्रेष्ठा, श्रीशिवाच्या प्रसादानें भूत, भविष्य, वर्तमान सर्व कांहीं मला समजतें, तर हे सुव्रता, आतां हा ब्राह्मणाचा वेष टाकून दे. (५६) हे मधुसूदना, देवेशा, क्षुपराजानें तुझी आराधना केली आहे, तर हे हरे, तुझी ही भक्तवत्सलता मी जाणतों. (५७) हे भगवन्, शिवपूजेंत रत असलेल्या मला खरोखर भीति आहे काय? वरदा, कमलाक्षा, भीति असेल तर प्रयत्नानें (विचारानें) सांग. (५८) हे जनार्दना, ह्मणूनच मी कोणालाही भीत नाहीं, असें मी जें बोलतों, तें खोटें नव्हे. याजगांत देवाला, दैत्यांला, दुसऱ्या कोणाला एक क्षण देखील मी भीत नाहीं.

(५९) नंदिकेश्वर बोलले— विष्णूनें याप्रमाणें त्या मुनीचें वाक्य ऐकून ब्राह्मणाचा वेष सोडून निजरूप प्रकट करून आश्चर्य पावून हंसत हंसत त्यामुनीला ह्मटलें कीं,

(६०) श्रीहरी बोलला— हे सुव्रता, तुला वास्तविक भीति कोणाची नाहींच, कारण तूं भवाराधनेंत (श्रीशिवाच्या आराधनेंत) निमग्न असून तूं सर्वज्ञ आहेस (६१) असें जरी आहे, तथापि एकवार "मी भ्यालों" असें ह्मण, तुला मी नमस्कार करतों. मी सांगतों, ह्मणून सभेमध्यें त्या राजापुढें असें ह्मण (६२) महामुनीनें याप्रमाणें विष्णूचें शांत वाक्य ऐकिलें, तरी त्या देवाला "मी भीत नाहीं" असें स्पष्ट त्या मुनीनें ह्मटलें. (६३) या प्रमाणें त्या मुनीचें वाक्य ऐकि-

मुमोच भगवान्दिधक्षुर्मुनिसत्तमम् ॥६३॥ अभवत्कुंठितास्यं हि विष्णोश्चक्रं सुदारुणम् ॥ प्रभावाद्धि दधीचस्य क्षुपस्यास्य च सन्निधौ ॥६४॥ दृष्ट्वा तत्कुंठितास्यं च चक्रं चक्रिणमाह सः ॥ दधीचः सस्मितं साक्षात्सदसद्व्यक्तिकारणम् ॥६५॥

दधीच उवाच ॥ भगवन्भवता लब्धं पुरातीव सुदारुणम् ॥ सुदर्शनमिति ख्यातं चक्रं विष्णो प्रयत्नतः ॥६६॥ भवस्यैतच्छुभं चक्रं न जिघांसति मामिह ॥ ब्राह्मैरन्यैस्तवास्त्रैर्वा प्रयत्नं कर्तुमर्हसि ॥६७॥

नंदिकेश्वर उवाच ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा दृष्ट्वा कुंठितमायुधम् ॥ ससर्ज च पुनस्तस्मै सर्वास्त्राणि समन्ततः ॥६८॥ चक्रुर्देवास्ततस्तस्य विष्णोः साहाय्यमव्ययाः ॥ द्विजेनैकेन योद्धुं हि प्रवृत्तस्य महाबलाः ॥६९॥ कुशमुष्टिं तदादाय दधीचः संस्मरन् शिवम् ॥ ससर्ज सर्वदेवेभ्यो वज्रास्थिः सर्वतो वशी ॥७०॥ दिव्यं त्रिशूलमभवत्कालाग्निस-

---

त्याबरोबर विष्णूला राग आला, नंतर त्यामुनीला जाळून टाकण्याकरितां विष्णूनें आपलें चक्र त्यावर सोडिलें. (६४) नंतर त्यामुनीच्या प्रभावानें भयंकर विष्णूचें चक्र क्षुप पाहत असतां कुंठित झालें, (६५) मग कुंठित झालेलें चक्र पाहून तो मुनि विष्णूला बोलला. सदसत्पदार्थाला कारण अशा विष्णूला मुनीनें हंसतहंसत ह्मटलें कीं,—

(६६) दधीचमुनि बोलला— हे भगवान, हें भयंकर चक्र पूर्वी तूं मिळविलेंस याचें नांव सुदर्शन असें आहे, याविषयीं तुझी खटपट फार झाली आहे. (६७) तथापि हें चक्र श्रीशिवाचेंच असल्यामुळें माझा हें नाश करूं शकत नाहीं. याकरितां इतर ब्राह्म वगैरे अस्त्रें तुझ्याजवळ असतील तर त्यां अस्त्रांनीं प्रयत्न करून पहा.

(६८) नंदिकेश्वर बोलले— त्यामुनीचें वचन ऐकून आपलें आयुध कुंठित झालेलें पाहून पुनः चोहोंकडे विष्णूनें पाहून सगळीं अस्त्रें सोडिलीं.(६९)तेव्हां त्या विष्णूला सर्व देवांनीं साहाय्य केलें. एका ब्राह्मणाबरोबर युद्ध करण्याकरितां महा बलिष्ठ सर्व देवांनीं विष्णूला मदत केली. (७०) तेव्हां दधीचानें शिवस्मरण करून कुशमुष्टि हातांत घेऊन सर्व जग ताब्यांत ठेवलेल्या वज्रास्थि दधीचानें सर्व देवावर ते दर्भ टाकून दिले. (७१) त्या दर्भाचे त्रिशूल होऊन त्याच्या भोंवती कालाग्नीच्या ज्वाळे प्रमाणें ज्वाला निघूं लागल्या. दुसऱ्या प्रलयाग्निप्रमाणेंच ते

दृशप्रभम् ॥ दग्धुं देवान्मतिं चक्रे युगान्ताग्निरिवापरः ॥७१॥ इंद्रनारायणाद्यैस्तु देवैस्त्यक्तानि यानि तु ॥ आयुधानि समस्तानि प्रणेमुस्त्रिशिखं मुनेः ॥७२॥ देवाश्च दुद्रवुस्सर्वे ध्वस्तवीर्या द्विजोत्तमम् ॥ ससर्ज भगवान्विष्णुः स्वदेहात्पुरुषोत्तमः ॥७३॥ आत्मनः सदृशान् दिव्यान् लक्षलक्षायुतान्गणान् ॥ ततस्तान्सहसा सर्वान्ददाह मुनिसत्तमः ॥७४॥ ततो विस्मयनार्थाय विश्वमूर्तिरभूद्धरिः ॥ तस्य मूर्तिं हरेस्साक्षादपश्यद्विजसत्तमः ॥७५॥ दधीचो भगवान् विप्रो देवतानां सहस्रकम् ॥ अंडानां कोटयश्चैव विश्वमूर्तेस्तनौ तथा ॥७६॥ दृष्ट्वैतदखिलं तत्र च्यावनिः सस्मितं तदा ॥ विष्णुमाह जगन्नाथं जगन्मयमजं हरिम् ॥७७॥ अंभसाभ्युक्ष्य तं विष्णुं विश्वरूपं महामुनिः ॥ मायां त्यज महाबाहो प्रतिभासो विचारतः ॥७८॥ विज्ञातानि सहस्राणि दुर्विज्ञेयानि माधव ॥ मयि पश्य जगत्सर्वं त्वया सममनिंदित ॥७९॥ ब्रह्माणं च तथा शक्रं दिव्यां दृष्टिं ददामि ते ॥ इत्युक्त्वा दर्शयामास स्वांगुष्ठे निखिलं मुनिः ॥८०॥ तं प्राह च हरिं देवं सर्वदेवभवोद्भवम्॥

---

त्रिशूल सर्व देवांना दग्ध करूं लागले. (७२) इंद्र नारायण यांनी जीं जीं आयुधें सोडिलीं होतीं, तीं तीं सर्व आयुधें त्या त्रिशूलाला नमस्कार करावयास लागलीं. (७३) हे ब्राह्मणश्रेष्ठा, देव सर्व हतवीर्य होऊन पळूं लागले. नंतर पुरुषोत्तम विष्णूनें आपल्या शरीरापासून (७४) आपल्या बरोबरीचे दिव्य एक लक्ष त्यांहून जास्त ह्मणजे दहाहजार लक्ष संख्येचे लोक निर्माण केले. तेव्हां त्यामुनिश्रेष्ठानें एका क्षणांत त्या सर्वांना जाळून टाकिलें. (७५) तेव्हां त्यामुनीला विस्मय वाटण्याकरितां श्रीहरीनें विश्वरूप दाखविलें. त्या श्रेष्ठमुनीनें श्रीहरीची विश्वमूर्ति पाहिली. (७६) भगवान दधीचानें त्या विश्वमूर्तीच्या शरीरांत हजारो देव, कोट्यावधि ब्रह्मांडें (७७) अखिल जग पाहून मुनि हंसून विष्णूला ह्मणाला. हे विष्णो, जगन्मया, जगन्नाथा, अजा, हरे, (७८) असें ह्मणून त्या विष्णूला अभिमंत्रित पाण्यानें संप्रोक्षण करून त्या विश्वरूपाला ह्मटलें कीं, हे विष्णो, महाबाहो, अविचारानें हें काय दाखवितोस, ती माया आहे, तिला सोडून टाक (७९) हे माधवा, अशा तऱ्हेचीं न समजणारीं हजारों कृत्यें मला ठाऊक आहेत. तर तुझ्यासह हें सर्व जग दाखवितों बघ. (८०) तुला दिव्यदृष्टि देतों, तर ब्रह्मा इंद्र यां सर्वांना येथें पाहा. असें ह्मणून मुनीनें आपल्या एका अंगठ्यांत सर्व जग दाखविलें. (८१) मग सर्व देवांच्या उत्पत्तीला कारण अशा विष्णूला

मायया ह्यथवा किंवा मंत्रशक्त्याथवा प्रभो ॥८१॥ वस्तुशक्त्याथवा विष्णो ध्यानशक्त्याथवा पुनः ॥ त्यक्त्वा मायामिमां तस्माद्योद्धुमर्हसि यत्नतः ॥८२॥ दधीचो भगवान्क्रुद्धस्ताडयामास वक्षसि ॥ वामपादेन वेगेन विश्वरूपं जनार्दनम् ॥८३॥ देवाश्च दुद्रुवुर्भूयो देवं नारायणं च तम् ॥ वारयामास निश्चेष्टं पद्मयोनिर्जनार्दनम् ॥८४॥ निशम्य वचनं तस्य ब्रह्मणस्तेन निर्जितः ॥ जगाम भगवान्विष्णुः प्रणम्य च महामुनिम् ॥८५॥ क्षुपो दुःखार्दितो भूत्वा संपूज्य च महामुनिम् ॥ दधीचमभिवंद्याशु प्रार्थयामास विक्लवः ॥८६॥ दधीच क्षम्यतां सर्वं यदज्ञानात्कृतं सखे॥ विष्णुना वा सुरैर्वापि शिवभक्तस्य किं तव॥८७॥ प्रसीद परमेशान दुर्लभां दुर्जनैर्मम ॥ भक्तिं भक्तिमतां श्रेष्ठ मद्विधैः क्षत्रियाधमैः ॥८८॥ श्रुत्वाऽनुगृह्य तं विप्रो दधीचस्तपसां वरः ॥ राजानं मुनिशार्दूलः शशाप सुरसत्तमान् ॥८९॥ रुद्रकोपाग्निना देवाः सदेवेंद्रा मुनीश्वराः ॥ ध्वस्ता भवत देवेन विष्णुना च गणैः समम् ॥९०॥ इत्युक्त्वा स्वोटजं विप्रः प्रविवेश महाद्युतिः ॥ दधीचमभिवं-

---

ह्मटलें कीं, हे हरे, ही माया ह्मणावी, कां मंत्रशक्ति ह्मणावी? (८२) हे विष्णो, ही स्थिति खरी ह्मणावी, कां ध्यानशक्ति ह्मणावी? काहीं असो. परंतु ही माया सोडून प्रयत्नपूर्वक माझ्या बरोबर युद्ध करावयास तयार हो. (८३) नंतर दधीच मुनीनें रागावून डाव्या पायानें विश्वरूपी जनार्दनाच्या उरावर जोरानें लाथ मारिली. (८४) पुनः सर्व देव जिकडे तिकडे पळून गेले. तेव्हां ब्रह्मदेवानें निश्चेष्ट झालेल्या नारायणाला पाहिलें. मग त्या जनार्दनाला युद्धापासून पराङ्मुख केलें. (८५)ब्रह्मदेवाचें वचन ऐकून दधीचानें केलेला पराभव सहन करून भगवान विष्णु महामुनीला नमन करून आपल्या स्थानाला निघून गेला. (८६) मग क्षुप राजा दुःखी होऊन त्या मुनीजवळ येऊन त्यानें मुनीची पूजा केली. मग त्या मुनीला नमस्कार करून दुःखी होऊन त्यानें त्याची प्रार्थना केली. (८७) हे सखे दधीचा, अज्ञानानें जें कांहीं मीं केलें, तें सर्व क्षमा कर. शिवभक्त अशा तुला विष्णु किंवा इतर देव काय करूं शकतील? (८८) हे श्रेष्ठा, प्रसन्न हो. भक्तिमानांमध्यें श्रेष्ठा, मजसारख्या दुर्जन अधम क्षत्रियांना दुर्लभ असलेली अशी भक्ति दे. (८९) याप्रमाणें राजाचें वाक्य ऐकून तपस्वी मुनीनें त्यावर अनुग्रह केला. मग सर्व देवांना मुनिश्रेष्ठानें शाप दिला. (९०) हे देवहो, पुढें तुह्मी रुद्राच्या कोपाग्नीनें तुमच्या गणासह विष्णूसह नष्ट होऊन जा. (९१) असें बोलून

द्यैव जगाम च सविस्मितः ॥९१॥

नंदिकेश्वर उवाच ॥ कथितस्तव संक्षेपाद्वादः क्षुपदधीचयोः ॥ प्रभावश्च दधीचस्य भवस्य च महात्मनः ॥९२॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे शिवभक्तप्रशंसायां क्षुपदधीचसंवादो-
पंचसप्ततितमोऽध्यायः ॥

---

तेजस्वी मुनीनें आपल्या आश्रमांत प्रवेश केला तो राजा दधीच मुनीला नमस्कार करून आश्चर्यचकित होऊन निघून गेला.

(९२) नंदिकेश्वर बोलले– हे सनत्कुमारा, क्षुपदधीचांचा हा वाद संक्षेपानें तुला सांगितला. व दधीच मुनीचा व महात्म्या श्रीशिवाचा प्रभावही सांगितला.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारानिरूपणांतील शिवभक्तप्रशंसेंतील क्षुपदधीचसंवादनांवाचा पंचाहात्तरावा अध्याय संपला.



## अथ षट्सप्ततितमोऽध्यायः

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ कालिकाखण्डे ॥ तृणबिंदुरुवाच ॥ भगवन् प्रष्टुमिच्छामि त्वामहं वै गुरूत्तमम् ॥ न हि मे तृप्तिरस्तीह त्वद्वाक्यामृतमुत्तमम् ॥१॥ पिबतः साधु कर्णाभ्यां महादेवकथाश्रयम् ॥ निंद्यानि भगवान् विष्णुः शंखचक्रगदाधरः ॥२॥ दशरूपाणि स कथं तामसान्यसुखानि च ॥ प्राप्तवानेतदाश्चर्यं सर्वं मे कथयाधुना ॥३॥

अनिलाद उवाच ॥ ॐ नमस्ते महेशाय शिवायाशिवहारिणे ॥ ब्रह्मविष्णिवन्द्रवंद्याय निर्विकाराय शंभवे ॥४॥ वृषरूपः स्वयं विष्णुर्यं वहेत सदाशिवम् ॥ तं नमस्ये महादेवं चराचरगुरुं शिवम् ॥५॥ तं प्रणम्य महाभोगमोक्षदातारमव्ययम् ॥ सर्वदेवमयं रुद्रं वक्ष्ये पृष्टं त्वयाऽधुना ॥६॥ देवासुराणां संग्रामः पूर्वमासीत्सुदारुणः ॥ अनेककालपर्यन्तं महाप्रलयसन्निभः ॥७॥ तदा देवैर्जिता दैत्याः स्वगुरुं भृगुनंदनम् ॥ अनुजग्मुर्भृशं भीताः शुक्रं नीतिमतां वरम् ॥८॥ काव्यश्चाश्वास्य संधीतान् प्रसन्नः शरणार्थिनः ॥ तान्दृष्ट्वा निर्जितान् दैत्यांस्तत्का-

---

श्रीशिवास नमस्कार असो, स्कांदपुराणांतल्या कालिकाखंडांत ह्मटलें कीं, तृणबिंदुराजा बोलला (१) हे भगवन, अनिलादा, गुरुश्रेष्ठ तुला प्रश्न करतों कीं, तुझ्या मुखानें किती कथा ऐकिल्या तरी अजून माझी तृप्ती होत नाहीं. (२) महादेवाच्या कथा किती ऐकिल्या तरी पुनः पुनः ऐकाव्या असें वाटतें. तर हे अनिलादा शंखचक्रगदाधारी भगवान विष्णूनें निंद्य, (३) तामस, दुःखकर दशावतार कां घेतले ? हें आश्चर्य वाटत आहे, तर सांप्रत मला सर्व सांग.

(४) अनिलाद बोलले–महेशाला, शिवाला, अमंगल, नाश करणाऱ्या देवाला, ब्रह्मविष्ण्वादि देवांना वंद्य असलेल्या देवाला, निर्विकाराला, शंभूला प्रणवपूर्वक नमन करतों. (५) वृषरूप घेऊन ज्या सदाशिवाला पाठीवर विष्णु वाहतो, त्या चराचरगुरु शिवमहादेवाला नमन करतों. (६) महाभोग व मोक्ष देणाऱ्या अव्यय सर्व देवमय रुद्राला नमन करून सांप्रत तुझ्या प्रश्नाला उत्तर देतों (७) पूर्वी देवासुराचा भयंकर संग्राम माजून राहिला. पुष्कळ वेळ पर्यंत तें युद्ध चालल्यामुळें आतां प्रलयच होतो कीं काय असें वाटत होतें. (८) नंतर सर्व देवांनीं दैत्यांचा पराभव केला. मग सर्व दैत्य भृगुनंदन, नीतिमानांमध्यें श्रेष्ठ, आपला गुरु अशा शुक्राजवळ आले. (९) शुक्रानें शरण आलेल्या शिष्यांना पाहून प्रसन्न

लसदृशं वचः ॥९॥ उवाच शुक्रो मेधावी समयं कृत्वाऽसुरांस्ततः ॥ कृतार्थौ रुद्रमाराध्य यावत्तैव व्रजाम्यहम् ॥१०॥ शान्ता दान्ता जित-क्रोधाः शिवभक्ता विमत्सराः ॥ सर्वदेवमयं लिंगं यजन्तः परमेश्वरम् ॥११॥ विवादो नैव कर्तव्यः सांप्रतं देवतैः सह ॥ बलेनाभ्यधिका देवाः भवन्तोऽल्पबलाः खलु ॥१२॥ न हि वै मंत्ररहिता जयन्ते चापि कुत्र-चित् ॥ कालापेक्षापरास्तस्माच्छिद्रेषु प्रहरेद्युधि ॥१३॥ भूयः सर्वत्र योत्स्यन्ते लब्धविद्ये हरान्मयि ॥ एवमुक्त्वा दितेः पुत्रान् भृगुपुत्रो महातपाः ॥१४॥ हिमवंतं नगश्रेष्ठं शिवं द्रष्टुं स्वयं ययौ ॥ तस्मिन्दृष्ट्वा स देवेशं सोमं चंद्रार्धशेखरम् ॥१५॥ उपास्यमानं बहुभिर्देवासुरम-होरगैः ॥ स्तुत्वा प्रणम्य चोवाच भगवन्तं वृषाकपिम् ॥१६॥ न त्र-स्यन्ति कचिद्दैत्या विद्याभिर्याभिरीश्वर ॥ ता मे प्रयच्छ देवेश मां भृत्यं मन्यसे यदि ॥१७॥

ईश्वर उवाच ॥ न या ब्रह्मणि नो विष्णौ न शक्रे न बृहस्पतौ ॥

---

होऊन पराभूत झालेल्या दैत्यांना पाहून त्यावेळेस योग्य असें भाषण केलें. (१०) आश्चर्य करून बुद्धिमान शुक्रानें दैत्यांना ह्मटलें कीं, शिष्यहो, साक्षात शंकराची आराधना करून मी कृतार्थ होऊन येईपर्यंत स्वस्थ राहा. (११) कारण शिव-भक्त शांत असून जितेंद्रिय असले पाहिजे, क्रोध जिंकिला पाहिजे, असें होऊन शिवभक्त सर्व देवमय परमेश्वराची अराधना करतात. (१२) याकरितां सांप्रत देवांबरोबर कलह करूं नका. प्रस्तुत सर्व देव बलिष्ठ असून तुह्मी बलहीन आहांत. (१३) केव्हांही चांगला पोक्त विचार केल्याशिवाय जय मिळत नसतो. याकरितां कालाचें निरीक्षण करा. छिद्र सांपडल्या बरोबर युद्ध करा. (१४) श्रीशिवापासून विद्या मिळविल्यानंतर पुनः तुह्मी देवांबरोबर युद्ध कराल. याप्रमाणें महातपस्वी शुक्राचार्य दैत्यांना सांगून (१५) पर्वतश्रेष्ठ हिमालयावर शिवाला पाहण्याकरितां आले. त्या पर्वतावर चंद्रशेखर, उमासहित शिवाला त्यानें पाहिलें. (१६) तेथें देव, असुर सर्प, इतर पुष्कळ प्राणी शिवाची उपासना करीत होते, अशा देवाचें स्तोत्र करून नमस्कार करून भगवान वृषाकपीला शुक्रानें ह्मटलें कीं (१७) हे ईश्वरा, ज्या विद्यांच्या योगानें देवापासून दैत्यांना त्रास न पोहोंचेल, अशी विद्या हे देवेशा, मला तूं भृत्य मानीत असशील, तर दे.

(१८) शिव बोलले— हे शुक्रा, ब्रह्मा, विष्णु, इंद्र, ब्रह्मस्पति, इतर देवं यां-

नान्येषु देवभूतेषु संति विद्या भृगूद्वह ॥१८॥ तास्ते भक्ताय दास्यामि यदि कर्ताऽसि मद्वचः॥पूर्णं वर्षसहस्रं तु कुण्डधूममवाक्शिराः॥१९॥ यदि पास्यसि भद्रं ते तदा विद्यास्तु लप्स्यसे॥प्रतिज्ञाते व्रते तस्मिन्दैत्यानां गुरुणा प्रभुः ॥२०॥ आदिदेश ततस्तस्मै धूमाप्तिं कुण्डमध्यतः॥ ततो बहुतिथे काले व्रतस्थे भृगुनंदने ॥२१॥ चित्रप्रहरणा देवाः सेंद्रा विष्णुपुरोगमाः ॥ वाहनायुधसंपन्ना दैत्यानभ्यद्रवंस्तदा ॥२२॥ तांश्च सर्वान्सुरान्दृष्ट्वा भीता दैतेयदानवाः ॥ ऊचुः प्रांजलयस्सर्वे भृगोराश्रमसंस्थिताः ॥२३॥ न्यस्तशस्त्रा वयं देवा जटावल्कलधारिणः ॥ तपस्विनो भस्मदिग्धा नायुधानि च हे सुराः ॥२४॥ दृष्ट्वा तांस्तादृशान् शक्रो वासुदेवमुवाच ह ॥यावद्व्रतस्थितः काव्यो यावदेते बलोज्झिताः ॥२५॥ तावदेव हि हंतव्या अन्यथा नास्ति नः सुखम् ॥ इति निश्चित्य तेऽन्योन्यं देवा दैत्यानभिद्रवन् ॥२६॥ ते वध्यमाना गीर्वाणैः काव्यमातुर्निकेतनम् ॥ दिव्याया विविशुस्त्रस्ता दनुजाः कृपणा इव ॥२७॥

---

त्याजवळ जी विद्या नाहीं, (१९) ती विद्या भक्त अशा तुला देतों. परंतु मी जें सांगेन, तें ऐकलें पाहिजें. एक हजार वर्षेपर्यंत डोकें खालीं करून कुंडांतला धूर (२०) जर तूं पिशील, तर त्या सर्व विद्या तुला येतील. नंतर शिवानें सांगितल्याप्रमाणें दैत्यगुरु शुक्रानें अशा नियमाची प्रतिज्ञा केली. (२१) मग प्रभूनें कुंडमध्यांतून धुराची प्राप्ति करून दिली. नंतर याप्रमाणें शुक्राचार्य पुष्कळ काळपर्यंत व्रतस्थ राहिला असतां (२२) विष्णु वगैरे इंद्रादिदेव वाहनावर बसून पुष्कळ आयुधें घेऊन दैत्यांवर धांवले. (२३) त्यां सर्व देवांना पाहून दैत्यदानव सर्व भ्याले. घाबरून भृगुमुनीच्या ( शुक्राच्या ) आश्रमांत राहिलेले सर्व दैत्य हात जोडून ह्मणाले. (२४) देवहो, आह्मीं सर्वांनीं शस्त्रें खालीं ठेविलीं आहेत. जटा धारण केल्या आहेत, वल्कलें नेसलीं आहे, तप करीत आहोंत, भस्मलेपन केलें आहे, आयुधें जवळ नाहींत. (२५) अशा स्थितींत असलेल्या दैत्यांना पाहून इंद्रानें वासुदेवाला ह्मटलें कीं, हे विष्णो, जोंपर्यंत शुक्राचें व्रत संपलें नाहीं, जोंपर्यंत हे दैत्य बलहीन आहेत, (२६) तोंपर्यंत दैत्यांना मारून टाकिलें पाहिजे. नाहींतर अह्मांस सुख मिळवयाचें नाहीं. असा निश्चय आपसांमध्यें करून दैत्यांवर सर्व देव धांवले. (२७) या प्रमाणें देवांनीं त्रस्त होऊन सर्व दैत्य शुक्राचार्यांच्या मातोश्रीच्या घरीं शिरले, अशा त्या दिव्येच्या घरांत तें

तत्रापि वध्यमानांस्तान्दृष्ट्वा दिव्या तपस्विनी ॥ न भेतव्यं नभेतव्य-मिति तान्प्राह साऽसकृत् ॥२८॥ ऐरावतगजारूढं वधोद्यतकरं तदा ॥ स्तंभयामास देवेन्द्रं निष्प्रयत्नगतिं रुषा ॥२९॥ आत्मानं स्तंभितं दृष्ट्वा शक्रः प्रोवाच केशवम् ॥ न किंचिदुत्सहे कर्तुं यद्युक्तं तद्वदस्व मे ॥३०॥ अथाह माधवः शक्रं मां त्वं प्रविश वासव ॥ विष्णुना रक्षितं दृष्ट्वा शक्रं दिव्याऽब्रवीदिदम् ॥३१॥ एनं त्वां विष्णुना सार्द्धं संहरामि शतक्रतो ॥ इत्युक्तः केशवस्तस्याः क्रूरं देव्याश्चिकीर्षितम् ॥३२॥ ज्ञात्वा चिच्छेद चक्रेण शिरः स्त्रीवधनिर्घृणः ॥ तां दृष्ट्वा निहतां भार्यां ब्रह्मपुत्रो भृगु-स्तदा ॥३३॥ क्रोधाज्जज्वाल कर्मान्ते कक्षासक्त इवानलः ॥ निर्दह-न्निव चोवाच वेपमानं जनार्दनम् ॥३४॥

भृगुरुवाच ॥ अहो वीर्येण महता दैत्यदर्पापहारिणा ॥ संयुक्तोऽद्य भवान्हत्वा मम भार्यां पतिव्रताम् ॥३५॥ पापिष्ठस्त्वं दुराचारः स्त्रीवधं

---

दैत्य दीन कृपणाप्रमाणें राहिले. (२८) त्या ठिकाणीं देखील देव येऊन त्यांना मारूं लागले. अशा त्यां दैत्यांना पाहून तपस्विनी शुक्रमातेनें दैत्यहो, तुह्मी भिऊं नका, भिऊं नका असें वारंवार ह्मटलें. (२९) ऐरावतावर बसून वज्र उचललेल्या इंद्राला तिनें रागाऊन स्तंभन करून टाकिलें. त्याची गति कुंठित करून टाकिली. (३०) आपलें स्तंभन झालेलें पाहून इंद्रानें विष्णूला ह्मटलें कीं, हे विष्णो, प्रस्तुत माझ्या हातून कांहीं होत नाहीं. आतां पुढें काय करावें? तें सांग. (३१) मग माधवानें ह्मटलें कीं, हे इंद्रा, माझ्या शरीरांत तूं प्रवेश कर. या प्रप्राणें वि-ष्णूनें रक्षण केलेलें पाहून इंद्राला दिव्येनें ह्मटलें कीं, (३२) हे इंद्रा, विष्णुस-हित तुझा निग्रह करित्यें. असें तिचें वाक्य ऐकून तिचें तें क्रूरकर्म (३३) जाणून स्त्रीहत्या करावयास न लाजतां विष्णूनें निर्दयपणानें तिचें डोकें चक्रानें कापिलें. याप्रमाणें मृत झालेल्या बायकोला पाहून ब्रह्मपुत्र भृगुमुनि (३४) कर्मसमाप्तीच्या वेळेस एका बाजूला अग्नीनें जसा पेट घ्यावा, त्याप्रमाणें क्रोधानें जळूं लागला. आतांच जाळतो कीं काय? असा दिसणारा मुनि थरथर कांपणाऱ्या विष्णूला ह्मणाला.—

(३५) भृगु बोलला— दैत्यांचा गर्व परिहार करणाऱ्या केशवा, मोठ्या परा-क्रमानें युक्त होऊन आज माझ्या पतिव्रता भार्येचा नाश केलास, (३६) तूं मोठा पापी आहेस. दुराचारी आहेस. स्त्रीविध करावयास, तुला कांहीं वाटलें

प्रति निर्घृणः ॥ अकृत्यकारिन् दुर्बुद्धे देवानां कुलहिंसन ॥३६॥ शृणु मे वचनं घोरं देवाधम भयावहम् ॥ अचिंत्यं ब्रह्म निर्द्वंद्वमैश्वरं हि बलं मम॥३७॥ यद्यहं त्र्यंबकान्नान्यं देवं वेद्मि महेश्वरात् ॥ तेन सत्येन गोविंद नरकान् दश यास्यसि ॥३८॥ मच्छकच्छपरूपस्त्वं मांसासृक्पूयभुक् भव ॥ तथा सूकररूपेण जगद्विष्ठाक्षयं कुरु ॥३९॥ नरसिंहादिभिर्भेदैः कुत्सितैस्तामसैस्तथा ॥ अनेकदुःखबहुलैर्युक्तो भव चिरं हरे ॥४०॥ अन्यं चापि महाघोरं शापं दद्मि स्थिरो भव ॥ एकदण्डास्त्रिदण्डाश्च भक्ता ये च हरे त्वयि ॥४१॥ तेऽद्य पाषंडिनः संतु दृष्ट्वापि नरकप्रदाः ॥ ये च तान्भोजयिष्यंति संभाषन्ते नमंति वा ॥४२॥ तेऽपि यास्यंति नरकं यावदाभूतसंप्लवम् ॥ तेऽद्यप्रभृति पापिष्ठास्त्वद्भक्ताः संतु नारकाः ॥४३॥ तेभ्यो दत्तं मनुष्येण सर्वं भवतु भस्मसात् ॥ मत्स्यकूर्मवराहांश्च भक्षयिष्यन्ति मानवाः ॥४४॥ तव तावद्बलं दृष्टं शृण्वन्त्वन्येऽपि चामराः ॥ ये शक्तास्ते समायांतु दर्शयंतु बलं स्वकम् ॥४५॥ पश्यंतु तपसो वीर्यं हराराधनजं मम ॥ एवमुक्त्वा शिरो गृह्य

---

नाहीं, तूं निर्दय आहेस. अकृत्य करणाऱ्या दुर्बुद्धे, देवांचा वंश नाश करणाऱ्या दुष्टा, (३७) देवनीचा, घोर भयंकर माझें वचन ऐक. माझें बल अचिंत्य असून निर्द्वंद्व आहे व ईश्वरीबळ माझें आहे. (३८) जर त्र्यंबकाशिवाय इतर देवाला जाणत नसेन तर त्या खरेपणानें दहावेळ तूं नरकवास भोग. (३९) मत्स्य कच्छ वगैरे रूपें घेऊन मांस, रक्त, पू, वगैरे भोजन कर. तसेंच डुकराच्या रूपानें जगांतली विष्ठा खा. (४०) नरसिंहादि कुत्सित तामस अनेक रूपांनीं युक्त हो. हे हरे त्यां योनींत अनेक दुःखांचा उपभोग घे. (४१) अरे याशिवाय भयंकर शाप देतों, उभा रहा. एकदंड त्रिदंड असें तुझे जे भक्त असतील, (४२) ते सर्व पाषंडी होवोत. त्यांचें दर्शन घेणाऱ्यांना नरकवास होवो. जे लोक त्यांना जेवावयास घालतील, त्यांना जे नमस्कार करतील, (४३) ते देखील प्रलय होईपर्यंत नरकांत राहतील. आजपासून ते तुझे भक्त पापी होऊन नरकांत पडोत. (४४) त्यांना मनुष्यांनीं दिलेलें सर्व राखरांगोळी होवो. मानव मासे, कासव, डुकर खातील. (४५) तुझें बळ तर पाहिल्याप्रमाणेंच आहे. जे देव ऐकतील, ते समर्थ होऊन माझ्या पुढें येऊन आपापलें बळ दाखवूं दे (४६) श्रीशिवाची आराधना करून मिळविलेले माझ्या तपाचें बळ पाहूं दे. असें बोलून आपल्या भा-

ग्रीवास्थाने निवेश्य च ॥४६॥ यदि मे सकलो धर्मो ज्ञायते चरितोऽथवा ॥ तेन सत्येन जीव त्वं यदि तथ्यं वदाम्यहम् ॥४७॥ एनां तां विष्णुना देवीं हतां संजीवयाम्यहम्॥ महता तपसा खिन्नां प्राणेभ्योऽपि गरीयसीम् ॥४८॥ इत्युक्त्वाऽद्भिस्तु तां प्रोक्ष्य समुत्तिष्ठेति चाब्रवीत् ॥ ततस्तां जीवितां दृष्ट्वा देवीं सुप्तोत्थितामिव॥४९॥मिषतां सर्वदेवानां तदद्भुतमिवाभवत् ॥ भृगुराह पुनर्विष्णुं लोचनाभ्यां दहन्निव ॥५०॥ तावदत्रापि गच्छ त्वं शीघ्रमेव सुराधम ॥ यावत्त्वां शापवज्रेण न दहामि गिरिं यथा ॥५१॥ इत्युक्तो भृगुणा विष्णुर्वेपमानस्त्वरान्वितः ॥ प्रस्खलन् गरुडस्थोऽपि हृदि ध्यायन्महेश्वरम् ॥५२॥ प्रपन्नार्तिहरं रुद्रं सोमं सगणमीश्वरम् ॥ ययौ वृंदारकावासं मंदरं चारुकंदरम् ॥५३॥ किन्नरैर्जुष्टविपिनं नानाप्रस्रवणाकुलम् ॥ नानागणकृतोद्यानं नानाविहगनादितम् ॥५४॥ नानावृक्षलतागुंफं सुरभीकृतमारुतम् ॥ मनः प्र-

---

ग्रेचें शिर घेऊन गळ्यावर ठेवून (४७) मुनीनें ह्मटलें कीं, जर माझा सर्व धर्म शिव समजत असेल तर सर्व धर्म केले असतील जर मी सत्य बोलत आहे तर व त्यास त्यानें माझ्या बायकोचें जीवित पुनः परत येवो. (४८) विष्णूनें मारिलेल्या इला पुनः जीवंत करतों, मोठें तप करून कृश झाली आहे, माझ्यां प्राणांही पेक्षां प्रिय आहें, हिला जीवंत करतों. (४९) असें बोलून उदक हातांत घेऊन तिच्यावर प्रोक्षण करून अगे ऊठ असें ह्मटलें. नंतर निजून उठलेल्या मनुष्या प्रमाणें जीवंत होऊन पुनः उठलेल्या दिव्येला पाहून (५०) सर्व देवांनीं तें पाहून अत्याश्चर्य केलें. डोळ्यांनीं जाळतो कीं काय याप्रमाणें पाहत तो मुनि पुनः विष्णूला ह्मणाला. (५१) हे देवनीचा अग्नीनें पर्वताप्रमाणें शापरूपी वज्रानें जोंपर्यंत तुला मी जाळून टाकिलें नाहीं, तोंपर्यंत येथून निघून जा. (५२) याप्रमाणें भृगुमुनीचें वाक्य ऐकून कांपत कांपत त्वरेनें गरुडावर बसून स्खलन पावणाऱ्या विष्णूनें आपल्या मनांत महेश्वराचें ध्यान केलें. (५३) शरणागतांची पीडा परिहार करणारा, रुद्र, सोम, गणसहित ईश्वर, अशा शिवाचें ध्यान करीत सुंदर सुंदर गुहा ज्यामध्यें आहेत, व देव नेहमीं जेथें राहतात, अशा मंदर पर्वतावर विष्णु आला. (५४) नेहमीं ज्या अरण्यांत किन्नर राहतात, अनेक झरे जेथें वाहत आहेत, अनेक गणांनीं जेथें बागबगीचे केले आहेत, अनेक पक्षी जेथें शब्द करीत आहेत (५५) अनेकझाडें जेथें असून सुगंध वारा जेथें वाहतो,

ल्हादनं रम्यं पारिजातवनान्वितम् ॥५५॥ नानारत्नोचितं चित्रं हेम-प्राकारतोरणम् ॥ कैलाससदृशं रम्यं प्रासादैरपि शोभितम् ॥५६॥ एव माद्यैः सुरम्यैश्च बहुरथ्याविभूषितम् ॥ संप्राप्य मंदरं मंदो हेमकंदर-सुंदरम् ॥५७॥ नारायणस्तपस्तेपे जटी मुंडी च मेखली ॥ भस्मदिग्धोऽग्निहोत्रश्च शांतस्त्रिषवणाप्लुतः ॥५८॥ कृच्छ्रचांद्रायणाद्यैश्च शोष-यन् स्वकलेवरम् ॥ दिव्यं वर्षसहस्रं तु वायुभक्षस्तदाभवत् ॥५९॥ को-टिद्वयं तु वर्षाणां दिव्यानां मधुसूदनः ॥ तं दृष्ट्वा तादृशं नंदी शिव-स्यैवापरा तनुः ॥६०॥ शिरास्थिकस्नायुमज्जाशेषं शेषांगशायिनम् ॥ प्रतीहारो महादेवं कपिवक्त्रो महाद्युतिः ॥६१॥ अयोनिजस्तपस्वी च शालंकायनजः प्रभुः ॥६२॥

नंदिकेश्वर उवाच ॥ भगवन्नत्र वः स्थाने वनमाली सुरारिहा ॥ अ-

---

जेथें मन संतुष्ट होतें, रम्य अशा पारिजात वनांनीं सुशोभित दिसत आहे; (५६) अनेक तऱ्हेचीं रत्नें जेथें असून चित्रविचित्र सोन्याच्या प्राकारानीं व तोरणांनीं सुशोभित दिसत आहे, कैलासाप्रमाणें रम्य असून अनेक प्रासादांनीं सुशोभित दिसत आहे, (५७) वगैरे रम्य पदार्थांनीं युक्त असून पुष्कळ रथ्यांनीं (रस्ते) सुशोभित दिसत आहे, (५८) अशा पर्वतावर जटा धारण करून, कित्येक दिवस मुंडन करून, कित्येक दिवस मेखला धारण करून, सर्वांगाला भस्म लावून, अग्नीच्या ठिकाणीं होम करीत, शांतवृत्ति धारण करून सायंकाल, प्रातःकाल, माध्यान्हकाल तीन्हीवेळ सवनांमध्यें (यागामध्यें) तत्पर होऊन नारायणानें तप केलें. (५९) कित्येक दिवसपर्यंत कृच्छ्रचांद्रायणादि याग करून आपला देह त्यानें कृश करून देवमानानें हजार वर्षेपर्यंत वायुभक्षण करून तप केलें. (६०) याप्रमाणें देवमानानें दोन कोटि वर्षेपर्यंत मधुसूदनानें तप केलें. अशा त्या विष्णूला शिवाचें दुसरें शरीरच अशा नंदिकेश्वरानें पाहिलें. (६१) तपश्चर्या करून शिरा, अस्थि स्नायु, मज्जा असे पदार्थ मात्र त्याच्या शरीरांत राहिले होते, शेषावर स्वस्थपणें तो निजून राहिला होता; अशा विष्णूला कपिवक्त्र महातेजस्वी महादेवाचा प्रतीहारी नंदिकेश्वरानें पाहिलें. (६२) जो अयोनिज असून मोठा तपस्वी आहे, व ज्याला शालंकायनाचा मुलगा ह्मणत असून जो सर्वांचा प्रभु आहे. अशा नंदिकेश्वरानें श्रीशिवाला ह्मटले कीं,—

(६३) नंदिकेश्वर बोलले—भगवन् शिवा, तुमच्या या जागेंत वनमाली,

नककोटिवर्षाणि तपश्चरति दुश्चरम् ॥६३॥ ध्यायन् किमपि मनसि कृशोऽयमनिशं ततः ॥६४॥

अनिलाद उवाच ॥ नंदिनो वचनं श्रुत्वा प्रणयावनतं प्रभुः॥ आरुह्य वृषभं देवः ससोमः सगणेश्वरः ॥६५॥ ब्रह्मादिभिः स्तूयमानो वीक्ष्यमाणो मरुद्गणैः ॥ जगाम यत्र तत्रास्ते तपस्यभिरतोऽच्युतः ॥६६॥ गत्वाह पुण्डरीकाक्षं विरूपाक्षो हसन्निव ॥ वत्स विष्णो प्रसन्नोऽस्मि पश्य मां वरदं तव॥६७॥तव जानाम्यहं कृष्ण हृदिस्थं च समीहितम् ॥ तथापि ब्रूहि वैकुंठ पूर्वरूपो भवाधुना ॥६८॥

अनिलाद उवाच ॥ इति श्रुत्वा वचः शंभोः कृष्णस्तुष्टो गतज्वरः ॥ विलोक्य देवदेवेशं तुष्टाव विविधैः स्तवैः ॥६९॥ वेदवेदान्तसंभूतैर्भूतेशं भूतभावितम् ॥ प्रहर्षोद्गतरोमांचः साश्रुनेत्रः सगद्गदः ॥७०॥ प्रणम्य दण्डवद्भूमौ प्रोवाच वचनं हरिः ॥ भगवन्नसुराणां तु कुर्वता र-

---

दैत्यांचा शत्रु, विष्णु अनेक कोटि वर्षें भयंकर तप करीत आहे, (६४) मनांत कांहींतरी योजना करून आपण प्रसन्न व्हावें ह्मणून तप करून तो विष्णु अतिशय कृश झाला आहे.

(६५) अनिलाद बोलले—याप्रमाणें नंदिकेश्वराचें वचन ऐकून प्रणयानें नम्र झालेल्या अशा वृषभावर उमासहित आरोहण करून गणसहित श्रीशिव. (६६) ब्रह्मादिदेवांकडून स्तोत्र करून घेत, मरुद्गणांच्या दृष्टिपातानें युक्त होऊन (मद्गरुण शिवाकडे पाहत होते.) ज्या ठिकाणीं श्रीविष्णु तप करीत होता, त्या ठिकाणीं अवतरले (आले.) (६७) पुंडरीकाप्रमाणें नेत्र असलेल्या विष्णूजवळ जाऊन विरूपाक्ष हंसतहंसत बोलले कीं, हे वत्सा, विष्णो, मी तुला प्रसन्न झालों आहें, वर देण्याकरितां मी आलों आहें, इकडे माझ्याकडे पाहा. (६८) हे कृष्णा, तुझें अंतःकरण मी जाणतों. तथापि हे वैकुंठा, तुझ्या मनांत काय आहे? तें सांग.—

(६९) आनिलाद बोलले—याप्रमाणें श्रीशिवाचें वचन ऐकून श्रीकृष्णाच्या मनांतला संताप जाऊन तो संतुष्ट झाला. देवाधिदेव श्रीशिवाला पाहून अनेक स्तुतींनीं विष्णूनें शिवाचें स्तोत्र केलें. (७०) वेद व वेदांत यांतील वाक्यांनीं प्राण्यांना पवित्र करणाऱ्या शिवाची स्तुति केली. नंतर आनंदानें रोमांच आंगावर यावयास लागले आहेत, अश्रु नेत्रांतून गळावयास लागले आहेत, गद्गद स्वरानें युक्त होऊन. (७१) श्रीहरीनें जमिनीवर श्रीशिवाला साष्टांग नमस्कार घालून ह्मटलें

क्षणं प्रभो ॥७१॥ भृगुणा ब्रह्मपुत्रेण क्रोधाच्छप्तोऽस्मि मानद ॥ विष्णो त्वमपि गंताऽसि नरकान् दश दारुणान् ॥७२॥ एकदण्डत्रिदण्डाद्या ये च भक्ता प्रभौ मयि ॥ ते पाषंडीकृतास्तेन दर्शनादपि पापदाः ॥७३॥ शयनासनवस्त्रादिदानादप्यभिवादनात् ॥ तेषां महारौरवादि नरकं परिकीर्तितम् ॥७४॥रुषा ब्रह्मर्षिणा नाथ यावदाभूतसंप्लवम् ॥ एवं निर्भर्त्सितस्तेन भीतस्त्वां शरणं प्रभो ॥७५॥ गतोऽस्मि सर्वभावेन शापात्त्वं मां समुद्धर ॥७६॥

अनिलाद उवाच॥इति विज्ञापितं श्रुत्वा विष्णोः शापार्दितस्य तु ॥ सांत्वयन्नाह गोविंदं मूर्ध्न्याघ्राय स्पृशन्मुहुः ॥७७॥

ईश्वर उवाच ॥ अवश्यं हि मुनेस्तस्य भविता वचनं हरे ॥ आत्मनैव कृतां सृष्टिं नात्मना नाशयाम्यहम् ॥७८॥ किं तु मे समयं कृष्ण श्रुणु नास्त्यत्र वान्यथा ॥ यो विष्णुमायानिर्मूढो मद्भक्तं द्वेष्टि दुर्मतिः ॥७९॥ ये च तं पालयिष्यंति त्वद्भक्तास्तेऽपि कल्मषाः ॥ ये चाप्युपह-

---

कीं, हे भगवन् प्रभो, दैत्यांचें रक्षण करणाऱ्या. (७२) ब्रह्मपुत्र भृगुमुनीनें रागावून मला शाप दिला. तो असा कीं हे विष्णो, दाहा वेळ तूं भयंकर नरकांत जाशील. (७३) आणि दुसरा शाप असा कीं हे विष्णो एकदंडी त्रिदंडी जे तुझे भक्त असतील, ते सर्व पाषंडी होतील, व त्यांचें दर्शन कोण घेतील, ते देखील नरकांत जातील. (७४) व त्यांना शयन, आसन, वस्त्र, वगैरेचीं दानें त्यांना नमस्कार कोण करतील, त्यां सर्व लोकांना महारौरव वगैरे नरक होतील. (७५) याप्रमाणें प्रलयकाल पर्यंत तुझी स्थिति होईल, असा त्या ब्रह्मर्षीचा शाप ऐकून हे प्रभो, भिऊन तुला मी शरण आलों. (७६) सर्वतोपरी तुला मीं शरण आलों. आहे, त्या शापापासून माझा उद्धार कर.

(७७) अनिलाद बोलले—शापानें पीडित झालेल्या त्याविष्णूची विनंति ऐकून त्याचें समाधान करून त्याचें मस्तक वारंवार हुंगून विष्णूला शिवानें म्हटलें की,—

(७८) शिव बोलले—हे विष्णो, त्यामुनीचें वाक्य खोटें होणार नाहीं. त्याप्रमाणें अवश्य होणारच. कारण आपण केलेल्या सृष्टीचा नाश मीच होऊन करूं शकत नाहीं. (७९) परंतु हे कृष्णा, माझा एक समय (करार) ऐक. यांत अन्यथा होणार नाहीं. जो दुष्ट प्राणी विष्णूच्या (तुझ्या) मायेनें मोहित होऊन माझ्या भक्ताचा द्वेष करतो, (८०) अशा दुष्ट तुझ्या भक्ताचें पालन जे लोक करतात, ते देखील पातकी आहेत, यांत संशय नाहीं. हे जनार्दना माझ्या भक्तांचा उप-

सिष्यन्ति पाषंडास्ते जनार्दन ॥८०॥ संभाषणादपि हरे तेषां दोषो महान्नृणाम् ॥ ममाश्रमरतांश्च्छांतान्ये द्विषन्ति नराधमाः ॥८१॥ ब्रह्मचारिगृहस्थांश्च वानप्रस्थान्यतींस्तथा ॥ चतुराश्रमधर्मस्थान् जितद्वंद्वान् क्रियापरान् ॥८२॥ पाषंडास्ते सुरश्रेष्ठ भविष्यंति न संशयः ॥ त्वदाश्रमस्था ये मोहाद्दूषयन्त्यल्पबुद्धयः ॥८३॥ मदाश्रमांस्ते नरकं यान्ति यत्र न निष्कृतिः ॥ पूजयिष्यंति ये केचिन्मदाश्रमसमाश्रितान् ॥८४॥ स्वागतासनदानेन पाद्यार्घ्याद्यभिवादनैः ॥ स्नानभोजनदानाद्यैस्तेषां मुक्तिः करे स्थिता ॥८५॥ तेषां वै दर्शनादेव ब्रह्महत्या विशुध्यति ॥ मदाश्रमस्थान्यो द्वेष्टि स च मां द्वेष्टि माधव ॥८६॥ मदाश्रम रतांस्तौति यस्स मां स्तौत्यकल्मषः ॥ ये चान्यथा करिष्यंति त्वन्मायामूढबुद्धयः ॥८७॥ तेषां नाहं न च भवान् ब्रह्मेन्द्रार्कादिदेवताः ॥ समर्थाः स्युः परित्राणे पततां नरकार्णवे ॥८८॥ पापानामतिदुष्टानामल्प-

---

हास जे लोक करतील, ते पाषंडी होतील यांत संशय नाहीं. (८१) तशा लोकांबरोबर जे भाषण करतील, ते देखील दोषी होतील. जे नीच लोक माझ्या आश्रमांत रत झालेल्या शांत लोकांबरोबर द्वेष करतील, (८२) ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य वानप्रस्थ, संन्यास यां चार आश्रमांमध्यें राहून शीतोष्ण वगैरे द्वंद्व जिंकलेले, सत्कर्मांमध्यें असक्त झालेले, अशा लोकांबरोबर द्वेष करतील, (८३) ते देखील हे देवश्रेष्ठा, पाषंडी होतील; यांत संशय नाहीं. तुझ्या आश्रमांत राहून मंदमति लोक मोहानें माझ्या आश्रमांतल्या लोकांचें दूषण करतील तर (८४) ते नरकाला जातील, त्यांना प्रायश्चित्तच नाहीं. जे कांहीं लोक माझ्या आश्रमांत राहिलेल्या लोकांची पूजा करतील, (८५) स्वागत, आसन, दान, पाद्य, अर्घ्य, अभिवादन, स्नान, भोजन, दान वगैरेंनीं सत्कार करतील, त्यां लोकांना मुक्ति हातांत असल्या प्रमाणें समजावें. (८६) तशा लोकांच्या दर्शनानें ब्रह्महत्या देखील शुद्ध होते (ब्रह्महत्या पातकापासून मनुष्य मुक्त होतो.) हे माधवा, माझ्या आश्रमांत राहिलेल्या लोकांबरोबर जे द्वेष करतात, ते माझ्या बरोबर द्वेष करतात असें मी समजतों. (८७) माझ्या आश्रमांत राहिलेल्या लोकांचें स्तोत्र जे करतात, ते माझें स्तोत्र करतात, असें मी समजतों. तुझ्या मायेनें मूढ होऊन जे यांत अन्यथा (विपरीत) करतील, (८८) त्या लोकांचा पक्षपाती मी होत नाहीं, तूं ब्रह्मा, इंद्र सूर्य वगैरे देव होत नाहींत. फार काय? यांपैकीं कोणीही नरकांत पडणाऱ्या त्यां लोकांचें संरक्षण करावयास समर्थ होत नाहींत. (८९) पापी, अति-

ज्ञानां कुकर्मणाम् ॥ दशोक्ता ये च नरकास्तामसा मुनिना तव ॥८९॥ मत्स्यकूर्मादिदेहैस्तु दशभिर्भुंक्ष्व किल्बिषान् ॥ मत्प्रसादं समासाद्य शनैर्मुक्तिर्भविष्यति ॥९०॥ मम भक्तेन भृगुणा कल्पितं शापमन्यथा ॥ कर्तुं न चोत्सहे विष्णो मद्भक्तो हि ममाधिकः ॥९१॥ तत्तत्कायसमाप्तौ तु मत्स्यादीनां जनार्दन ॥ अचिरात्संहरिष्यामि भवंतं हीनयोनितः ॥९२॥ अवतारा हि लोकानां भवतो रक्षणाय वै ॥ कर्मणोऽस्मात्कियत्कालं भोगान्स्वस्थो भवाच्युत ॥९३॥ मदेकनिष्ठो निष्ठात्मा मदाश्रमरतोत्सुकः ॥ सदोंनमः शिवायेति पठ मद्भक्तिमाश्रितः ॥९४॥

विष्णुरुवाच॥ व्यपेतदुःखो मुक्तोऽस्मि प्रसादात्तव शंकर॥ किं त्वेतत्समयं प्रष्टुमिच्छाम्येकं वदस्व मे ॥९५॥ चत्वार आश्रमाः प्रोक्ता यत्त्वया त्रिपुरान्तक ॥ किं तेषां लक्षणं देव कैश्चिन्हैश्चिन्हिता नराः॥९६॥ मद्भक्तैरवगंतव्यास्तन्नो वद सुरेश्वर ॥ त्वं हि मे परमो नाथस्त्वं हि मे परमो गुरुः ॥९७॥

---

दुष्ट, अल्पज्ञ, कुकर्मी अशा लोकांना व तुला त्या मुनीनें जे दहा नरक सांगितले, (९०) त्या मत्स्य, कूर्म वगैरे दहा शरीरांमध्यें जाऊन किल्बिषांचा उपभोग घे. नंतर माझ्या प्रसादानें हळुहळु तूं मुक्त होशील. (९१) माझ्या भक्त भृगूनें जों शाप दिला, तो व्यर्थ होणार नाहीं; व मीही तो शाप खोटा करूं शकत नाहीं. कारण मला सर्व वस्तूंपेक्षां भक्त ही वस्तु अतिशय प्रिय आहे, व माझ्यापेक्षां भक्तच अधिक आहे. (९२) हे जनार्दना, तें तें मत्स्यादि शरीर सोडतेवेळेस त्या हीन योनींपासून लौकरच मी सोडविणार आहें. (संहार करणार आहे.) (९३) तुझे ते अवतार लोकांच्या रक्षणाकरितां होतील. याकरितां कर्माचा क्षय होईपर्यंत स्वस्थपणें भोगांचा उपभोग घे. (९४) तेव्हां माझ्या एकट्यावर चांगली निष्ठा ठेव, माझ्या ध्यानांत आसक्त हो. माझ्या आश्रमांत रत होऊन उमेदीनें राहा. सर्वदा "ॐ नमः शिवाय" या मंत्राचा जप भक्तिपूर्वक कर.

(९५) विष्णु बोलला–हे शंकरा, माझें दुःख गेलें, तुझ्या प्रसादानें मी मुक्त झालों. आतां तुझा समय कोणता आहे, तो मला सांग. (९६) हे त्रिपुरमर्दना, चार आश्रम जे तूं सांगितले, त्यांचीं लक्षणें काय आहेत, व त्यांचीं चिन्हें काय आहेत हें सांग. (९७) कारण माझ्या भक्तांना तें समजावयाला पाहिजे आहे. याकरितां हे सुरेश्वरा, मला सांग. तूंच आमचा नाथ आहेस, तूंच आमचा परमगुरु आहेस.

ईश्वर उवाच ॥ ब्रह्मचारी गृहस्थस्तु वानप्रस्थो यतिस्तथा ॥ चत्वार आश्रमा ह्येते पृथगाचारलक्षणाः ॥९८॥ येषां चतुर्णां चत्वारो मुनयोऽप्यवतारकाः ॥ एतेषामपि नामानि वासुदेवावधारय ॥९९॥ दधीचिर्गौतमोऽगस्त्यो दूर्वासाश्च यथाक्रमम् ॥ ब्रह्मचर्याश्रमस्थोऽभूद्दधीचश्च्यवनात्मजः ॥१००॥ ग्रहस्थाश्रमनिर्माता गौतमो मुनिपुंगवः ॥ अगस्त्योऽपि च ब्रह्मर्षिर्वानप्रस्थप्रवर्तकः ॥१०१॥ दूर्वाससापि यतिनामाश्रमो निर्मितो महान् ॥ नात्राश्रमकृतः कश्चिदुत्कर्षो विद्यते नृणाम् ॥१०२॥ परां दीक्षां विना शैवीं बंधयंत्रविमोचनीम् ॥ यत्र कुत्राश्रमे तिष्ठन् दीक्षया तु विमुच्यते ॥१०३॥ तस्मान्मुक्तिर्दीक्षयैव नाश्रमैर्नान्यकर्मभिः ॥ अथ किं बहुनोक्तेन पुनरुक्तेन केशव ॥१०४॥ संक्षेपाच्छृणु मद्वाक्यं भवाब्ध्युत्तरणप्लवम् ॥ प्रमादाद्यदि वा मोहात्सुषुप्तो वाथ दुर्मतिः ॥१०५॥ यः शिवेति स्मरेत्कश्चित्तं मां विद्धि गुरुं यथा ॥ सतु मान्यश्च पूज्यश्च सर्वावस्थांगतोऽपि वा ॥१०६॥ य ॐ नमः शि-

---

(९८) श्रीशिव बोललें—ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ संन्यास हे चार आश्रम निरनिराळे असून प्रत्येकास आचार आणि प्रत्येकाचीं लक्षणें निरनिराळीं आहेत. (९९) या चार आश्रमांचे उत्पादक चौघे मुनि आहेत, यांचीं नांवें सांगतों. तीं चांगली लक्ष्यांत ठेव. (१००)दधीचि, गौतम, अगस्त्य, दूर्वासा अनुक्रमानें चार आश्रमांचे उत्पादक होत. च्यवनऋषीचा मुलगा दधीचीनें ब्रह्मचर्यव्रत चांगलें पाळिलें. (१०१) गृहस्थाश्रमाचें निर्माण करणारा गौतममुनि होय. वानप्रस्थाश्रमाचा उत्पादक ब्रह्मर्षि अगस्त्य होय. (१०२) दूर्वासमुनीनें चौथा आश्रम प्रचारांत आणला. परंतु केवळ आश्रमानेंच कोणत्याही मानवांचा उत्कर्ष होणार नाहीं. (१०३) बंधपाशाला सोडविणाऱ्या शैवी दीक्षेशिवाय उत्कर्ष होऊं शकत नाहीं. कोणत्याही आश्रमांत मनुष्य राहिला तरी तो दीक्षेच्या योगानेंच मुक्त होतो. (१०४) याकरितां दीक्षेनेंच मुक्ति होते, इतर आश्रमांनीं व इतर कर्मांनीं प्राणी मुक्त होत नाहीं. हे केशवा, पुनरुक्तीनें किंवा फार बोलण्यानें काय होणार आहे? (१०५) संसारसमुद्र तरण्याचा उपाय एकच आहे, तो संक्षेपानें सांगतों ऐक. प्रमादानें, मोहानें, गाढ झोपेंत जो मंदमति (१०६) शिवनामाचें स्मरण करतो, तो गुरुप्रमाणें आहे, असें मान. तो कोणत्याही अवस्थेंत असो, परंतु तो पूज्य असून मान्य आहे. (१०७) "ॐ नमःशिवाय" या मंत्राचें कीर्तन जो प्राणी

वायेति प्रमादादपि कीर्तयेत् ॥ शिव शंभो महादेव हर सर्वज्ञ शंकर ॥१०७॥ वामदेवेश श्रीकंठ नीलकण्ठेति यः स्मरेत् ॥ तं त्वं मामिव मन्येथा मन्नियोगादधोक्षज ॥१०८॥ एतेनाहं परां तृप्तिं गच्छामि किमतः परम् ॥१०९॥

अनिलाद उवाच ॥ एवमाज्ञाप्य श्रीवत्सलक्षणं वृषलक्षणः ॥ सर्वदेवैः परिवृतः सभार्यो गणपैर्वृतः ॥११०॥ मूर्ध्न्याघ्राय हृषीकेशं समाश्वास्य पुनः पुनः ॥ अन्तर्धानं जगामाशु महादेवो जगन्मयः ॥१११॥ विज्ञायान्तर्हितं देवं वृषांकं सगणांबिकम् ॥ सत्वरस्तार्क्ष्यमारुह्य श्वेतद्वीपं ययौ हरिः ॥११२॥ हृष्टेन मनसाऽत्यर्थं द्रष्टुं स्वपुरमुत्तमम् ॥ क्षीरोदोत्तरकूलस्थं कृष्णवानीरसंकुलम् ॥११३॥ वैष्णवैर्विविधैर्भव्यैर्वरस्त्रीकोटिसंकुलम् ॥ अनेकशतसंवाधं प्रासादैश्चंद्रवर्चसैः ॥११४॥ राजतैः स्वर्णजैश्चापि बहुभिर्भूषितं शुभैः ॥ कल्पपादपसंकीर्णं पारिजातोपशोभितम् ॥११५॥ एवमादिभिरन्यैश्च मनसः प्रीतिवर्धनम् ॥ म-

---

करतो, व शिवा, शंभो, महादेवा हरा, सर्वज्ञा, शंकरा, (१०८) वामदेवा, ईशा, श्रीकंठा, नीलकंठा, अशीं नांवें जो घेतो, तो प्राणी मीच आहें, असें माझ्या आज्ञेनें तूं मान. (१०९) इतक्यानेंच मी तृप्त होतों यावर जास्त मी काय सांगूं?

(११०) अनिलाद बोलले– श्रीशिवानें याप्रमाणें विष्णूला आज्ञा केली. नंतर सर्व देवांनीं युक्त होऊन भार्येसहवर्तमान, गणांसहित (१११) श्रीविष्णूचें मस्तक वारंवार हुंगून पुनः पुनः सांत्वन करून जगन्मय महादेव अंतर्धान पावले. (११२) गणसहित अंबिकासहित शिव अंतर्धान पावले, हें पाहून श्रीविष्णु लौकरच गरुडारूढ होऊन श्वेतद्वीपाला आला. (११३) अत्यंत आनंदयुक्तमनानें आपलें उत्तम शहर पहावयास विष्णु गेला. तें शहर क्षीरसमुद्राच्या उत्तर कांठाला असून त्या शहरा सभोंवतीं वेत फार लागले होते (११४) अनेक तऱ्हेचे भव्य वैष्णव तेथें असून श्रेष्ठ श्रेष्ठ उत्तम उत्तम कोट्यावधि स्त्रियांनीं सुशोभित दिसत होतें. चंद्राप्रमाणें शुभ्र व स्वच्छ अनेक शेंकडो प्रासादांनीं तें शहर गजबजून गेलें होतें. (११५) त्यांत चांदीचे, सोन्याचे, अशा पुष्कळ शुभकर प्रासादांनीं सुशोभित दिसत होतें व त्या शहरांत अनेक कल्पवृक्ष असून परिजाताचीं झाडें अनेक होतीं. (११६) वगैरे पदार्थांनीं मनाला आनंद देणाऱ्या त्या शहरांत तेजस्वी गरुडाच्या

हता पक्षवातेन सुपर्णस्य महौजसः ॥११६॥ विध्वस्ततारकाव्रातैरु-ड्डीनैर्वृक्षपर्वतैः ॥ समुद्रैरुल्लसद्भिश्च महाप्रलयसन्निभैः ॥११७॥ विज्ञापितो भीतभीतैस्त्रिलोकस्थैश्चराचरैः ॥ क्षणेन तत्पुरं प्राप्य शीघ्रत्वात्स गरुत्मतः ॥११८॥ विष्णुः स्वभवनं रम्यं प्रविवेश सुरैः स्तुतः ॥ स्थानं स्वं चाशु गच्छद्भिर्बहुभिस्तन्निवासिभिः ॥११९॥ अथोपविष्टो भगवांश्चारुसिंहासने शुभे ॥ तत्कालोचितसत्कारैर्मधुपर्कादिभिः परैः ॥१२०॥ सर्वैः संपूजितस्तस्थे पृष्टश्चानामयं मुदा ॥ सर्वांस्तान्कुशलं पृष्ट्वा यथार्हं हर्षवर्द्धनम् ॥१२१॥ कथाश्च विविधाश्चित्राः कथयित्वा चिरं पुनः ॥ कथयामास सर्वेषां यदुक्तं परमेष्ठिना ॥१२२॥

विष्णुरुवाच ॥ अहमिंद्रकृते पूर्वं भृगोराश्रमसेविनः॥असुरान् हन्तु कामो वै सर्वामरनिबर्हणान् ॥१२३॥ गतोऽथ रक्षितान् दृष्ट्वा भृगुपत्न्यादितेः सुतान् ॥ अहं तां चक्रमादाय यावत्संहृतवांस्तदा ॥१२४॥ तावच्छप्तोऽस्मि भृगुणा पतिना पवनादिना ॥ त्रिदण्डाश्चैकदण्डाश्च

---

पंखाच्या मोठ्या वाऱ्यानें (११७) तारा गळून पडूं लागल्या, पक्षी कांपावयास लागले, झाडें पर्वत तुटून पडूं लागले. महाप्रलयाप्रमाणें समुद्र सर्व खवळूं लागले (११८) मग चराचर त्रिलोकस्थ प्राण्यांनीं भीतीनें विष्णूची प्रार्थना केली, अशा थाटानें गरुडाच्या वेगानें आपल्या नगराला एका क्षणांत येऊन (११९) देवाकडून स्तोत्र करून घेत रम्य अशा आपल्या मंदिरांत श्रीविष्णूनें प्रवेश केला. तेथें वास करणाऱ्या येणाऱ्या जाणाऱ्या पुष्कळ लोकांकडून सत्कार घेत आपल्या स्थानावर (१२०) वि णु बसला. तेथें श्रेष्ठ सुंदर शुभ सिंहासनावर बसून त्या कालाला उचित मधुपर्क वगैरे सत्कारांनीं सत्कृत होऊन (१२१) सर्वांकडून पूजा घेऊन बसल्यावेळेस सर्वांनीं विष्णूला आरोग्यकर कुशल प्रश्न केले. सर्वांना त्यांच्या त्यांच्या योग्यतानुसार आपण कुशलप्रश्न करून मोठ्या आनंदानें (१२२) पुष्कळ कालपर्यंत चित्रविचित्र गोष्टी करून श्रीविष्णूनें श्रीशिवानें सांगितलेलें सर्व वाक्य त्यासमाजांत सांगितलें.

(१२३) विष्णु बोलला– जनहो, मी पूर्वी इंद्राकरितां आश्रमवासी भृगुमुनीच्या आश्रमाला देवांचा नाश करणाऱ्या असुरांना मारण्याकरितां गेलों होतों. (१२४) तेथें भृगुमुनीच्या पत्नीनें दैत्यांना संरक्षण करण्याविषयीं वचन दिलें होतें. ह्मणून मी हातांत चक्र घेऊन तिला जेव्हां मारून टाकिलें. (१२५) तेव्हां वायु भक्षण करून तप करणाऱ्या प्रभु भृगुमुनीनें मला शाप दिला तो असा कीं,

मद्भक्ता ये च केचन ॥१२५॥ अहं दशावतारांश्च तिर्यग्योनिषु गर्विं-तान् ॥ गतोऽहं तस्य शापेन महता परिपीडितः ॥१२६॥ आयुषो वि-द्यमानत्वाद्दैवाज्जीवफलान्वितः ॥ गत्वा च मंदरगिरिं गिरिशं शरणं गतः ॥१२७॥ दृष्टो मया महादेवः सर्वदेवमयःशिवः ॥ ततो मां तप-सा खिन्नं दृष्ट्वा सर्वेश्वरः प्रभुः ॥१२८॥ दत्वा वरं वरेण्योऽसौ समयं चेदमब्रवीत् ॥ ये द्विषंति शिवसद्भक्तान् ब्रह्मचारिग्रहाश्रमान् ॥१२९॥ वानप्रस्थान्यतीन्मूढाः पाषंडास्ते न चापरे ॥ भस्मदिग्धान् यतीन्मो-हाद्ये निंदन्ति मनागपि ॥१३०॥ अधोमुखोर्ध्वपादास्ते यास्यंति नर-कार्णवम् ॥ ये भक्ता ब्रह्मविष्ण्वेंद्रसुरादिषु च सर्वदा ॥१३१॥ नार-कास्ते भविष्यंति द्विषन्तो भस्मलिंगिनः ॥ एवं बहुविधं देवः समा-ज्ञाप्य प्रभुर्मम ॥१३२॥ क्षणादन्तर्दधे सर्वैर्वृतो देवर्षिकिन्नरैः ॥ प्रभुम-न्तर्हितं ज्ञात्वा सोऽह मप्यागतोऽधुना ॥१३३॥ आज्ञापयामि भवतः सर्वानन्यांश्च सर्वदा॥अद्यप्रभृति ये केचिन्मद्भक्ता यत्र कुत्रचित्॥१३४॥ स्थितान्निंदन्ति भस्मांकान्नरकं यांति ते महत् ॥ भस्मरुद्राक्षकौपीन-

---

जे कोणी एकदंडी त्रिदंडी माझे भक्त असतील, ते पाषंडी होतील. (१२६) मी त्याच्या मोठ्या शापानें पीडित होऊन गर्विष्ठ तिर्यग्योनींत दहा अवतार घेऊन जाणार आहें. (१२७) तितक्यांत थोडें आयुष्य माझें राहिल्यामुळें जीव घेऊन मी मंदरपर्वतावर जाऊन तेथें साक्षात श्रीशिवाला शरण गेलों. (१२८) तेथें सर्व-देवमय महादेव शिवाला मीं पाहिलें. नंतर तपश्चर्येनें खिन्न झालेल्या मला त्या सर्वेश्वरानें पाहून (१२९) वर दिले; व श्रेष्ठ देवानें आपला करार मला असा सांगितला कीं, हे विष्णो, ब्रह्मचर्यादि आश्रमामध्यें राहणाऱ्या माझ्या भक्तांवरो-बर जे द्वेष करतील, (१३०) व वानप्रस्थ संन्यास यां आश्रमांमध्यें राहणाऱ्या माझ्या भक्तांवरोबर द्वेष करतील ते सर्व पाषंडी होतील. भस्मचर्चन केलेल्या य-तीची निंदा मोहानें जे करतील, (१३१) ते सर्व लोक अधोमुख ऊर्ध्वपाद (खालीं तोंड वर पाय) करून नरकाला जातील. जे ब्रह्मा, विष्णु, इंद्र, इतर देव यांचे भक्त होतील, ते सर्व (१३२) भस्मधारी प्राण्यांचे द्वेष करतील तर नरकांत जा-तील. वगैरे करार देवानें मला सांगितलें. (१३३) मग एकाक्षणांत तो शिव देव ऋषि किन्नर यांसह गुप्त झाला. नंतर गुप्त झालेल्या प्रभूला पाहून मीही इकडे आलों. (१३४) याकरितां तुह्मां सर्वांना व इतरांना सर्वदा माझी आज्ञा अशी आहे कीं, कोठेंतरी माझे भक्त असोत, परंतु आजपासून (१३५) भस्म चर्चित

जटावल्कललक्षणैः ॥१३५॥ लक्षिता यतयः शैवाः शेषा ये नामधारकाः ॥ ये चान्यदेवता भक्ता दूषयन्ति शिवाश्रितान् ॥१३६॥ गृहस्थं लिंगिनं वापि महानारकिणस्तु ते ॥ अद्य प्रभृति शृण्वन्तु भवन्तो मम घोषणम् ॥१३७॥ सुवृत्तो दुर्विनीतो वा शिवभक्तः प्रभुर्मम ॥ शिवाश्रितान्ये निंदन्ति मद्भक्तास्तेऽरयो मम ॥१३८॥ जपहोमादिकं तेषां तत्सर्वं भस्मसाद्भवेत् ॥ येऽर्चयन्ति शिवे भक्तान् वाङ्मात्रेणापि मत्पराः ॥१३९॥ मत्प्रसादाद्गमिष्यन्ति ते हि स्थानमनुत्तमम् ॥ तस्माद्भवंतो यत्नेन मद्वाक्याद्देवतुष्टये ॥१४०॥ स्वागतासनदानाद्यैः शिवभक्तान्भजन्त्वलम् ॥ एकादशानां रुद्राणां प्रीत्यर्थं च मया सह ॥१४१॥ नित्यं पक्षद्वये भक्त्या कुर्वन्त्वेकादशीव्रतम् ॥ एवमाचरतां सम्यगन्येषां भवतां तथा ॥१४२॥ हस्तस्थितौ स्वर्गमोक्षावन्यथा नरकं परम् ॥१४३॥

अनिलाद उवाच ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा विष्णोर्विष्णुपरायणाः ॥

---

शिवभक्तांची निंदा करतील तर ते नरकाला जातील. भस्म, रुद्राक्ष, कौपीन, जटा, वल्कल इत्यादि लक्षणांनीं (१३६) युक्त यति शैव असतील किंवा नुसते नामधारी असतील त्या शिवाश्रित लोकांचें दूषण माझे किंवा इतर देवांचे भक्त करतील तर नरकांत जातील. (१३७) लिंग धारण केलेल्या गृहस्थाचें दूषण कोण करतील तेही मोठ्या नरकाला जातील. आजपासून माझी दवंडी सर्व तुह्मी ऐका. (१३८) सदाचारी असो, दुराचारी असो, तो शिवभक्त असेल तर तो माझा गुरु आहे. माझे भक्त जर आहेत, तथापि ते शिवभक्तांची निंदा करतील तर माझे शत्रु आहेत, असें मी समजेन. (१३९) शिवाय त्यांचे जप, होम, इतर सत्कृत्यें सर्व राखरांगोळी होतील. मत्पर होऊन नुसत्या वाणीनेंही शिवभक्तांची पूजा जे करतात, (१४०) ते लोक माझ्या अनुग्रहानें उत्तम स्थानाला जातात. याकरितां माझ्या आज्ञेनें प्रयत्नपूर्वक देवाच्या संतोषा करितां (१४१) स्वागत, आसन, दान, वगैरे सत्कारांनीं शिवभक्तांची सेवा करा. एकादशरुद्रांप्रीत्यर्थ व माझ्या संतोषा करितां मी सांगितल्याप्रमाणें करा. (१४२) निरंतर दोनी पंधरवाड्याला भक्तीनें एकादशी व्रत करा. याप्रमाणें चांगलें आचरण करणाऱ्या तुह्मांला व इतरांना (१४३) हातांत स्वर्ग मोक्ष असल्याप्रमाणें होईल, नाहींतर नरकवास भोगावा लागेल.

(१४४) अनिलाद बोलले—त्या विष्णूचें वाक्य ऐकून विष्णुभक्त सर्व नेहमीं-

उपासांचक्रिरे सर्वांश्चिच्छवभक्तान्सदैव तु ॥१४४॥ एकादशानां रुद्राणां प्रीत्यर्थं गरुडध्वजः ॥ पक्षद्वयेऽपि सततं करोत्येकादशीव्रतम् ॥१४५॥ स्नानोपवासनियमपूजाहोमादितर्पणैः ॥ आराधयन्महादेवमेकादश्यां हरिस्सदा ॥१४६॥ अन्यथापि सुरारिघ्नो गच्छंस्तिष्ठंस्स्वपन् हसन् ॥ सर्वदा मैथुनासक्तः शिवमेवान्वचिंतयन् ॥१४७॥ तस्य तं तादृशं भावं दृष्ट्वा त्रैलोक्यवासिनः ॥ शिवे च शिवभक्ते च सर्वे स्थावरजंगमाः ॥१४८॥ विस्मयं परमं गत्वा शंकरं शरणं ययुः ॥ संमानयन्तः सततं शिवभक्तान्यथोचितम् ॥१४९॥

अनिलाद उवाच ॥ इति ते घोरसंसारसागरोत्तारणक्षमः ॥ कथितः शिवभक्तस्य शिवज्ञानमहोदयः ॥१५०॥ एतत्सर्वं परिज्ञाय सर्वमन्यत्परित्यज ॥ शिवोक्तां प्राप्य वै दीक्षां चतुराश्रमपालकः ॥१५१॥ तपःस्वाध्यायनिरतो जपपूजाग्नितत्परः॥शिवलीनमनाः पश्चादन्ते मोक्षं गमिष्यसि ॥१५२॥ मदाज्ञया तवान्ये च शिष्या बोधाय भाविताः ॥ यथायोग्यतया ब्रह्मन् तत्तत्संतानवृद्धये ॥१५३॥ वृत्तम् ॥ अन्याश्रमा-

---

सर्व शिवभक्तांची उपासना करूं लागले. (१४५) एकादशरुद्रांप्रीत्यर्थ दोन्ही पंधरवड्यांतल्या एकादशी दिवशीं गरुडध्वज विष्णु एकादशीव्रत करूं लागला. (१४६) स्नान, उपवास, नियम, पूजा, होम, तर्पण यांनीं एकादशीच्या दिवशीं श्रीहरि महादेवाची आराधना करून राहिला. (१४७) नाहीं तरी तो विष्णु जातां, उठतां, बसतां, झोपेंत, स्वप्नांत, हसतां, सुरतांत शिवाचेंच चिंतन करूं लागला. (१४८) त्रैलोक्यवासी लोक त्या विष्णूचा असा भाव पाहून शिवाच्या ठिकाणीं व शिवभक्तांच्या ठिकाणीं सर्व स्थावरजंगम प्राणी आसक्त होऊन राहिले. (१४९) व अत्याश्चर्य पावून श्रीशिवालाच शरण आले. तेव्हां योग्यतानुसार शिवभक्तांचा सन्मान नेहमीं करूं लागले.

(१५०) अनिलाद बोलले—घोर संसारसमुद्रांतून तरून जावयाचा उपाय याप्रमाणें सांगितला. या योगानें शिवभक्तांला शिवज्ञानाचा उदय चांगल्या तऱ्हेनें होतो. (१५१) हें सर्व जाणून दुसरे सर्व सोडून दे. शिवोक्त शिवदीक्षा घेऊन चारी आश्रमांचें पालन करून (१५२) तपःस्वाध्यायांत आसक्त होऊन जपपूजेंत व अग्निकार्यांत निष्णात होऊन शिवाच्या ठिकाणीं मन तल्लीन करून शेवटीं मोक्षाला जाशील. (१५३) माझ्या आज्ञेनें तुझ्या शिष्यांना चांगला बोध करून योग्यतानुसार त्यांच्या वंशाच्या वाढीविषयीं यत्न कर. (१५४) अल्पफल देणाऱ्या

नल्पफलप्रदांस्त्वं विहाय सर्वान् तृणवन्मुनीन्द्र ॥ शिवाश्रमं सर्वगुणोपपन्नं मुक्तिप्रदं सद्विषयं भजेथाः ॥१५४॥ नान्याश्रमेष्वस्ति विशिष्टमुक्तिः शैवेऽस्ति मुक्तिः परमा परेषाम् ॥ मूढात्मनां मुक्ततया मतानां सन्यासयोगादिसमाश्रितानाम् ॥१५५॥ येऽन्येषु शास्त्रेषु वहुष्वतीव वांच्छंति मोक्षं परिमूढचित्ताः ॥ ते शीतभीता इव वानराः स्युः खद्योतपुंजेष्वनलेष्टचेष्टाः ॥१५६॥ एतन्मयोक्तं परमार्थसारं पुरोदितं शूलधरेण देव्यै ॥ भक्त्या त्वमप्यद्भुतचेष्टितस्य शिवस्य धर्मं प्रथितं कुरुष्व ॥१५७॥ इदं महापापहरं पवित्रं धन्यं यशस्यं चरितं रहस्यम्॥ पठेत्सदा यः शृणुयादथो वा विधूतपापः शिवलोकमेति ॥१५८॥ पुत्रेण पौत्रेण च भार्यया च गोभूहिरण्यांवरवाजिनागैः ॥ युक्तो विरागोऽत्र जगत्यसौ स्याल्लिखेदिदं लेखयिता च यो वा ॥१५९॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवभक्तप्रशंसायां विष्णुशापनिरूपणं नाम षट्सप्ततितमोऽध्यायः ॥

---

अन्य आश्रमांला सोडून सर्व पदार्थाला तृणा प्रमाणें मानून सर्व गुणसंपन्न मुक्ति देणाऱ्या श्रीशिवाश्रमाची सेवा कर. (१५५) इतर आश्रमांपासून मुक्ति मिळत नाहीं. इतरांना शैवाश्रमांत राहिलें तर श्रेष्ठ मुक्ति मिळते. जे मूर्ख असतील, मुक्त झालों असें मानणारे जे असतील संन्यासयोगांचा वगैरे आश्रय करणारे जे असतील, त्या सर्वांना शैवाश्रमापासूनच मुक्ति मिळते. (१५६) जे लोक इतर पुष्कळ शास्त्रांपासून मूर्खपणामुळें मोक्षाची इच्छा करतील, ते थंडीनें भ्यालेल्या माकडाप्रमाणें किंवा काजव्याला अग्नि मानणारे आहेत, असें समजावें. (१५७) पूर्वी साक्षात शिवानें पार्वतीस जें सांगितलें तें परमार्थसार मीं सांगितलें. अत्याश्चर्यकरचेष्टा असणाऱ्या शिवाचे हे धर्म भक्तीनें जगांत प्रसिद्ध कर. (१५८) हे मोठमोठ्या पातकांचा संहार करणारे असून पवित्र आहे, धन्य आहे, कीर्तिकर आहे, असें हें गुप्त चरित सर्वदा जो पाठ करतो व ऐकतो, तो निष्पाप होऊन शिवलोकाला जातो. (१५९) हें चरित्र जो लिहितो, व दुसऱ्याकडून लिहवितो, तो प्राणी पुत्रपौत्रांनीं युक्त होतो. अनुकूलभार्या त्याला मिळते, गायी, जमिनी, सोनें, वस्त्रें, घोडे, हत्ती यांनीं युक्त होऊन या जगांत सुखोपभोग घेतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील शिवभक्तप्रशंसेंतील विष्णुशापनिरूपण नांवाचा ७६ वा अध्याय संपला.

## अथ सप्तसप्ततितमोऽध्यायः

श्रीशिवाय नमः ॥ ग्रंथान्तरे ॥ ईश्वर उवाच ॥ मद्भक्तानां च माहात्म्यं को वा जानाति तत्त्वतः ॥ जानेऽहं त्वं च जानासि नंदी जानाति वा गुह ॥१॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः स्त्री शूद्रश्चांत्यजोऽपि वा ॥ शिवभक्तः सदा पूज्यः सर्वावस्थां गतोऽपि वा ॥२॥ आदित्यपुराणे ॥ मार्गस्थो वाप्यमार्गस्थो मूर्खो वा पंडितोऽपि वा ॥ मम भक्तो यदि भवेत्सर्वस्मादधिको हि सः ॥३॥ स्कान्दे ॥ यदि पापरतः क्रूरः स्वाश्रमाचारवर्जितः ॥ मम भक्तो यदि भवेत्पूज्यो मान्यः सदैव हि ॥४॥ शिवधर्मे ॥ अंत्यजो वाऽधमो वापि मूर्खो वा पंडितोऽपि वा ॥ शिवभावं प्रपन्नश्चेत्पूज्यः सर्वैः सुरासुरैः ॥५॥ आदित्यपुराणे ॥ म्लेंच्छोऽपि वा यदि भवेद्भवभक्तिसमन्वितः ॥ न तत्समश्चतुर्वेदी नाग्निष्टोमादियज्ञकृत् ॥६॥ शैवे ॥ न मे प्रियश्चतुर्वेदी मद्भक्तः श्वपचोऽपि वा ॥ तस्मै देयं ततो ग्राह्यं स च पूज्यो यथा ह्यहम् ॥७॥ लिंगसारे ॥ यो

---

श्रीशिवास नमस्कार असो. ग्रंथांतरांत सांगितलें कीं, श्रीशिव बोलले–(१) माझ्या भक्तांचें माहात्म्य कोण जाणूं शकतो ? मी जाणतों, तूं जाणतोस, व हे गुहा, नंदी जाणतो किंवा नाहीं संशय आहे. (२) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, स्त्री, अंत्यज यांपैकी कोणीही शिवभक्त असो, तो कोणत्या अवस्थेंत असला तरी पूज्य आहे. (३) आदित्यपुराणांत सांगितलें कीं, मार्गस्थ असो, (नीतीनें वागणारा असो) अमार्गस्थ असो, (अनीतीनें वागणारा असो,) मूर्ख असो, पंडित असो, माझा भक्त असेल तर तो सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे, असें समजावें. (४) स्कांदपुराणांत सांगितलें कीं, पापाचारांत रत असून जरी क्रूर आहे, आपल्या आश्रमाचे आचार त्यानें जरी सोडले आहेत, तो माझा भक्त असेल तर पूज्य असून सर्वदा मान्य आहे. (५) शिवधर्मांत सांगितलें कीं, अंत्यज असो, अधम असो, मूर्ख असो, पंडित असो, तो शिवभक्त असेल तर सुरासुरांना तो पूज्य आहे. (६) अदित्यपुराणांत सांगितलें कीं, म्लेंच्छ असून शिवभक्ति करीत असेल तर त्याच्या बरोबरीला चतुर्वेदी ब्राह्मण येत नाहीं; व अग्निष्टोमादि याग करणारा ब्राह्मण येत नाहीं. (७) शैवपुराणांत सांगितलें कीं, चतुर्वेदी ब्राह्मण असला तरी तो मला प्रिय नाहीं. श्वपच असून माझा भक्त असेल तर त्याला दान द्यावें, व त्याच्यापासून घ्यावें. मी जसा पूज्य आहे, तसा तोही पूज्य आहे. (८) लिंग-

लिंगवेषी सततं मत्प्रसादोपजीवकः ॥ सदा सन्निहितश्चैव चंडालो वापि सर्वदा ॥८॥ आदित्यपुराणे ॥ येऽपि दंभं समाश्रित्य भक्ता मदुपजीवकाः ॥ संसारात्तेऽपि मुच्यन्ते किं पुनर्मत्परा जनाः ॥९॥ शिवरहस्ये ॥ मृतस्य जीवतो वापि शिवभक्तस्य नारद ॥ यमाद्भयं न तस्यास्ति राज्ञश्चैव तु का कथा ॥१०॥ रहस्ये ॥ यमलोकभयं नास्ति संसारस्य भयं न च ॥ मम भक्तस्य माहात्म्यं देवि किं कथयामि ते॥११॥ आदित्यपुराणे ॥ नाग्निष्टोमादिभिर्यज्ञैर्न दानैस्तपसा न च ॥ गतिं तां यांति राजेंद्र याति माहेश्वरो जनः ॥१२॥ शैवे ॥ मद्भक्ता न विनश्यन्ति मद्भक्ता वीतकल्मषाः ॥ आदावेव प्रतिज्ञातं न मे भक्तः प्रणश्यति ॥१३॥ लैंग्ये ॥ ये भक्ता देवदेवस्य शिवस्य परमात्मनः ॥ भाग्यवन्तो विमुच्यन्ते भुक्त्वा भोगानिहैव तु ॥१४॥ शिवरहस्ये ॥ रिपवस्तं न हिंसंति न च खादन्ति राक्षसाः ॥ न दंशंति च नागेंद्रा नरं

---

सारांत सांगितलें कीं, जो प्राणी शिवचिन्ह धारण करीत आहे, व सतत माझ्या प्रसादानें उपजीविका करीत आहे, तो चांडाल जरी आहे, त्याच्या ठिकाणीं माझें सांनिध्य नेहमीं आहे; असें समजावें. (९) आदित्यपुराणांत सांगितलें कीं, जे लोक दंभानें माझे भक्त होऊन माझ्यावर उपजीविका करतात, तेही संसारांतून मुक्त होतात, मग खरे एकनिष्ठ प्राणी मुक्त होतात, ह्मणून काय सांगावयाचें आहे ? (१०) शिवरहस्यांत सांगितलें कीं, शिवभक्त मृत असो, जीवंत असो, त्याला यमाची भीति नाहीं, मग यःकश्चित राजाची भीति आहे, ह्मणून कांय सांगावयाचें आहे ? (११) रहस्यांत सांगितलें कीं, माझ्या भक्ताला यमाची व संसाराची भीति मुळींच नाहीं. हे देवि, माझ्या भक्तांचें माहात्म्य तुला काय सांगूं ? (१२) आदित्यपुराणांत सांगितलें कीं, अग्निष्टोमादि याग केले तरी जी गति मिळत नाहीं; तपश्चर्येनें जी गति मिळत नाहीं व महादानें केली तर जी गति मिळत नाहीं; हे श्रेष्ठराजा, त्या उत्तम गतीला माहेश्वर लोक जातात. (१३) शैवपुराणांत सांगितलें कीं, माझे भक्त कधींही नष्ट होत नाहींत, माझे भक्त निष्पाप असतात, मीं प्रथमच सांगितलें कीं, माझे भक्त नष्ट होत नाहींत. (१४) लिंगपुराणांत सांगितलें कीं, देवाधिदेव परमात्मा शिवाचे जे भक्त असतील, ते इहलोकांत यथेच्छ सुखोपभोग घेऊन भाग्यवान होऊन शेवटीं मुक्त होतात. (१५) शिवरहस्यांत सांगितलें कीं, शत्रु त्याची हिंसा करीत नाहींत, राक्षस त्याला खात नाहींत, सर्प त्याला दंश करीत नाहींत, परंतु तो मात्र

रुद्रपरायणम् ॥१५॥ रहस्ये ॥ मल्लाभान्नापरो लाभस्तेषामस्ति यथा परः ॥ ममापि लाभस्तल्लाभान्नापरः परमेश्वरि ॥१६॥ पराशरपुराणे ॥ सर्वं त्यक्त्वा यथा ज्ञानी मामेकं लब्धवान् प्रिये ॥ सर्वं त्यक्त्वा तथा चाहं तमेकं लब्धवान् मुदा ॥१७॥ रहस्ये ॥ नाहं वसामि कैलासे न मेरौ न च मंदरे ॥ मद्भक्ता यत्र तिष्ठंति तत्र तिष्ठामि पार्वति ॥१८॥ चंडालवाटिकायां तु शिवभक्तः स्थितो यदि ॥ तच्छ्रेणिः शिवलोकः स्यात्तद्गृहं शिवमंदिरम्॥१९॥कीकटेष्वपि देशेषु यत्र माहेश्वरो जनः॥ मनाक्प्रपन्नोऽपि वसेत्काशीक्षेत्रसमं तु तत् ॥२०॥ आदित्यपुराणे ॥ यस्मिन् देशे वसेन्नित्यं शिवभक्तः क्षमान्वितः ॥ सोऽपि देशो भवेत्पूतः किं पुनस्तस्य बांधवाः ॥२१॥ लैंग्ये ॥ रुद्रध्यायी वसेद्यस्तु ग्रामे वा नगरेऽपि वा ॥ न तत्र क्षुत्पिपासाद्या दुर्भिक्षव्याधयोऽपि वा॥२२॥ स्कान्दे ॥ माहेश्वरपदासक्तं स्थानं भवति संपदाम् ॥ पदाहतं दधी-

---

शिवाच्या ठिकाणीं आसक्त झालेला असावा. (१६) रहस्यांत सांगितलें कीं, त्या शिवभक्तांना माझ्या लाभाशिवाय दुसरा श्रेष्ठ लाभ कोणताही नाहीं. हे देवि, मलाही त्याप्रमाणें भक्ताच्या लाभाशिवाय दुसरा श्रेष्ठ लाभ नाहीं. (१७) पराशर-पुराणांत सांगितलें कीं, ज्ञानी मनुष्यानें सर्व सोडून माझाच लाभ कसा करून घेतला, त्याप्रमाणें मींही सर्व सोडून भक्ताचाच लाभ करून घेतला आहे. (१८) रहस्यांत सांगितलें कीं, हे पार्वति, मी कैलासांत राहत नाहीं, मेरूवर राहत नाहीं, मंदरपर्वतावर राहात नाहीं, माझे भक्त कोठें राहतील, तेथें मी राहतों. (१९) चांडाल वाडींत जर शिवभक्त राहिला, तर ती चंडालवाडी शिव-लोक असून तें घर शिवमंदिर आहे, असें जाणावें. (२०) कीकट देशामध्यें (निर्जल प्रदेशांत) कोठें तरी माहेश्वर मला येणारा माझा भक्त राहिला तरी तो देश काशीक्षेत्रासमान आहे. (२१) आदित्यपुराणांत सांगितलें कीं, क्षमाशील माझा भक्त कोणत्या देशांत राहील, तो देश पवित्र होतो. मग त्याचे बांधव पवित्र होतात, ह्मणून काय सांगावयाचें आहे? (२२) लिंगपुराणांत सांगितलें कीं, रुद्राध्याय पठन करणारा कोणत्या गांवांत किंवा शहरांत राहतो, त्या ठिकाणीं भूक, तहान, दुष्काळ यांचा उपद्रव होत नाहीं. (२३) स्कांदपुराणांत सांगितलें कीं, माहेश्वर लोकांचे पाय ज्या जागेला लागतील, ती जागा लक्ष्मीचें निवासस्थान होतें, दधीचानें श्रीविष्णूच्या वक्षस्थलावर लाथ मारिली ह्मणून तें स्थान लक्ष्मीचें

चेन विष्णोर्वक्षः श्रियः पदम् ॥२३॥ शिवधर्मे ॥ सुदूरमपि गन्तव्यं यत्र माहेश्वरो जनः॥प्रयत्नेनाऽपि द्रष्टव्यस्तत्र सन्निहितः शिवः ॥२४॥ लैंग्ये ॥ उपपातककोटींश्च ब्रह्महत्यायुतानि च ॥ दहत्यशेषपापानि शिवभक्तस्य दर्शनम् ॥२५॥ भक्तानां दर्शनादेव नृणां स्वर्गादयो द्विजाः॥ न दुर्लभा न संदेहो भक्तानां किं पुनस्ततः ॥२६॥ आदित्यपुराणे ॥ दर्शनाच्छिवभक्तानां सकृत्संभाषणादपि ॥ अतिरात्रस्य यज्ञस्य फलं भवति नारद ॥२७॥ वीरभद्रीये ॥ गंगास्नानादिकं पुण्यं दर्शनाच्छिवयोगिनाम् ॥ सर्वतीर्थाभिषेकाच्च तत्संभाषणमुत्तमम् ॥२८॥ लैंग्ये ॥ शिवभक्तमथायान्तं दृष्ट्वापि सुमुखः प्रियम् ॥ प्रणामादि करोत्येव महादेवं यथा तथा ॥२९॥ स वै भक्त इति ज्ञेयः पुनाति च जगत्त्रयम् ॥३०॥ शिवरहस्ये॥मनः प्रसन्नतां याति पूज्य माहेश्वरं सदा॥अकुलः कुलयुक्तः स्यान्नमस्कारपुरःसरम् ॥३१॥ शिवधर्मे ॥ शिवभक्तमथायान्तं दृष्ट्वैव गृहसंस्थिताः ॥ क्रीडन्त्योषधयः सर्वा यास्यामः परमां

---

निवासस्थान झालें. (२४) शिवधर्मांत सांगितलें कीं, ज्या ठिकाणीं माहेश्वर राहतो, तें ठिकाण दूर असलें तरी तेथें जावें. प्रयत्न करून त्याचें दर्शन घ्यावें. कारण त्या ठिकाणीं शिवाचें पूर्ण सान्निध्य असतें. (२५) लिंगपुराणांत सांगितलें कीं, कोट्यावधि महापातकें असोत, हजारो ब्रह्महत्या असोत, हीं सर्व पापें शिवभक्तांच्या दर्शनानें जळून जातात. (२६) हे ब्राह्मणहो, भक्तांचें दर्शन घेतलें असतां स्वर्गादिलोक अतिशय सुलभ आहेत ; यांत संशय नाहीं मग भक्त स्वतः स्वर्गादि लोकांला जातात ह्मणून काय सांगावयाचें आहे ? (२७) आदित्यपुराणांत सांगितलें कीं, शिवभक्तांच्या दर्शनानें शिवभक्तांबरोबर एकवार भाषण केल्यानें हे नारदा, अतिरात्र यज्ञ केल्याचें फल मिळतें. (२८) वीरभद्रीयांत सांगितलें कीं, शिवयोग्यांच्या दर्शनानें गंगास्नानापेक्षां जास्त पुण्य मिळत आहे. सर्व तीर्थांमध्यें स्नान करण्यापेक्षां त्याच्या बरोबर भाषण करणें अत्युत्तम श्रेयस्कर आहे. (२९) लिंगपुराणांत सांगितलें कीं, येणाऱ्या शिवभक्ताला पाहिल्या बरोबर ज्याचें मुख प्रसंन होतें, व महादेवाला जसा नमस्कार करावा तसा नमस्कार जो भक्ताला करतो, (३०) तोच भक्त आहे, असें समजावें. त्याच्या योगानें तीन लोक पवित्र होतात. (३१) शिवरहस्यांत सांगितलें कीं, माहेश्वराची पूजा केली असतां मन प्रसंन होतें. अकुलीन असो, कुलीन असो, त्यानें नमस्कारपूर्वक माहेश्वराची पूजा करावी. (३२) शिवधर्मांत सांगितलें कीं, येणाऱ्या शिवभक्ताला पाहिल्याबरोबर घरांतल्या सर्व औषधि

गतिम् ॥३२॥ शैवे ॥ हस्तपादादिसाधर्म्यान्मर्त्यान्रुद्रवपुर्धरान् ॥ प्राकृतानेव मन्वाना नैव जानन्त्यपंडिताः ॥३३॥ अवज्ञानं कृतं तेषु नरैर्व्यामूढचेतनैः ॥ आयुः श्रियं कुलं शीलं हित्वा नरकमाप्नुयुः ॥३४॥ लैंग्ये ॥ यस्य चित्तं शिवे लीनं तस्य जात्यादिकं स्मरन् ॥ शिवलिंगे शिलाबुद्धिं कुर्वाण इव पातकी ॥३५॥ शिवरहस्ये ॥ शिवभक्तं सकृन्निंदेद्यो जनः पापकर्मकृत् ॥ युगकोटिं कृमिर्भूत्वा विष्ठायां जायते पुनः ॥३६॥ सूकरः कोटिजन्मानि जायते शतकोटिशः ॥ मृगश्च कोटिजन्मानि सृगालः कोटिजन्मसु ॥३७॥अंधः स्यात्कोटिजन्मानि कुब्जाः स्यात्सप्तजन्मसु ॥ पंगुश्च शतजन्मानि पाषंडी जायते शतम् ॥३८॥ उलूको वायसो गृध्रः सर्पसूकरगर्दभाः ॥ जायते म्रियते चैव निष्कृतिर्न विधीयते ॥३९॥ शिवधर्मे ॥ ये शिवज्ञाननिरतं प्रद्विषंति मनागपि ॥ पश्चाद्बाहुकवद्धास्ते नीयते यमसाधनम् ॥४०॥ तत्राग्निदग्धैः संदंशैः

---

आह्मी सद्गतीला जातों, ह्मणून आनंदानें खेळूं लागतात. (३३) शैवपुराणांत सांगितलें कीं, हातापायाच्या साम्यतेनें मनुष्याचा आकार दिसत असून शिवाचें शरीर धारण करणाऱ्या शिवभक्तांना प्राकृताप्रमाणें मानणारे मूर्ख लोक त्यांना जाणत नाहींत. (३४) अशा भक्तांचा अपमान जे मूर्ख लोक करतात, त्यांचें आयुष्य, लक्ष्मी, कुल, शील हें सर्व नष्ट होऊन शेवटीं ते नरकाला जातात. (३५) लिंगपुराणांत सांगितलें कीं, ज्याचें मन शिवाच्या ठिकाणीं तल्लीन झालें आहे, त्याची जात वगैरे काढणारा शिवलिंगाला दगड ह्मणणाऱ्या पातक्याप्रमाणें पातकी आहे, असें समजावें. (३६) शिवरहस्यांत सांगितलें कीं, पापकर्म करणारा जो प्राणी शिवभक्ताची निंदा एकवार जरी करतो, तरी तो कोटि युगांपर्यंत विष्ठेंत कृमि होऊन राहतो. (३७) नंतर कोट्यावधि शेंकडो जन्म डुकराच्या योनींत घेतो. नंतर हरणाच्या जन्माला कोटवेळ जातो, नंतर कोल्हा कोटवेळ होतो. (३८) नंतर कोटवेळ आंधळा होतो; मग सात जन्मांपर्यंत कुबडा होतो. शंभर जन्म लंगड्याचे घेतो, नंतर शंभर जन्म पाषंड्याचे घेतो. (३९) घुबड, कावळा, गिधाड, साप, डुकर, गाढव अशा योनींत जन्म घेतो, व मरतो. त्याला प्रायश्चित्त ह्मणून नाहीं. (४०) शिवधर्मांत सांगितलें कीं, शिवज्ञानांत रत झालेल्या प्राण्यांवरोवर जे किंचित जरी द्वेष करतात, त्यांना यमदूत पाशानें मुसक्या बांधून यमलोकाला नेतात. (४१) त्या ठिकाणीं त्याला आग

प्रपीड्योरसि पादयोः ॥ तेषामुत्पाट्यते जिव्हा शतशोऽथ सहस्रशः ॥४१॥ विकत्थन्ते महात्मानं ये मूढाः शिवयोगिनम् ॥ ते यांति पितृभिः सार्धं नरकं नात्र संशयः ॥४२॥ ये चापवादं श्रृण्वंति विमूढाः शिवयोगिनाम् ॥ ते विशेषेण पच्यन्ते नरकेष्वामहीक्षयात् ॥४३॥ स्कान्दे ॥ ये निंदन्ति शिवं शास्त्रं गुरुं चैव तपस्विनम् ॥ तेषां भोजनदानेन दाताऽपि नरकं व्रजेत् ॥४४॥ शिवधर्मे ॥ स्थावरं जंगमं चेति द्विविधं लिंगमुच्यते ॥ जंगमस्यावमानेन स्थावरं निष्फलं भवेत्॥४५॥ वीरभद्रीये ॥ शिवाश्रमगतो भक्तः शिवभक्तं प्रपूजयेत् ॥ स्वागतासनदानेन पाद्यार्घ्याद्यभिवादनैः ॥४६॥ शिवज्ञपूजनात्साक्षाच्छिवो भवति पूजितः ॥ अकल्मषमतिस्तस्मात्पूजयेच्छिवशासनम् ॥४७॥ शिवरहस्ये ॥ गुणवत्पात्रपूजाया वरं शासनपूजनम् ॥ शासनं पूजयेत्तस्मादविचार्य शिवाज्ञया ॥४८॥ पात्रशासनयोर्मध्ये शासनं तु विशिष्यते॥ तस्माच्छासनमेवादौ पूज्यं यत्नाच्छिवो यथा ॥४९॥ शिवधर्मे ॥ शि-

---

लावून जाळतात, उरावर पायावर मारमारून यातना देतात, शेंकडो हजारो वेळां त्याची जीभ उपटून दुःख देतात. (४२) शिवयोग्याला पाहून जे लोक विनाकारण वडवडतात, ते लोक आपल्या पितरांसह नरकाला जातात; यांत संशय नाहीं. (४३) शिवयोग्यांचा अपवाद जे लोक ऐकतात, ते लोक पृथ्वीचा क्षय होईपर्यंत विशेषेंकरून नरकांत शिजत राहतात. (४४) स्कांदपुराणांत सांगितलें कीं, शिवशास्त्रांची निंदा जे करतात, तपस्वी गुरूची निंदा जे करतात, त्या लोकांना अन्न देणारा दाता देखील नरकाला जातो. (४५) शिवधर्मांत सांगितलें कीं, लिंगामध्यें स्थावर जंगम असे दोन भेद आहेत, परंतु जंगमलिंगाचा (महेश्वराचा) अपमान जो करतो, त्यानें स्थावरलिंगाची पूजा केली तरी ती पूजा व्यर्थ होते. (४६) वीरभद्रीयांत सांगितलें कीं, शिवाश्रमांत राहणाऱ्या भक्तानें शिवभक्ताची पूजा करावी. स्वागत आसन, दान पाद्य, नमस्कार इत्यादिकांनीं शिवभक्ताचा सत्कार करावा. (४७) शिवज्ञाची पूजा केल्यानें तोही साक्षांत शिवच होतो. याकरितां निष्कल्मषबुद्धीनें शिवशासन पाळावें. (४८) शिवरहस्यांत सांगितलें कीं, गुणवान सत्पात्रपूजेपेक्षां शिवशासन पाळणें जास्त श्रेयस्कर आहे. याकरितां विचार न करितां शिवाज्ञेप्रमाणें शिवशासन पाळावें. (४९) पात्र शासन यांमध्यें शासन हें श्रेष्ठ आहे याकरितां शिवाला जसा सन्मान द्यावा त्याप्रमाणें शिवशासनाला मान द्यावा. (५०) शिवधर्मांत सांगितलें कीं, शिव-

वयोगिशरीरे तु नित्यं सन्निहितः शिवः ॥ योगीन्द्रं पूजयेत्तस्मात्सा-
क्षात्संपूजितः शिवः ॥५०॥ आदित्यपुराणे ॥ यस्तु माहेश्वरो नित्यं
जातिमात्रोपजीवकः ॥ उत्तमः सर्वपात्राणां तस्मै दत्तं तदक्षयम्॥५१॥
शिवधर्मे ॥ असंयतः संयतो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ॥ यो वा को
वा शिवे भक्तः शिववत्पात्रमुत्तमम् ॥५२॥ स्कान्दे ॥ मद्भक्तस्सर्वदा
स्कन्द श्वपचोऽपि मम प्रियः ॥ न तस्मादधिकं किंचिद्विद्यते पात्रमु-
त्तमम् ॥५३॥ शिवधर्मे ॥ पात्रापात्रविशेषोऽस्ति धेनुपन्नगयोरिव ॥
तृणात्संजायते क्षीरं क्षीरात्संजायते विषम् ॥५४॥ शैवे ॥ न्यायार्जि-
तस्य वित्तस्य द्वावनर्थौ प्रकीर्तितौ ॥ अपात्रे प्रतिपत्तिश्च पात्रे चाप्र-
तिपादनम् ॥५५॥ शिवधर्मोत्तरे ॥ सद्बीजमूषरे यद्वद्वापितं निष्फलं
भवेत् ॥ भस्मनीव हुतं हव्यं यथा होतुस्तु निष्फलम् ॥५६॥ आमपात्रे
रसो यद्वन्नश्यते तच्च भाजनम् ॥ दानमज्ञे तथा न्यस्तं सह पात्रेण न-

---

योग्याच्या शरीरामध्यें शिवाचें सांनिध्य नेहमीं राहतें. अर्थात योगींद्राची पूजा
केली आसतां साक्षात शिवाची पूजा केल्याचें फल मिळतें. (५१) आदित्य पु-
राणांत सांगितलें कीं, जो माहेश्वर असून केवळ जातीनें उपजीविका करून रा-
हतो. तो सर्व पात्रांमध्यें उत्तम पात्र असून त्याला दिलेलें अक्षय होतें. (५२)
शिवधर्मांत सांगितलें कीं, मन स्वाधीन ठेवणारा असो, किंवा न ठेवणारा असो,
तो कोणत्या अवस्थेंत असला तरी व तो कोणीही असो, परंतु शिवाच्या ठिकाणीं
भक्ति करणारा असला तर तो साक्षात शिवाप्रमाणें उत्तम पात्र होय. (५३)
स्कांदपुराणांत सांगितलें कीं, हे स्कंदा, माझा भक्त असून श्वपच जरी आहे, तो
मला प्रिय आहे. त्याच्यापेक्षां अधिक पात्र कोणतेंही नाहीं. (५४) शिवधर्मांत
सांगितलें कीं, गाय आणि सर्प यांमध्यें जसा भेद आहे, त्याप्रमाणें पात्रापात्रां-
मध्यें विशेष आहे. तृणापासून दूध उत्पन्न होतें, व दुधापासून विष उत्पन्न होतें.
(५५) शैवपुराणांत सांगितलें कीं, न्यायानें मिळविलेल्या द्रव्यांत दोन अनर्थ
आहेत. ते असे कीं, अपात्रीं दान करणें व पात्रीं दान न करणें असे हे दोन अ-
नर्थ होत. (५६) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं, खारट जमिनींत पेरलें आसतां
तें जसें निष्फल होतें, व जसें राखेंत होम केला असतां होमकर्त्याचें हव्य जसें
निष्फल होतें, (५७) आमपात्रांत (विनकल्हईच्या भांड्यांत) रस जसा व्यर्थ
होतो, व तें पात्रही जसें काळें पडतें, त्याप्रमाणें अज्ञान्याला दान दिलें तर त्या

श्यति ॥५७॥ आदित्यपुराणे ॥ शिवभक्तमतिक्रम्य यच्चान्यस्मै प्रदीयते ॥ निष्फलं तद्भवेद्दानं नरकं च प्रपद्यते ॥५८॥ शिवधर्मे ॥ नित्यं नैमित्तिकं काम्यं विमलं च चतुर्विधम् ॥ दानं पात्रे प्रदातव्यं नापात्रे ह्यणुमात्रकम् ॥५९॥ हरस्य प्रीणनार्थं तु शिवभक्ताय दीयते ॥ दानं तद्विमलं प्रोक्तं केवलं मोक्षसाधनम् ॥६०॥ तस्मात्पात्रतमं ज्ञात्वा शिवभक्तमकल्मषम् ॥ तस्मै सर्वं प्रदातव्यमक्षयं फलमिच्छता ॥६१॥ पतनात्त्रायते यस्मादतीव नरकार्णवात् ॥ तस्य पात्रस्य माहात्म्याद्दानमण्वपि चाक्षयम् ॥६२॥ तस्मात्तस्मै सदा देयमप्रमाणफलार्थिभिः ॥६३॥ शिवधर्मोत्तरे ॥ यद्दानं श्रद्धया पात्रे विधिवत्प्रतिपाद्यते ॥ तदनंतफलं ज्ञेयमपि वा तिलमात्रकम् ॥६४॥ तिलार्द्धमात्रकेणापि यत्प्रमाणेन दीयते ॥ सत्पात्रे श्रद्धया किंचित्तद्भवेत्सर्वकामिकम् ॥६५॥ तस्मादतिथिमायान्तमभिगच्छेत्कृतांजलिः ॥ अभ्युत्थानाभिगमनं स्वागतं चासनं प्रियम् ॥६६॥ पादोदकमनुव्रज्य स्वर्गसोपानसप्तकम् ॥

---

पात्रासह (दान घेणाऱ्यासह) आपणही नष्ट होतो. (५८) आदित्य पुराणांत सांगितलें कीं, शिवभक्ताला सोडून दुसऱ्याला दान दिलें तर तें निष्फल होऊन दाता नरकाला जातो. (५९) शिव धर्मांत सांगितलें कीं, दानांमध्यें नित्य, नैमित्तिक, काम्य, विमल असे चार भेद आहेत. दान हें पात्रींच द्यावें लागतें अपात्रीं अणुमात्र देऊं नये. (६०) शिवाच्या प्रीतीकरितां शिवभक्ताला जें दान दिलें जातें, तें विमल असून केवळ मोक्षसाधन आहे. (६१) याकरितां निष्कल्मष शिवभक्त उत्तम पात्र आहे, असें समजून त्याला सर्व दानें द्यावींत, ह्मणजे अक्षय फल मिळतें. (६२) नरक समुद्रांत पडणाऱ्या मनुष्याचें रक्षण करीत असल्यामुळें सत्पात्रीं दान द्यावें. त्या पात्रांच्या माहात्म्यानें स्वल्पदान असलें तरी अक्षय होतें. (६३) याकरितां अपरिमित फलाची इच्छा धरणाऱ्यांनीं सर्वदा सत्पात्रीं दान द्यावें. (६४) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं जें दान श्रद्धापूर्वक सत्पात्रीं विधिपूर्वक दिलें जातें, तें तिळा एवढें असलें तरी अनंत फल देणारें आहे असें समजावें. (६५) तिलार्द्ध प्रमाणानें दान सत्पात्रीं श्रद्धेनें दिलें तरी तें सर्व फल देणारें आहे, असें समजावें. (६६) याकरितां येणाऱ्या अतिथीला हात जोडून सामोरें जावें. मग अभ्युत्थान, अभिगमन, स्वागत, आसन, प्रिय वस्तु समर्पण, (६७) पादोदक समर्पण, अनुव्रजन या सात वस्तु स्वर्गाच्या सात पायऱ्या

स्वागतासनपाद्यार्घ्यस्नानान्नशयनादिभिः॥६७॥तस्मात्सत्कृत्यदातव्य-
मनन्तफलमिच्छता ॥६८॥ लैंग्ये ॥ आसनाभ्यंगनस्नानवस्त्रधान्यांगना-
दिभिः ॥ पूजयेच्छिवभक्तं यः स याति परमां गतिम् ॥६९॥ शैवे॥ स-
त्कृल्लिगार्चके दत्वा वस्त्रमात्रं यदृच्छया ॥ एकछत्रं भवेद्राज्यं शिवसा-
युज्यमाप्नुयात् ॥७०॥ यावत्तद्वस्त्रतंतूनां परिसंख्या च यावती ॥ ता-
वद्वर्षसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥७१॥ सत्कृल्लिंगार्चके दत्वा सुवर्णं
चाणुमात्रकम् ॥ देवैश्च पूज्यते सम्यग्गणमुख्यो गणेश्वरः ॥७२॥ सत्कृ-
ल्लिंगार्चके दत्वा भूमिं गोचर्ममात्रकाम् ॥ भूलोकाधिपतिर्भूत्वा शिवेन
सह मोदते ॥७३॥ सत्कृल्लिगार्चके दत्वा धेनुं बहुपयोधराम् ॥ रुद्र-
लोके स वसति यावद्रोमाणि तत्पशोः ॥७४॥ फलं मूलं च भक्ताय
शाकानि विविधानि च ॥ भक्तिपूर्वं तु यो दद्यात्स याति परमां गति-
म् ॥७५॥ यद्यदात्महितं लोके तत्तद्द्रव्यमवंचयन् ॥ शिवलिंगार्चके द-
द्यात्तत्र तुष्यामि पार्वति ॥७६॥ शिवधर्मे ॥ ये दानं शिवभक्तेभ्यः प्रय-

---

आहेत. याकरितां स्वागत, आसन पाद्य, अर्घ्य, स्नान, अन्न, शयन इत्यादिकांनीं (६८) सत्पात्राचा सत्कार करावा; नंतर अनंत फल इच्छिणारानें या शिवभक्ता-लाच दान द्यावें. (६९) लिंगपुराणांत सांगितलें कीं, आसन, अभ्यंगन, स्नान, वस्त्र, धान्य, स्त्रिया वगैरे पदार्थांनीं जो शिवभक्ताचा सत्कार करतो, तो श्रेष्ठ ग-तीला जातो. (७०) इष्टलिंगपूजा करणाऱ्या शिवभक्ताला एकवेळ (एकदां) वस्त्रदान केलें तर तेवढ्यानेंच इहलोकीं एकच्छत्री राज्य मिळतें. शेवटीं शिव-सायुज्य मिळतें. (७१) वस्त्रांत तंतु जितके असतील, तितक्या हजार वर्षेपर्यंत रुद्रलोकांत पूज्य होतो. (७२) एकवार लिंगपूजा करणाऱ्या शिवभक्ताला अणु-मात्र सुवर्णदान केलें असतां त्याला देव देखील मान देतात. तो शिवलोकांत गणेश्वर होतो. (७३) इष्ट लिंगपूजा करणाऱ्या शिवभक्ताला एकवार गोचर्म प्रमाण भूदान केलें तर भूलोकांचा स्वामी होऊन शिवासह तो परलोकांत आनं-दानें राहतो. (७४) पुष्कळ दूध देणारी गाय एकदांच शिवभक्ताला दिली तर तो दाता गायीच्या अंगावर असलेल्या केंसा इतक्या वर्षेपर्यंत रुद्रलोकांत राहतो (७५) फल, मूल, विविध शाक हे पदार्थ भक्तिपूर्वक जो भक्ताला देतो, तो श्रेष्ठ सद्गतीला जातो. (७६) जगांत जें जें आपल्या हिताचें असेल, तें द्रव्य हे पार्वति वंचना न करतां शिवलिंगपूजकाला दिलें तर तितक्यानेंच मी संतुष्ट होतों. (७७) शिवधर्मांत सांगितलें कीं, जे बुद्धिमान लोक शिवभक्ताला दान देतात,

च्छन्ति विपश्चितः ॥ ते क्रीडंति महाभोगैर्नित्यं शिवपुरे नराः ॥७७॥ शैवसंहितायाम् ॥ माहेश्वरमुखं क्षेत्रमनूषरमशार्करम् ॥ वापयेत्सर्वबीजानि सा कृषिः सार्वकालिकी ॥७८॥ शैवे ॥ क्षीयन्ते च वरारोहे तपोयज्ञक्रियादयः ॥ न क्षीयते वरारोहे भक्तवक्त्रहुतं हविः ॥७९॥ शिवधर्मोत्तरे ॥ विप्राणां वेदविदुषां कोटिं संभोज्य यत्फलम् ॥ भिक्षामात्रप्रदानेन तत्फलं शिवयोगिने ॥८०॥ शिवयोगी गृहे यस्य भिक्षां गृण्हाति सत्कृताम् ॥ कुलं तारयते तेन सप्त सप्त च सप्त च ॥८१॥ भिक्षां सव्यंजनां दत्वा शिवभक्ताय भक्तितः ॥ वर्षलक्षं महाभोगैः शिवलोके महीयते ॥८२॥ पलाशपद्मपत्रैर्वा यत्कृत्वा पुटकानि तु ॥ प्रदद्याच्छिवयोगिभ्यः शिवलोके महीयते ॥८३॥ यस्ताम्रपात्रं सुकृतं प्रदद्याच्छिवयोगिने ॥ सुवर्णपात्रदानस्य फलं प्राप्नोति मानवः ॥८४॥ रौप्यसौवर्णपात्रं वा निवेद्य शिवयोगिने ॥ कोटिकोटिं स कल्पानां शिवलोके महीयते ॥८५॥ कलशं तर्करीयुक्तं वस्त्रपूतांबुपूरितम् ॥ प्रदद्याच्छिवभक्ताय तस्य पुण्यफलं शृणु ॥८६॥ शुद्धस्फाटिकसंकाशैर्वि-

---

ते लोक महाभोगांचा उपभोग घेत निरंतर शिवपुरांत क्रीडा करतात. (७८) शैवसंहितेंत सांगितलें कीं, माहेश्वरांचें (जंगमांचें) मुख हेंच एक सुपीक विनखड्याची जमीन आहे. या जमिनींत वाटेल तें पेरून केंव्हांही त्या जमिनींतून पीक घेतां येतें. (७९) शैवपुराणांत सांगितलें कीं, हे सुंदरि, तप, यज्ञ, क्रिया वगैरे क्षीण होतात, परंतु शिवभक्ताच्या मुखांत होम केलेल्या पुण्याचा क्षय होत नाहीं. (८०) शिवधर्मोत्तरांत सांगितलें कीं, वेदविद्वान कोटि ब्राह्मणाला भोजन घातलें असतां जें फल मिळतें, तें फल शिवयोग्याला नुसती भिक्षा घातली तर मिळतें. (८१) शिवयोगी मनुष्य ज्या घरीं सत्कारपूर्वक भिक्षा घेतो, त्या घरवाल्यांचीं सात कुलें हा शिवयोगी तारतो. (८२) भक्तिपूर्वक सव्यंजन भिक्षा शिवभक्ताला देऊन महाभोगांनीं एक लक्ष वर्षेपर्यंत शिवलोकांत पूज्य होतो. (८३) पलाश पत्राचे व पद्म पत्राचे द्रोण करून शिवयोग्यांला देतो, तो शिवलोकांत पूज्य होतो. (८४) उत्तम ताम्रपात्र जो शिवयोग्याला देतो, त्याला सुवर्णपात्रदान केल्याचें फल मिळतें. (८५) रुप्याचें किंवा सोन्याचें पात्र शिवयोग्याला दिलें तर कोट्यावधि कल्पे पर्यंत शिवलोकांत पूज्य होतो. (८६) वस्त्रपूत जलानें भरलेली कळशी तंवकडीसह शिवभक्ताला जो देतो. त्याचें पुण्यफल सांगतों ऐक. (८७) शुद्ध स्फटिकाप्रमाणें असलेल्या सर्व मनोरथ पूर्ण करणा-

मानैः सार्वकामिकैः ॥ संप्राप्य शंकरपुरं वर्षकोटिं प्रमोदते ॥८७॥ सुशीतलेन तोयेन शिवभक्तं पिपासितम् ॥ तर्पयित्वा शिवेलोके वर्षकोटिं प्रमोदते ॥८८॥ अप्यंत्यजमनाचारं शिवभक्तिपरं नरम् ॥ भोजयित्वा यथान्यायं शिवलोके महीयते ॥८९॥ शैवे ॥ बहुनाऽत्र किमुक्तेन शिवभक्तं तु भोजयेत् ॥ शिवभक्तो यथा भुंक्ते साक्षाद्भुंक्ते सदाशिवः ॥९०॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ नैवेद्यं पुरतो न्यस्तं दर्शनात्स्वीकृतं मया ॥ रसान्भक्तस्य जिव्हाग्रादश्नामि कमलोद्भव ॥९१॥ आदित्यपुराणे ॥ शिवस्य नित्यतृप्तस्य किं नाम क्रियते जनैः ॥ यत्कृतं शिवभक्तानां तेन प्रीतो भवेच्छिवः ॥९२॥ येन केन प्रकारेण शिवभक्तस्य जायते ॥ मनस्तुष्टिस्तथा कुर्यात्पूजा सैव मयोदिता ॥९३॥ आदित्यपुराणे ॥ शंकरस्य च ये भक्ताः शान्तास्तद्गतमानसाः ॥ तेषां दासस्य दासोऽहं भवेयं जन्मजन्मनि ॥९४॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यवि० श्रीमद्वीरमाहेश्वराचारसं० सदाचारनि० शिवभक्तपूजामाहात्म्यं नाम सप्तसप्तति तमोऽध्यायः ॥

---

त्या विमानांत वसून श्रीशिवपुराला येऊन कोटिवर्षेंपर्यंत सुखोपभोग घेतो. (८८) तान्हेलेल्या शिवभक्ताला थंडगार पाणी जो पाजतो, तो कोटिवर्षें पर्यंत सुखानें राहतो. (८९) शिवभक्ति करणारा मनुष्य असून अनाचारी अंत्यज जरी आहे, त्याला भोजन दिलें तर शिवलोकांत पूज्य होतो. (९०) शैवपुराणांत सांगितलें कीं, फार काय सांगावयाचें आहे? शिवभक्ताला भोजन घालावें. शिवभक्तानें भोजन केलें तर साक्षात शिवानेंच भोजन केलें, असें समजावें. (९१) ब्रह्मांड पुराणांत सांगितलें कीं, हे ब्रह्मदेवा, नैवेद्य पुढें ठेवला असतां नुसत्या दर्शनानें मात्र त्याचा स्वीकार करतो. परंतु त्यांतले सर्व रस भक्ताच्या जिव्हाग्रापासूनच घेतो. (९२) आदित्य पुराणांत सांगितलें कीं, नित्यतृप्त शिवाला लोक काय करूं शकतील बरें? शिवभक्तांच्या प्रीत्यर्थ जें करील, त्यानेंच शिव संतुष्ट होतो. (९३) कोणत्याही प्रकारांनीं शिवभक्तांचें मन संतुष्ट ठेवावें. तीच माझी श्रेष्ठ पूजा होय. (९४) आदित्य पुराणांत सांगितलें कीं, श्रीशिवाचे जे कोणी भक्त असतील, ते शांत असून शिवाविषयीं मन तल्लीन करणारे असतील तर त्यांच्या दासाचा दास जन्मोजन्मीं होतों.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारानिरूपणांतील शिवभक्तपूजामाहात्म्य नांवाचा ७७ अध्याय संपला.

## अथ अष्टसप्ततितमोऽध्यायः

श्रीशिवाय नमः ॥ शंकरसंहितायाम् ॥ ऋषय ऊचुः ॥ सूत धर्मविदां श्रेष्ठ ज्ञातमस्माभिरुत्तमम् ॥ वीरशैवाश्रितं धर्मरहस्यं त्वत्प्रसादतः ॥१॥ इदानीं श्रोतुमिच्छामो वीरमाहेश्वरस्य तु ॥ कृतदानफलं पूजाफलं वक्तुं त्वमर्हसि ॥२॥

सूत उवाच ॥ वक्ष्ये भाग्यवतां श्रेष्ठाः प्राणलिंगांगसंगिनः ॥ कृतदानफलं पूजाफलं माहेश्वरस्य तु ॥३॥ पुरा कुमारः पप्रच्छ शंकरं शशिभूषणम् ॥ एतदर्थं महाभागाः प्रोवाचास्मै महेश्वर ॥४॥ तच्छ्रुणुध्वं मुनिश्रेष्ठा दानपूजाफलं महत् ॥५॥

श्रीशंकर उवाच ॥ वक्ष्यामि शिवभक्तस्य दानपूजार्चने फलम् ॥ संसारपाशबंधघ्नं संविज्ञानप्रदं नृणाम् ॥६॥ वृत्तम् ॥ यो हस्तपीठे निजलिंगमिष्टं विन्यस्य तल्लीनमनः प्रचारः ॥ बाह्यक्रियासंकुलनिस्पृहात्मा संपूजयत्यंग स वीरशैवः ॥७॥ दुर्लभास्त्रिषु लोकेषु प्राणलिंगांगसंगिनः ॥ पूर्वजन्मकृतात्पुण्यात्केषांचित्सुलभा भुवि ॥८॥ यैः पु-

---

श्रीशिवास नमस्कार असो. शंकरसंहितेंत सांगितलें कीं, ऋषि बोलले (१) धर्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा हे सूता, तुझ्या प्रसादानें वीरशैवांनीं आश्रय केलेल्या धर्माचें उत्तम रहस्य आह्मांस समजलें. (२) आतां प्रस्तुत वेळेस वीरमाहेश्वरांला दान दिलें असतां व त्यांची पूजा केली असतां काय फल मिळतें? तें आह्मांस सांग.—

(३) सूत बोलले—भाग्यवान ब्राह्मणहो, प्राणलिंगांगसंग करणाऱ्या माहेश्वराला दान दिलें असतां व त्यांची पूजा केली असतां काय फल मिळतें तें सांगतों. (४) याच विषयीं पूर्वी कुमारानें चंद्रशेखर शिवाला प्रश्न केला होता, तेव्हां श्रीशिवानें त्याला जें सांगितलें. (५) तें दानपूजाफल सांगतों, ऐका.

(६) श्रीशिव बोलले—हे कुमारा, शिवभक्ताला दान दिलें असतां व त्याची पूजा केली असतां काय फल मिळतें; तें सांगतों; ऐक. त्यापासून संसाराचे पाश तुटून जातात; व मनुष्याला चांगलें शिवज्ञान मिळतें. (७) जो प्राणी आपल्या हस्तपीठावर इष्टलिंग ठेवून त्यावर मन तल्लीन करून बाह्यकर्माचा त्याग करून त्याची पूजा करतो, तोच खरा वीरशैव होय. (८) त्रैलोक्यामध्यें प्राणलिंगांगसंगी लोक दुर्लभ आहेत. पूर्व सुकृत असेल तर कांहीं लोकांना मात्र मिळतात. (९) भक्तीनें

राऽऽराधितः शंभुर्भक्तिप्रणतमानसैः॥ तैरेव लभ्यः पुण्यात्मा शिवलिंगांगसंगभाक् ॥९॥ यत्र तिष्ठति लिंगांगसंबंधीशपरायणः ॥ निमिषं निमिषार्धं वा तच्छिवक्षेत्रमुच्यते ॥१०॥ लिंगांगसंगिनः पुंसो ये दृग्विषयवर्तिनः ॥ ते सर्वे पापनिर्मुक्ता यास्यन्ति परमां गतिम् ॥११॥ प्राणलिंगैकनिष्ठस्य देहं स्पृष्ट्वा समीरणः ॥ यत्र गच्छति तत्रस्था मर्त्या मुक्ता न संशयः ॥१२॥ शिवलिंगांगसंबंधभाजां दर्शनमात्रतः ॥ मुक्तिं गच्छन्ति मनुजाः पशुपक्षिमृगादयः ॥ लिंगांगसंगिनं मर्त्यं लिंगध्यानपरायणम् ॥१३॥ अनुव्रजति यो मर्त्यः सोऽपि मुक्तिमवाप्नुयात् ॥ या पूजा मम भक्तस्य कृता येन षडानन ॥१४॥ सा ममैव कृता पूजा तेन नास्त्यत्र संशयः ॥१५॥ वृत्तम् ॥ माहेश्वरस्य हृदयांबुजकर्णिकायां मध्ये वसामि गिरिराजसुतासहायः ॥ तं पूजयेद्य इह मां मनुजोऽर्चयेद्यस्तस्मै ददामि शिखिवाहन वांछितार्थान् ॥१६॥ बहिष्ठाः सर्वदा सर्वे त्वं नंदी गणनायकः ॥ ममात्मा प्राणलिंगैक्यः स एवाहं न संशयः ॥१७॥ वीरमाहेश्वरं मां च विभिन्नं प्रवदन्ति ये ॥ ते मूढा एव

---

प्रणतमन करून ज्यांनीं शिवाची आराधना केली असेल, त्यांनाच पुण्यात्मा शिवलिंगांगसंगी मिळतो.(१०) ज्याठिकाणीं लिंगांगसंबंधी ईशासक्त प्राणी निमिष किंवा निमिषार्ध असेल, तेंच शिवक्षेत्र असें समजावें. (११) लिंगांगसंगी प्राण्याच्या नजरेला जितके प्राणी पडतील, ते सर्व पापमुक्त होऊन श्रेष्ठगतीला जातात. (१२) प्राणलिंगाच्या ठिकाणीं एकनिष्ठ प्राणी जो असेल, त्याच्या देहावरून आलेला वारा जेथें वाहात जाईल, त्याठिकाणचे सर्व लोक मुक्त होतात, यांत संशय नाहीं. (१३) शिवलिंगांगसंबंध करणाऱ्या प्राण्यांच्या नुसत्या दर्शनानें मानव, पशु, पक्षी, मृग हे सर्व मुक्त होतात. (१४) लिंगांगसंगी प्राण्यावरोबर चार पावलें जो जातो; तोही मुक्तीला जातो. हे षण्मुखा, जी पूजा माझ्या भक्ताची केली असेल, (१५) ती पूजा माझीच केली ; यांत संशय नाहीं. (१६) माहेश्वरांच्या हृदयकमलकर्णिकेमध्यें हैमवतीसह (पार्वतीसह) मी वास करतों. हे शिखिवाहना, जो प्राणी या लोकांत माझी पूजा करतो त्याला मी इच्छित फल देतों. (१७) सर्व लोक, व तूं, व गणनायक नंदी हे सगळे बाहेरचे माझे प्राण आहेत. माझा खरा आत्मा प्राणलिंगी तो एकटाच आहे, तो प्राणलिंगी मचि आहें, यांत संशय नाहीं. (१८) जे लोक वीरमाहेश्वरामध्यें व माझ्यामध्यें भेद मानतात, ते लोक महामूर्ख

मनुजा नात्र कार्या विचारणा ॥१८॥ वृत्तम् ॥ अतः सुखार्थी शिवलिंगपूजकं समर्चयेन्नित्यमतंद्रितः सुधीः ॥ समस्तसंसारनिवृत्तये सदा जलान्नवस्त्राभरणांगनादिभिः ॥१९॥ युगपच्छिवलिंगैक्यपादस्पृष्टरजांसि च ॥ पतन्ति मस्तके यस्य स मुक्तो नात्र संशयः ॥२०॥ पादप्रक्षालनं यस्तु कुरुते शीतलोदकैः ॥ वीरमाहेश्वरस्यासौ चतुरंबुधिराड्भवेत् ॥२१॥ धृतलिंगस्य मर्त्यस्य पादप्रक्षालितं जलम् ॥ पापशुध्द्यर्थमज्ञानां तत्तीर्थं शिखिवाहन ॥२२॥ प्राणलिंगांगसंबंधिपादप्रक्षालितं जलम् ॥ लिंगांगसंगरहितः पिबेत्तत्तस्य पुण्यदम् ॥२३॥ दद्यान्मृद्वासनं यस्तु शिवभक्तस्य सादरम् ॥ धृतलिंगस्य स पुमान्सप्तद्वीपाधिपो भवेत् ॥२४॥ वस्त्रं शीतापनोदार्थं यो दद्याच्छिवयोगिने ॥ स सर्वभोगसंयुक्तं लभते ब्रह्मणः पदम् ॥२५॥ छत्रं चोपानहं यस्तु चामरं व्यजनानि च ॥ दद्याल्लिंगार्चकायासावैन्द्रं पदमवाप्नुयात् ॥ २६ ॥ धनं दद्याद्यथाशक्ति यः पुमांश्छिवयोगिने ॥ स धनेशत्वमाप्नोति स-

---

आहेत यांत विचार करावयासच नको आहे. (१९) याकरितां सुखार्थी प्राण्यानें बिन आळसानें शिवलिंगपूजकाची पूजा करावी. जल, अन्न, वस्त्र, आभरण, अंगना (स्त्रिया) इत्यादिकांनीं शिवभक्ताचा सत्कार केला असतां सर्व संसाराची निवृत्ति होते. (२०) एककालीं (एकदम) शिवलिंगाशीं सामरस्य करून घेणाऱ्याचे पायाचे रजःकण ज्याच्या मस्तकावर पडतील, तो मुक्त होतो, यांत संशय नाहीं. (२१) जो प्राणी थंड पाण्यानें वीरमाहेश्वर शिवभक्ताचें पादप्रक्षालन करतो, तो प्राणी चारी समुद्रांपर्यंत पृथ्वीचें राज्य करील. (२२) हे षण्मुखा, लिंगधारण केलेल्या मनुष्याचें पादोदक अज्ञजनांच्या पापशुद्धीकरितां ते तीर्थच आहे, असें समज. (२३) लिंगांगसंगरहित प्राण्यानें प्राणलिंगांगसंबंध करणाऱ्याचें पादोदक प्यालें असतां तें त्याला पुण्यदायक होतें. (२४) जो प्राणी आदरपूर्वक लिंगधारक शिवभक्ताला मृदु आसन देतो, तो प्राणी सप्तद्वीपाचा अधिपति होतो. (२५) शिवयोग्याला थंडीच्या निवारणा करितां वस्त्र जो देतो, त्याला सर्व भोगांनीं युक्त असें ब्रह्मदेवाचें स्थान मिळतें. (२६) छत्र, जोडा, चामर, व्यजन हे पदार्थ लिंगपूजकाला दिले असतां त्याला ऐंद्रपद मिळतें. (२७) जो प्राणी शक्त्यनुसार शिवयोग्याला धन देतो, तो प्राणी सर्व भोगांनीं युक्त अशा कुबेराच्या पदवीला

र्वभोगसमन्वितम् ॥२७॥ कारयित्वा गृहं सम्यक्सर्वोपकरणान्वितम्॥ लिंगांगसंगिने दद्याद्यस्स शैवं पदं लभेत् ॥२८॥ दानानां च समस्तानां चत्वार्येतानि भूतले ॥ श्रेष्ठानि कन्यागोभूमिविद्यादानानि सर्वदा ॥२९॥ तस्मात्कन्याप्रदानेन समं दानं न विद्यते ॥ सन्ततौ सन्तन्तौ तस्यां यान्यपत्यानि भूतले ॥३०॥ भवन्ति तेषां रोमाणि यावन्त्यंगेषु संति वै ॥ तावन्ति वर्षाणि नरो विमानं सार्वकामिकम् ॥३१॥ आरुह्य सर्वलोकेषु भ्रमन्कन्याप्रदः सुखम् ॥ सर्वभोगान्क्रमाद्भुक्त्वा ततो गच्छेच्छिवैक्यताम् ॥३२॥ पयस्विनीं सवत्सां गां सर्वालंकारभूषिताम्॥ यो दद्याच्छिवभक्ताय स गच्छेच्छिवसन्निधिम् ॥३३॥ दत्तायां भुवि संभूतवीजसंख्यातवत्सरान् ॥ भूमिदः शांभवे लोके सर्वान्कामानवाप्नुयात् ॥३४॥ यो दद्यादीशभक्ताय विद्याकोशस्य पुस्तकम् ॥ स सर्वकर्मनिर्मुक्तो न पिवेज्जननीस्तनम् ॥३५॥ ध्यानानामुत्तमं यद्वच्छिवध्यानं प्रकीर्तितम् ॥ दानानामुत्तमं तद्वद्विद्यादानमुदीरयेत् ॥३६॥ विद्यादानसमं दानं नास्ति लोकेषु सर्वदा ॥ विद्यया प्राणिनां मुक्तिस्तस्माद्दान-

---

जातो. (२८) सर्व साहित्यांनीं युक्त असें घर बांधून लिंगांगसंबंध करणाऱ्या प्राण्याला दिलें तर तो शैवपदाला जातो. (२९) सर्व दानांमध्यें भूतलावर चार दानें श्रेष्ठ आहेत. कन्या, गो, भू, विद्या हींच चार दानें होत. (३०) याकरितां कन्यादानासमान दुसरें दान नाहीं प्रत्येक संततीच्या वेळेस भूतलावर जी संतति होईल, (३१) त्या संततीच्या अंगावर जितके रोमांच असतील, तितक्या वर्षें पर्यंत सर्व मनोरथ परिपूर्ण करणाऱ्या विमानांत बसून लोकांत हिंडतो. (३२) कन्यादाता सर्व लोकांमध्यें याप्रमाणें फिरत फिरत सर्व भोगांचा उपभोग घेऊन क्रमानें शिवैक्य पावतो. (३३) सर्व अलंकार अंगावर घालून सवत्स दुभती गाय जो शिवभक्ताला देतो, तो शिवाजवळ जातो. (३४) भूदान केलें असतां त्या जमिनींत जितक्या संख्येचे धान्याचे दाणे असतील; तितकीं वर्षें शिवलोकांत सर्व भोगांचा उपभोग मिळतो. (३५) जो प्राणी शिवभक्ताला विद्याकोशाचें पुस्तक देतो; तो सर्व कर्मांपासून मुक्त होऊन पुनः मातोश्रीचें स्तनपान करीत नाहीं (पुनःजन्माला येत नाहीं). (३६) ध्यानांमध्यें शिवध्यान जसें श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणें दानांमध्यें विद्यादान श्रेष्ठ आहे. (३७) लोकांमध्यें (जगांत) विद्यादानासमान दुसरें दान नाहीं, विद्येनें प्राण्याला मुक्ति मिळते, याकरितां विद्यादान

मनुत्तमम् ॥३७॥ दद्यादन्नं महादेवभक्ताय शिवयोगिने ॥ सर्वपापवि-निर्मुक्तः शिवलोके महीयते ॥३८॥ यावन्त्यन्नस्य सिक्थानि दत्तस्य शिवयोगिने ॥ तावन्ति वर्षाणि नरो वसेच्छिवपुरे सुधीः ॥३९॥ अन्नं वा जलमात्रं वा यद्दत्तं लिंगधारिणे ॥ तदन्नं मेरुसदृशं तज्जलं सागरोपमम् ॥४०॥ यत्र माहेश्वरः कुर्याच्छिवलिंगार्चनं सकृत् ॥ वसंति तत्र तीर्थानि सर्वाणि सततं गुह ॥४१॥ आत्मनो यदभीष्टं तु तेन द्रव्येण पूजयेत् ॥ येन केन प्रकारेण शिवभक्तस्य चेतसः ॥४२॥ यस्तृप्तिं कुरुते मर्त्यः स वै शिवपुरं व्रजेत् ॥ संसारसागरेऽगाधे दुःखावर्तशताकुले ॥४३॥ मज्जतां मनुजानां वै पूजा माहेश्वरस्य नौः ॥ पाठांतरम् ॥ तस्मात्सर्वं परित्यज्य वीरमाहेश्वरं जनम् ॥ पूजयेदादराद्यस्तु स सम्यग्ज्ञानवान्भवेत् ॥४४॥ वृत्तम् ॥ न वीरमाहेश्वरसेवया विना शिवस्य भक्तिर्मनुजस्य विद्यते ॥ विनास्य भक्त्या शिववेदनं नहि प्रधानमेतच्छिवभक्तपूजनम् ॥४५॥

श्रीशंकर उवाच ॥ अत उक्तप्रकारेण शिवभक्तांस्तपस्विनः ॥ पूज-

---

हें श्रेष्ठ आहे. (३८) महादेवाचा भक्त शिवयोग्याला अन्नदान करावें. सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकांत तो पूज्य होतो. (३९) शिवयोग्याला दिलेल्या अन्नांत शितें जितकीं असतील, तितकीं वर्षे बुद्धिमान मनुष्य शिवपुरांत राहतो. (४०) अन्न किंवा नुसतें पाणी लिंगधारकाला जें दिलें असेल, तें अन्न मेरूसमान असून तें पाणी समुद्रासमान आहे, असें समजावें. (४१) ज्या ठिकाणीं एकवार शिवलिंगपूजा माहेश्वर करील, त्या ठिकाणीं हे षण्मुखा, सर्व तीर्थें राहतात. (४२) आपलें आवडतें द्रव्य जें असेल, त्या द्रव्यानें शिवभक्ताची पूजा करावी. कोणत्याहीं प्रकारानें शिवभक्ताच्या मनाची (४३) तृप्ति जो मानव करतो, तो शिवपुराला जातो दुःखरूपी अनेक भोवऱ्यांनीं युक्त अगाध संसारसमुद्रांत (४४) बुडणाऱ्या मानवांना माहेश्वरांची पूजा हीच एक नाव आहे याकरितां सर्व सोडून वीरमाहेश्वराची पूजा आदरानें जो करतो, तो चांगला ज्ञानी होतो. (४५) वीरमाहेश्वराच्या सेवेशिवाय मनुष्याला शिवाच्या ठिकाणीं भक्ति उत्पन्न होत नाहीं. भक्तीशिवाय शिवज्ञान होत नाहीं. याकरितां शिवभक्ताचें पूजन मुख्य आहे.

(४६) श्रीशिव बोलले—हे वत्सा, याकरितां मी सांगितल्याप्रमाणें तपस्वी

थानिशमव्यग्रो वत्स लिंगांगसंगिनः ॥४६॥ अस्मिन्नर्थे स्वयं वेद्ये श्रुतयः सकलागमाः ॥ पुराणानि समस्तानि पर्यवस्यन्ति युक्तयः ॥४७॥ बहुनोक्तेन किं वत्स सार एष मयोदितः ॥४८॥

सूत उवाच ॥ इत्युक्तः शंकरेणासौ श्रीमान्बर्हिणवाहनः ॥ ननाम गिरिशं भक्त्या सर्वज्ञं करुणानिधिम् ॥४९॥ यूयं श्रद्धान्विता विप्रा दानमानार्चनादिभिः ॥ षट्स्थलज्ञानवन्तं तं वीरमाहेश्वरं जनम् ॥५०॥ पूजयध्वं महाभागाः पूजा सा पुरुषार्थदा ॥ एष वः कथितो धर्मः सर्वधर्मोत्तमोत्तमः ॥५१॥ शिवप्रीतिकरो विप्राः शिवभक्तार्चनांकितः ॥ नातः परतरो धर्मस्त्रिषु लोकेषु विद्यते ॥५२॥ विद्यायां रमते यस्मान्मायां हेयां श्ववद्दहेत् ॥ अनेनैव निरुक्तेन वीरमाहेश्वरः स्मृतः ॥५३॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन वीरमाहेश्वरं जनम् ॥ आराधयत विप्रेन्द्रा यूयं भक्तिपुरःसराः ॥५४॥ य इदं पुण्यमाख्यानं शृणोत्येकाग्रमानसः ॥ शिवलिंगार्चनाकाले तस्मै शंभुः प्रसीदति ॥५५॥ गृहे यस्येदमाख्यानपुस्त-

---

लिंगांगसंगी शिवभक्तांची पूजा अहोरात्र व्यग्रमन न करतां कर. (४७) याविषयीं स्वयंवेद्य (आपलें स्वरूप आपणच जाणणारा) परमेश्वराच्या ठिकाणींच सर्व श्रुति, सर्व आगम, समस्त पुराणें, सर्व युक्त्या पर्यवसान पावतात (शिवाचें प्रतिपादन करतात.) (४८) हे वत्सा, फार काय सांगावयाचें आहे? सारांतला सार हा तुला मीं सांगितला.

(४९) सूत बोलले—याप्रमाणें श्रीशंकरानें ह्मटल्या बरोबर मयूरवाहनानें सर्वज्ञ, करुणानिधि, गिरिशाला भक्तीनें नमस्कार केला. (५०) ब्राह्मणहो, तुह्मी श्रद्धेनें युक्त होऊन दान, मान, अर्चन यांनीं षट्स्थल ज्ञानी वीरमाहेश्वर लोकांची आराधना करा. (५१) महाभागहो, तुह्मी त्यांची पूजा करा ती पूजा पुरुषार्थ देणारी आहे. सर्व धर्मांमध्यें हा धर्म अत्युत्तम असून श्रेष्ठ आहे. (५२) विप्रहो, शिवभक्त पूजा लक्षणाचा हा धर्म शिवाचा आवडता असून याच्या समान श्रेष्ठ धर्म त्रैलोक्यांत नाहीं. (५३) ज्याअर्थीं विद्येमध्यें रमतो, व मायेचा त्याग कुत्र्याप्रमाणें करतो, ह्मणूनच या अर्थानें त्याला वीरमाहेश्वर असें ह्मणतात. (५४) याकरितां ब्राह्मणहो, तुह्मी सर्व प्रयत्नांनीं वीरमाहेश्वराची आराधना भक्तिपूर्वक करा. (५५) जो प्राणी हें पुण्यकर आख्यान एकाग्रमनानें ऐकतो, शिवलिंगाची पूजा करावयाच्या वेळेस जो ऐकतो, व पठन करतो, त्याला श्री शंभु प्रसंन होतो. (५६) ज्याच्या घरीं या आख्यानाचें पुस्तक असेल त्याच्या ऐश्वर्याची समृद्धि

कं तिष्ठति ध्रुवम् ॥ तस्यैश्वर्यसमृद्धिः स्यान्नाग्निचोरभयं भवेत्॥५६॥ पठते श्रावयेद्यस्तु धर्माख्यानमिदं नरः ॥ स त्रिसप्तकुलोपेतः शिवलोके महीयते ॥५७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे शिवभक्तपूजामाहात्म्यकथने श्रीमदीश्वरस्कंदसंवादो नामाष्टसप्ततितमोऽध्यायः ॥ ॥ समाप्तोऽयं ग्रंथः ॥

---

होते, व त्याला अग्नीची भीति व चोरांची भीति मुळींच नाहीं. (५७) जो प्राणी या धर्माख्यानाचें श्रवण करतो, व करवितो, तो प्राणी आपल्या एकवीस कुळांसह शिवलोकांत पूज्य होतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील सदाचारनिरूपणांतील शिवभक्तपूजामाहात्म्यकथनांतील श्रीमदीश्वरस्कंदसंवादनांवाचा अठ्याहत्तरावा अध्याय संपला.

शुभमस्तु ॥ शुभंभवतु ॥ श्रीः ॥ श्रीः ॥ श्रीः ॥ श्रीः ॥



# विक्रीस तयार.



१. **वीरशैवसदाचारसंग्रह**— ( मराठी अर्थासह ) किंमत १२ आणे.
२. **सिद्धांतशिखामणि**— ( मराठी अर्थासह ) भाग १ ला किंमत १८८.
३. **सिद्धांतशिखामणि**— ( मराठी अर्थासह ) भाग २ रा किंमत १॥ रु.
४. **बसवेश्वरपुराण व्यासोक्त**– ( मराठी अर्थासह ) भाग १ ला किंमत १॥.
५. **बसवेश्वरपुराण व्यासोक्त**— ( मराठी अर्थासह ) भाग २ रा किंमत १॥.
६. **वीरशैवाचारप्रदीपिका**— ( मराठी अर्थासह ) किंमत २ रुपये.
७. **हरिहरतारतम्य**– ( मराठी अर्थासह ) किंमत ८४.
८. **पादोदकविचार**— आवृत्ति ३ किंमत ८२.
९. **रामायणसारसंग्रह**— ( अप्पयदीक्षितकृत ) किंमत ६ आ०
१०. **उपयुक्त वेचे**— किंमत ८७.
११. **विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण** — कानडी टीकेसह किंमत आ० ४.
१२. **पारमेश्वरागम** —भाग १ ला मराठी अर्थासह किंमत १ रुपया.
१३. **पारमेश्वरागम** —भाग २ रा मराठी अर्थासह किंमत १ रुपया.

१४. **प्रभुलिंगलीला** —भाग १ ला ( भविष्यत्पुराणांतर्गत ) यांत अल्लमप्रभूची लीला फारच चटकदार रीतीनें वर्णिलेली आहे. किंमत १८८.

१५. **प्रभुलिंगलीला** —भाग २ रा ( भविष्यत्पुराणांतर्गत ) ह्यांत प्रमथगणांचे अवतार, त्यांचीं चरित्रें व महादेवीअक्कास कृतार्थ केल्याचें वर्णन आहे. किंमत १८४.

१६. **प्रभुलिंगलीला**-- भाग ३ रा ( भविष्यत्पुराणांतर्गत ) ह्यांत अल्लम प्रभूनें बसवेश्वरास व इतर भक्तांस तत्वोपदेश केल्याचें वर्णन आहे. किंमत १ रुपया.

१७. **पंचाचार्यपंचमोत्पत्तिप्रकरणम्** — ( सुप्रबोधागमांतर्गत ) यांत पंचाचार्य व पंचम यांची उत्पत्ति कशी झाली याबद्दल माहिती आहे. किंमत आ० ६.

१८. **वीरमाहेश्वरप्रकरणम्**—(स्कन्दपुराण शंकरसंहितामध्यपठित) किं. ८ आ.
१९. **दीक्षादिकथनम्**—( श्रीव्यासकृत लिंगपुराण उत्तरभागांतील ) किं. २ आ.
२०. **सूक्ष्मागम** —किंमत आ० १०, याचें स्वरूप व महत्त्व समजावें म्हणून याचें पटल पांचवें किंमत आ० १, सहावें किंमत आ० १. सातवें आ० १। व नववें किं. ९ पै. हीं निराळीं छापविलीं आहेत.

२१. **संक्षिप्त लिंगपूजाविधि** —किंमत ९ पै.
२२. **वीरशैवलिंगिब्राह्मण वंशावलिपट** —किंमत आ० १.
२३. **व्यापारसाम्राज्य पूर्वार्ध** —किंमत १ रुपया.
२४. **शिवपरअभंग** —किंमत ७ आणे.

२५. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी** —भाग १ ला. किंमत ५ आणे.

२६. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी** —भाग २ रा. किंमत ५ आणे.

२७. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी** —भाग ३ रा. किंमत ४ आणे.

२८. **मराठी सिद्धरामेश्वर चरित्र** —किंमत ७ आणे.

२९. **वीरशैवदीक्षाविधि वीरमाहेश्वरदीक्षाविधि**— वीरशैव सदाचारसंग्रहांतील प्रकरण ११ वें. किंमत १ आणा.

३०. **शिष्यवर्गसंप्रदायनिरूपण**— ( शिष्य कोणाला करावा याचा विचार ) वीरशैवसदाचारसंग्रहांतील प्रकरण १४ वें. किंमत १ आणा.

३१. **शिवपुराण वायवीयसंहिता पूर्वभाग**— मराठी अर्थासह कि. २ रु.

३२. " " **उत्तरभाग**— मराठी अर्थासह २ रुपये.

३३. **भारतसारसंग्रह**—मराठी अर्थासह किंमत आ० ६.

३४. **वीरशैव खानेसुमारी**—किंमत १ आणा.

३५. **वीरशैव मतसंवर्धिनी**—किंमत २ आणे.

३६. **संक्षिप्त विवाहविधि**—किंमत ३ आणे.

३७. **विशेषार्थप्रकाशिका**—मराठी अर्थासह ७ आणे.

३८. **अनादिवीरशैवसारसंग्रह** — मराठी अर्थासह भाग १ ला. कि. १॥.

३९. **अनादिवीरशैवसारसंग्रह** — मराठी अर्थासह भाग २ रा. कि. १॥.

४०. **विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण**—मराठी अर्थासह कि. ११ आणे.

४१. " —केवळ कानडी टीका. कि. ४ आणे.

४२. **कैवल्यसार**—किंमत १० आणे.

४३. **वीरमाहेश्वराचारसंग्रह**—( मराठी अर्थासह ) भाग १ ला. १॥ रु.

४४. " —( मराठी अर्थासह ) भाग २ रा. २ रु.

४५. **दशकर्मपद्धति**—किंमत १। रुपया.

४६. **शिवचरित**—किंमत ७ आणे.

४७. **वीरशैवाच्या धर्मसमजुतीस सरकारांतून मान**— कि. २ आणे.

४८. **तात्पर्यसंग्रह**—( मराठी भाषांतरासहित ) किंमत २॥ आणे.

यांपैकीं कोणत्याही ग्रंथांच्या एकदम दहा प्रती घेणारास एक प्रत बक्षिस मिळेल.

**छापत असलेले ग्रंथ**—शिवपूजापद्धति.

## ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें.

सोलापूर येथें रावसाहेब मलप्पा वसप्पा वारद यांचे दुकानीं व मुंबई, विजापूर व कलबुर्गा येथें रावसाहेब वारद यांचे दुकानीं विकत मिळतील.

